ॐ भूयानसि महानसि

# मराठी भाषा

## उद्गम व विकास

लेखक


कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी, एम्. ए., बी. टी.

संशोधक, पेशवे दप्तर

भाषाशास्त्र, संस्कृत नाटकें इत्यादि पुस्तकांचे कर्ते



The Internationl Book Service

Publishers

POONA 4

1933

# अनुक्रमणिका

[ आंकडे परिच्छेदाचे आहेत. ]

## प्रकरण पांचवें:—मराठीचे प्रांतिक भेद पृ. २४२–२८९



## प्रकरण सहावें:—मराठीची वर्णप्रक्रिया पृ. २९०–३२५

## प्रकरण सातवें:—मराठीचें व्याकरण पृ. ३२६–३८४





# मराठी भाषा

## उद्गम व विकास

### प्रकरण पहिलें

## भाषाशास्त्राचीं सामान्य तत्त्वें

१ भाषा हा शब्द भाष् [ भाष् शब्दे ( बोलणें या अर्थी ) ] ह्या धातू-पासून आला आहे. भाषा म्हणजे ध्वनींचा समूह. ह्या ध्वनींचा उपयोग मानवी व्यवहार सुकर करण्याकडे करतात, म्हणूनच भाषा हें व्यवहाराचें मुख्य साधन ठरतें. मनुष्याच्या ज्या कांही जातिक वृत्ति आहेत त्यांमध्ये ध्वनि उत्पन्न करणें ही एक वृत्ति आहे. खरें पाहिलें असतां ही वृत्ति सर्व प्राण्यांना साधारण अशी आहे. मानवानें उत्पन्न केलेला आवाज आणि इतर प्राण्यांनी उत्पन्न केलेला आवाज ह्यामध्ये एक फरक आहे. आवाजांना किंवा ध्वनींना एक व्यवहारोपयोगी अर्थ देणें, ध्वनि आणि वस्तु ह्यांचें साहचर्य साधणें, किंवा ध्वनींना 'संकेत' उत्पन्न करणें हें मनुष्याच्या बाबतींतच शक्य आहे. इतर प्राण्यांना आपल्या स्वताच्या ध्वनींना व्यव-हारोपयोगी असा अर्थ किंवा 'संकेत' देतां येत नाही. मनुष्याच्या ज्या निरनिराळ्या व्याख्या कांही तत्त्ववेत्त्यांनी केल्या आहेत, त्यांत 'मनुष्य हा बोलणारा प्राणी आहे' अशी एक व्याख्या आहे ती ह्याच दृष्टीनें केली आहे. ध्वनि उत्पन्न करणें हें जरी इतर प्राण्यांना साधलें तरी त्या ध्वनींना क्रम देणें, त्यांच्यांत अर्थ भरणें, त्याचें पौर्वापर्य साधणें वगैरे बाबींसाठीं जें एक बौद्धिक सामर्थ्य लागतें तें इतर प्राण्यांच्या अंगीं नसतें. इतर प्राण्यांच्या जीवनापेक्षा अधिक सोयीस्कर, सुखकर, आनंददायक अशा प्रकारचें

आपलें जीवन मनुष्याला ह्या त्याच्या भाषेच्या साहाय्याने करतां येतें. व्यवहारसौकर्याचीं इतर साधनें हात, डोळे, तोंड इत्यादि अवयवांच्या हालचाली, चिन्हें, चित्रें वगैरे जरी असलीं तरी त्या सर्वांपेक्षा अधिक सोयीस्कर असें साधन म्हणजे भाषा होय, व ती मानवाश्रित आहे.

ईश्वराने आपली प्रत्यक्ष प्रतिमा म्हणून जरी मनुष्यप्राणी निर्माण केला असला तरी व त्याला वर निर्दिष्ट केलेली शक्तीची देणगी दिली असली तरी त्यायोगे भाषा ही ईश्वरी देणगी ठरत नाही. भाषेमध्ये ईश्वरकर्तृत्व केवळ ध्वन्युत्पत्तिपुरतेंच आहे. ध्वनीनंतरची भाषेची सर्व उभारणी मानवकर्तृक आहे.

२ अशी वस्तुस्थिति असतां पूर्वीच्या सर्व धर्मग्रंथांत भाषा ही ईश्वरनिर्मित असल्याचीं वर्णनें आहेत. बहुतेक धर्मांच्या ग्रंथांत उत्पत्तिकाण्डांत विश्वांतील यच्चावत् वस्तु उत्पन्न करतांना परमात्म्याला—"स ऐच्छत बहु स्याम्" —पुष्कळ होण्याची इच्छा झाली, त्याने प्रत्येक वस्तूंत आपला अंश घातला व सर्व सृष्टीची उभारणी केली असें वर्णन आहे. सर्व वस्तूंच्या अगोदर भाषेची उत्पत्ति झाली आणि तिने सर्व वस्तूंना नामधेयें दिलीं असें ऋग्वेदांत वर्णन आहे.[1] उत्पत्तिक्रमांत आत्म्यास प्रधानपद देऊन त्यापासून आकाश, आकाशापासून वायु, वायूपासून इतर तत्त्वें असा क्रम सांगितला आहे. मनुस्मृतीमध्ये पहिल्या अध्यायांत हाच क्रम दिला आहे.

" मनः सृष्टिं विकुरुते चोद्यमानं सिसृक्षया ।
आकाशं जायते तस्मात्तस्य शब्दं गुणं विदुः । १–७५

विराट्पुरुष मन उत्पन्न करतो आणि तें मन नानाविध अशी सृष्टि उत्पन्न करतें. आपल्या इकडच्या पौरस्त्य ग्रंथांत ईश्वराने भाषा उत्पन्न केली असें प्रत्यक्ष वर्णन नसून भाषेचें मूळ जो शब्द किंवा ध्वनि किंवा स्फोट तो उत्पन्न केला असें वर्णन आहे. आरण्यक ग्रंथांत वाणीच्या उत्पत्तीचें वर्णन बरेंच विस्तृत आढळतें.[2] पुढे उपनिषत्कालीं वाणी व तिचें विवेचन ह्यांस अधिक महत्त्व दिलेलें आढळतें. ऋग्वेदादि

१ बृहस्पते प्रथमं वाचो अग्रं यत्प्रैरत नामधेयं दधानाः ॥ ऋ. १०·७१·१.
२ ऐतरेय आरण्यक २.

वाङ्मयाला विशेष महत्त्व प्राप्त झाल्यामुळे किंवा ऋग्वेद म्हणजेच तेवढें चांगलें वाङ्मय अशी समजूत असल्यामुळे ऋग्वेद म्हणजे वाणी अशी समजूत होऊन बसली. "अथाध्यात्मं वागेवर्क् प्राणः साम" किंवा "वाग्वाव नाम्नो भूयसि वाग्वा ऋग्वेदं विज्ञापयति" ह्या विधानांच्या मुळाशीं तीच समजूत आहे. मन, प्राण आणि वाक् हीं तीन तत्त्वें आत्म्याने आपल्याला अन्न म्हणून निर्माण केलीं. "यः कश्च शब्दो वागेव सा" आणि "त्रयो लोका एत एव वाक्" असल्या वाक्यांत वाणीची आणि भाषेची व्याप्ति किती समजली जात होती हें दिसून येतें. "सर्वेषां वेदानां वागेकायनम्" ह्यावरून सर्व वेदिक वाङ्मयाची गति म्हणजे वाणी इतकी वाणीची व्याप्ति वाढली. बृहदारण्यकोपनिषद् व कांही व्याकरणग्रंथांत वाणीस कामधेनु कल्पिली आहे, व स्वाहाकार, वषट्कार, स्वधाकार हे तिचे स्तन व त्यांवर देव व पितर अशा योनि पोसल्याचें वर्णन आहे.

ख्रिस्ती मताप्रमाणे आदिमानव जो ॲडम तो ईश्वराचा पुत्र असून ईश्वराने सर्वांगपरिपूर्ण अशी भाषा त्याच्या उपयोगासाठी त्याच्या स्वाधीन केली. पृथ्वीवर असलेल्या धुळीच्या कणांपासून त्याचें शरीर तयार करून त्यांत जीवितसार ओतलें. त्याच्या उपयोगासाठी व सुखासाठी त्याने 'प्रकाश असूं दे' असें म्हटलें आणि जिकडे तिकडे प्रकाश झाला. "भाषा असूं दे" असें म्हटलें आणि भाषा तयार झाली. अशा तऱ्हेचें ईश्वराच्या इच्छेनेच सर्व विश्वाची उभारणी झाल्याचें वर्णन बायबलच्याच उत्पत्तिकांडांत आहे. सर्व पृथ्वीवर एकच भाषा व बोली होती आणि बाबेल येथें सर्व पृथ्वीवरील भाषांचा घोटाळा होऊं लागला म्हणून ईश्वराने निरनिराळ्या देशांत त्या फेंकल्या.[१]

अशा तऱ्हेचीं कोठे आलंकारिक तर कोठे श्रद्धामय अशीं भाषेच्या उत्पत्ती संबंधी वर्णनें आढळतात. मनुष्याचा स्वभाव कितीहि श्रद्धाळू असला तरी परिपक्व, पूर्ण व सांग झालेली भाषा ईश्वराने मनुष्याच्या ताब्यांत दिली ह्या सिद्धांतावर सध्याच्या शास्त्रीय युगांत विश्वास बसणें शक्य नाही. ईश्वराने सर्व शब्दांचा कोश थोडाच तयार केला होता की, जो त्यानें आपल्या

१ Holy Bible Jenisis ch. XI, 1, 9.

आवडत्या लेकरांस दिला ! लहान मूल जसें आपली भाषा आपल्या अनुभवाने हळूहळू वाढवितें तसेंच मानवांच्या आद्य समाजाने भाषेची पहिली पुंजी हळूहळू भोवतालच्या परिस्थितीच्या व समाजांतील इतर घटकांच्या साहाय्याने वाढविली हें उघड आहे.

३ भाषेच्या उत्पत्तीचा उलगडा करतांना आणखी एक दुसरी उपपत्ति पुढे मांडण्यांत येते. " कदाचित् भाषा ही ईश्वराची देणगी नसेल, परंतु सृष्टि उत्पन्न झाल्याबरोबर जो एक मानवांचा आद्य समाज तयार झाला त्याने आपआपसांत सभा भरवून त्यांच्या नेत्याने म्हणजे राजाने व्यवहाराच्या सोयीकरिता कांही शब्दांचा समूह तयार करून कांही तरी नियमाने बोली बांधून भाषेसंबंधी आरंभ केला असावा ". ह्या उपपत्तींतहि फारसें तथ्य नाही. कोणी जुलुमाने रूढि पाडूं शकत नाही व भाषेच्या बाबतींत राजाला रूढि पाडतां येत नाही. शब्दाचा संकेत उत्पन्न करणें म्हणजे एक प्रकारची रूढि पाडणें आहे व हें राजाच्या आवाक्याबाहेरचें आहे. धर्माच्या बाबतींत रूढि पाडतां येईल. राजकीय बाबतींतहि एका मनुष्याचा शब्द कायदा म्हणून पाळला जाईल. परंतु भाषेच्या बाबतींत धार्मिक सत्ता अथवा राजसत्ता अगदीं लंगड्या पडतात. अमक्याने अमका शब्द अमक्या प्रकारानेच उच्चारिला पाहिजे, अमुकच स्वर काढला पाहिजे, अमक्या शब्दाला अमुकच एक अर्थ पाहिजे असा नियम करणें कठीण आहे. भाषादेवीचा संचार नेहमी स्वैरवृत्तीनें चाललेला असतो. तिला कोणाचींहि बंधनें सहन होत नाहीत. फार तर ती आपल्या भक्तांना आपल्या अंगावर नानातऱ्हेचीं भूषणें घालून आपल्या नेत्रांचे पारणें फेडण्यास मुभा देईल. ती कोणा राजाची, धर्मगुरूची अथवा विशिष्ट समाजसमूहाची इतकेंच नव्हे, तर प्रत्यक्ष ईश्वराचीहि सत्ता कबूल करीत नाही. भाषेच्या घटनेस लागणारे ध्वनि उत्पन्न करण्याची शक्ति मनुष्यास ईश्वराने दिली. व ध्वनि उत्पन्न केल्यानंतर त्या ध्वनींवर व्यवहारोपयोगी अशा अर्थाचा आरोप किंवा संकेत उत्पन्न करणें हें मनुष्याने हळूहळू करून भाषा पूर्ण व सांग अशी बनवली. आता संकेत उत्पन्न करणें किंवा शब्दांना अर्थ देण्याची क्रिया तरी कशी झाली हें पाहूं.

४ आवाज उत्पन्न करण्याची शक्ति मानवाप्रमाणे इतर प्राण्यांमध्येहि

ईश्वराने उत्पन्न केली आहे. परंतु त्या ध्वनींना अर्थ चिकटविणें, हें त्या इतर प्राण्यांना साधत नाही. हें काम मनुष्यच फक्त करूं शकतो. मानव-प्राण्यांचा विशेष काय तो हाच. आवाज उत्पन्न करतांना त्याच्या मार्गांत मुखांतील इंद्रियांच्या साहाय्याने अडथळे ठेवले म्हणजे त्याच एका आवाजांचे निरनिराळे प्रकार उत्पन्न होतात. आवाज उत्पन्न करण्याचीं मनुष्याचीं इंद्रियेंहि त्याच्या इतर इंद्रियांबरोबर हळूहळू उत्क्रांत झालीं आहेत. एक काळ असा होता की, त्या वेळेस मनुष्यहि इतर प्राण्यांप्रमाणे एकच स्वर उत्पन्न करीत होता. जसजसे दिवस जात चालले तसे त्याला ह्या एकतानी स्वराच्या साहाय्याने सुख व दुःख दाखवितां येऊं लागलीं. मनुष्याने प्रथम उत्पन्न केलेला जो आरोदन अथवा आरटन स्वर तो भाषेचें मूळ ( आद्य-स्वरूप ) म्हणण्यास हरकत नाही; भाषेचें बीज त्यांतच आहे; भाषेचें गर्भावस्थेंतील स्वरूप त्यांत आहे. ह्या आरोदन किंवा आरटन एकतानी सुराचे निरनिराळे प्रकार उत्पन्न झाले. त्याची पुनरावृत्ति, कमी अधिक प्रमाणांत होणारे त्याचे ऱ्हस्वदीर्घ उच्चार हे भाषा उत्पन्न करण्याचे मनुष्याचे प्रथमचे प्रयत्न असावेत. पहिल्या मनुष्याचा किंवा मानवी समाजाचा प्रथमचा शब्दकोश म्हणजे ह्या एकतानी सुराचे पांच किंवा सहा प्रकार, इतक्यापुरताच असला पाहिजे. त्या प्रकारांनी अंतःकरणांतील भावना दाखवितां येत असाव्यात. त्या आद्यमानवांच्या गरजाहि थोड्याच म्हणजे ज्याच्यावर जीविताचें अस्तित्व अवलंबून रहावयाचें अशाच स्वरूपाच्या —उदाहरणार्थ क्षुत, तृष्णा, भय, आशा, इच्छा, सुख, दुःख इत्यादि— असल्यामुळे त्या भावना दाखविण्यासाठी आरटनाच्या एकतानी सुराचे निरनिराळे प्रकार त्याने उत्पन्न केले असावेत. भाषारूप नदीचा उगम आणि तिच्या उगमाजवळची अल्पशी पाण्याची धार हीं अशा स्वरूपाचीं होतीं. आता ह्यापुढचा तिचा झालेला विस्तार क्रमाने पुढे पाहूं.

कोणत्याहि भाषेच्या हल्लींच्या सुधारलेल्या व संपूर्ण अशा स्वरूपावरून भाषेच्या मूळ उत्पत्तीची कल्पना येणें अशक्य आहे. दिवसानुदिवस वाढणाऱ्या ज्ञानवृद्धीबरोबर भाषावृद्धिहि होत असते व अशा रीतीने मूळावर इतके थर साचत जातात की, मूळाबद्दलची माहिती पार बुजून जाते. भाषेच्या उत्पत्तीसंबंधी निरनिराळे सिद्धांत पाश्चात्य भाषाकोविदांनी मांडले

आहेत. त्यांपैकी महत्त्वाचा सिद्धांत म्हटला म्हणजे भाषेची उत्पत्ति व वाढ 'अनुकरण' ह्या मानवी जातिक वृत्तीवरून झाली आहे हा होय. हा सिद्धांत डॉ. गायगर ह्या भाषापंडिताने प्रथम मांडला. कुत्रा, मांजर, कावळा इत्यादि परिचित प्राण्यांचें स्वरानुकरण करूनच त्यांना नामाभिधान देण्याची प्रवृत्ति लहान मुलांच्या भाषेंत आपण पाहतों. व हीच प्रवृत्ति आद्यभाषेच्या बाबतींत असली पाहिजे. 'म्यॉंव' म्हटलें म्हणजे मांजर, 'हम्मा' म्हणजे गाय, 'काव' म्हणजे कावळा, इत्यादि त्या त्या प्राण्यांची कल्पना येण्यास व त्यांना योग्य 'नांव' मिळण्यास हे त्यांच्या ध्वनींच्यासारखे शब्दच कारणीभूत होतात. 'कुत्रा किंवा गाढव' ह्या प्राण्याचे वाचक शब्द भाषेंत नाहीत आणि त्या प्राण्यासंबंधाची कल्पना तर बोलणाऱ्यास दुसऱ्याला कळवावयाची आहे. अशा स्थितींत तो ती कशी कळविणार ? त्या त्या प्राण्यांचीं चित्रें काढून व किंवा त्यांच्या एखाद्या अंगविक्षेपाची उदाहरणार्थ—शेपूट हलविणें, फुरफुरणें ह्याची खूण करून त्या त्या प्राण्याची कल्पना आणून देतां येईल हें खरें. पण हे सर्व मार्ग 'ध्वनिभाषा' नव्हत. ध्वनिभाषा म्हणजे ह्याचे दर्शक असे त्यांना प्रतिशब्द पाहिजेत. कुत्र्याचा जो 'भो भो' भुंकण्याचा स्वर किंवा गाढवाच्या खिंकाळण्याचा स्वर, ह्या स्वराच्या साहाय्याने त्या प्राण्यांना नांव मिळतें. लहान मुलांची भाषा तर असल्या ध्वन्यनुकरणजन्य शब्दांचीच बनलेली असते. नामांच्याच बाबतींत ह्या ध्वन्यनुकरणतत्त्वाचा प्रभाव दिसून येतो असें नाही, तर क्रियेच्या बाबतींतहि दिसून येतो. क्रियेच्या प्रतिध्वनीवरुनहि त्या क्रियेला योग्य नांव मिळतें. उदाहरणार्थ, ताडकन् मारणें, टारकन् फाडणें, सुळकन् जाणें, मुळूमुळू रडणें, पाऊस झिमझिम पडणें, सपाटणें, झपाटणें, ठोकणें, बोंबलणें झंझाळणें, वगैरे सर्व क्रियापदें त्यांच्या ध्वनींवरूनच रूढ झालीं आहेत. मुसमुसणें, फुणफुणणें, तणतणणें, भणभणणें यासारखे मानवी विकारामुळे उत्पन्न झालेल्या क्रियाप्रतिध्वनींपासून बनलेले शब्द याच वर्गात पडतील. सारांश, भाषोत्पत्ति व भाषाविस्तार यांना हा अनुकरण—किंवा प्रतिध्वनि—सिद्धांत बराच लागू पडतो. ह्या सिद्धांतास मॅक्समुलरनें Bow-wow Theory असें नांव दिलें आहे.

५ भाषेला जन्माला आणण्यास व पुढे तिचें संगोपन करण्यास स्वरानुकरण

कितीहि कारणीभूत झालें तरी तें एकटेंच तेवढें भाषेच्या उत्पत्तीचें कारण आहे असें म्हणतां येणार नाहीं. भाषेंतील सर्व शब्दांची ह्या एका कारणानें उपपत्ति लागूं शकत नाही. एखादा पक्षी रँव रँव असा आवाज करतो म्हणून त्याला कारंडव म्हटलें. दुसरा 'कु' 'कु' असा शब्द करतो म्हणून त्याला कुक्कुट म्हटलें. मांजरास कोणीं तोंड साफ करतांना पाहिलें म्हणून त्याला मार्जार म्हटलें. तें मँव, मँव, असा शब्द करतें म्हणून त्याला माऊ, माऊबाई, मनुबाई इत्यादि नांवानें संबोधिलें. हें सर्व खरें आहे. पण ह्या सदराखाली न येणारे शब्द पुष्कळ आहेत. सजीव प्राण्याच्या बाबतींत प्रत्यक्ष स्वरोत्पादन, व त्या स्वराचें अनुकरण व त्याप्रमाणे त्याला नांव ह्या गोष्टी शक्य तरी आहेत. पण निर्जीव अचेतन पदार्थांच्या बाबतींत हें कांही शक्यच नाही. शिवाय भावना, इच्छा, भय इत्यादि विकारवाचक शब्दांची उपपत्ति कशी लावावयाची व त्यांना नांवें कशी द्यावयाचीं ? तेव्हां अशा ठिकाणीं पदार्थांना योग्य नामाभिधान देण्याचें काम मनुष्याची भावनामय प्रवृत्ति करते. एका उदाहरणानें हें जास्त स्पष्ट होईल. भाषा अवगत नसणाऱ्या पहिल्या माणसानें ज्या वेळेस अरण्यांत लांडगा किंवा तसलाच एखादा हिंस्र प्राणी आपल्या स्वताकडे येतांना पाहिला असेल त्यावेळीं भीतीनें गांगरून जाऊन त्याच्या तोंडांतून पहिला शब्द कोणता बाहेर पडला असावा ? अंतःकरणाच्या वृत्तीवर जबरदस्त धक्का बसल्यामुळे कांहीतरी भावनाप्रेरित व विकारप्रधान असा शब्द बाहेर पडणार ह्यांत कांही वाद नाही. तो मनुष्य काय ओरडला असेल ? लांडगा ! लांडगा ! लांडगा ! असें ओरडला किंवा धावा ! धावा ! असें ओरडला ! किंवा आला ! आला ! असें ओरडला ? कांहीतरी ओरडला हें खास. जें कांही भावनाप्रधान किंवा विकारप्रधान ओरडला त्यास उद्गारवाचक म्हणावयास हरकत नाही. 'लांडगा, आला, धावा' ! इत्यादि स्फोटशब्द हे व्याकरणाच्या नियमानें नाम किंवा क्रियापदें असले तरी ते ज्या भावनेने उच्चारिले गेले त्या दृष्टीनें ते उद्गारवाचकच ठरले पाहिजेत. कांही विशिष्ट विकाराचा पगडा बसून मनुष्य जे उद्गार काढतो ते भाषेच्या उत्पत्तीच्या मुळाशीं आहेत. 'शि ! शि ! छे ! छे ! अबब, अरेरे' इत्यादि भावनाप्रधान उद्गारवाचक शब्द आहेत. अशा रीतीनें भाषेच्या उत्पत्तीचें व वाढीचें कारण ही भावनाप्रधान शब्द उत्पन्न करण्याची मानवी शक्ति आहे

हें उघड आहे. कांहीं ठिकाणीं हा 'भावनामय उद्गार सिद्धांतच' (Pooh Pooh Theory) लागू पडत नाहीं. " विकारप्राबल्यामुळे तोंडांतून शब्द बाहेर पडत नाहीत! त्या परिस्थितींत भाषाच खुंटते, तेव्हां तिची उत्पत्ति व वाढ कशी होणार ?" या मुद्यावर वरील सिद्धांतास विरोध करण्यांत जरी येतो, तरी भाषेंतील कांहीं शब्द भावना किंवा विकार ह्यांच्या प्राबल्यानें तयार होतात हें खरें आहे. व त्याच दृष्टीने व तितक्या पुरतचा भावनामय उद्गाराचा हा सिद्धांत भाषेच्या मुळाशीं ठेविला आहे.

६ भाषेच्या उत्पत्तीचें आद्यकारण जें अनुकरण म्हणून वर दिलें आहे त्याची चेष्टा करण्याच्या हेतूनें त्याला ' भो भो ' ( Bow-wow ) असें निंदाव्यंजक नांव मॅक्समुल्लरनें दिलें. त्याला हा सिद्धांत मान्य नसल्यामुळे त्यानें भाषेच्या उत्पत्तीच्या व वाढीच्या कारणाबद्दल एक निराळाच सिद्धांत मांडला. तो ' Dingdong ' ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. त्याचें म्हणणें असें कीं, प्रत्येक शब्दाला त्याचा म्हणून एक नाद असतो व तो नाद त्या शब्दानें दाखविलेल्या पदार्थाकडून जी क्रिया होते त्या क्रियेचा दर्शकच तो शब्द असतो. शब्दाचा नाद आणि त्याचा अर्थ ह्या दोहोंमध्यें एकतऱ्हेचा समत्वाचा संबंध असतो. दोन्ही एकमेकांचे पूरक असतात. ह्या सिद्धांतास आम्ही ' ठणठण ' सिद्धांत असें नांव देतों.

खरें पाहिलें असतां अनुकरण सिद्धांत आणि हा Dingdong सिद्धांत ह्या दोन्हींमध्यें विशेष फरक नाहीं. एक सजीव सचेतन प्राण्यांचा प्रतिध्वनि तर दुसरा Dingdong हा निर्जीव अचेतन पदार्थांचा प्रतिध्वनि आहे. दोहोंतहि प्रतिध्वनींचा संबंध आहे व त्या प्रतिध्वनीप्रमाणें तद्दर्शक शब्दाची उत्पत्ति होते.

७ भाषेच्या उत्पत्तीसंबंधी वर दिलेल्या तिन्हीं सिद्धांतांनीं समाधान न झाल्यामुळे लुडविग न्वार (Ludwig Noire) ह्या भाषाशास्त्रज्ञानें yo-he-yo म्हणून एक सिद्धांत बसविला. ह्या सिद्धांताचा थोडक्यांत गोषवारा असा आहे. आपल्याकडे शेतकरी लोक शेतामध्यें काम करीत असतां आपले श्रम नाहींसे व्हावे, त्यांचा विसर पडावा म्हणून सर्व जण एकसुरानें " भुलेरी दादा भुलेरी" हें गाणें म्हणत असतात. बांधकाम चाललें असतां मजूर "रामाच्या

ग बागेमंदी, बागेझुंदी' अशासारखीं कांही श्रमविनोदनपर गाणीं म्हणत असतात. त्याचप्रमाणे आद्यमानवांच्या संघाने अशींच कांही सर्वांनी मिळून संघांनी गाणीं म्हटलीं असावींत व त्या गाण्यांत जी त्यांनी स्वरमालिका योजिली तिच्यापासून मूळ भाषा उत्पन्न झाली.

८ भाषेची उत्पत्ति प्रेममूल आहे हा सिद्धांत जेस्परसन ह्या शास्त्रज्ञाने मांडला आहे. मनुष्याच्या सहजात वृत्तींपैकी एकमेकांवर प्रेम करणें ही एक महत्त्वाची सहजात वृत्ति आहे. व मनुष्यच काय परंतु यच्चावत् प्राणिमात्र हा स्वभावतः प्रेमाचा वेडा आहे. दुसऱ्यावर प्रेम करणें आणि दुसऱ्याकडून प्रेम करून घेणं हें सर्व प्राणिमात्रांला आवडतें. अशा प्रेमाच्या फेऱ्यांत सापडला म्हणजे प्राणिमात्र नाचूं, उडूं, बागडूं व गाऊं लागतो. अशा प्रेमाच्या मोहक प्रसंगांत असतांना आपल्या प्रेमाची पूर्तता करण्यासाठी त्याला भाषेसारख्या साधनाची जरुरी लागली असावी व त्या साधनाचा उपयोग त्याने आपल्या प्रेमपात्राच्या आराधनेसाठी केला असावा. गायनाच्या अथवा गुणगुणण्याच्या स्वरूपांत भाषा प्रथम उद्भवली असावी व तेंच भाषेचें आद्यस्वरूप असलें पाहिजे. कोणत्याहि समाजाच्या भाषेचें आद्यस्वरूप पाहिलें तर तें पद्यमय असतें, ह्याचें कारण हेंच होय. भाषेचें मूळ स्वरूप गान; तें प्रेमामुळे उत्पन्न झालें आणि प्रेम करणें ही मानवांची एक मुख्य जातिक वृत्ति आहे. प्रेमयुक्त गान हें भाषेचें मूळ कारण आहे हा जेस्परसनचा सिद्धांत आहे.[1]

९ भाषेच्या उत्पत्तीसंबंधी जीं कांही पांच मतें वर दिलीं आहेत त्यांपैकी कोणत्याहि मताने भाषेच्या उत्पत्तीचा उलगडा नीट होत नाही. मनुष्य हा प्राणी प्रथम भाषा कशी शिकला किंवा त्याने भाषा ही प्रथम कशी तयार केली हें ठरवितांना आपणांस लहान मूल प्रथम भाषा कशी शिकतें हे पाहणें उपयोगीं पडेल. वन्य स्थितींत वावरणारे रानटी लोक प्रथम भाषा कशी शिकतात हेंहि पाहणें तितकेंच उपयोगीं पडेल. लहान मुलांची शारीरिक व मानसिक वाढ ही त्यांच्या जातिक वृत्तींवर अवलंबून असते असें आता सर्वमान्य झालें आहे. अनुकरण वगैरे ह्या मानवांच्या जातिक वृत्ति आहेत.

---

१ Jesperson, Language. XXI

होत क्रीडाशक्ति ही अत्यंत महत्त्वाची वृत्ति आहे. लहान मूल स्वस्थ जरी पडलें असलें तरी त्याची हातपाय हलविण्याची क्रिया, तोंडाने म, ब, व इत्यादि स्वर काढण्याची क्रिया ह्या चाललेल्या असतात. ह्या क्रिया करण्यास लागणारी शक्ति मुलांत जन्मतःच असते. ह्या क्रियांनीच त्या मुलाची वाढ झपाट्याने होत असते. ह्या क्रिया जितक्या जास्त तितकी त्याची वाढ जास्त झपाट्याने होत असते. मुलामध्ये जन्मतःच बेसुमार कार्यशक्ति (Superfluous energy) असते. व हिच्या जोरावरच त्याच्या हातून मोठ्या उत्साहाने नानाप्रकारच्या क्रिया घडत असतात व त्याच्या शारीरिक वाढीस हातभार लावीत असतात. ह्या रीतीने त्याचें शरीर वाढतें, इंद्रियें व त्यांचे व्यापार वाढतात. स्वर उत्पन्न करण्याची त्याची शक्तिहि वाढून निरनिराळे स्वर उत्पन्न करून त्यांचे निरनिराळ्या प्रकारचे संयोग करून त्यांच्या साहाय्याने आपल्या गरजा भागविण्याकरिता त्यांवर अर्थाचा संकेत लादून मुलें आपली भाषा बनवीत असतात. व भाषा बनवितांना पूर्वी होऊन गेलेल्या लोकांनी तयार केलेल्या भाषेचा फायदा आपल्या स्मरणशक्तीच्या जोरावर तीं मुलें घेऊं शकतात. तेव्हा स्वरोत्पादनांत, स्वरांच्या निरनिराळ्या संयोगांत, त्या संयोगांवर संकेत लादण्यांत व अशा रीतीने एकंदर भाषेची वाढ करण्यांत वर दिलेल्या सर्व कारणांपेक्षा हें क्रीडाशक्ति (Play way) कारण अत्यंत महत्त्वाचें आहे असें आमचें मत आहे.

१० भाषेचा आणि मनुष्याचा एक प्रकारचा अन्योन्याश्रयी संबंध आहे. भाषा आहे तर मनुष्य आहे आणि मनुष्य आहेत तर भाषा आहे. मनुष्याच्या हातांत जरी भाषेची वाढ करण्याचें नसलें तरी मनुष्याशिवाय भाषेची वाढ होणें शक्य नाही. 'भाषा' हें मनुष्याचेंच वैशिष्ट्य आहे. तसेंच भाषा ही व्यक्तिजात नसून समाजजात आहे. एकट्या दुकट्या माणसाच्याने कधीहि भाषा तयार होणें शक्य नाहीं, म्हणून तिला सामाजिक संस्था (Social Product) असें अन्वर्थक रीतीने म्हणतात. भाषा ही सजीव संस्था असली तरी तिची वाढ प्राणी, वनस्पती वगैरे सचेतन प्राण्यांप्रमाणे आपोआप होत नसून ती मानवाश्रयानेच होते.[१] तिला इतर सेंद्रिय प्राण्यांप्रमाणे वाढ (Organic growth) आहे, पण

[१] Whitney–Origin and Growth of Language, ch, II.

ती मानवाश्रित आहे. भाषारूपी लतिकेस मानवी समाजाचा आश्रय करावा लागतो. व ह्या दृष्टीनेंच भाषा ही एक मानवी व जिवंत संस्था आहे. जिवंत संस्था म्हटली म्हणजे तिला षड्विकार असतात, त्याप्रमाणे भाषेसहि तिच्या आयुष्यांत अस्ति, जायते, वर्धते, विपरिणमते, अपक्षीयते व नश्यति म्हणजे सत्ता, जन्म, वृद्धि, विपरिणमन, क्षय व नाश असे सहा विकार आहेत. भाषा समाजाच्या आश्रयाने वावरणारी असल्यामुळे तिचें आयुष्यहि मोठें असून ह्या सहा विकारांचे कालखंडहि मोठे असतात.

## भाषांचें वर्गीकरण

११ पृथ्वीच्या पाठीवर प्रचलित असलेल्या भाषांचें भाषाशास्त्रवेत्त्यांनी दोन प्रकारांनी वर्गीकरण केलें आहे: एक त्या त्या भाषेंतील शब्दाच्या व्युत्पत्तीवरून (Genealogical), व दुसरे भाषांतील अन्वित शब्दांच्या संबंधावरून (Morphological). मातृ, पितृ, भ्रातृ, स्वसृ (Mater, Pater, Brother, Sister) इत्यादि नात्याचे शब्द, एक, दोन, तीन, पंधरा, वीस, तीस, शंभर इत्यादि संख्यावाचक शब्द, अहम्, युष्मत्, यत्, कोण, मी, तूं, I, Thou, इत्यादि सर्वनामें, लहान लहान अव्ययें, व इतर अनेक शब्द ह्या सर्वांच्या व्युत्पत्तीमध्ये ज्या ज्या भाषांत साम्य आढळून येतें, त्या त्या भाषांचे त्या साम्यावरून वर्ग केले आहेत. ज्या ज्या प्रांतांत विशिष्ट भाषा प्रचलित आहेत त्यांचा भौगोलिक दृष्ट्या विचार करून, तसेंच त्यांतील सर्वनामें, संख्याविशेषणें, अव्ययें आणि प्रत्यय इत्यादि तौलनिक पद्धतीनें अभ्यासून भाषांचीं परस्पर नातीं आणि पिढ्या प्रथम प्रो. बॉप्प ह्या भाषाशास्त्रज्ञाने ठरविल्या. ह्यानेच प्रथम आर्योद्भव भाषा विवेचिल्या आणि त्यांचा वंश कायम केला.

अखिल जगावरील भाषांचे कोणी तीन, तर कोणी चार, पांच, सहा, असे निरनिराळे वर्ग मानतात. १ आर्यन, २ सेमिटिक, ३ टयुरेनियन, ४ मंगोलियन, ५ द्रविडिअन आणि ६ इतर मिश्र अशा सहा मुख्य कुळी समजतात. पहिल्या 'आर्यन' भाषानांच इंडोयुरोपियन, इंडोजर्मनिक, अशीं नांवें देण्यांत येतात. ह्या भाषांपैकीं कांहीं भाषांत 'शंभर' ह्या अर्थी "सेंटम्" व कांहीं भाषांत 'शतम्' असे शब्द रूढ आहेत. यावरून त्या भाषांचे सेंटम्

( पश्चिमेकडील ) व शतम् (पूर्वेकडील) अशा दोन शाखा झाल्या आहेत. पश्चिम शाखेपासून १ जर्मानिक (हाय व लो), २ गॅलिक, ३ ग्रीक, हेलेनिक, डोरिक, ४ लॅटिन, रोमॅनिक, ५ स्लॅव्हानिक, लेटिक लिथ्यूनियन, स्कँडिनेव्हियन, नॉर्स, डॅनिश इतक्या भाषा उत्पन्न झाल्या आहेत. पूर्वेकडील जी 'शतम्' शाखा तिच्यापासून १ इंडोइराणियन (ह्यांत अवेस्ता, पेहलवी ह्या भाषा येतात.) आणि २ इंडियन किंवा भारतीय भाषा हे दोन वर्ग झाले आहेत.

१२ मूळ आर्य किंवा आर्योद्भव भाषा ह्यांच्या मुख्य खुणा खाली दिल्याप्रमाणे आहेत. पहिली खूण त्यांच्या धातुसंबंधी. ह्या भाषांतील बऱ्याच शब्दांच्या बाबतींत व्युत्पत्तीच्या साहाय्याने शब्दाचा कीस काढीत मागे जात जात सीमान्त अशा कोणत्या तरी धातुपर्यंत जातां येते. धातूच्या पुढे मात्र व्युत्पत्ति सापडत नाही. नामें, सर्वनामें, विशेषणें व बरींच अव्ययें अशा रीतीने त्यांच्या मूळ धातुपर्यंत पोहोचवितां येतात. प्रत्यय छाटून शेवटीं धातु राहतो आणि ते सर्व सीमान्त धातु एकाक्षरी व बहुतेक क्रियार्थी असतात. तेथपर्यंत पोहोचलें म्हणजे अर्थदृष्ट्या जास्त पृथक्करण अशक्य होतें, आणि नंतर ध्वनिदृष्ट्या पृथक्करण करावें लागतें. असले हे मूळ धातु सारखे सापडल्यामुळेच त्या त्या भाषांचा एक वंश बनला व त्याला आर्य भाषांचा वंश म्हणूं लागले. दुसरी मोठी खूण सर्वांच्या नजरेस उघड दिसते ती ही की, सर्व आर्य भाषा जगांतील सुधारलेल्या व पुढारलेल्या लोकांच्या बोलभाषा आहेत. तिसरी गोष्ट म्हणजे सर्वांत दिसून येणारी त्यांची "स्वभावानुवृत्ति" ही होय. प्रांतिक भेद किंवा कालिक भेद, बोली व पोटभाषा ह्यांचा बुजबुजाट वाटेल तितका झाला तरी व मूळ मध्यवर्ती बुंध्यापासून ह्या शाखा कितीहि निराळ्या व अलग दिसल्या तरी त्यांच्यांत मूळ मातृभाषेचा ठसा उमटलेला दिसल्याखेरीज राहत नाही. निरनिराळ्या काळांची व प्रांतांची मराठी भाषा जरी सर्वांना सारखी समजली नाही तरी ती 'मराठी'च आहे हे ओळखणें फारसें अवघड नाही. मराठी, गुजराती, बंगाली ह्यांचें अपभ्रंशादि विभाषांशीं, अपभ्रंशांचें प्राकृतांशीं, प्राकृतांचें संस्कृताशीं, संस्कृतचें ग्रीकलॅटिनशीं, आणि त्यांचें मूळ आर्यभाषेशीं साम्य शोधून काढतां येतें. हाच एकसूत्रीपणा सर्व

आर्योद्भव भाषांमध्यें सूत्रासारखा गोवला आहे. आर्योद्भव भाषांची चौथी खूण त्यांच्या व्याकरणासंबंधी. त्यांच्या व्याकरणांत विसंगततेपेक्षा नियमबद्धताच जास्त दिसून येते. द्विवचनाचा व चतुर्थीसारख्या विभक्तींचा लोप जरी झाला तरी ह्या लोपांना कालावधि फार लागतो, व म्हणून आर्योद्भव भाषांच्या व्याकरणांत एक प्रकारचें बराच काळ राहणारें असें स्थैर्य दिसून येतें.

ह्या खुणा सूक्ष्मदृष्टीच्या शास्त्रज्ञालाच दिसतात. स्थूलदृष्टीला सहज दिसणाऱ्या अशा खुणाहि आर्योद्भव भाषांच्या सांगतां येण्यासारख्या आहेत. ह्यांमध्यें नामें आणि क्रियापदें हीं भिन्न असतात. त्यांचे प्रत्यय निराळे, घटना निराळी. एकच शब्द नाम आणि क्रियापद असा चिनी भाषेसारखा प्रकार आर्योद्भव भाषांत आढळून येत नाहीं. आर्योद्भव भाषांत वचनें तीन व विभक्त्या पांच पासून नवापर्यंत इतके भेद आहेत. ह्या सर्वांचे प्रत्यय निराळे. वचन, विभक्ती, काळ, अर्थ ह्यांच्या प्रत्ययांचा बुजबुजाट झाला आहे. आर्योद्भव भाषांची आणखी एक ठळक खूण म्हणजे त्यांचें सामासिक स्वरूप हीं होय. लॅटिन, संस्कृत, इंग्लिश वगैरे सर्व प्रत्ययांचा लोप करून शब्द जवळ जवळ ठेऊन भाषेचें सामासिक रूप साधता येतें. लॅटिन भाषेपासून इटॅलियन, फ्रेंच, इंग्रजी ह्या जशा भाषा उत्पन्न झाल्या तशाच संस्कृतपासून पाली, प्राकृत अपभ्रंश व वर्तमानकालीन बोली उत्पन्न झाल्या. हीहि एक त्यांची खूणच म्हणावयास हरकत नाहीं.

भाषांचा दुसरा वर्ग जो सेमिटिक किंवा हेमिटिक भाषांचा, तोहि ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाचा आहे. अरबस्तान, मेसापोटेमिया या भागात त्यांचा उगम झाला असला तरी सुमेरियन लोकांमार्फत हिंदुस्थानांत खिस्तपूर्व ३००० वर्षांपूर्वी त्या नांदत होत्या असें सिंधमध्यें मोहेंजोदारो येथे सापडलेल्या अवशेषांवरून आता सिद्ध झालें आहे. या कुळींत अरबी, हिब्रू, अरेमाइक ह्या भाषा येतात. तुराणी कुळींतील मुख्य भाषा तुर्की, रशियन आणि हिमालयांतील कांही भाषा ह्या होत. मंगोलियन कुळींत चिनी, जपानी, ब्रह्मी ह्या भाषा येतात. द्राविडी कुळी कोणी तुराणी वंशांतील समजतात तर कोणी निराळीच एक कुळी समजतात. तिच्या उत्तर द्राविडी

आणि दक्षिण द्राविडी अशा दोन शाखा आहेत. बलुचिस्तानच्या एका भागांतील ब्राहुई व मणिपुरसारख्या डोंगराळ रानांत रूढ असलेल्या भाषा उत्तर द्राविडी होत आणि तामील, तेलगु, कानडी व मल्याळी, तुळु, कुडुगु, तोड, गोंड इत्यादि दक्षिण द्राविडी वर्गांतील भाषा होत.

१३ येथवर भाषेतील शब्दांच्या व्युत्पत्तिसाम्यावरून भाषांचे मुख्य वंश व कुळी सांगितल्या. आता वाक्यामध्ये शब्दांचा जो संबंध येतो त्यावरून भाषेचे झालेले प्रकार सांगतो. हे प्रकार पाडतांना शब्दांतील प्रकृति व प्रत्यय ह्या दोहोंतील परस्परसंबंध, त्यांचें एकरूपत्व किंवा भिन्नरूपत्व, ह्यांकडे आपणास दृष्टि द्यावी लागते. भाषेचा आद्यघटक शब्द नसून वाक्य हा असल्यामुळे वाक्यामध्ये शब्दांचा संबंध काय आहे, त्यांचे परस्पर निकटवर्तित्व कितपत आहे, ह्यावरच प्रकृति आणि प्रत्यय ह्यांचा संबंध अवलंबून असतो. प्रकृति व प्रत्यय ह्यांच्या संबंधांवरून झालेलें किंवा वाक्याधारावरून ठरविलेलें भाषांचे जें वर्गीकरण त्याला इंग्रजीमध्ये Morphological वर्गीकरण म्हणतात. ह्या वर्गीकरणामध्ये एकंदर सहा प्रकार आहेत. [१] Isolating, [२] Agglutinative, [३] Inflectional, [४] Incorporating, [५] Polysynthetic, [६] Analytical, हे ते प्रकार होत. असें हें वर्गीकरण करणारा श्लेगल नांवाचा एक जर्मन भाषापंडित होता. भाषांच्या ह्या प्रकारांचीं उदाहरणें पुढे दिलीं आहेत.

पहिला Isolating म्हणजे अप्रत्ययी भाषांचा प्रकार. ह्यामध्ये चिनी भाषा व तिच्यासारख्या इतर भाषा येतात. लिंग, वचन, विभक्ति, ...वा काळ ह्याचे भेद दाखविणारा एकहि प्रत्यय त्या भाषेत नाही. प्रत्ययांचें काम स्वतंत्र शब्दाच्या साहाय्याने केलें जातें. 'पेकीनहून' असें म्हणावयाचें असलें तर "त्सुंग-पेकिन-लै असें म्हणतात. याचा शब्दशः अर्थ Follow-Pekin-come असा आहे. 'तरवारीनें' म्हणावयाचें असेल तर "युग यी-पा-टौ" असें म्हणतात. ह्याचा शब्दशः अर्थ Use one sword = By means of a sword असा आहे. क्रियापदांच्या काळाचा भेद प्रत्ययाने न दाखवितां दुसऱ्या साहाय्यकारी क्रियापदाने दाखविला जातो. उदाहरणार्थः —

त्सु=चालणें; लिओ=संपणें आणि याओ=इच्छिणें.

यावरून त्सुलिओ = चालणें, संपणें = चाललों (भूतकाळ)
याओत्सु = इच्छिणें, चालणें = चालेन (भविष्यकाळ)

Isolating ह्या प्रकारालाच Roots म्हणजे धातुभाषा असेंहि म्हणतात. ह्या प्रकारांतील भाषांमध्ये शब्दांचें विशिष्ट स्थानच त्यांची जात ठरवितें. अमुक एक शब्द क्रियापद आहे, का नाम आहे, का क्रियाविशेषण आहे हें त्या शब्दाच्या वाक्यांतील स्थानावरून ठरवितात. असल्या भाषांना धातुप्रधान भाषा म्हटलें तर कांही वावगें होणार नाही. ह्या भाषांत वाक्यांतील मुख्य शब्दांना पूर्णशब्द आणि साहाय्यकारी जे शब्द असतात त्यांना रिकामे, निकामी (Empty) शब्द असें म्हणतात.

भाषेचा दुसरा प्रकार चिकट्या किंवा शब्दनिगडित भाषा हा होय. ह्या प्रकारांत वाक्यांतील निरनिराळे अर्थदर्शक शब्द एकमेकांपुढे ठेवतात किंवा एकमेकाला चिकटवितात. ह्या प्रकारच्या भाषांना Agglutinative भाषा असें म्हणतात. 'तुर्की भाषा' ह्या प्रकाराचें उत्तम उदाहरण आहे. तुर्की भाषेंत 'इव' म्हणजे घर असा शब्द आहे आणि 'इम' हा प्रथम पुरुषाचा षष्ठीचा अर्थ दाखविणारा शब्द आहे. हे दोन्ही शब्द जवळ ठेविले म्हणजे 'इवइम' असा शब्द तयार होतो आणि त्याचा अर्थ "माझें घर" असा होतो. 'इन' हा एक सामान्य षष्ठीच्या अर्थाचा शब्द आहे. 'इव इम इन' म्हणजे "माझ्या घराचा" असा अर्थ होतो. 'इविमदन' म्हणजे "माझ्या घरापा..." असा अर्थ होतो. जुन्या मराठींतील 'खेंव' ह्या शब्दाचा अर्थ 'आलिंगन' असा आहे. हा शब्द दुसऱ्या एका शब्दाला लाविल्यानें 'देखतखेंवो' असा शब्द तयार होतो. व त्याचा अर्थ 'देखताक्षणीं" असा होतो. संस्कृत व मराठींतील शब्दांचा समास करण्याची जी प्रवृत्ति आहे ती वरील सारखी चिकट्या किंवा शब्दनिगडित भाषेसारखीच आहे. मराठींतील सामान्यरूपांची तऱ्हा थोडीशी ह्याच प्रकारची आहे.

असे स्वतंत्र शब्दच एकमेकांजवळ ठेवून वाक्यांतील लिंग, वचन, विभक्ति इत्यादि संबंध दाखविण्याची प्रवृत्ति अशीच पुष्कळ दिवस चालली म्हणजे त्या स्वतंत्र शब्दांनाच प्रत्ययत्व प्राप्त होतें. Wife-man 'मनुष्याची

बायको' अशा अर्थांचे दोन स्वतंत्र शब्द जवळ जवळ ठेवून पुष्कळ दिवसांच्या उच्चाराने त्यांत फरक पडून Woman असा शब्द तयार होऊन त्याचा अर्थ 'स्त्री' होतो व त्याला स्त्रीलिंगत्व प्राप्त होतें. 'प्रत्यय' म्हणून जेवढे उपलब्ध आहेत ते सर्व एके काळीं भाषेंत स्वतंत्र शब्द म्हणून नांदत होते. कालान्तराने त्यांचा स्वतंत्र अर्थ नाहीसा होऊन त्यांना प्रत्ययत्व प्राप्त झालें आहे. 'गच्छामि' हा शब्द घेतला तर त्यांत गच्छ्+आमि अथवा मि–एक अंग व दुसरा प्रत्यय–असे दोन भाग आहेत. क्रियापदांना लागणारे पुरुषवाचक प्रत्यय हे पूर्वी एके काळीं स्वतंत्रपणें प्रचारांत असलेलीं सर्वनामेंच आहेत. 'मि' हा प्रत्यय पूर्वीच्या प्रथमपुरुषवाचक सर्वनामाचा अपभ्रष्ट अवशेष आहे. 'जाता हूं' 'जातों' ह्या रूपांमध्येंहि प्रथमपुरुषवाचक सर्वनाम अपभ्रष्ट होऊन प्रत्ययाच्या रूपांत राहिलें आहे. शब्दयोगी अव्ययाची हीच स्थिति आहे. "मुळे, विषयी, पासून, प्रमाणे, योगे" वगैरे अव्ययें एके काळीं स्वतंत्र शब्द म्हणून भाषेंत रूढ होतीं. परंतु हल्ली त्यांचा तो अर्थ जाऊन त्यांना विभक्त्यर्थदर्शक असा दुय्यम अर्थ प्राप्त झाला आहे. अशा तऱ्हेने सर्व प्रत्ययी भाषांची उत्पत्ति अप्रत्ययी किंवा चिकट्या किंवा शब्दनिगडित भाषापासून झाली असावी असा तर्क आहे. संस्कृत, ग्रीक, लॅटिन, अवेस्ता वगैरे भाषा प्रत्ययी भाषेचीं उत्तम उदाहरणें होत.

प्रत्ययी भाषेच्या पुढची भाषेची सुधारलेली स्थिति म्हणजे प्रत्ययास अजीबात फाटा देऊन त्याऐवजी विभक्तिप्रतिरूपक अव्ययांचा उपयोग करावयाचा ही होय. नुसते शब्द एकमेकांपुढे ठेवून काळ, लिंग, वचन विभक्त्यादि अर्थ दाखविणें ही पहिली स्थिति, त्याचें प्रत्ययांत रुपांतर होणें ही दुसरी त्याच्यापुढची स्थिति, आणि त्याच्याहि पुढची स्थिति म्हणजे प्रत्ययाबद्दल शब्दयोगी अव्ययं वापरण्याची प्रवृत्ति ही होय. 'ने, एं, यीं' ह्या प्रत्ययांऐवजी मुळे, कारणे, हस्ते, द्वारा, किंवा 'स, ला, ना, ते' ह्या प्रत्ययांऐवजी 'कारणे, करिता, साठीं, स्तव' किंवा 'त, ई'बद्दल 'समयीं, विषयीं' हीं अव्ययें वापरलीं जातात. ह्या प्रकाराच्या भाषेचीं उदाहरणें फ्रेंच, इंग्लिश, हिंदी व कांही थोड्या अंशीं मराठी ह्या भाषा होत. ह्या प्रकाराला पाश्चात्य भाषावेत्ते Analytical असें म्हणतात.

भाषेचे Incorporating आणि Polysynthetic म्हणून जे प्रकार पाश्चात्य

भाषाशास्त्रवेत्त्यांनीं मानिले आहेत ते फारसे महत्त्वाचे नाहीत. पहिल्या प्रकाराच्या भाषेंत उपसर्ग आणि धातु ह्यांच्यामध्ये इतर शब्द घालण्याची रूढि आहे. उदाहरणार्थ, "अपहते" असें न म्हणतां "अप एनं पाप्मानं हते" असें म्हणावयाचें:—'अप' आणि 'हते' ह्या दोन शब्दांमध्ये 'एनं पाप्मानं' हे दोन शब्द आले आहेत. "पातयामास" असें न म्हणतां "पातयाम् प्रथमम् आस" असें म्हणावयाचें. हीं दोन संस्कृतमधील उदाहरणें ह्या Incorporating भाषेच्या विशिष्टपणाचीं उदाहरणें होतील.

१४ पाश्चात्त्य भाषावेत्त्यांनी शब्दांचे 'प्रकृति व प्रत्यय' ह्यांच्या संबंधांवर आधारलेले भाषांचे प्रकार सांगितले. आपल्या इकडील दृष्टीनें पाहिलें म्हणजे भाषांचे दोन मुख्य प्रकार पडतील: एक प्रत्ययी भाषा आणि दुसरी अप्रत्ययी भाषा. अप्रत्ययी भाषांनाच सामासिक भाषा असें म्हटलें तरी त्या दो[illegible]फरक आहे. सामासिक भाषेंत समास जे आपण करतों त्याच्या मुळा[illegible]यांची कल्पना असते. प्रत्ययांचा आपण लोप करतों एवढेंच. अप्रत्ययी भाषेंत प्रत्ययांची कल्पना नसून शब्द एकमेकांपुढे ठेवितात. सामासिक भाषा बोलणेंहि कांही फारसें अवघड नाही. संस्कृत, प्राकृत ह्या भाषांत समास करून बोलण्याच्या प्रवृत्तीचा प्रकर्ष झालेला दिसून येतो. सवय झाली म्हणजे समस्त बोलणें हेंच व्यस्त बोलण्यापेक्षा सुलभ होतें. Isolating आणि Agglutinative हे जे दोन प्रकार सांगितले ते ह्या आपल्या 'अप्रत्ययी' प्रकारांत सहज येतील. दुसरा आपला प्रकार प्रत्ययी भाषांचा. प्रत्ययी भाषांत प्रकृति व प्रत्यय ह्यांच्यामुळे पोटभेद झाले आहेत. प्रत्यय साधारणपणें शब्दाच्या पुढे लावण्याची रूढि आहे. परंतु तुर्की व अवस्ता भाषांत शब्दांच्यामध्ये एखादे वेळेस प्रत्यय घालतात. असल्या भाषांना "आगमप्रधान" भाषा म्हणावें. शब्दाच्या पुढे जसे प्रत्यय लावतात तसे शब्दाच्या मागे, आरंभींहि कांही शब्द किंवा शब्दांचे अवशेष ठेवतात. शब्दाच्या मागे शब्द दोन प्रकारांनीं ठेविला जातो व त्याप्रमाणे त्यांना दोन नांवेंहि प्राप्त झालीं आहेत. एक आगमाप्रमाणे व दुसरा उपसर्गाप्रमाणे. शब्द आगमाप्रमाणे मागे ठेविला म्हणजे 'आगमप्रधान' व उपसर्गाप्रमाणे ठेविला म्हणजे 'उपसर्गप्रधान' अशीं त्या त्या भाषेस नांवे प्राप्त होतील. ज्याप्रमाणे प्रत्ययाने शब्दांत विकृति होते

त्याचप्रमाणे आगम व उपसर्ग ह्यांनीहि शब्दांत विकृति होते. हे "उपसर्गेण धात्वर्थो बलादन्यत्र नीयते" ह्या वचनावरून सिद्ध आहे.

आद्य मानवसमाजाच्या आद्य भाषेचें स्वरूप कोणतें होतें ह्याबद्दल विद्वानांमध्यें मतभेद आहे. त्याचप्रमाणे अप्रत्ययी भाषेपासून प्रत्ययी भाषा उत्पन्न झाली ह्या सिद्धांताबद्दलहि मतभेद आहे. वर सांगितलेले भाषांचे जे सहा प्रकार सांगितले ते पृथ्वीवर सध्या रूढ असलेल्या भाषा कोणत्या स्थितींत आहेत त्याचेच फक्त दर्शक आहेत. अमुक एका स्थितीमधून तिला अमुक एक स्थिति प्राप्त झाली असें म्हणतां येत नाही. त्याचप्रमाणे रानटी लोकांच्या कांहीं भाषा जर पाहिल्या तर त्यांत प्रत्ययांचा बुजबुजाट परमावधीस गेलेला दिसून येईल. त्यावरून आद्य भाषा अप्रत्ययी होती असें म्हटलें तर टिकणार नाही. त्याचप्रमाणे अप्रत्ययी भाषेतहि कधी कधी शब्दनिर्गाडित्वहि दिसून येतें. तेव्हां भाषांच्या उत्क्रां[illegible] ह्या वर दिलेल्या प्रकारांकडे न पाहतां केवळ त्यांची विद्[illegible]ति काय आहे, त्या सध्या कोणत्या अवस्थेंत आहेत, एवढेंच पाहण्यास त्यांचा उपयोग होईल, अशा प्रकारची नवीन विचारसरणी आहे.

१५. भाषेच्या उत्पत्तीबद्दलचे जे सिद्धांत वर दिले आहेत त्यांपैकी [illegible] हे कारणानें भाषा उत्पन्न झाली असें मानलें तरी भाषा एकदां उत्पन्न झाली म्हणजे तिची परिणति होते व परिणति झाली म्हणजे तिच्यामध्यें प्रकारहि पुष्कळ पडतात व निरनिराळ्या जातिहि पुष्कळ होतात. भाषेची वाढ किंवा विकास हाच होय. सर्व जगांतील मनुष्यांचा पूर्वज असा एकच मानवसमाज होता व त्याची एकच भाषा होती व त्या पहिल्या समाजापासून व त्याच्या भाषेपासून इतर समाज व इतर भाषा उद्भवल्या असें संभवत नाही. तर पृथ्वीच्या पाठीवर मनुष्याच्या उत्पत्तीस व वाढीस अनुकूल अशी परिस्थिति जेथें जेथें सापडली तेथें तेथें मनुष्यसमाजाचे पुंज उत्पन्न झाले आणि वाढले; व त्यांच्याबरोबर त्यांच्या भाषाहि उत्पन्न झाल्या व वाढल्या; व त्या त्या ठिकाणाहून नंतर मग वसाहत करण्यासाठीं त्या त्या मानवपुंजानें प्रवास केला व आपल्या भाषाहि आपल्याबरोबर नेल्या. अशा रीतीनें रूढ असलेल्या मानवजातींचें व त्यांच्या भाषांचें उत्पत्तिस्थान एकच ठरत नसून निरनिराळे वंश ठरतात.

त्याचप्रमाणे पहिली भाषा [illegible] झाली ती एका शब्दापासून दोन शब्द, दोहोंपासून चार, चारां[illegible]ळा, सोळांपासून शंभर, शंभरांपासून हजार अशा विवक्षित गणित[illegible] वाढली असें नाही; किंवा पहिली भाषा अगदी साधी होती[illegible]हे प्रकार नाही. नानाप्रकारचे काळ, ते दर्शविण्याचे [illegible]कार, विभक्तींचे अर्थदर्शक अनेक प्रकार, नामांचीं, क्रियापदांचीं [illegible], इत्यादि विविधत्व आद्य भाषेंत होतें. व पुढे पुढे हें विवि[illegible] होऊन तीमध्ये साधेपणा आला[1]. हें मत अलीकडे भाषाशास्त्रज्ञ[illegible] होऊं लागलें आहे.

भाषेची वाढ [illegible]ति निरनिराळ्या प्रकारांनी होते. आद्य भाषा पूर्ण व सांग होती[illegible]दिवसेंदिवस अपभ्रष्ट होत चालली; तिच्या मूळच्या चांगल्या स्वरू[illegible]ट स्वरूप प्राप्त होत चाललें आहे असें म्हणणेंहि सयुक्तिक ना[illegible]षा दिवसानुदिवस अपभ्रष्ट होत चालली आहे, ह्या म्हणण्य[illegible]षा परिणत होत चालली आहे, तिचा विकास होत आ[illegible]णेंच जास्त सयुक्तिक आहे. भाषेमध्ये अपभ्रंश, दुरुच्चार [illegible] वगैरे जी निराशाजनक परिभाषा उत्पन्न झाली आहे [illegible] म्हणजे मूळभाषा दैवी, गीर्वाण व पूर्ण आहे व ती मनु[illegible]ताब्यांत आल्यापासून उत्तरोत्तर हीन दशेप्रत चालली आहे ही [illegible]त आहे. जुनें तितकें सोनें ह्या प्रवृत्तीचाच हा एक परिणाम आहे. परंतु ह्याच्या शास्त्रीय युगांत ही अंधश्रद्धा सोडली पाहिजे. शास्त्राच्या परिभाषेतसुद्धा आशावादीपणा पाहिजे. म्हणूनच त्या उत्कर्षेच्छेच्या दृष्टीने अपभ्रंश ह्या शब्दाच्या ऐवजी परिणति, वाढ, विकास असे शब्द आम्ही सुचवितों.

भाषेंत फरक होण्याचीं स्थलें दोन; एक शब्दाचें बाह्य स्वरूप आणि दुसरें अन्तःस्वरूप. शब्दाच्या बाह्य स्वरूपांत फरक म्हणजे त्याच्या उच्चारांत फरक व अन्तःस्वरूपांत फरक म्हणजे त्याच्या अर्थांत फरक. कधी कधी बाह्य व आन्तर म्हणजे उच्चार व अर्थ ह्या दोन्हींमध्येहि फरक होतो. कालान्तराने असें होतें की, कांही जुने शब्द वापरांतून पार नाहीसे होतात. कांही शब्दांच्या मूळ अर्थांचा लोप होतो व त्या ठिकाणीं दुसराच अर्थ त्या शब्दाला प्राप्त

---

१ Jesperson, Language, Ch. XXI. 5.

होतो. जुन्या शब्दांच्या लोपाबरोबर ... भरणाहि भाषेंत होतो. असे निरनिराळ्या प्रकारचे फरक हो... द सारखी होत असते.

भाषेंत कालान्तरानें व देशान्तरानें ... डत जातात. आर्य लोकांची आर्यभाषा घेतली तर पूर्ववैदिक, वैदिक संस्कृत, पाली, प्राकृत, अपभ्रंश व मराठी हे मूळ आर्य भाषेचे कालिक द म्हणता येतील व ग्रीक, लॅटिन, इंग्रजी, गॉथिक, लिथ्यूनियन, झेंद, संस्क इत्यादि प्रांतिक भेद म्हणतां येतील. दुसरें उदाहरण मराठी भाषेचें घेत तर यादवकालीन, बहामनी-कालीन, पेशवेकालीन व आंग्लकालीन इत तिचे कालिक भेद होतील व कोंकणी, वऱ्हाडी, घाटी, देसूर, कारवारी इत्या प्रांतिक भेद होतील. ह्या कालिक व प्रांतिक भेदांशिवाय बोलणाऱ्यांच्या ... तीवरून, धंद्यावरून, लिंगावरून, वयावरून, शिक्षणावरून भाषेचे फर ... डतात व ते भाषेंत रूढ असतात हें प्रत्यक्ष आपल्या नजरेस येतें. लोहार ... र, भटभिक्षुक, कुंभार, शिंपी इत्यादिकांच्या निरनिराळ्या गणभाषा, ... बालभाषा, ग्रामभाषा, नागरभाषा इत्यादि प्रकार आहेत.

## उच्चारप्रक्रिया

१६ भाषेच्या बाह्य व आंतर या दोन्ही स्वरूपांत नेहमी फरक पडणें हा भाषेचा स्वभाव आहे. व असा सारखा फरक झाल्यानेंच तिची परिणति होते हें वर सांगितलेंच आहे. उच्चारांत किंवा ध्वनींत मुखांतील कंठ, तालु, दन्त, मूर्धन, जिह्वा, नादनलिका, फुप्फुसें इत्यादि इंद्रियांचा संबंध येतो व अर्थाच्या बाबतींत मेंदु किंवा बुद्धि यांचा संबंध येतो. श्वास हें साहित्य आणि वर दिलेलीं इंद्रियें हीं साधनें ह्या दोहोंच्या जोरावर ध्वनि उत्पन्न होतात. तेव्हा ह्या दोहोंत थोडा जरी फरक झाला तरी ध्वनि किंवा उच्चार ह्यांत फरक झाल्याखेरीज राहणार नाही. हिलाच उच्चारप्रक्रिया, वर्णप्रक्रिया किंवा स्वरप्रक्रिया म्हणतात.

(१) उच्चारोपयोगी अशीं जीं इंद्रियें वर सांगितलीं तीं किंवा ज्या साहित्यावर उच्चार उत्पन्न करावयाचे तें साहित्य म्हणजे श्वास ह्या दोहोंच्या वापरांत थोडासा आळस झाला किंवा थोडीशी ढिलाई झाली तर उच्चारांत फरक पडतोच. मनुष्यप्राणी जात्याच थोडासा ढिलाईचा शोकी असल्यामुळे उच्चारांत जितकी

काळजी त्याने घ्यावया... ी तो घेत नाही. शिक्षित मनुष्य जरा थोडी तरी उच्चाराबद्द... ाहील; परंतु अशिक्षित माणसें, स्त्रिया व मुलें ह्यांच्याहातून ... क्षता न बाळगिली गेल्यामुळे भाषेतील शब्दांच्या उच्चारांत हळूहळू फरक पडत जातात व समाजांत त्यांचें प्रमाण जास्त असल्यामुळे त्यांनी ... लेले फरकच अखेर सर्वमान्य होतात. बरें, उच्चाराची गोष्ट अशी आहे की, त्यामध्ये स्खलन केव्हा व कसें सुरू होतें हें तावडतोब ... त येत नाही. वाहत्या गंगेतील आपल्या पायाखालची वाळू कणाक ... कशी कमी होत जाते हें आपणास घसरून पडेतोपर्यंत समजत ना... तसेंच उच्चारांतील फरकाचें आहे. उच्चार-प्रक्रियेचें मुख्य का... जे आळस किंवा होतां होईल तितके श्रम कमी करण्याची जी म... प्रवृत्ति आहे ती होय.

(२) उच्चा... क पडण्याचें दुसरें कारण अनुकरण हें होय. प्रत्येक मनुष्याचें जसें ... रूप भिन्न असतें तसे त्याचे उच्चारहि भिन्न असतात. दोन मनुष्यांचे उच्चार अगदी हुबेहुब सारखे आहेत असें उदाहरण सापडणें विरळा. भाषा शिकतांना किंवा बोलतांना आपण दुसऱ्याच्या उच्चारासारखे उच्चा... ची खटपट करतों. कधी त्याची नक्कल करतों. अशा वेळींहि ... कल न झाल्यामुळे उच्चारांत फरक पडत जातात व तेच भाषेंत होऊन बसतात. परकी भाषा शिकतांना तर असे फरक फार होतात. लहान मुलें ज्या वेळीं थोरांच्या उच्चारांचें किंवा गांवढळ लोक ज्या वेळीं शिकलेल्या लोकांच्या उच्चारांचें अनुकरण करण्याचा प्रयत्न चांगल्या सद्-बुद्धीने करतात त्या वेळीं त्यांतच त्यांच्याहातून प्रमाद घडतात आणि दुष्ट उच्चार सुरू होऊन कायम होतात.

(३) उच्चारांत वाजवीपेक्षा जास्त आघात दिला किंवा वाजवीपेक्षा जास्त श्वास सोडला तरीहि शब्दांच्या उच्चारांत फरक होतात. इंग्रजी वगैरे भाषांत जो आघात (accent) आहे त्याच्या स्थानांत बदल केला तर उच्चारांत फरक होतात. क्, च्, ट्, त्, प्, ग्, ज्, ड्, द्, ब् ह्या अल्पप्राण व्यंजनांच्या उच्चारांत जर श्वास अधिक मिसळला तर त्यांचीं लगेच महाप्राण व्यंजनें तयार होतात.

(४) हवामान व देशपरिस्थिति ह्यांमुळेहि उच्चारांत फरक होतात. समुद्र-

किनाऱ्यालगत राहणाऱ्या लोकांच्या उच्चारांत नासिक्य उच्चारांचें प्रमाण जास्त असतें. कोंकणांतील उच्चार निराळे तर घाटावरील उच्चार निराळे. डोंगरकठडींत राहणाऱ्या रानटी लोकांच्या उच्चारांत कार्कश्य असतें. थंड प्रदेशांत राहणाऱ्या लोकांचे उच्चार निराळे तर उष्ण प्रदेशांत राहणाऱ्या लोकांचे उच्चार निराळे. समशीतोष्ण प्रदेशांत राहणाऱ्या लोकांच्या उच्चारांत नरमपणा व गोंडसपणा असतो. आर्य लोक थंड प्रदेशांत होते तोंपर्यंत त्यांना मूर्धन्य वर्ण उच्चारतां येत नसत. मारवाडांतील बऱ्याच लोकांना र् व स् हे वर्ण उच्चारतां येत नाहीत. हवामान व भाषेतील उच्चार ह्या दोहोंचा कांहींहि संबंध नाही असें वरील मताच्या विरुद्ध एक मत आधुनिक भाषाशास्त्रवेत्त्यांनी मांडलें आहे.[१]

(४) मुखांतील इंद्रियांमध्ये कांही कृत्रिम किंवा स्वाभाविक दोष असेल तर उच्चारांत फरक पडतो. कांही लोकांना क्, र्, च् वगैरे वर्ण नीट स्पष्ट उच्चारतां येत नाहीत. त्यांबद्दल ते अनुक्रमें ट्, य्, त् इत्यादि वर्ण उच्चारतात. कांही कांही रानटी जातींत तोंडांत कांही तरी लाकडाचा तुकडा घालण्याची चाल आहे. बोलतांनासुद्धा तो न काढल्यामुळे त्यांच्या उच्चारांत फरक होतो. कांही सुधारलेल्या समाजांतील स्त्रियांच्या नाकांत दागिने घालण्याची जी चाल आहे तीमुळे कांही थोडासा उच्चारांत फरक पडल्याखेरीज राहात नाही.[२]

(५) भिन्न भिन्न संस्कृतींच्या लोकांचें मिश्रण किंवा एकीकरण झाल्यानेहि परस्परांचे उच्चार बदलतात. आर्य आणि अनार्य ह्यांच्या सान्निध्यानेच आर्यांच्या उच्चारांत मूर्धन्य उच्चाराचा प्रकार आला. त्याने दन्त्यतालव्याचा एक नवीनच उच्चार आला. दन्त्यतालव्याचा उच्चार आर्यांचा मंगोलीयन लोकांशीं ज्या वेळेस संबंध आला त्या वेळेस आर्यांच्या उच्चारांत आला असेंहि एक मत आहे. ही झाली प्राचीन कालची गोष्ट. पण पुढे उत्तरकालींहि हिंदुस्थानांत स्थायिक झालेल्या आर्यांचा टयूरेनियन लोकांशीं संबंध आला त्यामुळे परस्परांच्या भाषांवर परिणाम झाला. सोळा, सतरा, अठरा ह्या तीन शतकांत महमदीयांचा मराठयांशीं जो संबंध आला त्यामुळे मराठी

१ Jesperson, Language, ch. XIV 2

२ N. B. Divatia, W.P. Lectures, 1

बोलणाऱ्याच्या उच्चारांत निभृत तो [illegible] 'अ' उच्चार, एक विशिष्ट कंठ उच्चार असे नवे उच्चार मराठींत [illegible]ले आहेत. करकी (खडकी), मुटरा ( मथुरा ), बॅरोडा ( बडोदा किं[illegible] [illegible]डोदरा ), सियन ( शीव ), बेलगाम ( बेळगांव ) वगैरे या गावाच्या [illegible]च्या उच्चारांत जो इंग्रजीच्या वळणावर फरक झाला आहे तो इंग्र[illegible] [illegible]कर्त्यांशीं आपला जो संबंध आला त्यामुळे झाला हें उघड आहे.

(६) ह्या संस्कृतीसंस्कृतीं [illegible] मसळीच्या परिणामासारखा जेत्यांच्या संबंधाचाहि उच्चारावर परि[illegible] होतो. एका राष्ट्राने दुसऱ्या राष्ट्रावर मोहीम करून जय मिळविला [illegible] त्या जयाबरोबर जेत्या राष्ट्राचे उच्चारहि न कळत जित राष्ट्रांत ये[illegible] त्यायोगाने मूळ लोकांचे उच्चारभेद होतात. युरोपमध्ये पूर्वी [illegible] [illegible]या रोमन लोकांची राजवट नाहींशी झाल्याबरोबर हायजर्मन भाषेंत [illegible] तरी फरक झालेले आहेत.

(७) बसाह[illegible] [illegible]च्या इच्छेनें किंवा राजकर्तृक अमानुष जुलुमाला किंवा धार्मिक छळा[illegible] [illegible]टाळून जे लोक देशत्याग करतात त्यांच्या उच्चारांतहि देशकांती[illegible] [illegible]रक होत असल्याचे दिसतात. बुद्धोत्तरकालीं अशीच लोक[illegible] [illegible] व तिच्या योगाने निरनिराळ्या प्रांतिक प्राकृत भाषा उद्भवल्या.

(८) अन्नामुळेहि उच्चारक्रिया बदलते. ब्राह्मणाच्या उच्चारशुद्धीचें कारण त्यांची आहारशुद्धि आहे हें उघड आहे. वर्ण तेच, परंतु त्यांचे ब्राह्मणांचे उच्चार निराळे तर मराठ्यांचे निराळे, व इतर जातींचे निराळे. फरक थोडे का असेनात परंतु ते कानास निराळे लागल्याशिवाय राहत नाहीत.

(९) दुर्गादेवीसारखे कजाग दुष्काळ किंवा रोगांच्या साथी ह्यांमुळेहि उच्चारक्रियेंत थोडी फार क्रांति होत असल्याचें सांगतात. मादक पदार्थांच्या सेवनाने किंवा ज्वरासारख्या आजाराने मनुष्याच्या मेंदूत जी विकृति होते तिजमुळे त्या त्या व्यक्तीच्या उच्चारांतहि विकृति झाल्याचीं उदाहरणें सर्वांच्या परिचयाचीं आहेत; आणि ही जरी व्यक्तिव्यक्तीची उच्चारविकृति असली तरी ती कालपरत्वें सर्वांची उच्चारविकृति होते. उच्चारप्रक्रिया ही मूळची व्यक्तिनिष्ठ असून हळुहळूच तिचा प्रसार होत असतो.

(१०) भिन्न भिन्न भाषा बोलणाऱ्या लोकांच्या सान्निध्याने व संघर्षणानेहि भाषेचें रूपान्तर होतें. परंतु हें रूपान्तर भाषेच्या बाह्य स्वरूपाच्याच बाब-

...त फक्त होतें. तिच्या अंतररचनेंत फारसा फरक होत नाही. भोंवतालच्या भाषेंतील शब्द व वाक्प्रचार यांची भाषेंत मिसळण होते इतकेंच. जेथे दोन भिन्न भाषांचे प्रांत एके ठिकाणीं मिळतात अशा सरहद्दींवरहि मिश्रण-क्रिया सामान्य जनतेंत अतिरिक्त प्रमाणांत घडते व अशा मिश्र भाषांना त्या त्या प्रांतीं तोंडी व्यवहारांत शिष्टत्वहि लाभतें; परंतु त्यांचा ग्रंथभाषेंत सहसा प्रवेश होत नाही; म्हणजे अशा रांगडी भाषांच्या पदरीं शिष्टत्व पडूं शकत नाही. कोल्हापुराकडील मराठीवर कानडीचें, नागपुराकडील मराठी-वर हिंदीचे, खानदेशी मराठीवर गुजरातीचे, जे कांही परिणाम दिसून येतात ते सर्व ह्या मिश्रणाच्या प्रवृत्तीचेच होत.

१७ उच्चारप्रक्रियेच्या कारणांचा येथवर निर्देश झाला. ह्या निरनिराळ्या कारणांनी उच्चारप्रक्रियेंत जे निरनिराळे फरक रूढ होतात ते आता पाहूं. फरकांचे मुख्य दोन प्रकार आहेत. एक सापेक्ष फरक व दुसरा निरपेक्ष फरक. पहिल्या सापेक्ष प्रकारांत जे उच्चाराचे फरक होतात ते कशावर तरी अवलंबून असतात. दुसऱ्या प्रकारांतील फरक कशावर अवलंबून नसून स्वतंत्र असतात. युरोपीय आर्योद्भवभाषांतील उच्चारप्रक्रियेसंबंधी जो एक अत्यंत महत्त्वाचा सिद्धांत ग्रिम ह्याने शोधून काढिला तो असा निरपेक्ष स्वतंत्र आहे. हा फरक कशावरहि अवलंबून नसतो. संनिकटवर्ती उच्चारांवर तो अवलंबून नसतो. (परिशिष्ट १ पहा.)

दुसऱ्या सापेक्ष प्रकारांतील मुख्य प्रकार पुढे दिले आहेत:—

(१) अन्त्यलोप. ह्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. मराठींतील अन्त्य अनुच्चारित अनुस्वार जे आहेत ते सर्व एके काळीं उच्चारिले जात असत ह्याबद्दल शंका नाही. परंतु अन्त्य उच्चारांकडे बोलणाराचें विशेष लक्ष नसल्यामुळे ते उच्चारिले जात नाहीत व कालपरत्वें त्यांचा लोप होतो. ग्रीक, संस्कृत, प्राकृत ह्या भाषांत दोन व्यंजनें शेवटीं एकत्र येऊं शकत नाहीत. त्यांपैकी एकाचा लोप होतो. उदा०— संस्कृतः— वाक् (वाक् + स्), क्रीडन् (क्रीडन्त् + स्); प्राकृतः— पच्छा < पश्चात्, जाव < यावत्, पुण > पुनर्; मराठीः— करून > करूं > करू.

(२) आघातामुळे होणारे फरक. 'व्हरनियर' ह्याने जो एक उच्चारांचा सिद्धांत ग्रिमच्या सिद्धांताला पुरवणी म्हणून स्थापिला तो ह्या सदरांत

मोडतो. प्, ट्, च् ह्या वर्णांना [illegible] ड्, ज् आदेश होतात. शब्दाच्या उच्चारांत व तत्परत्वें अर्थांतहि फ [illegible] इंग्लिश भाषेंत होतात, हें सर्वांच्या परिचयाचें आहे. स्वरित, उदात्त [illegible]अनुदात्त ह्या तीन प्रकारच्या स्वरांमुळे वेदाच्या भाषेंतील शब्दांच्या उच्च[illegible]त फरक होतात..

(३) गुण, वृद्धि, संप्रसारण [illegible] स्वरांच्या व अर्धस्वरांच्या उच्चारांतील फरक आहेत. 'इ, उ, ऋ, [illegible]' बद्दल कांही विशिष्ट परिस्थितींत ए, ओ, अर्, अल् असे फरक झाले [illegible]जे त्याला गुण म्हणतात. (अदेङ् गुणः १-१-२.) अ, इ, उ, [illegible] ह्याना आ, ऐ, औ, आर्, आल् असे आदेश झाले म्हणजे [illegible] होते. (वृद्धिरादैच् १-१-१). संप्रसारणाची व्याख्या [illegible]ाने "इग् यणः संप्रसारणम्" (१-१-४५) अशी केली आ[illegible] "य्, व्, र्, ल्" ह्या व्यंजनांबद्दल पुन्हा त्यांचे मूळचे स्वर [illegible], ऋ, ऌ' येणें या विकारास संप्रसारण असें म्हणतात. अशी उलटा[illegible] उच्चारांत होती तरी कां? तर ह्याची उपपत्ति अशी. 'य्, व्, [illegible] ह वर्ण अर्धस्वर ह्या प्रकारांत मोडतात. ह्यांच्या उच्चारांत पूर्[illegible]त्व उतरलेलें नसल्यामुळे त्यांचा उच्चार बऱ्याच वेळां स्वरांच्या उच्च[illegible] झुकतो. अशा तऱ्हेने त्या वर्णांच्या एकेरी संयुक्त उच्चारांत भेद [illegible]ातो. उदा०-य् = इअ, व् = उअ, र = ऋअ, ल् = ऌअ' असें [illegible]त पृथक्त्व येतें. व विशेषतः हे वर्ण ज्या वेळेस शब्दाच्या आंतर भागांत दोन स्वरांच्यामध्ये येतात त्या वेळेस तर हें पृथक्त्व जास्त होतें. कारण ज्या दोन स्वरांच्या उच्चारांत ह्यांपैकी वर्ण सापडतो त्या स्वरांच्या योगाने एक प्रकारची त्या वर्णाभोंवती स्वरोच्चाराची छटा उत्पन्न केली जाते. व त्याचा त्याच्यावर परिणाम होतो. अशा प्रकाराने य्, व्, र्, ल् हे उच्चार नरमावले जाऊन त्यांचें रूपान्तर स्वरांत होतें.

| | | | |
|---|---|---|---|
| उदा०— | हृदय | हियअउ | हिय्या |
| | वायु | वाइउ | वाई |
| | दीपयष्टि | दिवइट्टि | दिवटी |
| | स्वरः | सुअर | सूर |
| | सुवर्णक | सुवण्णउ | सोनें |
| | कषपट्टिका | कसवट्टिआ | कसोटी |

प्रतिवेशी पडउशी पडोशी

(४) सान्निध्यपरिणाम (Assimilation). विसर्गाचे जे निरनिराळे फरक किंवा न् चें ण् होणें वगैरे फरक हे सान्निध्याचे परिणाम होत. "रषाभ्यां नो णः" व "स्तोः श्चुना श्चुः" या पाणिनीच्या सूत्रांत उल्लेखिलेले फरक ह्याच सदरांत येतात.

ह्याचे दोन प्रकार आहेत. (१) पूर्ववर्णपरिणति; उदा. स्तृ+नु=स्तृणोमि; मुक्त > मुक्क, व्याघ्र > वग्घ > वाघ, रामः+टीकते=रामष्टीकते, रामः+तिष्ठति = रामस्तिष्ठति; (२) परवर्णपरिणति; उदा० – कार्य > कज्ज > कजा, सार्धम् > सत्थ > साथ.

(५) समानवर्णपरिहार. हा फरक वरील फरकाच्या अगदी उलट आहे. उदा०–मुकुट > मउड. घेऊन घेऊन > घे घेऊन. र् च्या पुढे र् आणि ढ् च्या पुढे ढ् आला तर एक वर्ण नाहीसा होतो, व पूर्वस्वराला दीर्घत्व येतें. 'रो रि' (८-३ १४) व 'ढ्रलोपे पूर्वस्य दीर्घोऽणः' (६-३-१११) ह्या दोन पाणिनिसूत्रांत उल्लेखिलेले फरक ह्याच प्रकारचे होत.

(६) उच्चारसौलभ्यासाठीं स्वरागम (Prothesis) संयुक्तवर्ण उच्चारणें कठीण असल्यामुळे त्याच्या अगोदर एखादा स्वर घालतात. उ०–स्क्रू > इस्क्रू, इस्कुल, इस्टेशन, इस्पीक, अस्नान (स्नान), अस्तुरी (स्त्री)

(७) स्वरभक्ति हा प्रकार वरीलप्रमाणेच उच्चार सोपा करण्यासाठि होतो. 'स्वरभक्ति' ('स्वरेण भक्तिः' किंवा 'स्वरस्य भक्तिः') हा वर्णप्रक्रियेंतील फार महत्त्वाचा फरक आहे. ह्या प्रकारांत शब्दाच्या उच्चारसौलभ्यासाठी त्याच्यामध्ये एक स्वर येतो. शब्दामध्ये व्यंजनाच्या पूर्वी जर 'र्' आला तर तो 'र्' उच्चारतांना त्याच्यापूर्वी एक स्वर उच्चारिला जातो. 'र' ह्याचा मूर्धन्य उच्चार सोप्या रीतीने केला जावा म्हणून केवळ आधार म्हणून तो स्वर येतो. हाच प्रकार 'ल्' व्यंजनाच्या किंवा दुसऱ्या कोणत्याहि व्यंजनाच्या बाबतींत होतो.

स्वरभक्ति आणि विश्लेष ह्या दोहोंत थोडा सूक्ष्म फरक आहे. स्वरभक्तीचा संबंध केवळ छन्दामध्ये येतो. विश्लेषाचा संबंध तसा येत नाही.

स्वरभक्तीचीं उदाहरणें —अदर्शि, आर्ष्टिषेणः, शतवल्शः.

(ऋ. प्रा. १-३२.)

विश्लेषाचीं उदाहरणें–इंदर (इंद्र), ...शत (दर्शत), परकार (प्रकार), ...रम (भ्रम), इपर (विप्र), पृथिवी ...ी).

वर दिलेल्या उदाहरणांत 'स्वर' म ... आला आहे. कधी कधी स्वराच्या ...वजी व्यंजन दोन भिन्नस्थानीय व्यंजनांमध्ये केवळ उच्चार सोपा करण्या-...ाठी येतें. उदा०– तुम्बळ (तुमुल), कंबळ (कमळ), वान्दर (वानर), ...बर, अंमळ, तारांबळ, म्हणटलें ...टलें. मराठीने हा प्रकार अपभ्रंश भाषे-...ासून उचललेला दिसतो.

(८) स्वरलोप (Syncop...) हा प्रकार स्वरभक्तीच्या उलट आहे. ह्या-...मध्ये स्वर जास्त येण्याच्याऐवजी मधील स्वराचा लोप होतो. उदा०–...मा, ...मा, पल्डा>पडला, वरा...डा>वराडला (कोंकणी भाषेंत).

(९) शब्दांतील ...वांचा लोप (Haplology) – ह्या प्रकारांत दोन ...ारखे शब्दावयव ... जवळ आले तर एकाचा लोप होतो. उदा०–...ेवधृषः>शेवृध ...होहि>जहि, शष्पपिंजर>शष्पिंजरः, गुरेराखी>गुराखी, ...ुकें केळें > सुकेळें., जमातदार>जमादार.

(१०) वर्णविपर्यय–दोन उच्चारांची उलटापालट होते. र्, ल् ह्यांचे फार ...दला... ...ात. त्याचप्रमाणे अनुनासिकांची उलटापालट होते. उदा.०– ...णसी), जाणपछाण (ज्ञानप्रत्यभिज्ञान), हलू (लघु), कवडासा ...वाक्षा), नुकसान (नुस्कान, लुस्कान), काख (खाक), महाशूर (मशहूर) ...ुलुप (कुप्ल), जनावर (जानवर),

(११) कधीकधी छंदाच्या सोयीसाठी वर्णांच्या उच्चारांत फरक पडतात.

वेदपठणांत तर नेहेमी अन्त्य 'अ' दीर्घ उच्चारिला जातो. उदा०:– वेदा मघवन् विदा; सप्तहस्तासोऽअस्या.

(१२) शब्दाच्या उच्चारपरिमाणामुळे होणारे फरक. शब्दाच्या उच्चाराचें ...रिमाण एक ठरलेलें असतें. त्याच्या मात्रांची संख्या ठरलेली असते. तो ...ब्द एका भाषेंतून दुसऱ्या भाषेंत गेला व त्याच्यांतील इतर वर्ण जरी ...दलले तरी तें परिमाण कायम राहतें; व त्याच्या अनुरोधानें त्या शब्दांत ह्रस्वदीर्घत्व येतें. उदा०–पक्व>पिकला, पाका; पृष्ठ>पठ>पाठ. ऋक्ष> ...च्छ>रीस, वितस्ति>वीत. वर्तिका>वत्तिआ>वात.

वयाचें की काय ? तेव्हा शब्दार्थासंबंधी विशिष्ट संकेत पडलेले असतात व ते डोळे मिटून घ्यावे लागतात. मुख्य गोष्ट एवढीच ध्यानांत ठेवावयाची की, वस्तूला अन्वर्थक नांव देण्याच्या वेळेस त्या वस्तूंतील मुख्य गुण प्रामुख्याने डोळ्यापुढे उभा राहतो व दिलेल्या नांवांत त्याचा ठसा उमटतो. व त्याचप्रमाणे वस्तूवस्तूंमधील साम्य, वैषम्य, अनुकरण, विरोध ह्यांमुळेच शब्दावर अमुक एक अर्थ लादला जातो. नामकरणाच्या वेळेस नांव सर्व बाजूंनी सार्थ व अन्वर्थ असतेंच असें नाही.

'शब्द' काय दाखवितो ह्यासंबंधीहि आपल्या इकडील नैयायिकांनी व वैयाकरणांनी विवेचन केलें आहे. पतंजलीने आपल्या महाभाष्याच्या आरंभीं शब्दाचे वैदिक व लौकिक असे दोन प्रकार मानून लौकिक शब्द एखादा 'गाय' ह्या सारखा घेतला तर तो वशिंड, मान, शिंगें वगैरे पदार्थ किंवा हालणें, चालणें वगैरे क्रिया किंवा दुसरा एखादा गुण हे न दाखवितां त्या सर्वांनी युक्त असा प्राणी दाखवितो असें विवेचन केलें आहे.[१] जो शब्द उच्चारल्याने गाईच्या सर्व क्रिया, गुण व इतर गोष्टी मनापुढे उभ्या राहतात तोच शब्द 'गाय' होईल अशा आशयाची पतंजलीने शब्दाची व्याख्या केली आहे. शब्द नुसती जाति दाखवीत नाही किंवा नुसती व्यक्तिहि दाखवीत नाही. तर तो जातिविशिष्ट व्यक्ति दाखवितो असाच भाव पतंजलीच्या पुढील वाक्यांत दिसून येतोः– "नहि गौः स्वरूपेण गौर्नाप्यगौः, गोत्वाभिसंबंधात्तु गौः ।

अर्थाच्या किंवा व्युत्पत्तीच्या दृष्टीने शब्दांचे तीन प्रकार आहेत. कांही शब्दांचा अर्थ रूढीने कायमचा ठरविलेला असतो त्यांना रूढ असें म्हणतात. उदा०:– गो, अश्व, कर्ण, वगैरे. कांही शब्द असे असतात की, त्यांचा अर्थ त्यांच्यांतील धातूच्या अर्थाप्रमाणे लागतो. ह्यांना यौगिक असें म्हणतात. उदा०:– पाचक, लोहार, विणकरी इत्यादि. वरील दोन्ही तत्त्वें ज्या शब्दांत आढळून येतात त्याला योगरूढ म्हणतात. ह्यामध्ये व्युत्पत्तीचा एक व रूढीचा एक असे दोन्ही अर्थ असतात. उदा०:– पङ्कज, साप, वगैरे. ह्या शिवाय यौगिकरूढ असा एक चौथा प्रकार नैयायिकांनी मांडला आहे. त्यामध्ये "उद्भिज्ज" वगैरे सारखे शब्द येतात.

---

१ पतंजलि, महाभाष्य, १-१-१.

२१ अर्थदृष्ट्या शब्दाच्या ३ शक्ति आलंकारिकांनी मानिल्या आहेत. त्या अभिधा, लक्षणा व व्यंजना होत. शब्दाचा अर्थ जेथे प्रत्यक्ष, सरळ वं उघड रीतीने समजतो तेथे भिधाशक्ति समजतात. दगड शब्दाचा 'दगड, धोंडा' हा अर्थ अभिध ीने प्राप्त होतो. परंतु 'मठ्ठ, निर्बुद्ध मनुष्य' हा जो त्याचा अर्थ तो लक्षण ने प्राप्त होतो. 'गाढव=प्राणिविशेष' ही अभिधाशक्ति, तर 'गाढव=निर्बुद्ध मनुष्य' ही लक्षणाशक्ति. शब्दाचा प्रत्यक्ष सरळ व स्पष्ट अर्थ कांही वेळेस कमी पडतो, त्यास बाध येतो; मुख्यार्थाने कल्पना जर बरोबर समजली गेली नाही तर ती समजण्यासाठी मुख्यार्थालाच संलग्न असा रूढीने मान्य केलेला व कांही तरी जास्त गुण दाखविणारा जो ध्यावा लागतो त्यालाच लाक्षणिक अर्थ म्हणतात. "नदीवरील झोपडी" ह्या शब्दप्रयोगांत नदीच्या पाण्यावरील झोपडी असा प्रत्यक्ष सरळ न घेतां, तो सोडून नदीच्या काठावरील झोपडी असा अर्थ घ्या तो. हीच शब्दाची लक्षणावृत्ति होय.

अभिधाश प्रांत सोडल्यानंतर भाषेतील बहुतेक सर्व प्रांत ह्या लक्षणेने आहे. कित्येक स्थलीं लक्षणेवर लक्षणा लादली जाते. आद्य मा या ताब्यांतील भाषेचा झुळझुळ वाहणारा पहिला ओघ लक्षणेमुळे विराट्स्वरूप धारण करतो. लक्षणेनेच उपमा, रूपक, व इतर अलंकार उत्पन्न होतात. लाक्षणिक बोलण्याचा आपणांस इतका सराव होतो की, अमुक एक बोलणें लाक्षणिक असल्याचें ध्यानांतहि येत नाही. भाषेची ही लक्षणासंपत्ति भाषेच्या सुधारणेबरोबर वाढत जाते. शब्दांत किंवा भाषेत लाक्षणिक अर्थ पेलण्याची कितपत व कशा प्रकारची शक्ति आहे यावरून भाषा बोलणाऱ्या लोकांची बुद्धिमत्ताहि अजमावतां येते. भाषेमध्ये लक्षणा पदोंपदीं आढळून येते. 'त्याने त्याची खूब कणीक तिंबली', 'मडकें मढविणें', 'सोनाराने कान टोचणें', 'कागद घासणें,' 'पंजाबचा सिंह', 'गडाचा सिंह', 'शुक्राचार्य', 'पुणें हें महाराष्ट्राचें नाक', 'तानाजी शिवाजीचा उजवा हात', 'डोंगर कसा टवकारतो' 'आम्रवृक्ष आपणास बोलावितो', 'शेत आम्हांस जेवूं घालतें', 'पाषाणास पाझर फुटत नाही', 'दया येणें', 'विचार करणें', 'खाबू', 'माणसाची काय किंमत!', 'त्याने व्यूह रचला', 'त्याचा व्यूह

ढासळला ', 'गोष्टीचा थांग ', 'तो टेंभा मिरवितो ', 'त्याची कळी उमलली ', 'त्याचें तोंड कोमेजलें ', 'दिव्यांनी रस्ते फुलले ' हीं सर्व उत्तान व प्रच्छन्न अशा लक्षणेचीं उदाहरणें आहेत[1].

अभिधा आणि लक्षणा ह्या दोन शक्तींसारखी शब्दाची तिसरी एक शक्ति 'व्यंजना' म्हणून आहे. ह्या शक्तीस काव्याचा आत्मा म्हणतात. "गतोऽस्तमर्कः" = सूर्य अस्तास गेला, असें म्हटल्याबरोबर संध्या करण्याची वेळ झाली, आता स्नान केलें पाहिजे, कामें सर्व आवरलीं पाहिजेत इत्यादि अर्थ जो सूचित होतो तो त्या शब्दांच्या 'व्यंजना' ह्या शक्तीमुळेच होतो. ही शक्ति लक्षणेपेक्षा थोडी निराळी आहे. 'व्यंजना' शक्तीच्या साहाय्याने शब्दाचा अर्थ समजण्यास जरा जास्त विद्वत्ता, समय-सूचकता लागते. व्यंजनाशक्तीसारखेच शब्दाचे अर्थ दाखविणाऱ्या आणखी कांही शक्ति समजल्या गेल्या आहेत. त्यांचें आणि व्यंजनेचें बरेंच साम्य आहे. संयोग, विप्रयोग, साहचर्य, विरोधिता, अर्थ, प्रकरण, लिंग, संनिधि ह्यांपैकी कोणत्या तरी कां होईना संबंधाने निगडित झालेल्या इतर शब्दांचा विचार करावयाचा असतो.

२२ शब्दाच्या अर्थात निरनिराळ्या कारणांनी जे निरनिराळे प्रकार पड-तात त्यांच्या मुळाशीं लक्षणा हीच वृत्ति आहे. लक्षणावृत्तींत दोन प्रकार प्रथम उद्भूत होतात. ( १ ) अर्थाचे सामान्यीकरण व ( २ ) विशेषीकरण. ह्यांनाच अर्थविस्तार आणि अर्थसंकोच असें म्हणतां येईल. अर्थविस्तार किंवा अर्थसंकोच होण्याचें कारण शब्द आणि अर्थ ह्या दोहोंमध्ये असणारें समी-करण कोणत्या तरी बाजूस कमी पडतें हें होय. दोन्ही समसमान नसल्यामुळे इतका फरक पडत जातो.

(१) अर्थविस्तार:— एखादा शब्द जितका मूळ अर्थ दाखवितो त्याच्या-पेक्षा अधिक अर्थ त्या शब्दाने घ्यावा लागतो. गोसावी म्हणजे गो + स्वामिन् = गाईचा धनी; पण हल्ली कशाचाहि धनी नसला तरी किंवा असला तरी त्याला गोसावी म्हणतात. मृग म्हणजे हरीण, परंतु सर्व प्राण्यांच्या

१ ह्याचें विवरण 'भाषाशास्त्र आणि मराठी भाषा' पृ. ९२-९३ वर दिलें आहे तें पाहावें.

अर्थी हा शब्द वापरतात. पैसेवाला म्हणजे केवळ पैसे किंवा नाणें जवळ असलेला माणूसच नव्हे तर पैसाअडका, सोनेंदागिने, घरवाडी, जमीनजुमला वगैरे जवळ असणारा इतका व्यापक अर्थ त्यांत येतो. समाहारद्वंद्व म्हणून जो समासाचा प्रकार आहे त्यांत अर्थाची वाढ बरीच झालेली असते. पानपत्रावळ, भाजीपाला, पितर, नरौ, दम्पती वगैरे शब्दांच्या मूळ अर्थात पुष्कळ अर्थविस्तार झालेला आहे. गोठा म्हणजे फक्त गाई बांधण्याचें ठिकाण; परंतु म्हशी, बैल, घोडे जरी बांधले तरी तो गोठाच असतो. बायको असते एकच पण तिला 'आमची मंडळी' म्हणतात. गंगा, भागिरथी ही एका विशिष्ट नदीचीं नांवें होत; परंतु तीं आपल्या गांवाजवळच्या नदीलाहि व नदी नसेल तर ओढ्यालाहि लावतांना कधी कधी आपण ऐकतों. कादंबरी म्हणजे बाण कवीच्या कथानकांतील एका नायिकेचें नांव. परंतु आता सर्व रम्य कथांना हा शब्द लावतात. वरात (<वरयात्रा) म्हणजे नवऱ्या मुलाची फक्त मिरवणूक परंतु तो शब्द मुंजीच्या मिरवणुकीस लावतात.

(२) अर्थसंकोचः—ह्याच्या उलट अर्थाचा संकोच होतो. पांखरू आणि पक्षी हे दोन्ही पंख असणारे प्राणी या एका अर्थाचेच शब्द. परंतु पांखरू म्हणजे लहान आणि पक्षी म्हणजे मोठा असा फरक होतो. निर्वाण, मोक्ष, स्वर्ग हे एका अर्थाचे शब्द; परंतु निर्वाण हें बुद्धांचें, मोक्ष हे ज्ञान्याचें आणि स्वर्ग म्हणजे इतरांचें कैवल्य ह्या अर्थी भेद करून वापरले जातात. पार्थिव म्हणजे पृथ्वीसंबंधी, परंतु त्याचा 'राजा' पृथ्वीवर राज्य करणारा इतकाच अर्थ संकुचित केला आहे. 'गांठोडें' म्हणजे कांहीहि गुंडाळून ठेवलेलें, परंतु "तो गांठोडें बाळगून आहे" ह्यांत गांठोडें म्हणजे पैशाचें किंवा दागिन्याचें एवढाच अर्थ अभिप्रेत आहे. "त्याचेजवळ सोनें आहे;" 'मी शहरांत किंवा गांवांत जाणार आहे', 'तो आमचा काळ आहे' ह्या वाक्यांतील जाड ठशाचे शब्द तसेंच धर्म, ताप, वेदना, वेणा, वेद, कुटुंब, जनावर, इंद्र, विषयसुख, गवेष इत्यादि शब्दांत मूळच्या अर्थाचा संकोच झाला आहे. हीं सर्व अर्थसंकोचाचीं उदाहरणें होत.

एकाच अर्थाचे अनेक शब्द असले तर प्रत्येक शब्दाच्या अर्थात सूक्ष्म भेद करून प्रत्येकाच्या अर्थात कांही तरी निराळी छटा उत्पन्न होते. माता, आई, माई, माय हे एकाच अर्थाचे शब्द आहेत; परंतु त्यांच्या

अर्थात व तदनुषंगी प्रेमळ भावनेंत सूक्ष्म कां होईना पण अंतर आहे. ‘ कार्य, काम, काज, कज्जा ’ इत्यादि शब्द व्युत्पत्तिदृष्ट्या एकाच अर्थांचे, परंतु रूढ अर्थ मात्र त्याचे भिन्न आहेत. ‘ हृदय ’ म्हणजे अंतःकरण, परंतु त्यापासून निघालेला ‘ हिय्या ’ शब्दाचा अर्थ निराळा आहे. ‘पुस्तक’ निराळें आणि ‘ पोथी ’ निराळी. ‘स्नान’ म्हणजे आंघोळ करणें व ‘न्हाण’ म्हणजेहि आंघोळ करणें. परंतु एकाबद्दल दुसरा शब्द चालत नाही. ‘ मार्ग सापडला ’ ह्याचा एक अर्थ तर ‘ माग सांपडला ’ ह्याचा अगदी निराळा अर्थ. ‘ मारग मळणें ’ म्हणून देशस्थ ब्राह्मणांमध्ये कुलाचार आहे त्यांत ‘ मारग ’ ह्याचा अर्थ ह्याहून भिन्न. मनस्, मनुष, मति, मनन, मन्यु हे सर्व शब्द ‘ मन् = मनने ’ ह्या धातूपासून निघाले. परंतु प्रत्येक शब्दाचा रूढार्थ अगदी निराळा आहे. ‘ गाभारा, गाभ, गाभा ’ या तिन्ही शब्दांचें मूळ एकच पण अर्थ मात्र निराळे झाले आहेत. ✓

शब्दाच्या संस्कृत रूपाबरोबरच त्याचीं प्राकृत रूपेंहि भाषेंत रूढ आहेत. परंतु त्यांचा अर्थ मात्र संस्कृत रूपाच्या अर्थाहून निराळा आहे. शब्दाच्या संस्कृत व प्राकृत रूपांच्या जोड्या पुढे दिल्या आहेत. दोन्हींतील अर्थभेद स्पष्ट असल्यामुळे दिला नाही.

अस्थि–आठी, क्लेश–किळस, कर्म–काम, नष्ट–नाट, नाटाळ; परुष–फरस, वर्ण–वाण, सिंह–सिंग, स्पर्शणें–फासणें, क्षीर–खीर, शून्य–सुना, मिथुन–मेहूण, स्थान–ठाण, व्यापार–वापर, वावर; शुद्धि–सुद, पत्र–पत्ता, पर्व–पेर, पक्ष–पांख, पंख; भवानी–बोहणी, मुहूर्त–म्होतूर, संधि–सांध, स्तन–थान, मुद्रा–मूद.

ह्या सर्व उदाहरणांवरून असें दिसून येईल की, भाषेंत शब्द रिकामा, निरर्थक असा राहूं शकत नाही. कोणत्याहि शब्दानें आळशी, निरुपयोगी बनावें हें भाषेस खपत नाही. प्रत्येक शब्दानें आपलें काम बजाविलें पाहिजे; म्हणून बोलणारे लोक एकस्वरूपी अथवा समस्वरूपी शब्दांच्या अर्थांत सूक्ष्म भेद करीत असतात.

(३) ग्राम्यतापरिहार :— मनुष्याचा स्वभावच असा आहे की तो वाईट असेल तें टाळतो आणि चांगलें असेल तें जवळ करितो. वाइटास

चांगला पोषाख चढवून त्याचा वाईटपणा कमी करण्याकडे मनुष्याची प्रवृत्ति असते. वाईट, अभद्र, अश्लील अशा शब्दांचा उच्चारहि सभ्यतेच्या विरुद्ध होतो. गोष्ट जरी खरी असली तरी तिच्या मूळ भेसूर, अपथ्य स्वरूपांत सांगितली तर ती कानाला, जिभेला, मनाला व शिष्टतेलाहि खपत नाही. 'कोणी मोठा मनुष्य खाली पडला' असें न म्हणतां 'रावसाहेब खाली आले' असें म्हणतात. तसेंच मरण्याची बातमी सांगतांना "अमका अमका मेला" असें न म्हणतां 'वारला किंवा अमका स्वर्गवासी झाला, किंवा देवाज्ञा झाली, देहावसान झालें, प्राणोत्क्रमण झालें' इत्यादि त्याच अर्थाचे शिष्ट प्रयोग वापरतात. 'दिवा मालवणें' हा प्रयोग अशिष्ट समजतात. त्याऐवजीं 'दिवा थोर करणें, दिव्यास निरोप देणें' असें म्हणतात. स्त्रियांच्या बाबतींत तर ही प्रवृत्ति जास्त दिसून येते. घरंदाज सुवासिनी 'करंड्यांतील कुंकू संपलें' अथवा 'कपाळावरील कुंकू पुसलें' असें कधी म्हणावयाची नाही. तर त्याऐवजी 'कुंकू वाढलें' असा प्रयोग करील. 'बांगडी फुटली' असें न म्हणतां 'बांगडी वाढली' असेंच ती म्हणेल. 'शौच' ह्या शब्दाचा आहे. मूळचा त्याचा अर्थ स्वच्छता, परंतु तो कोणत्या अर्थानें वापरला जातो हे सर्वांना माहीत आहेच.

कधी कधी कालान्तरानें आपोआपच एखाद्या ग्राम्य शब्दाचा ग्राम्यपणा नाहीसा होतो. अर्थाकडे बारकाईनें पाहिलें तर सभ्य, शिष्ट माणसांच्या तोंडांतून ते शब्द उच्चारले जाऊं नयेत असे ते शब्द असतात. परंतु रोजच्या उपयोगांत आल्यामुळे त्यांच्या मूळच्या ग्राम्य स्वरूपाकडे कोणाचें लक्ष जात नाही. "गुलाम, भोसडीचा, बहानचोद, मादरचोद" हे व असलेच शब्द ह्या प्रकारांत येतात. 'त्याची खरडपट्टी काढली', 'त्याची चांगली तासडपट्टी केली' वगैरे वाक्यांतील शब्दांचा अर्थ पाहिला तर किती अश्लील आहे! परंतु रोजच्या वापरानें तो इतकासा दृष्टीसमोर येत नाही.

(४) वाईट शब्दांचा वाईटपणा जसा नाहीसा होतो तसा चांगल्या शब्दांचा चांगुलपणाहि नाहीसा होऊन त्यांना केवळ औपचारिकत्व येतें. पत्रांत जे मायने आपण लिहितों ते सर्व ह्या प्रकारचे होत. 'राजमान्य राजेश्री', 'अखंडितलक्ष्मी', 'सकलगुणालंकरण', 'राजश्रिया विराजित', 'सद्गुणनिधान',

'कृपानिधान', 'आपला आज्ञाधारक', 'कृतानेक साष्टांग नमस्कार' इत्यादि मायने आपण वापरतों; परंतु त्यांच्या अर्थाकडे आपण कधींहि लक्ष देत नाहीं. 'राम राम', 'उधो उधो केली' ह्या शब्दांचा मूळ अर्थाचा पार विसर पडला आहे. संस्कृतमधील ' असुर ' शब्दाचा इतिहास तर मजेदार आहे. असुर म्हणजे देव, शक्तिमान् असा अर्थ असतां असुर्य लोकांशी आर्यांचा झगडा झाल्यामुळे त्यांच्या देवतांस 'असुर' हा शब्द दैत्य ह्या अर्थी लावून त्याच्या उलट ' सुर ' शब्द उत्पन्न करून त्याची योजमा स्वदेवता-दर्शक अशी केली. हे सर्व अर्थशून्यत्वाचे प्रकार आहेत.

(५) अकारण गौरव:-— कधी कधी शब्दांमध्ये खोटा भारदस्तपणा आणिला जातो. उमेंट, श्राप, शिकस्त, निद्रिस्त, अर्वाच्य, श्रीमंतपूजन इत्यादि शब्दांत विनाकारण एक वर्ण जास्त घालून अकारण गौरव आणिलें आहे. कांही प्रयोगांमध्येहि असा भारदस्तपणा आणिला जातो. उदा :— "मारामारी झाली" असें न म्हणतां "शरीरसंबंधावर आले" असें म्हणतात.

(६) कधी कधी शब्दाचा मूळ अर्थ जाऊन त्या शब्दाकडे वाक्यांतील संबंध दाखविण्याची कामगिरी येते. उदा :— ' ऐवजीं ' हें ' ऐवज ' ह्या शब्दाचें सप्तमीचें एकवचनी रूप आहे; परंतु 'ऐवजीं' म्हणजे ' बद्दल ' असा अर्थ होऊन ते 'अव्यय' होऊन बसलें आहे. तीच गोष्ट ' मुळे, प्रमाणे, साठी, योगे, पेक्षा ' इत्यादि शब्दयोगी अव्ययांची. परिच्छिन्न, त्यादारभ्य, गेल्या-दारभ्य, लिहिल्यादारभ्य, इत्यादि ह्याच स्वरूपाचीं अव्ययें जुन्या लिखाणांत येतात. संस्कृतमधील अधिक, अपर, अधर, अन्तर्, वरीयस्, ईयस्, इष्ट इत्यादि शब्दांचा उपयोग विशेषणाचा ' तर तम ' भाव दाख-ण्याकडे करतात. विभक्तिप्रत्ययांबद्दल शब्दयोगी अव्ययें वापरण्याची प्रवृत्ति ह्यामुळेच पडली आहे. ' घरीं ' बद्दल ' घरामध्ये ', ' गांवाहून ' बद्दल ' गांवापासून ' तसेंच 'त्याच्यापेक्षा' 'त्याच्याकरिता' हीं सर्व त्याच प्रवृत्तीचीं उदाहरणें होत. विशेषणाबद्दल नामें, नामाबद्दल विशेषणें, भाववाचक नामांबद्दल सामान्यनामें, सामान्यनामांबद्दल भाववाचक, काळ दाखविण्या-साठी साहाय्यकारी क्रियापदांचा उपयोग हे जे उलटसुलट प्रयोग आढ-तात तेहि ह्याच प्रवृत्तीचे दर्शक आहेत. प्रत्ययप्रक्रियेंतील उलाढाल तिज-मुळेच होते.

(७) साम्याभासः— शब्दांच्या उच्चारांत फरक ज्याप्रमाणे साम्याभासामुळे पडतात त्याचप्रमाणे शब्दांच्या अर्थांतहि फरक साम्याभासामुळे पडतात. ह्या साम्याभासामुळेच लहान मुलें कांही चमत्कारिक प्रयोग करतात. 'धरला' हें रूप व्याकरणशुद्ध व योग्य आहे; परंतु त्याच धर्तीवर 'मरला' किंवा 'करला' अशीं रूपें मुलें करितात. 'दूध प्यालास का ?' असें विचारल्याबरोबर 'दूध प्यालों' च्या ऐवजीं 'दूध प्याला' असा प्रयोग मुलें करतात. परकी लोक मराठी शिकतांना असेच चमत्कारिक प्रयोग केवळ त्यांच्या स्वतःच्या भाषेंतील साम्यावरून करतात. 'तो काम केला' हा प्रयोग कानडी लोकांच्या बोलण्यांत नेहमी येतो. पारशी लोक दक्षिणी लोकांस चेष्टेने 'अरे तात्या, बघलास का ?' असा प्रयोग करतात. मुलांकडून किंवा अन्यभाषीयांकडूनच असे चमत्कारिक प्रयोग होतात असें नाही तर चांगल्या जाणत्या लोकांकडूनहि साम्याभासामुळे प्रयोगसंकर होतो. 'मला तें काम होत नाही' ह्या प्रयोगांत ज्या दोन प्रयोगांची छाया पडली आहे ते प्रयोग हेः— 'मला तें काम करवत नाही' हा एक, व माझ्याच्याने तें काम होत नाही" हा दुसरा. 'तो जावेंसें म्हणतो', ह्यावरहि 'त्याला जावेंसें वाटतें' आणि 'तो जाऊं म्हणतो' ह्या दोन प्रयोगांची छाया पडली आहे.

(८) शब्दांचा अपरिचितार्थः— कांही वेळेस शब्दाचा मूळ अर्थ नाहीसा होऊन त्याच्याऐवजी त्यांच्याशीं अगदी अपरिचित असा अर्थ त्या शब्दाला प्राप्त होतो. उदा :— 'ताराबल' ह्या शब्दाचा आकाशांतील ताऱ्यांच्या सामर्थ्याचा मनुष्याच्या जीवितावर होणारा बरावाईट परिणाम हा मूळचा अर्थ, परंतु त्यांत एक अनुस्वार येऊन तारंबळ म्हणजे धांदल असा अर्थ झाला. तसेंच 'शनीचा फेरा', 'खडाष्टक', 'मनस्वी', 'बादरायण', 'त्रेधा', 'छांदिष्ट', 'आर्ष', 'बाष्कळ', 'भादरणें' ह्या शब्दांच्या अर्थांत फरक पडला आहे.

(९) अर्थभ्रंश — ह्या वर सांगितलेल्या प्रवृत्तीसारखीच आणखी एक शब्दाच्या अर्थांत भ्रंश किंवा दोष उत्पन्न करण्याची प्रवृत्ति आढळून येते. उदाः— 'विद्यार्थी' ह्या शब्दाचा मूळचा अर्थ विद्या शिकणारा; परंतु

आम्हांला ‘एक विद्यार्थी’ ठेवावयाचा आहे म्हणजे शाळेंत जाणारा मुलगा परंतु घरीं पूजा, भाजी आणणें वगैरे किरकोळ कोरडीं कामें करणारा गरीब मुलगा असा व्यवहारांत त्याचा अर्थ झाला आहे. ‘महाराज’ हा शब्द गुजराती आचाऱ्याला लावतात. आचारी ( आचार्य ह्या शब्दापासून ), परिमळ, वास (तुपाचा), व्यसन, उपाधि, ग्रंथ ( लहानशा गोष्टींचा ग्रंथ ), अरिष्ट ही आणखीं अर्थभ्रंशाचीं उदाहरणें होत. ‘छांदिष्ट’ (छंदासंबंधी), ‘आर्ष’ (ऋषीसंबंधी), ‘बाष्कळ’ (बाष्कल = वेदाची शाखा), ‘भादरणें’ (भद्राकरणम्) ह्या वर दिलेल्या शब्दांतहि अर्थभ्रंश झाला आहे.

कधी कधी शब्दाच्या मूळ अर्थाच्या अगदीं विरुद्ध असा अर्थ त्या शब्दाला प्राप्त होतो. उदा :— ‘अचपल’ (अतिचपल ह्या अर्थी), अपरोक्ष ह्याचा मूळ अर्थ समोर. परंतु त्याऐवजी ‘पाठीमागे, दृष्टीआड’ हा त्याचा अर्थ रूढ झाला आहे.

(१०) अर्थप्रशस्ति – कधी कधी एखाद्या शब्दाचा मूळचा अर्थ वाईट असतो, परंतु कालांतराने अर्थातील वाईटपणा जाऊन त्या ठिकाणीं चांगला अर्थ येतो. उदा :– ‘धूर्त’ ह्या शब्दाचा ‘कावेबाज’ असा मूळचा अर्थ असून त्याऐवजी ‘शहाणा’ ‘दूरदर्शी’ असा अर्थ रूढ झाला आहे. ‘वजीर’ ह्या शब्दाचा अर्थ ‘सामान्य नोकर’ असा मूळ होता तो जाऊन त्याऐवजी ‘मुख्य प्रधान’ असा त्याचा अर्थ झाला आहे.

आधिभौतिक शास्त्रांत प्रत्यहीं जसजसे शोध लागत आहेत तसतसे निरनिराळे शब्द नव्या अर्थाने भाषेंत रूढ होत आहेत. नव्या नव्या शास्त्रांची परिभाषाहि मराठींत तयार करण्याचे प्रयत्न चालले आहेत. अशा रीतीने भाषेची शब्दसंपत्ति सारखी वाढत चालली आहे.

२३ भिन्न भिन्न संस्कृतींच्या किंवा भाषांच्या लोकांचा संबंध आला म्हणजेहि नवे नवे परकी भाषेंतील शब्द भाषेंत रूढ होतात. द्राविडांचा आणि मराठ्यांचा संबंध आला आणि पुष्कळ द्राविडी शब्द मराठींत शिरले. महमदीयांचा आणि मराठ्यांचा संबंध आल्याबरोबर किती तरी फारशी, अरबी व तुर्की शब्द मराठींत घुसले. सध्या इंग्रजीच्या अमदानींत मराठी भाषेंत इंग्रजी शब्दांचा भरणा पुष्कळच होत आहे. मराठी भाषेंतून हे परकी शब्द काढून

टाकण्याची चळवळ कांही लोकांनी सुरू केली आहे. ही चळवळ कितीहि सद्धेतुमूलक असली तरी भाषेच्या वाढीच्या दृष्टीने हानिकारक आहे. संस्कृति-संस्कृतींचा मिलाफ झाला की, शब्दाचें लेण येणारच. तें टाळतां येतच नाही. शब्द टाळावयाचें असले तर त्या संस्कृतिसंयोगाचाच छेद केला पाहिजे. ते न करतां केवळ शब्द उचलून काढणें हें बैलाच्यापुढे गाडा बांधण्यासारखें किंवा पायाच्या अगोदर कळस उभारण्यासारखें आहे. शिवाय कोणताहि शब्द भाषेंत उत्पन्न होऊन जो रूढ होतो तो त्याच्या मुळाशीं असलेल्या कल्पनेच्या ( Concept ) जोरावर होतो. ती कल्पना नाहीशी झाली तरच तिच्यावर आधारलेला शब्द भाषेंतून नाहीसा होतो. वेदी, दर्वी, आसंदी, होता, प्रतिहर्ता, पुरोडाश वगैरे वेदांतील शब्द पुढे बेपत्ता झाले, किंवा मवला, एकवंकी, रासौभ, राऊवें, रामस्य, आविस, आहाणा हे ज्ञानेश्वरींतील शब्द किंवा हुंबते, बोहरी, वोगरू, निकुरे, लास, वारुवा, झांजर, वगैरे नामदेवाचे शब्द पुढच्या मराठींत बेपत्ता झाले ह्याचें कारण त्यांच्या मुळाशीं असलेल्या कल्पना नष्ट झाल्या हेंच होय. शब्द मरतात ह्याचें कारण त्यांची मूळची कल्पना मरते हें होय; तेव्हा कल्पना जोंपर्यंत जिवंत आहे तोंपर्यंत तद्द्योतक शब्द नाहीसा कसा होणार ? असे शब्द मुद्दाम नाहीसे केले तर दुसरे परकी शब्द त्यांचें स्थान पटकावितील व दुसऱ्या चांगल्या शब्दांना हद्दपार करतील. तदर्थी मराठी शब्द रूढ करावयाचे असल्यास त्यांची कल्पना ( Concept ) मराठींत स्वतंत्र अशी निर्माण केली पाहिजे. सर्व शास्त्रनिर्मिति व कलाविकास मराठींत करून यासंबंधी कल्पना मराठींत उत्पन्न केल्या तरच तद्दर्शक मराठी शब्द रूढ होतील.

२४ शब्दांत काव्य, इतिहास, नीतिमत्ता हीं असतात. शब्दांत समाजाचा सर्व व्यवहार प्रतिबिंबित झालेला असतो. कांही शब्द काव्यांतच योजण्यासारखे कोमल, कर्णमधुर असतात तर कांही कर्णकर्कश असतात. कर्ण, गांगेय, कालेय, मर्दन, नरकासुर, यादवी, कुरुक्षेत्र, कोडगा, शतकृत्य, शरपंजरी, जन्मसावित्री वगैरे शब्दांत पुराणांशीं अनुसंधान आहे. निर्वाण, अर्हत्, सूत्र, फाकडा, भवानी, घाशिरामी वगैरे शब्दांत इतिहास आहे. राजकीय, धार्मिक, सामाजिक, अनुकूल प्रतिकूल मतेंहि शब्दांत उमटलेलीं

दिसतात. Whigs, Tories, मवाळ, जहाल हे शब्द राजकीय भिन्न मतें दाखवितात. बामण, भटुरगा, पळीपंचपाऱ्या, कुणबट, नांगऱ्या, लंगोट्या, कागडा, लांडा, सायबा वगैरे निंदाव्यंजक शब्दांत धर्ममतें उतरलेलीं दिसतात.

सामाजिक चालीरीती, व्यवहार, सवयी वगैरे कित्येक वेळा शब्दांवर उमटलेल्या असतात. 'कोस' म्हणजे दोन किंवा तीन मैल असें आपण सध्या म्हणतों. परंतु पूर्वी मनुष्याचें ओरडणें किंवा हाक जेवढ्या अंतरावर ऐकूं जाई तेवढ्या प्रदेशास क्रोश म्हणत असत. फरशी म्हणजे कुऱ्हाड असें आपण समजतों व तें हत्यार लोखंड-पोलादाचें करतों. परंतु फरशी म्हणजे परशु आणि तो पार्श्व किंवा पर्शु ह्या शब्दापासून ज्या अर्थी आला आहे त्या अर्थी पूर्वी तें हत्यार प्राण्यांच्या कुक्षींतील हाडाचें करीत असत हें उघड आहे. 'सैपाक' हा कांहीं कोणी दुसऱ्या आचाऱ्याकडून तयार करावयाचा नसून ( <स्वयं-पाक ) स्वता करावयाचा असे. 'परीट' हे कपडे धूत असत ( <धावक ) व रंगवीतहि असत ( <रजक ). वेळ दाखविण्याकरिता पूर्वींहि टोले मारीत असत हें 'प्रहर' ह्या शब्दावरून उघड आहे. घोड्यापुढे धावणें, घोड्यावर बसणें, अमुक घोड्यावर आहे, घोडामैदान जवळ, आपलें घोडें पुढे ढकलणें वगैरे वाक्यप्रयोग युद्ध-प्रवृत्तीचे निदर्शक आहे. घायाळचतुर्दशी ( युद्धांत घायाळ झालेल्याची श्राद्धतिथि), ढालगज ( ढालेचा हत्ती ), खडाजंगी, खानाजंगी ( मोठी लढाई ), हूल उठविणें ( सैन्याच्या पुढे ओरडणें ), जामा ( विजार )-निमा ( वरचा अंगरखा ), वगैरे शब्द जुन्या कांहीं चालीरीतींचें निदर्शक आहेत. 'काडी मोडणें' 'घटस्फोट' ('मडकें फोडणें' हें मृत्यूचें निदर्शक आहे ) 'गौड बंगाल' (बंगाल देशांतील जारणमारण विद्येचें दर्शक), 'घनचक्र' 'घनघोर', (अघोरपंथापासून घोर हा शब्द), 'लाजाहोम', 'सप्तपदी' वगैरे शब्दा वरून पूर्वीच्या काळच्या सामाजिक चालीरीति दाखविल्या जातात. शब्दाच्या अर्थामध्ये सामाजिक चालीरीती ज्या लपून बसलेल्या असतात त्या शब्दाच्या धात्वर्थाच्या साहाय्यानेच हुडकून काढतां येतात. वेदकालीन सामाजिक परिस्थिति जी कांहीं विद्वानांना रंगविता आली व जें इतक्या प्राचीन कालचें चित्र पुढे उभें करतां आलें तेंहि ह्या शब्दांच्या अर्थांमुळेच आलें हें स्पष्ट आहे.

भाषेतील शब्दांच्या उच्चारप्रक्रिया व अर्थप्रक्रिया ह्या येथवर सांगितल्या. ह्यांना शब्दांचे वर्णसमाम्नाय, किंवा उच्चारसमाम्नाय, व अर्थसमाम्नाय म्हणावयास हरकत नाही. अशा तऱ्हेचे समाम्नाय ( सम् + आ + म्ना = एकत्र विचार ) प्राचीन कालचे लोक करीत असल्याचे दाखले आपल्या पूर्वीच्या वाङ्मयांत सांपडतात. शब्दांचा उच्चार व अर्थ ह्यांत झालेल्या फरकानेच भाषेचा विकास होतो. शब्दांच्या स्वरूपांत बदल, अर्थांत बदल किंवा दोहोंत बदल, स्वरूप कायम राहून अर्थ बदलणें, किंवा अर्थ तोच राहून स्वरूपांत फरक पडणें, जुने शब्द नाहीसे होणें, नवे शब्द येणें हे सर्व प्रकार भाषेंत प्रत्यहीं चाललेलेच असतात. असे पुष्कळ प्रकार झाले तरी भाषेस कमीपणा येत नाही. उलट हे प्रकार म्हणजे भाषेच्या जिवंतपणाचीं लक्षणें होत व जिवंत प्राण्यामध्ये ज्याप्रमाणे बाल्य, तारुण्य, वार्धक्य अशीं अवस्थांतरें किंवा रूपान्तरें असतात तद्वत् भाषेचींहि हीं रूपान्तरें होत. ह्या सर्व प्रकारांनी भाषा जास्त फोफावतच जाते. वर्णप्रक्रिया व अर्थप्रक्रिया ह्या दोन्ही प्रकारच्या चमत्कारांनी भाषेंत हळूहळू फरक पडत जाऊन तिच्यापासून पोटभाषा व कालपरत्वें स्वतंत्र अशा भाषा उत्पन्न होतात. पोटभाषांचा विचार खाली केला आहे. ×

## पोटभाषा

२५ भाषेच्या बाह्य व आंतर ह्या दोन्हीं स्वरूपांत कालान्तराने फरक कसे व कोणत्या प्रकारचे पडतात हें येथवर सांगितलें. भाषेचें शरीर व तिच्यांतील आत्मा ह्या दोहोंत असे बदल झाल्यामुळे विकृति होऊन तिचें स्वरूप पालटतें व तिच्यापासून निरनिराळ्या भाषा उत्पन्न होतात. मूळ भाषेचे आर्य, टयूरेनियन, मंगोलियन, बांटू वगैरे प्रकार होणें किंवा आर्य भाषेचे वैदिक, अवेस्ता, ग्रीक, लॅटिन, लिथ्यूनियन, गॉथिक वगैरे प्रकार होणें किंवा वैदिक भाषेचे संस्कृत, पाली, प्राकृत, अपभ्रंश व वर्तमानकालीन बोली किंवा मराठीचे वऱ्हाडी, कोंकणी, कारवारी, खानदेशी इत्यादि प्रकार होणें हें सर्व भाषेच्या दुहेरी स्वरूपांत फरक होण्याचा जो तिचा स्वभाव आहे त्याच्यावर अवलंबून आहे. ह्या स्वभावामुळेच भाषेमध्ये पोटभाषा उत्पन्न होतात; व वर दिलेले भाषेचे प्रकार त्या त्या भाषेचे पोटभाषाच होत.

खऱ्या अंतिम दृष्टीने पाहिलें तर जितक्या व्यक्ति तितक्या निराळ्या भाषा व तितक्या पोटभाषा असल्या पाहिजेत. परंतु पोटभाषेची व्याप्ति इतकी वाढवून चालावयाचें नाही. भाषेंत व्यक्तीचें व्यक्तित्व तर उमटतेंच परंतु तें समाजाचा जो एक मोठा ठसा तिच्यावर उमटतो त्याच्यापुढे टिकत नाही. भाषेवर उमटणाऱ्या ह्या मोठ्या ठशाला पोटभाषा म्हणतात. पोटभाषा ही सुद्धा समाजांतील एखाद्या घटकाची बोलभाषाच असते. भाषेंतील एकजिनसीपणा कायम राहण्यास बोलणाऱ्या लोकांत व्यवहार सारखा झाला पाहिजे. ह्या व्यवहारसातत्यानेच भाषेमध्ये स्थैर्य राहतें. हें कोणत्याहि कारणानें खुंटलें की एक भाषा दुसऱ्या पोटभाषेस प्रसवते. जवळ जवळ असणाऱ्या उपभाषांमध्ये स्पष्ट असा फरक फारसा दिसत नाही; परंतु मध्यवर्ती भाषेच्या प्रदेशाच्या दोन टोकाच्या दोन उपभाषा घेतल्या तर त्यांमधील अंतर मनाला पटल्याशिवाय राहत नाही. मूळभाषा आणि तिच्यापासून निघालेल्या पोटभाषा ह्या दोहोंमध्ये प्रयोग, प्रत्यय, शब्दसमूह ह्या बाबतींत साम्य आणि वैषम्य दोन्हीं असावीं लागतात. साम्य नसेल तर दोन्हींचें मायलेकींचें नातें राहणार नाही व वैषम्य नसेल तर दोन्हींमध्ये अलगपणा राहणार नाही. पोटभाषा बोलणार समाजहि एकमेकाशीं संबद्ध असावे लागतात. देशाचा अभिमान, इतिहास, महाकाव्यें, पुराणांतील दंतकथा, लोककथा हीं सर्व त्या दोहोंस एकत्र बांधणारीं साधनें होत. साम्य किंवा वैषम्य ज्या प्रमाणांत सापडेल त्या प्रमाणांत मूळ मातृभाषेपासून पोटभाषेचा अलगपणा अजमावतां येईल. पुनः ज्या प्रमाणांत मूळ समाजांत लढाई, दुष्काळ, आपसांतील वितुष्टें वगैरेंनी उलथापालथ होईल त्या प्रमाणांत त्यांच्या बोलींतहि साम्य कमी होऊन वैषम्याचें प्रमाण वाढूं लागेल व पोटभाषा मूळ भाषेपासून दूरची दिसेल. एक संस्कृति, एक धर्म, एकच राजकीय सत्ता, एकच जीवनमार्ग, एकच सारस्वत असल्याने कोणत्याहि भाषेपासून पोटभाषा उत्पन्न होण्यास आळा पडतो. परंतु त्यांतच जर का बिघाड झाला तर भाषेंत विकृति सुरू होते आणि पोटभाषा उत्पन्न होण्यास सुरवात होते.

२६ पोटभाषा उत्पन्न झाल्या म्हणजे मध्यवर्ती मातृभाषा कमकुवत होते असें नाही. पोटभाषा मातृभाषेचें सत्त्व न शोषतां उलट तिला पोसण्याचें,

तिच्या अंगावर मूठभर मांस चढविण्याचें काम करतात. पोटभाषा म्हणजे मूळ भाषेचे फाटे किंवा मूळ भाषाभागीरथीचे कांही कालवे नव्हत की, त्यांमधून नदीचें पाणी खेळलें गेलें की, मूळ नदीला खांडवे पडावेत. पोटभाषा ह्या मूळ भाषारूपी अश्वत्थाच्या पारंब्या होत. त्या वरून खाली खोल अदृश्य जागेंत जमिनीच्या थराथरांत चांगली जागा पकडून बसतात व मूळ वृक्षास पोसण्याचें व वारा, पाऊस, तुफान वगैरे संकटांत बेगुमान अचल राहण्याची शक्ति त्यास देतात. प्रांतांच्या कोणत्या तरी कोपऱ्यांत पोटभाषा दबा धरून बसते आणि मूळ मातृभाषेस सारखी मदत करून वर्णांचा त्याग, आगम वगैरे संकटांना तोंड देण्याचें सामर्थ्य तिच्या अंगीं उत्पन्न करते. योग्य अन्वर्थक शब्दांची ज्या वेळेस मूळ भाषेस उणीव भासते त्या वेळेस पोटभाषाच ती दूर करून तिला मदत करूं शकते. एखाद्या भाषेस जर तिच्या पोटभाषांच्या गोतावळ्यामधून काढून जर दुसरीकडे नेऊन ठेविलें तर तिचें गणगोत तुटलें म्हणून झुरून झुरून ती भाषा मरून जाईल; कारण तिच्या एकटींत त्राण नसतो. तंबू उभारावयाच्या वेळीं मधील मुख्य खांब लागतोच. पण तोच खांब नीट अचल सरळ राहावा म्हणून चहूंबाजूंस काढण्यांनी व मेखांनी त्याला बांधावें लागतें. तसेंच भाषेचें आहे. तिला चांगली डांबून टाकण्यासाठी तिला पोटभाषारूपी रश्शींनी बांधावी लागते, व म्हणूनच ती संकटांना न जुमानतां स्थिर राहूं शकते.

२७ पोटभाषांचें महत्त्व मूळ भाषेच्या इतकें जरी कदाचित नसलें तरी तें कांही कमी नाही. उत्पत्तीच्या बाबतींत कधी कधी मध्यवर्ती भाषाच एखाद्या पोटभाषेपासून निघालेली सापडते. पोटभाषांचा गौणपणा काढून टाकून त्यांना महत्त्व प्राप्त करून देणें हें बोलणाऱ्यांच्या ताब्यांतील आहे. पोटभाषांत सरस व सकस असें वाङ्मय निर्माण झाल्यानंतर तिला कमी कोण लेखणार ? तिच्यामध्ये जर जाज्वल्य व स्वतंत्र स्वरूपाचा व्यवहार सुरू केला, तिच्या द्वारा जर शास्त्राचा प्रसार झाला तर तीच पोटभाषा आदर्श मध्यवर्ती मुख्य भाषाच कां होऊं शकणार नाही ! अशा दृष्टीने पोटभाषेंत जर वाङ्मयनिर्मिति कोणीं केली तर मध्यवर्ती भाषीयांनी तिजक[illegible]च्या दृष्टीने न पाहतां तिचें त्या वाङ्मयाबद्दल अभिनंदनच

केलें पाहिजे. कोंकणी किंवा वऱ्हाडी भाषेंत जर भावनास्पर्शी उत्तम काव्य निर्माण केलें, उत्तम विचारप्रवर्तक गद्यरचना केली, अभिनवशास्त्राचा प्रसार जर कोणीं केला तर त्यांत मध्यवर्ती मराठी बोलणाऱ्यास त्याचा विषाद कां वाटावा ? पोटभाषा संपन्न व ऊर्जस्वल केल्याने मध्यवर्ती भाषाहि संपन्न होईल. त्याचप्रमाणे अमुक एका गणाचीच किंवा प्रांताचीच भाषा आम्हीं आदर्श कां मानावी ? आमचीच भाषा त्यांनी कां मानू नये ? असा आग्रहहि धरण्यांत कांही अर्थ नाही. भाषा काय किंवा पोटभाषा काय, ती जी मूळ धरून सर्वमान्य व सन्मान्य होते ती बोलणाऱ्याच्या दुराग्रहाने न होतां तिच्यामध्ये जें जोरदार, ओजस्वी व तेजस्वी वाङ्मय निर्माण केलें जातें त्यावरून होते. तशा प्रकारचें वाङ्मय निष्पन्न करणें आणि आपली भाषा सर्वमान्य करावी ह्याच उघड व प्रामाणिक मार्ग आहे.

पोटभाषांनी व्यापावयाच्या क्षेत्रास अमुक एक मर्यादा घालतां येत नाहीं. त्याचप्रमाणे बोलणाऱ्यांची संख्या अमुकच असली पाहिजे असाहि निर्बंध ठरवितां येत नाही. नेपाळमध्ये व मणिपूरच्या आसपास पोटभाषांचा इतका बुजबुजाट झाला आहे की, एकेका पोटभाषेचें क्षेत्र कांही कुटुंबापुरतेंच आहे. हीब्रु भाषेचें व बास्क या भाषेचेंहि क्षेत्र फार संकुचित आहे. यहुदी व बास्क हे लोक धर्म, संस्कृति वगैरे कारणांनी मूळच्या आपल्या लहानमोठ्या क्षेत्रांस बिलगून राहिले आहेत. कधी कधी लढाया, दुष्काळ, रोगांची साथ ह्या उत्पातांनीहि बोलणाऱ्यांची संख्या सारखी घटत असते.

पोटभाषांचे निरनिराळे प्रकार आहेत. प्रांतिक भेद, कालिक भेद, गणभेद, लिंगभेद, वयोभेद, संस्कृतिभेद इत्यादि सर्व हे भाषांचें निरनिराळे पोटभेद आहेत. केवळ मराठीचें उदाहरण द्यावयाचें झालें तर वऱ्हाडी, खानदेशी, कोंकणी, देशी, कारवारी हे प्रांतिक भेद. यादवकालीन, बहामनीकालीन, शिवकालीन, पेशवेकालीन, किंवा वर्तमानकालीन हे कालिक भेद. लोहार, चांभार, महार, बुरूड, ब्राह्मण, मराठे इत्यादि गणभाषा, स्त्रीभाषा, पुरुषभाषा, बालभाषा, वृद्धभाषा, ग्रामिकभाषा, नागरभाषा इत्यादि मराठी भाषेचे प्रकार आहेत. ह्या सर्वांचा ऊहापोह व त्यांचीं गमकें हीं पुढे स्वतंत्र प्रकरणांत दिलीं आहेत.

## वर्तमानकालीन भारतीय भाषा

२८ मराठी भाषा ही मागे सांगितलेल्या आर्यभाषेच्या कुळींत उत्पन्न झालेली असल्यामुळे आपणास तिच्या भोवतालचा गोतावळा कशा स्वरूपाचा आहे हें पाहिलें पाहिजे. त्यावरून सर्व गोतावळ्यांत मराठीचा दर्जा काय आहे हें समजण्यास त्याचा उपयोग होईल. मूळ आर्य भाषेच्या आठ शाखा समजल्या गेल्या आहेत. (१) आर्य भारतीय, (२) आर्मिनियन, (३) स्लाव्ह, (४) अल्बानियन, (५) ग्रीक, (६) लॅटिन, (७) केल्टिक, (८) जर्मॅनिक ह्यापैकी प्रत्येक शाखेपासून निरनिराळे फाटे निघाले आहेत. ह्या शिवाय पुन्हा एके काळीं रूढ असलेल्या परंतु सध्या लोप पावलेल्या अशा मध्य आशियांतील तुखारी भाषेसारख्या भाषांचाहि एक निराळा वर्ग होईल.

आपल्या मराठीशीं संबद्ध म्हणजे पहिली शाखा होय. हिला आम्ही आर्यभारतीय असें जरा विस्तृत नांव दिलें आहे. ह्या वर्गांत भरतखंडांतील आर्योद्भव सर्व भाषा येऊन त्यांच्याशिवाय त्यांच्या भोवतालच्या व त्यांच्या प्रत्यक्ष गोतावळ्यांतील अशा इतर थोड्याहि भाषा येतात. भारतीय भाषेचे मुख्य तीन पोटभेद पडतात. खुद्द भरतखंडांतील वैदिक, संस्कृत, पाणिनीय संस्कृत, पाली, शौरसेनी, पैशाची, मागधी, माहाराष्ट्री, अपभ्रंश, हिंदी, गुजराथी, बंगाली, मराठी इत्यादि सर्व भाषांचा अन्तर्भाव त्या पहिल्या वर्गांत होतो. दुसऱ्या वर्गांत इराणांतील जुन्या आर्यभाषांचा अन्तर्भाव होतो. ब्राह्मणांची जशी वैदिक संस्कृत भाषा होती तशी इराणामध्ये स्थायिक होऊन राहिलेल्या आर्यांची भाषा अवेस्ता ही होती. झेंद हें त्यांच्या ग्रंथाचें नांव व अवेस्ता हे त्याच्यावरील टीकेचें नांव. अशा दोन्ही नांवांपासून बनलेलें झेंद-अवेस्ता हें नांव त्याच्या भाषेस येऊन बसलें. पारशी धर्माचा संस्थापक जो झरतुष्ट त्याने आपल्या धर्माच्या गाथा ह्याच भाषेंत गायिल्या. झरतुष्टाचा काळ साधारणपणें खि. पू. ६०० पर्यंत आहे. ह्याच भाषेचा तिसरा पोटभेद म्हणजे ‘दरदीय’ भाषांचा. सीमांत असा जो वायव्य सरहद्दीकडील प्रांत आहे त्या प्रांताच्या टापूत ह्या भाषा बोलल्या जातात. चित्रळ, वसिवेरी, कलश, कोहिस्तान आणि काश्मीर ह्या प्रांतांत ह्या भाषा बोलल्या जातात.

वर दिलेल्या भारतीय भाषेच्या तीन भेदांपैकी मराठी भाषेसारख्या ज्या वर्तमानकालीन भारतीय बोली आहेत त्यांसंबंधी माहिती पुढे देत आहे.

(१) अगदी उत्तरेकडील भाषांचा दारदीय भाषा म्हणून एक स्वतंत्रच वर्ग केला आहे. महाभारतांत उल्लेखिलेल्या दरद लोकांमध्ये ह्या भाषा प्रचलित होत्या म्हणून त्यांना 'दरदीय' असें नांव मिळालें आहे. ह्या दारदीय भाषा दर्दिस्तान, चित्रळ, काफिरिस्तान व काश्मीर वगैरे प्रांतांत रूढ असल्यामुळे त्याच प्रांताच्या आसपास वावरणाऱ्या ज्या इतर भाषा आहेत त्यांचा त्यांचा परस्पर संबंध आला आहे. बोलणारे लोक साधारणपणें वीस लाख आहेत. त्यापैकी निमी संख्या एकट्या काश्मिरांतच आहे. ह्या सर्व भाषांमध्ये काश्मिरी भाषाच फक्त कांहीशीं सुसंस्कृत व साहित्यिक स्वरूपाची आहे असें म्हणतां येईल. बाकी सर्व बोली ग्रामिक स्वरूपाच्या आहेत. काश्मीर हा प्रांत जुना आर्यस्तान असल्यामुळे तेथील भाषेवर, धर्मावर, संस्कृतीवर, वाङ्मयावर आर्यांचा ठसा उठलेला आहे. काश्मिरी भाषा जिच्यापासून उत्पन्न झाली ती पैशाची भाषा 'दरदीय' स्वरूपाची आहे असें कित्येक म्हणतात.[१] गुणाढ्याची 'बृहत्कथा' ह्या पैशाची भाषेंतच लिहिली आहे. काश्मिरी भाषा शारदा लिपींत लिहिली जाते. परंतु सध्या बहुतेक ठिकाणीं शेकडा नव्वद लोक महमदीय असल्यामुळे फारशी लिपी वापरतात.

(२) ह्यानंतर लगतची भाषा म्हणजे पंजाबांतील लहाण्डी भाषा होय. ही भाषा बोलणाऱ्यांची संख्या पन्नास लाख आहे. ह्या भाषेंत फारसें वाङ्मय नाही. जें कांही थोडेसें आहे तें शीखांचे 'जनमसाखी' वगैरे धार्मिक गद्य आहे. लहाण्डी भाषा पंजाबच्या पश्चिम भागांत चालते. पंजाबच्या पूर्व भागांत पंजाबी भाषा बोलली जाते. ही भाषा बोलणारे लोक एक कोटी साठ लाख आहेत. पश्चिमेस सिंधुनद आणि पूर्वेकडे सतलज नदीपर्यंत डोंगराळ प्रदेशांतून थेट मुलतानपर्यंतचा प्रांत पंजाबी भाषेने व्यापला आहे. पंजाबांतील कोणतेंहि शहर घेतलें तर पंजाबी भाषा एकाच मासल्याची बोलली जाईल असें नाही. पंजाबी भाषेचें शुद्ध स्वरूप रावी आणि बियास ह्या दोन नद्यांमधील प्रदेशांत ऐकावयास सापडतें. डोगरी म्हणून ह्या भाषेची

१ S. K. Chatterji, O. D. B. L. P. 7.

एक पोटभाषा आहे आणि ती जम्मु, कंग्रा वगैरे प्रांतांत बोलली जाते. शीख लोक पंजाबी भाषा वापरतात. त्यांची लिपी मात्र गुरुमुखी आहे. सर्व पंजाब प्रांताची सामान्य बोधभाषा म्हटली तर उर्दू किंवा हिंदुस्तानी आहे असेंच म्हणावें लागेल. पंजाब प्रांतांतील दुसरी एक महत्त्वाची भाषा पुश्तू ही होय. ही भाषा बोलणारे लोक नऊ लाख आहेत. पंजाबच्या वायव्य टोकापासून हिला सुरुवात होते. पेशावर, हजारखोरें, सिंधुनदीच्या पूर्वेकडील खोरें ह्या प्रदेशांत हीच भाषा वापरतात.

(३) उत्तरेस हिमालयाच्या पायथ्याशीं लगत असलेल्या ज्या भाषा प्रचलित आहेत त्यांना 'पहाडी' भाषा म्हणतात. ह्या भाषांत पूर्वेकडील, पश्चिमेकडील व मध्य पहाडी असे तीन पोटभेद आहेत. ह्या भाषा बोलणारे लोक मूळचे 'खश' ह्या नांवाचे दरदजातीय होते व हिमालयाच्या पश्चिमेकडील भागांतून हे खाली उतरले. त्याच सुमारास राजपुताना वगैरे प्रांतांतून कांही आर्यजातीय लोक वर सरकले आणि खश लोकांत जाऊन मिसळले. ह्या त्यांच्या मिलाफानें खश लोकांची मूळची भाषा बदलून 'पहाडी' भाषा तयार झाली. ह्या पहाडी भाषा जर बारकाईनें तपासल्या तर त्यांच्यामध्ये राजपुतान्यांतील भाषा आणि दरदीय भाषा ह्यांचें मिश्रण झालेलें आढळल्याशिवाय राहत नाही. ह्या पहाडी भाषांपैकी खस्कुरा नांवाची जी त्यांतील एक पोटभाषा ती इतर सर्वांपेक्षा अधिक महत्त्वाची आहे. हिलाच पर्वतीय, गोरखाली किंवा नेपाळी म्हणतात. कुमाउनी, गढवाली ह्या भाषाहि पहाडी वर्गांतील होत. पहाडी भाषा बोलणाऱ्यांची संख्या एकंदर २० लाख आहे. ह्या भाषांचें आयुष्य फार मोठें नसल्यामुळे त्यांच्यांत वाङ्मयहि कांही विशेष निर्माण झालेलें नाही. अठराव्या शतकांत ह्या उत्पन्न झाल्या. त्यापूर्वी ह्याच प्रदेशांत अवधी, मैथिली व बंगाली ह्या भाषा चालू होत्या.

(४) सिंधुनदीच्या दक्षिण खोऱ्यांतील प्रदेशांत सिंधी भाषा चालू आहे. तिच्या पांच पोटभाषा असून सिंधच्या पांच भागांत त्या वापरल्या जातात. थरच्या मैदानांत थरेली, उत्तर सिंधमध्ये सिरायकी, दक्षिण सिंधमध्ये लारी, कच्छमध्ये कच्छी व अगदी उत्तरेकडे बिचोली अशा त्या रूढ आहेत.

सिंधी भाषा सध्या ज्या प्रांतांत बोलली जाते त्या प्रांतांत पूर्वी पैशाची प्राकृत बोलली जात होती. पुढे सिंधमध्ये आभीर लोकांची वस्ती झाल्यामुळे त्यांनी आपली 'अपभ्रंश' भाषा तेथे रूढ केली. ह्या दोन कारणानें सध्याच्या सिंधी भाषेंत पैशाची आणि अपभ्रंश अशा दोन्ही भाषांचीं चिह्नें सापडतात. आभीर लोक सिंध प्रांतांतूनच खाली गुजरातेंत महाराष्ट्र व कोंकण ह्या प्रांतांत उतरले. उच्चार व प्रयोग ह्या दोन्ही बाबतींत सिंधी व पंजाबी ह्या भाषांमध्ये बरेंच साम्य आढळतें. सिंधीमध्ये ग्, झ्, ड्, ब् ह्या वर्णांचे उच्चार कांहीं अंशीं चमत्कारीक रीतीने करतात. ह्या भाषेंत वाङ्मय फारसें नाही व जें आहे तें फारसें जुनें नाही. लेखनांत उर्दु किंवा गुरुमुखी लिपी वापरतात. सिंधी भाषा बोलणारे लोक पसतीस लाख आहेत.

(५) पंजाबी भाषेशीं लगतच सतलज नदीच्या दक्षिणेस आणि पूर्वेस हिंदी भाषेचा प्रदेश सुरू होतो. हिंदुस्थानांतील कोणत्याहि बोलीपेक्षा हिने जास्त प्रदेस व्यापला आहे. हिची पश्चिमेची सरहद्द सरहिंदपर्यंत जाते. पुढे नैऋत्येच्या बाजूने खाली जात जात पतियाळा आणि भावलपूर संस्थानांतील अरण्यांतून वाट काढीत काढीत पंजाबच्या अनुरोधाने येऊन जैसलमीरजवळ ती सिंधीची गाठ घेते. नंतर ती पश्चिमेच्या बाजूस वळून पुढे जात जात एका बाजूस गुजरातीस टाकते आणि थोडे पुढे जाऊन मराठीच्या हद्दीशीं आपली हद्द नेऊन भिडविते. इंदोरच्या जवळ तिन्ही भाषांचा अंमल थोडाबहुत दिसून येतो. पूर्णजवळ हिंदीची आणि बंगालीची भेट होते. हिंदी बोलणारे लोक सहा कोटी सात लक्ष त्रेसष्ट हजारांवर आहेत. ह्या भाषेंत हिंदुस्थानांतील भाषांतील प्रत्येकीचा चांगुलपणा उतरला आहे. ही भाषा अतिशय डौलदार, श्रवणहारी, योग्य भावनाप्रदर्शक, ऐकायला गोड, बोलायला गोड, अर्थाला गोड, परिस्थितीस साजेशी, सभ्य, सौम्य, गंभीर, मृदु असे सर्व गुण हिच्यांत एकवटलेले आहेत. संस्कृतच्या संगतीने हिला भारदस्तपणा आला आहे. फारशीच्या सहवासाने हिच्यांतील लेचेपेचेपणा नाहीसा झाला आहे. गुजराती व बंगाली ह्या भाषांनी आपलें उच्चारमाधुर्य दिलें आहे. मराठीने हिला आपला कणखरपणा दिला आहे. ह्या भाषेंत वाङ्मयसंपत्तिहि पुष्कळ आहे, व सध्या जारीने वाढत आहे. तुलसीदास,

सूरदास, नाभाजी, प्रियदास वगैरेंनी भाषेवर उपकार करून तिच्यांत ओज व सामर्थ्य ओतलें आहे.

हिंदी भाषेच्या ज्या उपभाषा आहेत, त्यांमध्ये राजस्थानी, अवधी, ब्रज आणि खडी बोली ह्या मुख्य समजल्या जातात.[१] बुंदेलखंडी म्हणून एक बराच महत्त्वाचा असा पोटभेद आहे; परंतु स्थूलमानाने त्याचा अन्तर्भाव वर सांगितलेल्या ब्रज भाषेमध्ये होतो.

(अ) राजस्थानीः— ही भाषा राजस्थानमध्ये सुरू आहे. राजस्थानी भाषा बोलणारे लोक वीस लाख आहेत. ह्या भाषेमध्ये पश्चिमराजस्थानी व पूर्वराजस्थानी असे दोन स्थूल भेद असले तरी तिचे पुन्हा प्रांतपरत्वें पुष्कळ पोटभेद झाले आहेत. त्यांपैकी मारवाडी, जयपुरी, मेवाडी माळवी, नेमाडी व हरौती हे मुख्य होत. ह्यांतील कांही पोटभेदांमध्ये नांव घेण्यासारखें वाङ्मय तयार झालें आहे. मारवाडामधील जुनें साहित्य डिंगल ह्या नांवाने प्रसिद्ध आहे. दादू दयाल व त्यांचे शिष्य ह्यांच्या वाणीने जयपुरी भाषेस शोभविलें आहे. सूक्ष्म दृष्टीने पाहिलें असतां ह्या पोटभेदांमध्ये परस्परापासून अलग समजण्यासारखे असे विशेष दिसणार नाहीत. भोवताली वावरणाऱ्या भाषेशीं हे पोटभेद बरेचसे जुळतेमिळते असेच आहेत. उदाहरणार्थः— जयपुरी आणि मारवाडी यांचें गुजरातीशीं बरेंच साम्य आढळून येतें. तसेंच मेवाडीचें ब्रज भाषेशीं आणि माळवीचें बुंदेलखंडाशीं साम्य दिसेल. एकंदरींत राजस्थानी भाषेमध्ये गुजरातीचेंच वळण जितकें दिसतें तितकें पश्चिम हिंदीचें सुद्धा दिसत नाही. नामांचे कारक तर गुजरातींतील कारकाप्रमाणे दिसतात.

आपल्या मराठीचा ह्या राजस्थानीशीं थोडासा संबंध येतो. मराठीचे उत्तरेकडील पोटभेद भिल्ली, खानदेशी, अहिराणी, नागपुरी, वऱ्हाडी हे राजस्थानच्या दक्षिणेस असल्यामुळे, व ग्वाल्हेर, इंदोर वगैरे बृहन्महाराष्ट्रांतील मराठी लोकांचा माळवी, जयपुरी व मेवाडी ह्या भाषांशीं संबंध आल्यामुळे एकीचा परिणाम दुसरीवर झाल्याशिवाय राहत नाही.

(आ) अवधीः—हिंदीचा हा दुसरा पोटभेद आहे. अवधी भाषा अयोध्या,

---

१ श्यामसुन्दरदास, हिंदी भाषा और साहित्य. अ. ५

आग्रा, बुंदेलखंड, छोटा नागपूर ह्या प्रांतांतील कांही प्रदेशांत चालते. दक्षिणेच्या बाजूस ह्या भाषेचा आणि मराठीचा संबंध येतो, व तो इतका निकटपणाचा आहे की, त्या बाजूस जो एक छत्तिसगडी म्हणून पोटभेद आहे त्याला हिंदीचा पोटभेद समजावें कां मराठीचा पोटभेद समजावें ह्याबद्दल भाषाकोविदांमध्ये मतभेद आहे. छत्तिसगडी भाषेमध्ये मराठीच्या लकबा जितक्या दिसतात तितक्याच हिंदीच्याहि दिसतात. ह्याशिवाय उडिया भाषेचा परिणाम तिच्यावर थोडाबहूत आहे तो निराळाच. अवधीशिवाय बघेली म्हणून हिंदीचा आणखी एक प्रकार आहे. अवधी आणि बघेली ह्यांमध्ये तसा विशेष स्पष्ट असा फरक नाही. अवधी भाषेस गोस्वामी तुलसीदासजी ह्यांनी रामचरितरूपी लेणें घालून विशेष सौंदर्य आणिलें व त्यामुळेच हिचा ग्रांथिक भाषा म्हणून दर्जा चढला. ह्याच्या अगोदर हा दर्जा वाढविण्याचा उपक्रम मलिक महम्मद ह्यांनी आपल्या पद्मावत ग्रंथाने केलाच होता. ह्या भाषेंतहि पूर्वअवधी आणि पश्चिमअवधी असे फरक पडले आहेत. पूर्वअवधी अयोध्या प्रांतांत व पश्चिमअवधी लखनौपासून कनौजपर्यंत बोलली जाते.

(इ) व्रजभाषाः—प्राकृतोद्भव अंतर्भाषांमध्ये ही फार महत्त्वाची आहे. शौरसेनी प्राकृत व तत्परत्वें शौरसेनी अपभ्रंश ह्या भाषेची खरी वारस म्हणजे ही व्रजभाषा आहे. कृष्णाच्या सर्व व्रजमंडलांत ह्या भाषेचा अंमल चालतो. व्रजमंडलांत बराच मोठा टापू येतो. मथुरा मध्यवर्ती धरून त्याच्या भोवताली बुलंद शहर, अलीगड, एटा, बदाऊ, बरेली, आगरे, भरतपूर, धौलपूर, करौली, जयपूरचा पूर्वभाग इत्यादि प्रदेश व्रजभाषेने व्यापिला आहे. मराठीवर व्रजभाषेचा थोडा फार परिणाम झालेला आहे. मराठींतील अभंग वाङ्मय कृष्णस्तुतिपर, व व्रजभाषा ही कृष्णाची भाषा अशी वैष्णवांची ठाम समजूत; तेव्हा ह्या भाषेंतील– नन्दभाषेंतील– बरेच शब्द साधुसंतांच्या अभंगांत आढळून आल्यास नवल नाही.

( ई ) बुंदेली भाषा :—वर दिलेल्या व्रजभाषेशीं बरीच संलग्न अशी बुंदेली भाषा आहे. बुंदेलखंडांत ही चालू असल्याने भाषेलाहि त्या प्रांताचें बुंदेलखंडी असें नांव मिळालें आहे. अस्सल उत्तम बुंदेली भाषा आल्हखंडामध्ये प्रत्ययास येते. कवि केशवदासांनी ह्या आपल्या मायबोलीस आपल्या प्रतिभासंपन्न काव्याने गौरविलें आहे.

(उ) खडी बोली:--ह्या भाषेचें उर्दु हें नांव सर्वांच्या परिचयाचें आहे. ह्या भाषेच्या घटनेचा इतिहास मोठा मनोरंजक आहे. मुसलमानांचा हिंदुस्थानांत प्रवेश झाल्यानंतर व त्यांची सत्ता दिल्लीमध्ये बद्धमूल झाल्यानंतरच्या कालापासून उर्दू भाषेचा उद्गम आहे. मुसलमानी लढवय्ये लोक अरबस्थान, इराण, तुर्कस्थान वगैरे तुराणी भाषांच्या प्रदेशांतून आले असल्यामुळे येथील एतद्देशीय बोलींमध्ये व्यवहार करणें त्यांना साहजिकच फार जाचूं लागलें. त्यांच्या अरबी, फारशी, तुर्की वगैरे भाषा येथील लोकांना समजत नसत तर येथील कोणत्याहि हिंदवी भाषेचा त्यांना उमज पडत नसे. अशा रीतीने परस्परांचा वाग्व्यवहार जेव्हा अशक्य होऊं लागला तेव्हा दोन्ही लोकांनी परस्परांस समजण्यासाठी परस्परांच्या भाषेंतील शब्द, व्याकरण, वाक्प्रचार इत्यादि बाबतींत आदानप्रदान करून व्यवहार सुकर होण्यासाठी मार्ग काढला. उर्दु म्हणजे शिपायांची छावणी; व शिपायांच्या छावणींत ज्याप्रमाणे डाळ व तांदूळ यांची बनलेली खिचडी हीच निर्वाहाचें साधन असते, त्याचप्रमाणे हिंदवी, अरबी व फारशी ह्यांच्या भेसळीवर बनलेली उर्दू हीच त्यांच्या वाग्व्यवहाराचें साधन होऊन बसली. आरंभीं आरंभीं ही भाषा शिपायांच्या छावणींत व बुणग्यांच्या बाजारहाटांतच चालत असे. पुढे जसजसे उपरे मुसलमान स्थायिक बनले व एतद्देशीय भाषेशीं परिचित होऊं लागले तसतसें ह्या त्यांच्या उर्दू भाषेलाहि स्थैर्य येऊं लागलें, आणि आपल्या महमदी संस्कृतीचा प्रसार करण्यासाठी ते लोक जेथे जेथे फिरले तेथे तेथे साधन म्हणून त्यांनी ह्या भाषेस नेलें. उर्दु भाषेचें ठराविक असें स्थान नाही तें ह्यामुळेच. हिंदुस्थानांत चोहोंबाजूस ही भाषा स्वैरपणाने वावरते.

ह्या भाषेच्या घटनेमध्ये एक प्रकारची रस्सीखेच दृष्टीस पडते. मुसलमानी लोक आपल्या स्वताच्या भाषेचा ठसा देण्याचा प्रयत्न करतात, व त्यासाठी अस्सल अरबी, तुर्की किंवा फारशी शब्द व वाक्प्रचार तिच्यांत हुबेहुब आणून सोडतात. हिंदूंचा प्रयत्न ह्याच्या उलट म्हणजे होतां होईल तो अस्सल आर्य शिक्क्याचे शब्द व वाक्प्रचार तिच्यांत आणून सोडण्याच्या स्वरूपाचा आहे. रस्सीखेचीच्या विरुद्ध प्रयत्नामुळे ह्या भाषेस नांवेंहि उर्दु व हिंदी अशीं दिलीं जातात. पुढे इंग्लिश लोकांच्या आग-

मनानंतर त्यांच्या अव्वल अमदानींत त्यांनी दोन्ही भाषेंतील प्रचलित असे शब्द घेऊन त्यांना हिंदी भाषेच्या व्याकरणाने बांधून तिसराच एक "हिंदुस्तानी" म्हणून प्रकार रूढ केला. अशा रितीने एकंदर ह्या भाषेचे तीन प्रकार दिसतात. १ शुद्ध हिंदी— हिच्यामध्ये हिंदूंचें अभिजात वाङ्मय तयार होतें व ही हिंदूंची प्रचाराची भाषा आहे. २ उर्दु–हिचा प्रचार विशेषतः मुसलमान लोकांमध्ये आहे व तेच लोक शिष्टभाषा म्हणून आपल्या साहित्यांत ही भाषा वापरतात. हिंदूसुद्धा घराबाहेर बाजारहाटावर हिचा उपयोग करतात. ३ हिंदुस्थानी–हिचा उपयोग सर्व लोक सरसहा करतात. घटनेच्या दृष्टीने पाहिलें तर साधारणपणें असें म्हणतां येईल की, हिंदीचें उच्चारण व व्याकरण आर्य शिक्क्याचें आहे. त्यामध्ये तुराणी भाषेची भेसळ अगदी नाही. उर्दूमध्ये शब्दसमूह आर्य आणि तुराणी ह्या दोन्ही भाषांतून घेतलेला आहे. परंतु व्याकरणाचा साचा बराचसा तुराणी वळणावर आहे. हिंदुस्तानी भाषेमध्ये शब्दसमूहांत प्रमाण आर्य शब्दांचें जास्त असून व्याकरणाचा साचा आर्य भाषेच्या वळणावर आहे.

'हिंदुस्थानी' ही गंगेच्या उत्तर दुआबाची प्रथमतः भाषा होती. तिचें सर्वांत शुद्ध स्वरूप मीरत प्रांताच्या आसमंतात व उत्तरेस सापडतें. ह्या भाषेंतील कांही शब्दांमध्ये प्रांतपरत्वें थोडाबहुत फरक झाला असेल पण एवढी तोशीस सहन करून ती सर्व हिंदुस्थान देशाची, विशेषतः उत्तर हिंदुस्थानची बोलण्याची भाषा होऊन बसली आहे. ह्या भाषेचें नांवहि युरोपीय लोकांनी बनविलें आहे. हिंदुस्थानांतील लोकांनी ह्या भाषेचा जो वाङ्मयाकडे उपयोग केला तो बहुधा युरोपीय लोकांचें वर्चस्व नसतें तर केला नसता. सार्वत्रिक उपयोगाची भाषा म्हणून ह्या भाषेचा जन्म दिल्ली राजधानीनजीकच्या बाजारांत झाला व तेथून मोंगल दरबारच्या सुभेदारांनी तिचा सर्व हिंदुस्थानभर प्रसार केला. ती तेव्हापासून आतापर्यंत अविच्छिन्न चालत आलेली आहे. तिच्यांत पुष्कळ भाषाप्रकारांचा, विशेषतः उर्दु व हिंदी ह्या दोन भाषांचा समावेश होतो.[१]

अरबी लिपीमध्ये लिहिलेलें व फारशी व अरबी शब्दांचा पुष्कळ

---

१ Dr. Grierson L. S. I. H. Vol. p. 202, 205.

भरणा असलेलें जें हिंदुस्थानीचें रूप तीच उर्दू भाषा होय. पश्चिम हिंदुस्थानाच्या शहरांतून मुसलमान लोकांच्या व ज्यांच्यावर फारशीचा संस्कार झाला आहे अशा हिंदु लोकांच्या बोलण्यांत बहुधा ही भाषा येते. हिंदुस्थानीमध्ये सर्वत्र अगदी खेडेगावी बोलीमध्ये सुद्धा फारशी शब्द सापडतातच. उर्दु वाङ्मयांत फारशी शब्दांचा उपयोग जवळ जवळ इतक्या कल्पनातीत प्रमाणांत केला जातो की कधी कधी उर्दु वाक्यांत वाक्यरचना फक्त हिंदी आणि शब्द सर्व फारशी अशी स्थिति आढळून येते. असें हें फारशीमय स्वरूप मुसलमानी जेत्यांकडून कांही दिलें गेलें नाही; तर उलट जितांपैकी राज्यव्यवहारांत पटाईत झालेल्या हिंदु लेखकांकडून विशेषतः लेखननिविसांचा धंदा करणाऱ्या कायस्थ, खत्री व पारसनिवीस ह्यांच्याकडूनच दिलें गेलें आहे.

हिंदी भाषेचा विचार करतांना ओघानेच आणखी एका मुद्याचा विचार करावा लागतो; आणि तो म्हणजे हिंदुस्थानांतील अखिलभारतीय भाषा ठरविण्यासंबंधीचा. हिंदी भाषेपासून एक मुसलमानी अमदानींत व दुसरी इंग्रजी अमदानींत –उर्दू व हिंदुस्थानी– अशा दोन सर्वमान्य बोली उद्भवल्या म्हणून वर सांगितलेंच आहे. ह्या दोन्ही भाषा हिंदी भाषेपासूनच कां उद्भवल्या? दुसऱ्या भाषेपासून कां नाही उद्भवल्या? असा साहजिकच प्रश्न येतो. ह्याचें उत्तर म्हणजे हिंदीमध्ये असेच कांही आकर्षक गुण असले पाहिजेत हें होय. तिच्यांत अशी कांही क्षमता असली पाहिजे की, तिचा उपयोग 'अखिलभारतीय' भाषा म्हणून करतां यावा.

सध्यासुद्धा हिंदुस्थानांत अखिलभारतीय अशी बोली कोणती असावी ह्यासंबंधी बराच मतभेद आहे. जग हें झपाट्याने पुढे चाललें आहे. सुधारणेचें पाऊल वायुवेगाने पुढे पडत आहे. जागतिक व्यवहारांत प्रत्यहीं क्रांति होत आहे; तेव्हा अशा क्रांतीच्या युगांत व्यवहाराचें मुख्य साधन जी भाषा ती जर सर्वांस समजण्याजोगी अशी असेल तर हिंदुस्थानासारख्या विस्तृत देशाच्या मार्गातील अडथळा नाहीसा होईल. जगांतील उलाढालींत व्यवहाराच्या दृष्टीने जगांतील लोकांस समजणारी व बोलतां येणारी एक विश्वभाषा किंवा जागतिक भाषा –सर्व भाषांतील मुख्य मुख्य विशेष घेऊन तयार करण्याच्या सद्धेतूने कांही भाषाशास्त्रवेत्त्यांनी ईडो किंवा एस्पॅरॅन्टो

नांवाची भाषा तयार केली. कृत्रिम भाषा म्हणून तिने मूळ धरलें नाही ही गोष्ट निराळी. परंतु अशा सर्वसामान्य भाषेची जरुरी भासते हें खास. युरोपमध्ये सर्व खंडभर फ्रेंच भाषा आंतरराष्ट्रीय भाषा म्हणून चालू आहे. अलीकडे इंग्रजी लोकांच्या सर्व बाबींत अग्रेसरत्वामुळे व त्यांच्या राजवटीच्या विस्तारामुळे त्यांच्या इंग्रजी भाषेस असेंच आंतरराष्ट्रीय स्वरूप येऊं पाहात आहे. कांही स्वतंत्र राष्ट्रांनी तर केवळ व्यवहारसौकर्याकडे दृष्टि देऊन इंग्रजी भाषेचा 'राजभाषा' म्हणून स्वीकार केला आहे.

ह्याच दृष्टीने हिंदुस्थानांत अशी अखिलभारतीय भाषा कोणती असावी की, जिच्या योगाने कैलासेश्वरापासून रामेश्वरापर्यंतच्या सर्वांस लोकांचा व्यवहार सुकर होईल. अशी भाषा ठरविण्यांत हिंदुस्थानच्या बाबतींत तर फार अडथळे आहेत. अगोदर देश विस्तृत, त्यांत पुनः संस्कृति भिन्न, धर्म भिन्न, भावना भिन्न, आचारविचार भिन्न, अशा भेदाने जखडलेल्या लोकांत राष्ट्रीय भाषा ठरविण्यांत एकवाक्यता व्हावी कशी? हें ठरविणें जरी विपद्ग्रस्त आहे तरी अत्यंत जरूर आहे.

अखिलभारतीय भाषा म्हणून दोनच भाषा पुढे येतात. एक इंग्रजी आणि दुसरी हिंदी. आणि दोन्ही भाषांचा निर्विकार मनाने हिंदुस्थानाच्या परिस्थितीकडे लक्ष देऊन जर विचार केला तर हिंदी भाषाच अखिलभारतीय भाषा होण्यास जास्त लायक आहे असाच निर्णय द्यावा लागेल. इंग्रजी भाषा जर अखिलभारतीय बोली म्हणून मान्य केली तर सुशिक्षितांचीच तेवढी सोय होईल. परंतु असे सुशिक्षित हिंदुस्थानांत आहेत किती? तेव्हा ह्या मूठभर लोकांच्या सोईसाठी बहुसंख्याक लोकांचे हाल करणें हें कांही न्याय्य होणार नाही. इंग्रजी भाषेतील वाङ्मय सकस आहे, तेजस्वी आहे, प्रत्यहीं वाढणारें आहे, तें "वाघिणीचें दूध" आहे. परंतु येथे वाङ्मयाच्या सरसनीरसतेचा प्रश्न नसून व्यवहारसौकर्याचा आहे; व हें व्यवहारसौकर्य हिंदी भाषेच्या साहाय्याने साधतें. हिंदी भाषा ही आर्योद्भव बोली असल्यामुळे तिच्यांत आणि उत्तरेकडील सर्व आर्योद्भव बोलींत बरेंच साम्य आहे, व त्यामुळे विशेष अभ्यासाशिवाय हिमालयापासून कावेरीपर्यंत सामान्य जनास हिंदी भाषा समजण्यास अडचण पडणार नाही. अडचण पडेल ती कावेरीच्या दक्षिणेकडील लोकांस. परंतु दुसरी कोणतीहि भाषा स्वीकारिली तरी

त्यांना -द्राविडी भाषा बोलणाऱ्यांना- ही अडचण राहणारच. इंग्रजीबद्दल-हि त्यांची अडचण कायमच. तेव्हां एका राष्ट्रांतील, एका संस्कृतींतील लोकांना एकत्र आणण्यासाठीं राष्ट्रीय भाषेचें हें आणखी एक साधन झालें तर त्यांत वावगें काय आहे व अशा रीतीनें हिंदी भाषा 'अखिलभारतीय' किंवा राष्ट्रीय भाषा म्हणून स्वीकारण्यांत व्यवहारसौकर्याची सोय असूनहि एक तऱ्हेची उच्च भावनाहि आहे. उर्दु भाषा जर स्वीकारिली तर लिपीचा प्रश्न म्हणजे एक मोठीच धोंड मार्गांत येईल व उर्दु भाषा नागरी लिपींत लिहिणें विसंगत होईल. हिंदुस्तानी भाषा स्वीकारिली तर तिला जितकें शिष्टत्व याव-यास पाहिजे तितकें आलें नाही. नाही तर तिला विशेष हरकत नाही. शिवाय हिंदी आणि हिंदुस्तानी ह्यांत शास्त्राच्या सूक्ष्म दृष्टीनें जरी फरक असले तरी व्यवहाराच्या स्थूल दृष्टीनें फारसा फरक नाही.

(६) हिंदुस्थानांतील भाषांपैकीं बंगाली ही एक मुख्य भाषा आहे. बंगाली भाषा बोलणाऱ्यांची संख्या ४ कोटी ८३ लक्ष ६९ हजारावर आहे. वाङ्मयाच्या दृष्टीनें बंगाली भाषाहि फारच संपन्न आहे. काव्य, शास्त्र, इतिहास, राजकारण वगैरे महत्त्वाच्या बाबतींत बंगाली लोकांनीं हिंदुस्थानांतच नव्हे तर सर्व पृथ्वीवर चांगलें नांव मिळविलें आहे. अशा लोकांची भाषाहि सर्व भाषांमध्यें अग्रेसर असावी ह्यांत काय नवल? कविवर रवींद्रनाथ टागोर ज्या भाषेंत आपलें काव्य गातात, पृथ्वीशचंद्र राय, जगदीशचंद्र बोस हे ज्या भाषेंत आपलें शास्त्रीय शोध आपल्या वंगीय बंधूस सांगतात, राखलदास बानर्जी, जदुनाथ सरकार ज्या भाषेंत आपल्या इति-हासाची जाणीव आपल्या लोकांस पटवितात ती भाषा सर्वांत अग्रस्थान मिळविल्याखेरीच कशी राहील? बंगाली भाषा ललितवाङ्मयानें नटली आहे. तिच्यामध्यें उच्चारमाधुर्यहि पुष्कळ आहे. तिच्यांत संस्कृत शब्द उचलण्याची प्रवृत्ति विशेष दिसून येते. ती इतकी आहे की, पांढरपेशाची एक भाषा आणि गांवढ्यांची एक भाषा असे दोन प्रकार भाषेंत दिसतात. कलकत्ता जर मध्यावर धरलें तर त्याच्या पूर्वेस रंगपूर, मैमनसिंग, डाक्का, बारिसाल वगैरे ठिकाणची एक पोटभाषा दिसते आणि पश्चिमेस नडिया परगण्यांत दुसरी पोटभाषा दिसते.

संख्येवरून पाहतां हिंदी भाषा सोडली तर बोली म्हणून बंगाली-

चाच क्रम वर लागेल. खुद्द बंगालमध्ये शंभरांतील अजमासे ९२ तरी लोक बंगाली भाषा बोलणारे आढळतात. आसाम, बिहार आणि ओढिया ह्या प्रांतांपैकी बराचसा भाग भाषेच्या दृष्टीने बंगालमध्येच मोडतो. जसजसें पश्चिमेकडे जावें तसतसें बंगाली भाषा ओरिया, मगधी आणि मैथिली ह्या भाषांत रूपांतरित होते, आणि ईशान्येस तिला आसामी भाषेचें स्वरूप प्राप्त होतें. बंगाली भाषेच्या भोवती तर द्राविडी भाषांचे ठिकठिकाणीं एक जाळेंच पसरलेलें आहे. पश्चिमेस सन्ताळी, हो, मुण्डारी, कोळ ह्या भाषांचा बंगालीशीं संबंध आहे. ह्याशिवाय राजमहालाच्या डोंगरकठर्डातील माल्टो आणि ओराँ ह्या निराळयाच. पूर्वेस व उत्तरेस ब्रह्मी आणि चिनी ह्या भाषांशीं बंगालीचा संबंध आला आहे. ईशान्येस वार, कचारी ह्या भाषा आहेत, व त्यांच्यापुढे कांही नाग भाषांचा संबंध येतो. खासी भाषा ईशान्येस अगदी शेवटीं आहे.

बंगालीच्या उपभाषांचे एक राढ, दुसरा वरेन्द्र, तिसरा कामरूप, चौथा वंग असे चार वर्ग आहेत. राढ बोली पश्चिम आणि नैऋत्य ह्या दोन दिशांकडे मिदनापूरच्या आसपास चालू आहे. बंगालच्या पश्चिमेकडे हीच बोली आहे. तिच्यामध्ये अगदी पश्चिमेकडे एक आणि दुसरी थोडी त्याच्या पूर्वेस असे दोन प्रकार पडण्यासारखे आहेत. पहिली बांकुरा, मनभूप, सिंगभू ह्या शहरांच्या आसपासच्या प्रांतांत चालते. दुसरी मुर्शिदाबाद, नडिया (पश्चिम), बर्द्वान (पूर्व), हुगळी, हावरा आणि कलकत्त्यासह २४ परगणे वगैरे प्रांतांत रूढ आहे. हीच बंगालमधील मुख्य मध्यवर्ती जनभाषा. ज्यामध्ये राजशाही, पबना, बोग्रा, दिनाजपूर वगैरे जिल्हे मोडतात त्या प्रांतांत वरेन्द्र बोली चालते. कामरूप बोलीचेहि पश्चिमेकडील आणि पूर्वेकडील असे दोन भेद आहेत. पैकी पूर्वेकडील भेद आसामांत रूढ असून जलपैगरी, पूर्वपूर्णिया, दार्जिलिंग, दिनाजपूर, कुचबिहार, पश्चिम गोपाळपूर वगैरे प्रदेशांतहि चालतो. वङ्ग म्हणून जो बंगालीच्या बोलीचा चौथा भेद आहे त्यामध्येहि पूर्वेकडील वङ्ग आणि पश्चिमेकडील वङ्ग असे दोन उपभेद आहेत. त्यांपैकी पश्चिमेकडील भेद मैमनसिंग, डाक्का, फरिदपूर वगैरे प्रांतांत चालतो आणि दुसरा पूर्वेकडील उपभेद सिल्हेट, कचर, मायाङ्ग, तिपेरा, चितागांग वगैरे प्रांतांत चालतो.

ह्या बोलींशिवाय डोंगराच्या खबदडीमध्ये पुष्कळ रानटी भाषा– चक्मा, मायङ्ग वगैरे चालू आहेत. मुख्य मध्यवर्तिनी भाषा कलकत्त्याच्या आसपास वावरते. तिलाच ग्रांथिक भाषेचा मान प्राप्त झाला आहे.[१]

(७) बंगालीच्यापुढे आसामी भाषा येते. बंगाली आणि आसामी ह्या भाषांचें बरेंच साम्य आहे. बंगालच्या खालच्या बाजूस ओरिसामध्ये उरिया अथवा उत्कली भाषा प्रचारांत आहे. सुवर्नीरेखापासून गंजमापर्यंत समुद्राच्या किनाऱ्याकिनाऱ्याने ही भाषा जाते. उरिया भाषा बोलणारे लोक वीस लाख आहेत. दक्षिणेस उरियाचा संबंध तेलगू भाषेशीं येऊन तिच्या पलीकडे एका बाजूस गुजराती आणि दुसऱ्या बाजूस मराठी ह्या भाषांशीं संबंध येतो.

(८) पश्चिमेकडील उत्तर किनाऱ्यालगतचा सिंधच्या दक्षिणेकडील टापू गुजरातीने व्यापिला आहे. ह्या भाषेंत वाङ्मयनिर्मितिहि झपाट्याने होत आहे. त्यांत शास्त्रासारख्या गहन विषयांवर विशेष ग्रंथ नसतात हें खरें आहे. बहुतेक लोकांचा कल लक्ष्मीच्या आराधनेकडे असल्यामुळे सरस्वतीच्या आराधनेकडे लक्ष देण्यास कोणास विशेष फावत नाही. प्रेमानंद, मिराबाई, नरसी मेहता ह्यांच्या काव्याने भाषेस विशेष शोभा आली आहे. गोवर्धनराम त्रिपाठी ह्यांच्या सरस्वतीचंद्राने इतर भाषांतील कादंबऱ्यांस खाली पहावयास लाविलें आहे. जैनमार्गीय व वल्लभपंथीय किंवा रामानुजीय अनुयायांनी वेदांत वाङ्मय निर्माण केलें आहे. महात्मा गांधी यांनी भाषेंत एक प्रकारचें ‘ नवजीवन ’ आणून सोडलें आहे. ह्या नवजीवनाबरोबर केशव हर्षदराय ध्रुव, नरसीलाल दिवाटिया, आनंदशंकर ध्रुव, कन्हयालाल मुनशी, रमणभाई नीलकंठ ह्यांनी भाषेचें शुद्धत्व व शुचित्व कायम राखिलें आहे. गुजरात देश जसा संपन्न तशी त्याची भाषाहि संपन्न आहे. लोक जसे सुखास लालचावलेले, शांतिप्रिय तशी त्यांची भाषाहि आहे. भाषा गोंडस व रम्य अशी असली तरी जोरदार नाही. ती दरबारी जरी दिसली तरी गुजरातमधील जमिनीसारखी भुसभुशीत आहे.

गुजरातींत तीन पोटभाषा आहेत. सुरतेस एक, अमदाबादेस दुसरा,

---

१ S. K. Chatterji, O. D. B. L. P. I, 136.

आणि काठेवाडांत तिसरा असे तीन प्रकार आहेत. ह्या भाषेच्या पश्चिमेची सरहद्द समुद्राने व्यापिली आहे. उत्तरेस मारवाडी व राजस्थानी व हिंदी ह्या भाषांचा मुलूख आहे. पूर्वेस व दक्षिणेस मराठी व तिची पोटभाषा खानदेशी यांचा प्रदेश आहे. पश्चिमेकडे थोडासा कच्छी भाषेशीं संबंध येतो व तिच्या पलीकडे उत्तरेस एका बाजूस सिंधी येते.

(९) आर्योद्भव भाषांपैकी शेवटची, आपणां सर्वांस परिचित अशी जी मराठी भाषा तिचा क्षेत्रविस्तार सांगण्यापूर्वी दक्षिण हिंदुस्थानांतील मुख्य द्राविडी भाषांचा उल्लेख करणें जरूर आहे. ह्या भाषांनी सर्व दक्षिण हिंदुस्थान व्यापिलें आहे. ह्यांना पूर्वी तामुळी असें नांव होतें. ह्याच द्राविडी वंशांतील कांही भाषा उत्तरेस बलुचिस्तान व हिमालयाच्या डोंगराळ प्रदेशांत चालू आहेत. द्राविडी नांवाखाली मोडणाऱ्या भाषांपैकी तामील, तेलगु, कानडी व मल्याळी ह्या चार मुख्य होत. ह्यांशिवाय आणखी तुलु, कुडागु, कोटा, खोंड, राजमहाली, कैकाडी ह्या त्याच वर्गांतील भाषा आहेत. मराठीच्या लगत दक्षिणेस कानडी भाषेचा प्रांत सुरू होतो. ही भाषा मलबार किनाऱ्यावरील सदाशिवगडापासून निघून, कारवारमधून धारवाडच्या पश्चिमेकडून बेळगाव हुकेरीवरून कागल, कुरुंदवाड संस्थानांत येते. नंतर मिरजेच्या पलीकडे जाऊन पुढे भीमा नदीच्या काठाकाठाने ब्रह्मपुरी, केळीगाव, पांडेगाव वगैरे ओलांडून ती बेदर गाठते. ही तिची उत्तरेकडील सरहद्द होय. दक्षिणेकडून सदाशिवगडावरून सह्याद्रीच्या पश्चिमघाटावर चढून म्हैसूर, कोईमतूर प्रांतांतून ती पूर्वघाटावर वळते. कानडी भाषा बोलणाऱ्यांची संख्या नव्वद लाख आहे. शुद्ध कानडीचा मासला म्हैसूर संस्थानांत ऐकावयास मिळतो. मराठी आणि कानडी ह्यांचा संबंध पदोंपदीं येत असल्यामुळे एकमेकींवर त्यांचा परिणाम झाला आहे. कानडीमध्ये उत्तम वाङ्मय बरेंच आहे. दुसरी द्राविडी भाषा जी तेलगु तिचा उत्तर सरकार, कर्नुल, अर्काट, नेलोर, मद्रास इलाख्यांतील बल्लारी प्रांत, निजामशाहींतील कांही मुलुख आणि मध्यप्रांतांतील पूर्वेकडचा कांही प्रदेश इतका विस्तार आहे. तेलगु भाषा बोलणारांची संख्या दोन कोटी तीस लाखांवर आहे. ह्या भाषेत संस्कृत शब्दांचा भरणा पुष्कळ आहे. बेदर, आदिनाबाद या प्रांतांत मराठीचा तेलगूशीं संबंध येतो. अगदी दक्षिणेकडील भाषा तामील होय. सर्व द्राविडी

भाषांत हीच श्रेष्ठ ठरेल. ही भाषा बोलणाऱ्यांची संख्या एक कोटी, ऐशीं लाख आहे. मद्रासच्या थोड्या उत्तरेपासून थेट दक्षिण टोकापर्यंत तामील बोलणारे लोक सापडतात. पुलिकत ते केपकामोरीनपर्यंतचा प्रदेश तामीलचा आहे. सिलोनच्या उत्तर भागांत तामील भाषाच बोलली जाते. सर्व द्राविडी भाषांत ही फार जुनी, डौलदार व सुसंपन्न अशी आहे. ग्रांथिक भाषेला शेंगतामील व बोलीला कोडूनतामील अशीं नांवें आहेत. चौथी भाषा मल्याळी मलबार किनाऱ्यावर चालते. ही भाषा बोलणाऱ्यांची संख्या सत्तर लाख आहे. कोचीन, त्रावणकोर संस्थानांत हीच भाषा चालू आहे. पूर्वी एके काळीं तामील व मल्याळी ह्या दोन्ही एक स्वरूपाच्याच भाषा होत्या असें म्हणतात.

(१०) हिंदुस्थानांत सध्या रूढ असलेल्या आर्य व द्राविडी ह्या दोन वंशांतील मुख्य मुख्य भाषांचा येथवर निर्देश केला. आर्य व द्राविडी अशा दोन्ही भाषांच्या संधीवर वावरणारी जी मराठी भाषा तिचा येथे निर्देश केला म्हणजे वर्तमानकालीन बोलींविषयींचें हें विवेचन पूर्ण होईल. आर्योद्भव भाषांपैकी मराठी ही एक मुख्य भाषा आहे. ही भाषा बोलणाऱ्या लोकांची संख्या १९२१ सालच्या शिरोगणतीप्रमाणे १,८७,९७,८३१ आहे. कांहीं भाषा मराठीच्या पोटभाषा असून चुकीने दुसऱ्या भाषांत गणल्या गेल्यामुळे ही संख्या कमी झाली आहे. दोन भिन्न वंशाच्या भाषांच्या कैचींत सापडल्यामुळे मराठीस पुष्कळ जाच सोसावा लागत आहे. तिचा स्वभाव व शरीररचना ह्या बाबी आर्योद्भव परंतु तिचा प्रसार मात्र जो झाला आहे असलेल्या लोकांत. द्राविडी लोकांच्या वावरामुळे व द्राविडी भाषांच्या सान्निध्यामुळे तिच्या मूळ आर्योद्भव स्वरूपावर कानडी-तेलगूचा फार परिणाम झाला आहे.

ठोकळ मानाने सातपुड्याच्या खाली कावेरीपर्यंतचा पश्चिमेकडील प्रांत मराठी भाषेने व्यापिला आहे. उत्तरेस दमणपासून दक्षिणेस गोव्यापर्यंतचा अरबी समुद्राचा पश्चिम किनारा ही मराठीची पश्चिमेकडील मर्यादा आहे. उत्तरेस ती दमणपासून दमणगंगेच्या काठाकाठाने तिच्या उगमापर्यंत जाऊन नंतर घाटावर चढून घाटावरील पाणलोटाच्या अनुरोधाने भिल्ल, कोळी वगैरे रानटी लोकांत मिसळून नर्मदा नदीस गाठते. येथच

तिची गुजराती आणि नेमाडी ह्या भाषांची भेट होते. ह्यापुढे मराठीचा प्रवास सातपुडा पर्वताच्या रांगेने होतो. सातपुडयाच्या एका रांगेतून गाविलगडाच्या आसपासच्या प्रांतांतून तिचा रोख पूर्वेकडे वळून बैतुल आणि सिओनी वगैरे प्रदेशास अर्धवर्तुळाकार वळसा घालून नागपूर मध्यावर ठेवून थोडीशी दक्षिणेस तर थोडीशी पूर्वेस व पश्चिमेस वळून लांजी व वैरागडजवळ गोण्डी व तेलगू ह्या भाषांना ती भेटते. पुढे चांद्यापर्यंत जाऊन पश्चिमेकडे पैनगंगेच्या पात्रापात्राने माहूरपर्यंत आल्यावर तिचा आणि तेलगूचा संबंध तुटतो. माहूरवरून दक्षिणेकडे गोदावरीकडे जाऊन नैर्ऋत्य दिशेकडे वळणावळणाने देगलूर, नलदुर्ग, सोलापूर, विजापूर ह्या गावावरून ती कृष्णानदीजवळ येते. येथे कानडीचा आणि तिचा संबंध येतो तो कोल्हापूरपर्यंत टिकतो. नंतर कोल्हापूरवरून पुनः नैर्ऋत्येकडे ती जाते व सर्व करवीर इलाख्याचा प्रदेश व्यापून गोव्याचे घाटालगतच्या वरील व खालील प्रदेशावरून टेराकोल येथे पुनः पश्चिमसमुद्रास भेटते. महाराष्ट्रांतील नद्या ज्याप्रमाणे वाकडया वाकडया नागमोडीने वाहतात त्याचप्रमाणे मराठीची ही क्षेत्रमर्यादा नागमोडीने जाते.[१] ह्याशिवाय निरनिराळया विभक्त अशा पुष्कळ लहान लहान टापूंत मराठी बोलली जाते. सतराव्या व आठराव्या शतकांत हिंदुपदपादशाहीच्या विस्तारासाठी मराठ्यांनी जी मुलुखगिरी निरनिराळया प्रांतांत केली, त्या प्रांतांत त्यांचे कांही दिवस पाय रुतल्यावर साहजिकच त्यांच्या मातृभाषेस त्या परप्रांतांत स्थायी होण्यास अवसर मिळाला. मुलुखगिरीचें पहिलें वारें ओसरल्यानंतर जेते जसे स्थायी झाले तशी त्यांची भाषाहि स्थायी झाली; व अशा रितीने तंजावर, बडोदा, इंदूर, ग्वाल्हेर ह्या दूरदूरच्या प्रांतांत मराठी भाषा राजदरबारीं आपलें ठाणें देऊन बसली व दरबारचा मानपान घेऊं लागली. मराठीचा महाराष्ट्रांत व बृहन्महाराष्ट्रांत क्षेत्रविस्तार अशा स्वरूपाचा आहे. मराठीचे निरनिराळे प्रांतिक भेद पुढे स्वतंत्र रीतीने दिले आहेत. (नकाशा पहावा.)

## परिशिष्ट १

आर्यभारतीय भाषांच्या वर्णप्रक्रियेचा एक मुख्य उत्सर्ग ग्रिम ह्या भाषाकोविदाने बांधला. संस्कृत व पाश्चात्य भाषा ह्यांमधील कांही शब्दांत

---

१ Molesworth's M. E. Dictionary, Preface XXV.

ध्वनींचे जे बदल होतात त्यावरून ग्रिमने असा नियम बांधला की, "संस्कृतमधील प्, ट्, क् ह्या व्यंजनांबद्दल गॉथिक भाषेंत फ्, ट्, व्ह्, अशीं व्यंजनें येतात. मूळच्या आर्यभाषेंतील प्रत्येक वर्गांतील पहिलें आणि दुसरें व्यंजन संस्कृत, ग्रीक, लॅटिन व स्लाव्ह भाषांमध्ये कायम राहतें, परंतु जर्मनिकभाषेंत तें बदलतें."

| | संस्कृत | ग्रीक | लॅटिन | गॉथिक | जर्मनिक | इंग्लिश |
|---|---|---|---|---|---|---|
| कठोर व्यंजनें | पशु | | पेकुस् | फैहु | फी | फी |
| | नपात् | | नेपोस् | | नेफ | नेफ्यू |
| | तृणम् | | | टार्नस् | डोर्न | थार्न |
| | वर्तते | | व्हर्टो | वाइर्टन् | वेर्डेन् | |
| | त्रय | | ट्रेय् | ट्रइस् | द्राय | थ्री |
| | शुनः | शुनस् | | हुंडूस | हुण्ड् | हाऊण्ड |
| | दिशति | | | | त्साीगेन | |
| | कः | | कोड् | व्हस् | वास् | हॉट् |
| मृदु व्यंजनें | | | | | | |
| | दशन् | | डेकुम् | टैहून् | त्सेन् | टेन |
| | जानु | | | क्नु | क्युइ | नी |
| | युगम् | | | युक | योख् | योक |
| | भरामि | | | बैरान् | बेरेन | बेअर |
| | हंस | | | | गान्स् | गूज़ |

ग्रिमने हा नियम शोधून काढला खरा. परंतु एका गोष्टीकडे त्याचें दुर्लक्ष झालें. प्, ट्, क् हीं जीं संस्कृत व्यंजनें दुसऱ्या भाषेंत जातांना आदेश घेतात तीं व्यंजनें त्या त्या शब्दांत आरंभीं तरी असतात किंवा त्यांच्या पूर्वीच्या शब्दावर आघात तरी असतो. जेव्हा ह्यांपैकी एखादें व्यंजन आरंभींहि नाहीं आणि त्याच्यापूर्वी आघातहि नाहीं तेव्हा हा ग्रिमचा नियम तेथे लागत नाहीं. उदा० पिता हा शब्द Father असा व्हावयास पाहिजे.

तो तसा न होता Fadar असा होतो. तेव्हा अशा उदाहरणाच्या बाबतींत ग्रिमचा सिद्धांत कोता ठरतो. ह्या सिद्धांताचा कोतेपणा डॉ. व्हरनियर यांने शोधून काढला आणि ग्रिमच्या सिद्धांताला पुस्ति जोडून त्याला पूर्णत्व आणून दिलें.[१]

## परिशिष्ट २

जुन्या आर्य भाषेंतील बरेच उच्चार वैदिक भाषेंत बरोबर उतरले आहेत असे विद्वान लोक समजतात. ग्रीक, लॅटिन किंवा लिथ्यूनियन वगैरे पाश्चात्य आर्य भाषा आणि वैदिक भाषा ह्या दोहोंमध्ये जेव्हा आदेशासंबंधी एखादी विसंगति आढळते तेव्हा वैदिक भाषेंतील उच्चार मूळ खरा व ग्रीक, लॅटिन इत्यादि भाषेंत जो त्याबद्दल आदेश झाला असेल तो नंतरचा उत्तरकालीन असा विद्वानांचा साधारणपणें निश्चित असा सिद्धांत आहे. ह्या सिद्धांतास एखादे वेळेस अपवादात्मक उदाहरण सापडत नाही असें नाही. वैदिक भाषेंतील जो Palatal Law – तालव्यासंबंधी– उत्सर्ग आहे तो अशा अपवादात्मक उदाहरणांवरूनच शोधला गेला आहे. मूळ वेदपूर्व आर्य भाषेंतील कण्ठ्य वर्ण ह्यांचे पौर्वात्य आणि पाश्चात्य भाषांमध्ये दोन निरनिराळे फरक झाले आहेत. पूर्वेकडील भाषांत कंठ्य वर्णाच्या उच्चारांत एक 'व'कार येऊन मिसळतो. पाश्चात्य भाषांत तो निव्वळ कंठ्यच राहतो. वैदिक भाषेंत क् असा राहतो तर लॅटिन भाषेंत त्याबद्दल qu असा होतो. पुढे आणखी कांही वैदिक भाषेंतील उदाहरणें तपासल्यानंतर असें आढळून आलें की, ज्या ठिकाणीं कंठ्य वर्ण यावयास पाहिजे त्या ठिकाणीं वेद भाषेंत तालव्य वर्ण येई व ह्या शब्दांची जर ग्रीक व लॅटिन भाषांतील प्रतीकें पाहिलीं तर त्यांत कंठ्य वर्ण येऊन त्या कंठ्य वर्णापूर्वी मात्र इ किंवा ए हा तालव्य स्वर असे. ह्या सर्व परिस्थितीवरून असा एक नियम बांधला की, "इ, ए ह्या तालव्य स्वरांपुढे जर कंठ्य वर्ण आला तर त्याचा वैदिक भाषेंत आदेशाने तालव्य वर्ण होतो." तेव्हा वैदिक भाषा मूळ आर्य भाषेच्या जवळची या सिद्धांतास हा 'तालव्य उत्सर्ग' अपवाद ठरतो. उदा० रेक (Gk) loipos, रिरेच (Gk) leloipe, चत्वारः (Gk) teleores, चित् (Gk) ti, Lat quid.

---

१ Vendryes. Language. P. 50

## प्रकरण दुसरें

# मराठीची पूर्वपीठिका

## १ वेदपूर्वकालीन आर्य भाषा

२९ मराठी भाषा आर्य भाषेच्या कुळांत उत्पन्न झाली हें मागील प्रकरणांत सांगितलें. आता त्या आर्य भाषेचें अति प्राचीन आद्य असें स्वरूप व त्या स्वरूपाची मराठीच्या सध्याच्या स्वरूपांत परिणति होईपर्यंत मध्ये झालेलीं अवस्थांतरें हें सांगणें जरूर आहे. येथे प्रथम आर्य भाषेचें वेदपूर्वकालीन स्वरूप सांगतों. वेदपूर्वकालीन भाषेच्या ज्ञापकांचा शोध हा बऱ्याच अंशीं आनुमानिक स्वरूपाचा असणार. वेदावरून किंवा वेदसमकालीन वाङ्मयावरून वैदिक कालच्या भाषेच्या खुणा सांगतां येणें शक्य आहे. झेंदअवेस्तावरून तत्कालीन पारशांची भाषा अजमावितां येते. होमरच्या इलियड ह्या काव्यावरून होमरच्या वेळची भाषा कशा स्वरूपाची होती हें सांगतां येतें. त्या त्या काळाच्या भाषेची चिन्हें सांगतां येण्याचें साधन म्हटलें म्हणजे तत्कालीन वाङ्मय. अशा तऱ्हेचें वाङ्मय वेदपूर्व कालासंबंधी उपलब्ध नसल्यामुळे अर्थात् त्या काळच्या भाषेचीं अनुमानें बांधणें इतर साधनांच्या बळावरच केलें पाहिजे. वैदिक व वेदसमकालीन इतर वाङ्मय, पाणिनीय संस्कृत, प्राकृत व इतर पाश्चात्य आर्य भाषा ह्या सर्वांचा तौलनिक अभ्यास, त्याचप्रमाणे आधुनिक बोलींच्या सांदीकोपऱ्यांत जें जें कांही चमत्कारिक वाग्वशेष सापडतात ते, हीं सर्व साधनें ह्या कामीं उपयोगीं पडण्यासारखीं आहेत. वेदकालीन किंवा इतर पाश्चात्य भाषा ह्यांसंबंधी सिद्धांत ज्याप्रमाणे इतिहासाच्या सबल व खड्या प्रमाणावर आधारलेले असतात तसे वेदपूर्वकालीन भाषेसंबंधीचे सिद्धांत आधारलेले राहणार नाहीत. धाग्याधाग्याने माग मागे काढीत काढीत वेदपूर्वकालीन भाषासर-

स्वतीच्या स्वरूपाची निश्चिति करावयाची आहे. जे लोक ही भाषा बोलत असत त्यांच्यासंबंधी माहिती पुढीलप्रमाणे आहे.

३० आर्यांचें मूळ वसतिस्थान कोणतें ह्यासंबंधी वादाचा निकाल अद्याप लागला नाही व पुढेहि लवकर लागून विद्वन्मान्य होईल असें दिसत नाही. निरनिराळ्या संशोधकांनी वैदिक व तत्समकालीन वाङ्मयाच्या संशोधनाच्या बळावर आर्यांच्या वसतिस्थानासंबंधी निरनिराळे तर्कवजा सिद्धांत मांडले आहेत. त्यांतील एकाचा एकास मेळ नाही. आतापर्यंत कांही नाही तरी निदान आठ एक स्थानें आर्यांचें मूळ वसतिस्थान म्हणून अनुमानिलीं आहेत. १) युरोपचा वायव्येकडील भाग, २) आशिया युरोप ह्यांच्या सांध्यावरील उत्तरेकडील बिंदू, ३) उत्तर ध्रुवाच्या आसपासचा प्रदेश, ४) आर्मीनिया आणि आक्सस आणि जक्सार्तीस ह्यांमधील दुआब, ५) काकेशियस अथवा हिंदुकुश ह्यांचा माथा, ६) दक्षिण रशियाजवळचा आशिया-युरोपच्या सांध्याचा टापू, ७) सध्या ऑस्ट्रिया-हंगेरीने व्यापलेला प्रांत व ८) सैबेरीया अशा निरनिराळ्या प्रांतांत आर्य लोक अति प्राचीन काळीं राहत असावेत अशाबद्दलची ग्वाही संशोधक देतात. ही जशी आर्यांच्या वसतिस्थानासंबंधाची बाब वादग्रस्त आहे तशी त्यांनी आपल्या वसतिस्थानांतून जें अभिनिष्क्रमण केलें तें कोणत्या मार्गानें केलें ह्यासंबंधी बाब सुद्धा वादग्रस्त आहे. मूळ मध्यस्थानापासून पश्चिमेस तमसा नदीपर्यंत व पूर्वेस गंगा नदीपर्यंत जेव्हा त्यांनी वसाहतीसाठी किंवा इतर कारणासाठी आपला प्रवास केला तेव्हा ते कोठून कोठे गेले, कोठे किती वेळ मुक्काम पडला, वाटेंत कोणकोणाचा संबंध आला ह्याविषयींहि संशोधन झालें आहे. परंतु तीं अद्याप अनुमानेंच आहेत. निर्णय म्हणून ठाम सांगतां येणार नाही. मूळ वसतिस्थान उत्तरेकडील कोणचेंहि धरिलें तरी प्रवासाचा कांही भाग तरी आर्यांचा संबंध पुंजचा पुंज तसाच खाली उतरला असला पाहिजे. नंतर त्यापैकी कांही शाखा अलग झाल्या असाव्या. उत्तर ध्रुवाजवळील प्रदेश हा जर त्या शाखांचे अभिनिष्क्रमणाचें केंद्र समजलें तर रशियन उंचवट्यावरून कास्पियन समुद्र, तेथून तुर्कस्थान, तेथून खोकंद, तेथून पुनः दोन फाटे होऊन एक फाटा मर्व्हजवळ पूर्व इराणांत स्थायी होऊन बसला व दुसरा कुभा नदी ओलांडून भरतखंडांत शिरला. हा एक मार्ग किंवा दुसरा आस्ट्रिया हंगेरी जर निष्क्रमणाचें केंद्र

समजलें तर तेथून आशिया मायनरमधून दार्दानेलिस सामुद्रधुनींतून मेसा-पोटेमियामधील तैग्रीसयुफ्राटीसच्या दुआबांत व तेथून इराणांत व इराणांतून हिंदुस्थानांत असाहि मार्ग आर्यांनी स्वीकारला असल्याचें अनुमान करतां येण्यासारखें आहे. खाल्डिया, मध्य आशियांतील तुखारस्तान व सिंधु नदीच्या खोऱ्यांतील मोहेन्जोदारो वगैरे ठिकाणीं झालेल्या व होऊं घातलेल्या संशोधनावरून वर दिलेल्या वादग्रस्त बाबींचा जास्त पत्ता लागण्याचा संभव आहे.

३१ आर्यांचें मूळ वसतिस्थान व त्यांचा निष्क्रमणाचा मार्ग ह्या दोन गोष्टींसंबंधी मतभेद जसा सांगितला तसाच आर्यांच्या भाषेच्या नांवासंबंधीचा मतभेदहि सांगण्यासारखा आहे. ह्या नांवासंबंधी तर विद्वानांनी आपली वैयक्तिक आवडनिवड व भावनाप्रधान अभिनिवेश ह्या वादांत घुसडून देऊन घोटाळे उडवून दिले आहेत. आर्यांच्या मूळ भाषेला व तिच्यापासून उद्भवलेल्या भाषांच्या गोतावळ्याला नांव काय द्यावें ह्याविषयी एकमत नाही. निरनिराळ्या विद्वानांनी त्याला आपआपल्या परीने निरनिराळीं नांवें सुचविलीं आहेत. इण्डोयुरोपियन, इण्डो-जर्मॅनिक, इण्डो-ट्यूटॉनिक, इण्डो-केल्टिक, इण्डो-क्लासिक, जाफेटिक, मेडिटरेनियन व आर्यन अशीं आठ नांवें पुढे आलीं आहेत. ह्या प्रत्येक नांवाची छाननी केली तर त्याच्या अन्वर्थकतेंत कांहींत अतिव्याप्तीचा तर कांहींत अव्याप्तीचा दोष येईल. त्यातल्या त्यांत आर्य (आर्यन) हें नांव कमी सदोष व जास्त जुळतें येईल. मग हा शब्द 'लोक' दाखवितो, भाषा दाखवीत नाही असा आरोप आला तरी हरकत नाही. जें लोकांचें नांव तेंच त्यांच्या भाषेचें नांव असलें तर बिघडलें कोठे ? कांही विद्वानांना आर्य हें नांवहि लोकांना दिलेलें आवडत नाही. ते Wiros हें नांव लोकांना पसंत करतात. कमींत कमी निदान ५००० वर्षांचा हा उदधि मध्ये पडल्यामुळे त्याच्यापूर्वी एके काळीं उदधीच्या पलीकडील तीरावर असलेल्या आपल्या पूर्वजांच्या वसतिस्थानासंबंधी, त्यांच्या निष्क्रमणाच्या मार्गासंबंधी व त्यांच्या वापरांत असलेल्या भाषेच्या व तद्भव गोतावळ्याच्या नांवासंबंधी इतकी अनिश्चितता आहे.

वेदपूर्वकालीन भाषेच्या वर्णप्रक्रिया आणि प्रत्ययप्रक्रिया ह्या क्रमाने खाली विशद केल्या आहेत.

## पूर्ववैदिकभाषेची वर्णप्रक्रिया

**३२** संस्कृत वर्णमालेंतील स्वर जर आपण पाहिले तर त्यांत साधे स्वर, संयुक्त स्वर व अर्धस्वर असे तीन प्रकार दिसतात. हे तिन्ही प्रकार पूर्ववैदिक भाषेंत होतेच; परंतु ह्या तिहींमध्ये उच्चारदृष्ट्या क्रम असावा असें वाटतें. ह्या तिहींपैकी अर्धस्वर हे प्रथमचे असावेत. त्यापासून साधे स्वर उत्पन्न झाले व शेवटीं संयुक्त स्वर झाले असा क्रम असावा असें म्हणण्यास पाणिनीय सूत्राचा आधार आहे. अ, इ, उ, ऋ हा क्रम "हयवरट्" ह्या सूत्रांत आलेल्या अर्धस्वरांच्या क्रमासारखा आहे. ह्या दोन्ही जोड्यांचें साम्य पाहिलें म्हणजे असे वाटतें की 'अ' हा स्वर 'ह्' ज्या स्थानापासून उत्पन्न होतो त्या स्थानापासूनच उत्पन्न होत असला पाहिजे. 'ह' कार हे दोन प्रकारचे आहेत हें विसरतां कामा नये. एक कंठ्य हकार व दुसरा उरस्य हकार. हे दोन्ही निरनिराळे आहेत. पैकीं कंठ्य 'ह' कारापासूनच 'अ' हा स्वर निघाला आहे. 'अ' चें उच्चारस्थान व 'य्' आणि 'व्' ह्यांचें उच्चारस्थान जवळजवळ सारखें असल्याचें अच घेः '(७-३-११९)' ह्या पाणिनीय सूत्रावरून दिसतें.

कारण अग्नि + औ = अग्नय् + औ

पशु + औ = पशव् + औ

ह्या दोन उदाहरणांत य् आणि व् ह्यांना 'अ' च्याबद्दल वापरलेलें दिसतें.

अर्धस्वरांपैकी 'ह्' पासून 'अ' ह्या स्वराची उत्पत्ति झाली. पुढे य्, व् आणि र् पासून इ, उ, ऋ हे स्वर उत्पन्न झाले. पाणिनीच्या 'इक् यणः' (१-१-४५) ह्या सूत्रावरून य्, व्, र् बद्दल इ, उ, ऋ असे आदेश होतात हें उघड आहे. य्, व् ह्यांच्या उच्चारांत पुन्हा दोन प्रकार होते हें "व्योर्लघुप्रयत्नतरः शाकटायनस्य" (८-३-१८) ह्या सूत्रावरून उघड आहे. य् आणि व् ह्यांचे एक ह्रस्व आणि दुसरा दीर्घ असे दोन उच्चार होते हें शाकटायनास माहित होतें. लोपो व्योर् (६-१-६६) ह्या सूत्रांत अन्त्य य्, व्, ह्या व्यंजनाचा जो लोप होतो म्हणून सांगितलें

आहे त्याचेंहि कारण हा य् आणि व् ह्यांचा ह्रस्व उच्चार हेंच असावें.

ह्या विवेचनावरून अर्धस्वर ह्, य्, व्, र् हे अगोदरचे आणि ह्यांपासून उत्पन्न झालेले अ, इ, उ, ऋ हे नंतरचे स्वर असें सिद्ध झालें. ज्या अर्थी ह्, य्, व्, र् हे अर्ध स्वर अगोदरचे त्या अर्थी वेदभाषेच्या पूर्वीच्या भाषेत कोणत्याहि शब्दाचा अन्त स्वरांत न होतां अर्धस्वरांतच होत असला पाहिजे हें उघड आहे. वेदाच्या भाषेत देव, शाला, अग्नि, पशु, पितृ, नृ, रै, गो, नौ इत्यादि शब्द जे स्वरान्त वापरलेले आढळतात तेच शब्द वेदपूर्व भाषेंत देवह्, शालाह्, अग्नय्, पशव्, पितर्, नर्– नार्, रय्–राय्, गव्–गाव्, नव्–नाव्, असे व्यंजनान्त असले पाहिजेत. साधारणपणें स्वरान्त शब्दांपेक्षा व्यंजनान्त शब्द हे फार जुने असतात.

३२ अर्धस्वर व साधे स्वर ह्यांच्यानंतर संयुक्त स्वरांचा विचार येतो. संयुक्त स्वरांत आ, ई, ऊ, ए, ऐ, ओ, औ इतके स्वर येतात. 'य्, व्' ह्या अर्धस्वरांचे जसे दोन उच्चार शाकटायनाच्या स्मरणांत होते म्हणून वर सांगितलें तसेच ह्या संयुक्त स्वरांचेहि दोन–एक ह्रस्व व दुसरा दीर्घ- असे उच्चार होते असें पाणिनीच्या सूत्रांवरून दिसतें. " तपरस्तत्कालस्य " ह्या सूत्रान्वयें 'त्' हें ज्ञापक 'वृद्धिरादैच्' व 'अदेङ्गुणः' ह्या सूत्रांना लाविलें आहे. ह्या 'त्' कारावरून असें अनुमान निघतें की, 'आ' ह्याचे दोन उच्चार ह्या सूत्रकाराला माहित होते. 'आ' चा दीर्घ उच्चार स्त्रीत्वाचा ज्ञापक व ह्रस्व उच्चार पुंस्त्वाचा ज्ञापक होता. उदा०–अश्वी ( घोडी ), गोदा′ ( गाय देणारा पुरुष ) असा भेद दोन्ही उच्चारांत आहे. तसाच भेद पुढील उदाहरणांतहि आहे. पङ्गू–लंगडी स्त्री, पङ्गु–लंगडा पुरुष, अवी–मेंढी, अवि–मेंढा.

पुढच्या ए, ओ, ऐ, औ ह्या चार संयुक्त स्वरांपैकी पहिले दोन ए, ओ हे पूर्ववैदिक भाषेंत संयुक्त असे समजले जात नसावेत. 'एओङ्' ह्या सूत्रांतील ए आणि ओ हे एकस्वरी होते, द्विस्वरी–संयुक्त–नव्हते. ए आणि ओ ह्यांचे उच्चार ह्रस्व होते हें " ईदूदेद् द्विवचनम् प्रगृह्यम् " ( १–१–११ ) आणि ओत् ( १–१–१५ ) ह्या दोन सूत्रांत 'ए' आणि 'ओ' ह्यांना जो त् लागला आहे त्यावरून उघड आहे. 'एच इक्'

( १-१-४८ ) ह्या सूत्रावरून ए, ओ ह्या दोन्ही स्वरांचा दीर्घ उच्चार असावासा वाटतो.

अ + इ आणि अ + उ यांचा उच्चार अनुक्रमें ए आणि ओ होत असे. ऐ आणि औ होत नसे. ह्यावरून असें दिसतें की वेदपूर्व कालीं एक काळ असा होता की, दोन स्वर परमसन्निकृष्ट झाले असतां त्याची संहिता होत नसे; व ह्याचें अवशिष्ट गमक म्हणजे तितउ किंवा प्रउग अशीं अल्पस्वल्प उदाहरणें सापडतात. वेदोत्तरकालीन भाषेंत ही बोलण्याची लकब नाहीशी झाली. दोन स्वर जवळ जवळ आले असतां त्यांचा संधि करूनच पुढे बोलू लागले. जवळजवळ आलेल्या स्वरांचा संधि न करण्याकडे कल जो वेदपूर्व आर्य भाषेचा होता तोच पुढे प्राकृत भाषांच्या कालांत व तदनंतर मराठीसारख्या आधुनिक प्राकृतिकोद्भव देशी भाषांतहि दिसून येतो. दोनच स्वर काय पण तीन तीनहि स्वर प्राकृतांत एकाला एक जोडून उच्चारिले जात. ह्याचा अर्थ एकच– "वेदपूर्वकालीन प्राकृत भाषा व वेदोत्तरकालीन प्राकृत भाषा, ह्यांच्यांत परमसन्निकृष्ट स्वरांची संहिता न झालेली खपत असे."[१] वेदपूर्वकालीन भाषा प्राकृतच असत. अइ, अई, आइ, आई, अए, अऐ, आए, आऐ, अय, आय्, इतके उच्चाराचे प्रकार ह्या दोन्ही कालांत सापडतात. त्याचप्रमाणे अउ, अऊ, आउ, आऊ, अओ, अऔ, आओ, आऔ, अव्, आव् इतकेहि उच्चार रूढ होते. वैदिककालीं ह्या वरील दोन गटांतील सर्व पहिल्या चारांबद्दल ए, ओ असे उच्चार होत आणि शेवटच्या सहाबद्दल ऐ, औ उच्चार होत. परंतु पाणिनीय कालांत मात्र पहिल्या गटांतील सर्व उच्चारांबद्दल ऐ आणि दुसऱ्या गटांतील सर्व उच्चारांबद्दल औ असे दोन उच्चार रूढ झाले.

३४ पाणिनीय परिभाषेंत वृद्धि म्हणून जो प्रकार 'वृद्धिरादैच्' ह्या सूत्रानें सांगितला आहे त्याच्या मुळाशीं हीच वर सांगितलेली वेदपूर्व भाषेची परमसंनिकृष्ट स्वर असंहित उच्चारण्याची लकब आहे. वेदपूर्व कालीं असंहित स्वरांच्या उच्चारांना वृद्धि ही विशिष्ट संज्ञा देण्याचें कांही एक कारण नव्हतें, कां की त्या असंहित स्वरांचा उचार ऐ, औ ह्या संयुक्त व संहित

१ राजवाडे–गुण व वृद्धि निबंध, इतिहास व ऐतिहासिक ३.

जोडस्वरांच्या उच्चारांसारखा हुबेहुब होई. पुढे जेव्हा वेदकाळीं अ + ई ह्यांचा संहित उच्चार 'ए' होऊं लागला व अ + उ ह्यांचा संहित उच्चार ओ होऊं लागला तेव्हा, अ + इ = ऐ आणि अ + उ = औ या जुन्या संहित जोड स्वरांना वृद्धि ही स्वतंत्र व स्वैर संज्ञा देणें भाग पडलें. हे वेदपूर्वकालीन उच्चार जरी नष्ट झाले तरी त्यांची स्मृति मात्र अजीबात नष्ट झाली नव्हती. प्रातिशाख्य व पाणिनीय संधिनियम ह्यांवरून ते उच्चार अजमावितां येतात. प्र + ऊढ = प्रौढ; अक्ष + ऊहिणी = अक्षौहिणी; स्व + ईर = स्वैर; ऋण + ऋण = ऋणार्ण इत्यादि शब्दांत त्या उच्चारांची स्मृति राहिली आहे.

'वृद्धि' ह्या व्याकरणविषयक चमत्काराच्या मुळाशीं वेदपूर्व भाषेतील उच्चार कसे आहेत हें येथवर सांगितलें. आता वृद्धि ह्या चमत्काराचा भाषेमध्ये उपयोग काय व तो उपयोग करतांना मानसिक हेतु काय होता हें पाहूं. पूर्ववैदिक भाषेच्या चारित्र्याचा असा एक काल होता की पितृवाचक शब्दापासून अपत्यवाचक शब्द बनवावयाचा असल्यास तो पितृवाचक शब्दाच्या शेवटीं प्रत्यय लागून बनत नसे, तर पितृवाचक शब्दाच्या प्रथम स्वराच्या अगोदर 'आ' किंवा 'अ' हा आगम शिरून बनत असे. मानसशास्त्रदृष्ट्या ह्या आ किंवा अ ह्या आगमाला विशेष अर्थ असे. मूळ शब्दाच्या आंत 'अ' किंवा 'आ' घालून त्या शब्दाला लांब करण्यांत मतलब हा की त्या शब्दाने दाखविल्या जाणाऱ्या अर्थाची लांबी किंवा वृद्धि झालेली दर्शवावी. सर्व भाषांत अर्थाचें आतिशयन असा दीर्घ स्वर काढून करण्याची चाल आहे. पूर्ववैदिक भाषांत हा अनेकमात्राक उच्चार 'अ' किंवा 'आ' ह्या स्वरावर अन्यत्वें स्थिर होऊन वृद्धिसंततिसंबंधदर्शक झाला. तद्धितादि प्रक्रियेंत वृद्धिस्वर अपत्यवाचक शब्दांत फार भेटतो. सबब त्या स्वरांना अपत्यवाचक जो 'वृद्ध' शब्द तोच लक्षणेने मुक्रर करण्यांत आला. वृद्धिस्वरांचा व संज्ञेचा हा असा इतिहास आहे[१].

वृद्धीची प्रक्रिया खाली दिलेल्या उदाहरणांवरून स्पष्ट होईल.

पुत्र = प् + उ + त्र = प् + आ + उ + त्र = पाउत्र = पौत्र

---

१ राजवाडे–गुण व वृद्धि निबंध, इतिहास व ऐतिहासिक ३.

मित्र= म् + इ + त्र = म् + आ + इ + त्र = माइत्र = मैत्र
कुरु = क् + उ + रु = क् + आ + उ + रु = काउरु = कौरव
शाक = श् + अ + क = श् + आ + अ + क = शाक
शिक= श् + इ + क = श् + आ + इ + क = शाइक = शैक

उच्चारांत फरक झाल्यामुळे भाषेतिहासांत, भाषारचनेंत व भाषा-व्याकरणांत कोणकोणत्या अडचणी येतात व कसकशीं स्थित्यंतरें होतात हें वृद्धीच्या इतिहासावरून कळून येण्यास मार्ग होतो. उच्चार व स्वराघात यांचे फरक भाषांच्या चारित्र्यांत केवढी विलक्षण क्रांति करतात तिचें उत्तमोत्तम दर्शक हें वृद्धीचें प्रकरण आहे.

३५ पूर्ववैदिक भाषेंत ' अ ' ह्या स्वराचीं तीन स्वरूपें होतीं. ह्या तीन स्वरूपांचीं पुढे वैदिक संस्कृत भाषेंत ' अ ' असें एकच रूप झालें.

| | | |
|---|---|---|
| सचते | eqetai ( Gk ) | Sequitur ( Lat ). |
| रथः | ra$\theta$o ( Av ) | Roto ( ,, ) |
| आगामि | azami ( ,, ) | Ago ( Gk ) |

ह्या वरून ' अ ' ह्या स्वराच्या उच्चारासंबंधी पूर्ववैदिक भाषेमध्ये निश्चिति नव्हती.

अर्धस्वरः—ह्या उच्चारांच्या बाबतींत पूर्ववैदिक भाषा विशेष संपन्न होती.

| | | | |
|---|---|---|---|
| आद्यः— | यकृत | iccur ( Lat ) | Yakard ( Aves ). |
| | वीरः | viro ( Aves ) | Air ( Lat ). |
| मध्यः— | प्लवते | plovet (Slav ) | |
| | एति | eisi ( Gk ) | Aeiti ( Aves ). |

अन्त्यः—ज्या (जीया), मर्त्य (मर्तीय), कर्त्य (करतीय) असा वेदामध्ये उच्चार करीत असत.

३६ विसर्गांचा उच्चार पूर्ववैदिक भाषेंत कसा होता हें अजमावितां येण्यासारखें आहे. विसर्गांच्या उच्चारांत ' स् ' काराचा अंश आहे व ' ह् ' काराचाहि अंश आहे. वैदिक किंवा पाणिनीय संस्कृतमध्ये विसर्गांचा कधी ऊष्मान्त तर कधी ' ह ' कारान्त असें रूपान्तर होतें. त्यावरून विसर्गांचा उच्चार पूर्ववैदिक भाषेंत अर्धस्वरासारखा होता की ऊष्म्यासारखा होता ह्याविषयी शंका आहे. निरनिराळ्या परिस्थितींत विसर्गांचें निरनि-

राळें रूपांतर पाणिनीय संस्कृतमध्ये होत असे. विसर्गाच्या पुढे कोणताहि वर्ण नसला तर त्याचा उच्चार कधी ह्, कधी र् अथवा स्, ष्, श् इतक्या निरनिराळ्या प्रकारांनी होत असे. कधी कधी य् अथवा व् ह्या-सारखाहि त्याचा उच्चार होत असावा. विसर्गाच्या पुढे मृदु व्यंजन अथवा अ आला तर त्याचें स्पष्टीकरण पाणिनि "असुरः = असुर + उ = असुरो." असें करतो. विसर्ग ज्या अर्थी अर्धस्वराबरोबर गणला गेला आहे व ज्या अर्थी "हयवरट्" ह्या पाणिनीय सूत्रांत त्याचा अन्तर्भाव केला आहे त्या अर्थी विसर्गाचा उच्चार अर्धस्वरासारखा होत असावा.

३७ वेदपूर्वकालीन आर्य भाषेतील स्वरोच्चारासंबंधी विवेचन येथवर केलें. व्यंजनोच्चारासंबंधी थोडासा विचार येथे करून हे वर्णप्रक्रियेचें प्रकरण पुरें करूं. व्यंजनोच्चाराच्या बाबतींत कांही ठळक गोष्टी सांगतां येण्यासारख्या आहेत. वेदपूर्वभाषेंत सर्व व्यञ्जनांचा उच्चार सध्या आपण करतों तसाच करीत असले पाहिजेत असें आपणांस म्हणतां येणार नाही. मूर्धन्य उच्चार तर त्या भाषेंत नसावेत असें आता निश्चित ठरलें आहे. पाश्चात्य आर्य भाषा आणि अवेस्तीय भाषा ह्यांमध्ये मूर्धन्य उच्चार नाहीत त्या अर्थी वेदपूर्व भाषेंत ते नसावेत. वैदिक आर्य हिंदुस्थानांत आल्यानंतर द्राविडी लोकांचा आणि त्यांचा जसा निकट संबंध आला तसे आर्यांच्या भाषेंत हे मूर्धन्य उच्चार शिरले असें भाषाशास्त्रवेत्त्यांचें मत आहे[1]. मूर्धन्य उच्चारांप्रमाणेच तालव्य उच्चारांतहि कांही थोडासा फरक होण्यास सुरुवात झाली असली पाहिजे, व त्याचीच परिणति पुढे गुजराती आणि मराठी ह्या आधुनिक भारतीय भाषांत जे दन्ततालव्य उच्चार सुरू झाले त्यांत झाली असावी.

वेदपूर्व कालांत ज्या कांही आर्यांच्या टोळ्या हिंदुस्थानांत आल्या त्यांमध्ये सुद्धा उच्चारभेद पुष्कळ असावेत. कांही आर्यांच्या टोळ्यांत दन्त्य उच्चार अधिक स्पष्ट तर कांहींत तालव्य उच्चार अधिक स्पष्ट अशी स्थिति असली पाहिजे; व हेच भेद पुढे प्राकृत कालांत शौरसेनींत व मागधींत अवतरले असावेत. उदा०—स्, श्, ष् ह्याबद्दल शौरसेनींत 'स' येतो

---

१ Caldweal, Gr of Dravidian Langs, Intro.

तर मागधींत ‘श’ (तालव्य) येतो. ह्या ऊष्म्यांच्या उच्चारांत जसा फरक त्या लोकांत होता तसाच दुसऱ्या व चौथ्या व्यंजनांच्या बाबतींतहि होता. कांही लोकांच्या उच्चारांत ‘ह्’ कार फार येई तर कांहींच्या उच्चारांत तो तितका येत नसे. उदा०—“देवः” हा शब्द वेदपूर्व कालांत ‘दय्वह्’ असा उच्चारीत व त्याच्याहि पूर्वीच्या कालांत धय्वह् किंवा थय्वह् असा ‘ह’ मिश्र उच्चार होत असे. तसाच पितर् ह्या शब्दाचा उच्चार पूर्ववैदिक कालांत पय्तर् असा होई व त्याच्याहि पूर्वीच्या कालांत ‘भय्धर्’ व ‘फय्थर्’ असा होई. असे उच्चार होत असत ह्याजबद्दल ग्रीक, लॅटिन व अवेस्तीय भाषांमध्ये दाखला मिळतो. उदा– देव–थेऑस (ग्रीक), पितर्–फेदर (अवेस्तीय). ह्या उच्चारभेदांवरून असें दिसतें की, उच्चारांत जसजसा ‘ह’ मिश्र उच्चार अधिक तसतसा तो उच्चार अधिक प्राचीन असें म्हणावयास हरकत नाही. गुह् आणि बन्द् असे दोन जर धातु घेतले तर ह्यांचीं प्राचीनतर, प्राचीनतम उच्चारांचीं रूपें गुह् < घुह् < घुद् < घुध् ; व बंद् < बन्ध् < भन्ध् < भंध् अशीं होतील[1]. पाश्चात्य आर्यभाषा व अवेस्तिक भाषा ह्यांतील जर ह्या धातूंचीं रूपें पाहिलीं तर ह्यांना दुजोरा येईल.

व्यंजनांपैकी पूर्ववैदिक भाषेंतील दन्त्य व ओष्ठ्य ह्या दोन्ही वर्गांतील व्यंजनें जशींच्या तशींच संस्कृत, ग्रीक, लॅटिन इत्यादि उत्तरकालीन भाषांमध्ये उतरलीं. त्यांमध्ये कांही फरक झाला नाही. उदाहरणार्थ,

पति Potis (Gk), Potis (Lat), Patis (Lith). अपि Aipi (Av), èpi(Gk), भरामि Barami (Av), Barem (Arm), Fere (Gk), Fere (Lat). त्रयः Tres (Gk), Tres (Lat). दमः Domo (Gk), domus (Lat). domu (Sl). रुधिरः Eruthros (Gk), ruber (Lat).

पूर्ववैदिक भाषांत महाप्राण व अल्पप्राण असा भेद कठोर व्यंजनांच्या बाबतींत मानीत असत असेंहि वरील उदाहरणांवरून दिसतें. (उदा– प् >< फ्, त् >< थ्).

---

१ R. Bhagvat W. P. Lectures 3.

पूर्ववैदिक भाषेतील कंठ्य व तालव्य उच्चार उत्तरकालीन वैदिक, लॅटिन, ग्रीक, लिथ्यूनियन भाषेत येतांना मूळापासून फार बदलले आहेत. कंठ्यापासूनच तालव्याची उत्पत्ति कांही बाबतींत झाली आहे. कांही वेळीं मूळच्या उच्चारांतील 'व्' उच्चार पुढे नाहीसा झाला.

रेकः Loiqos (Gk). रिणक्ति Linquo (Lat), Leloiqe (Gk). रिरेच eliqe (Gk). चित् Quid (Lat), ti (Gk).

ऊष्मे :—पूर्ववैदिक भाषेंत ह्यांचें दैन्य फार दिसतें. उष्मा 'स' हा एकच आहे. ह्याचींच पुढे निरनिराळ्या अवस्थांत 'ह्, श्, ष्, त्, झ्' अशीं रूपें होतात.

सनः Senas (Lith), Senex (Lat), Sinista (Goth), Hin (Arm). वक्ष्यामि Vaxya (Aves). तृष्यति Tirtas (Lith).

मूर्धन्य :— पूर्ववैदिक भाषांत स्पष्ट मूर्धन्य उच्चार नव्हते. ते द्राविडांच्या संपर्कामुळे आले. आर्यंयुरोपीय भाषांच्या जुन्या स्वरूपांत हे उच्चार आढळत नाहीत. दन्त्य व्यंजनांनाच कांही विशिष्ट परिस्थितींत मूर्धन्याचें रूप प्राप्त होतें.

## प्रत्ययप्रक्रिया

३८ कोणत्याहि भाषेची आद्य स्थिति ही प्रत्ययविरहित असते. त्याप्रमाणे वैदिक भाषेच्या पूर्वीची भाषाहि प्रत्ययविरहितच होती. वाक्यांतील शब्दांचे जे निरनिराळे संबंध सध्या प्रत्ययांच्या साहाय्याने दाखविता येतात तेच संबंध अशा अप्रत्ययी भाषांत निरनिराळे स्वतंत्र शब्द ठेवून दाखवीत असत. ह्या स्वतंत्र शब्दांचाच कालांतराने फरक होऊन अखेर त्यांना प्रत्ययांचें स्वरूप येतें. असा हा प्रत्ययांच्या उत्पत्तीचा थोडक्यांत इतिहास आहे. प्रत्ययांमध्ये प्रथम वचनाचे प्रत्यय, नंतर विभक्तिप्रत्यय व नंतर लिंगभेद दाखविणारे प्रत्यय असे उत्पन्न झाले. "व्योमन्, मति, सरसी, नदी" वगैरेसारखीं प्रातिपादिकेंच प्रथमेच्या एकवचनाचीं रूपें म्हणून वापरलीं जातात ह्यावरून कांही रूपें पूर्ववैदिक भाषेच्या निर्विभक्तीच्या काळांतील असावींत असें वाटतें. त्याचप्रमाणे दार, मित्र, कलत्र वगैरेसारखे शब्द पूर्ववैदिक आर्य भाषेच्या " निर्लिंग " अशा अवस्थेंतील शिल्लक राहिलेले अवशेष आहेत की काय अशी शंका येते.

३९ विभक्तींच्या प्रत्ययांतहि अगोदर एक विभक्ति असून तिच्यापासून दुसऱ्या विभक्ति उत्पन्न झाल्या असाव्यात. पूर्ववैदिक भाषेंतहि एक विभक्तीचा काल, दोन विभक्तींचा, नंतर तीन विभक्तींचा, नंतर चार, पांच, सहा, सात, आठ असा क्रम लागतो. आठी विभक्तींपैकी संबोधन आणि प्रथमा ह्यांचीं रूपें बहुतेक सारखीं असतात, व सर्वनामांच्या बाबतींत संबोधन विभक्ति गणली जात नाही त्या अर्थी ती एक विभक्ति गळते. ह्या सातांमध्ये पुनः कांही शब्दांचीं रूपें तपासलीं तर पंचमी आणि षष्ठी ह्या दोन्ही विभक्तींचीं रूपें सारखींच दिसतात असें आढळून येईल. म्हणून आणखी एक विभक्ति कमी म्हणजे सहा होतात. त्याचप्रमाणे प्रथमा आणि द्वितीया ह्या दोन्ही प्रत्ययांच्या दृष्टीने बऱ्याच अंशीं सारख्या आहेत. तेव्हा पुनः एक विभक्ति कमी होऊन विभक्ति पांच राहतात. नपुंसक नामांचीं अनेकवचनाचीं रूपें, पुंल्लिंगी व स्त्रीलिंगी व्यंजनान्त नामांचीं रूपें व स्त्रीलिंगी आकारान्त नामांचीं अनेकवचनाचीं रूपें जर तपासलीं तर पांच विभक्तिच असाव्यात असें वाटतें. हीच जर विभक्तींच्या रूपांची छाननी आणखी केली तर विभक्तींची संख्या चारावर येते. आता द्विवचनाचे प्रत्यय पहाः

प्रथमा, द्वितीया, संबोधनः—आ–ए–ई–ऊ–औ.

तृतीया, चतुर्थी, पंचमी :—भ्याम्

षष्ठी, सप्तमी :—ओस्

द्विवचनाचे प्रत्यय तपासले तर विभक्तींचे तीन निरनिराळे गट पडतात. ह्यावरून तीन विभक्तींचा एक काळ असावा असें अनुमान निघतें. अगदी जर प्रथमावस्थेची कल्पना केली तर मालक आणि ज्याचा मालक असावयाचा तो किंवा बोलणारा आणि ज्याविषयी बोलावयाचें तो असे दोनच संबंध उघड होतात, व हे दोन कारकसंबंध दाखविणाऱ्याच विभक्ति प्रथम उत्पन्न झाल्या.

येथे एका गोष्टीबद्दल घोटाळा होऊं देऊं नये. वेदपूर्व आर्य भाषेंत विभक्ति नव्हत्या व त्या क्रमाक्रमाने उत्पन्न झाल्या असें ज्या वेळेस आम्ही म्हणतों त्या वेळेस निरानिराळ्या विभक्तींचे स्वतंत्र असे प्रत्यय उत्पन्न झाले नव्हते एवढाच त्याचा अर्थ आहे. साती निरनिराळ्या विभक्तींच्या साहाय्याने जे निरनिराळे कारकसंबंध सध्या दाखविले जातात ते वेदपूर्व आर्य

भाषेंतहि दाखविले जात असत. परंतु ते अन्य मार्गांने म्हणजे निरनिराळे शब्द पुढे चिकटवून दाखविले जात असत. ह्यावरून जितके असे निरनिराळे शब्द चिकटविले जात तितके कारकसंबंध व तितक्या निरनिराळ्या विभक्ति अशी स्थिति वेदपूर्व भाषेंत होती. हीच स्थिति प्रत्येक आद्य भाषेसंबंधी असते असें भाषाशास्त्रवेत्त्यांचें मत आहे[१]. आम्हीं जें विभक्तींच्या संबंधी विवेचन केलें आहे तें फक्त विभक्तींच्या प्रत्ययांना अनुलक्षून आहे.

४० विभक्तींच्या प्रत्ययाच्या विवेचनानंतर प्रातिपदिकांच्या स्वरूपाचा प्रश्न येतो. वेदपूर्व भाषेंत प्रातिपदिकें कधी स्वरान्त असत व कधी व्यंजनान्त असत. त्यांतल्या त्यांत शब्द व्यंजनान्त उच्चारण्याची लकब फार रूढ असे. वैदिक भाषेंत जे देव, शाला, अग्नि, पशु, पितृ, नृ, रै, गो, नौ असे स्पष्ट स्वरान्त शब्द रूढ असलेले सापडतात तेच पूर्ववैदिक भाषेंत देवह्, शालाह्, अग्नय्, पशव्, पितर्, नर–नार्, रय्–राय्, गव्–गाव्, नव्–नाव् असे व्यंजनान्त असावेत असें त्याच्या रूपांवरून वाटतें. व ह्याच्याहि पूर्वीच्या पूर्ववैदिक भाषेच्या पहिल्या थरांत दयवह्, पयतर्, इत्यादि त्या शब्दांचीं रूपें होत असावीं असें ग्रीक, अवेस्ता वगैरे भाषांतील त्यांच्याशीं सम असलेल्या शब्दांच्या तुलनेवरून वाटतें. पूर्ववैदिक भाषांत शब्द व्यंजनान्त उच्चारिले जात असत येवढेंच नव्हे तर कधी कधी तें अंत्य व्यंजन द्वित्त उच्चारिलें जात असे असें पाणिनीच्या अनचि च (८–४–४७) ह्या सूत्रावरून वाटतें. 'ह्' शिवाय कोणतेंहि अन्त्य व्यंजन द्वित्त उच्चारीत असत. त्याच्यापूर्वी शब्दांतील स्वर असे. उदा– अन्, अम्, अय्, अव्, अस् ह्यांचे उच्चार अन्न्, अम्म्, अय्य्, अव्व्, अस्स् असे होत असत[२]. ह्याचा अवशेष पाणिनिकालापर्यंत चालू होता हे "ङमो" (८, ३, ३२) ह्या सूत्रावरून सिद्ध होतें. ऱ्हस्व स्वरानंतरचे आणि स्वरापूर्वीचे न्, ण्, ङ् हे पाणिनीय संस्कृतमध्ये द्वित्त होतातच.

वैदिक व उत्तरकालीन संस्कृत ह्या भाषांतील नाम व क्रियापदें ह्यांचें

---

१ Jesperson, Language, XVIII 2.

२ R. Bhagvat, W. P. L. 2.

प्रत्यय जर पारखून पाहिले तर प्रत्ययबीजें म्, स्, न्, त्, अ, इ इतकीं ठरतात.[1] हीं प्रत्ययबीजें नामें, क्रियापदें, यांच्या प्रत्ययांत व गणांचीं विकरणें ह्या सर्वांत आहेत. ह्या बीजांपासून उत्तरकालीन संस्कृतमधील प्रत्ययांचा पसारा झाला आहे. 'स्' चा अर्थ एक, दोन स्, स् म्हणजे द्विवचन, तीन स्, स्, स् म्हणजे तीन. असा त्यांत वचनाचा अर्थ आला. त्याचप्रमाणे अम् व अन् ह्यांचाहि अर्थ एक. राज् + अन् = राजन् ( एक राजा ) इ.

वैदिक भाषेंतील जर वैकल्पिक रूपें पाहिलीं तर ह्यावरून पूर्ववैदिक समाजामध्ये ज्या कांही भाषा प्रचलित होत्या त्यांची प्रयोगसमृद्धि चांगलीच नजरेस येते. देवा, देवौ, ( द्वि ); देवाः, देवासः ( बहु ); देवेभिः, देवैः ( तृ. ब ); देवेभ्यः, देवे (च. पं. बहु); ह्या रूपांवरून असें वाटतें की हीं निरनिराळीं रूपें बोलणारे निरनिराळे समाज पूर्ववैदिक कालीं होते, आणि त्या सर्व समाजांचा मिलाफ झाल्यावर संमिश्र समाजाने उच्चाराला सुकर अशीं रूपें ठेविलीं. 'तस्थिवस्' ह्या शब्दाचीं अंगें तस्थिवान्स्, तस्थुष्, तस्थिवत् अशीं तीन तऱ्हेने होतात. ह्यावरून असें अनुमान निघतें की तीन समाज लिट्चीं कृदन्तें तीन तऱ्हेने सिद्ध करीत. विभक्तीच्या प्रत्ययांत असाच फरक दिसतो. व्यंजनान्त आणि स्वरान्त शब्दांना निरनिराळे विभक्तींचे प्रत्यय लागतात. उदा०—

| | स्वरान्त शब्दांस | व्यंजनान्त शब्दांस |
|---|---|---|
| तृतीया | एन | आ |
| चतुर्थी | य | ए |
| पंचमी | त् | स् |
| षष्ठी | स्य<br>ओस<br>नाम् | अस्<br>आम् |

ह्यावरून पूर्ववैदिक एक समाज एक प्रकारचे व दुसरा समाज दुसऱ्या प्रकारचे प्रत्यय वापरी असें अनुमान निघतें.

'गो' शब्द पूर्ववैदिक कालीं चार प्रकारांनी उच्चारणारे चार समाज होते. उदा०— १ गौ, २ गो, ३ गा, ४ गव, गु

१ राजवाडे, संस्कृत भाषेचा उलगडा, पृष्ठ १२.

पूर्ववैदिक कालीं एक समाज इकारान्त व उकारान्त स्त्रीवाचक शब्द पुंल्लिंगी समजे व दुसरा समाज स्त्रीलिंगी समजे. ह्याला मति व धेनू ह्या शब्दांची साक्ष आहे.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| उदा०— | मतये | धेनवे | मत्यै, | धेन्वै |
| | मतेः | धेनोः | मत्याः | धेन्वाः |
| | मतौ | धेनौ | मत्याम् | धेन्वाम् |
| | पुंल्लिंगी हरि व गुरूप्रमाणे | | स्त्रीलिंगी नदी व धेनू प्रमाणे | |

'पति' शब्द असाच मनोरंजक आहे. त्याचीं रूपें १ पति, २ पत्य् ३ पतिय, पत्यु ह्या तीन शब्दांच्या रूपांच्या सरमिसळीने झालीं आहेत.

कर्तुम्, गन्तुम्, यातुम् हीं पाणिनीय संस्कृतांत तुमन्त म्हणून एक धातुसाधिताचा प्रकार आहेत त्याचीं रूपें असें समजतात. वैदिक वाङ्मयांत हीं धातुसाधितनामें आहेत, कारण नामास ज्याप्रमाणे विभक्तिप्रत्यय लागतात त्याप्रमाणे ह्या धातुसाधितांस दोन विभक्तींचे प्रत्यय लागत असत. कर्तुम्, गन्तुम्, यातुम् वगैरे ह्या द्वितीयेच्या रूपांबरोबर कर्तवे, गन्तवे, यातवे इत्यादि चतुर्थ्यन्त रूपें वैदिक वाङ्मयांत उपलब्ध आहेत. पूर्ववैदिक कालीं हा शब्द साती विभक्तींत चालत असावा. "मया यातुः शक्यते" असा प्रयोग पूर्ववैदिक भाषेंत रूढ असावा असे सध्या मराठींत जो "म्यां जाऊ शकतों" असा प्रयोग कांही ठिकाणीं रूढ आहे त्यावरून वाटतें. हा प्रयोग पुढे पाणिनीय कालांत लोपला असला तरी प्रांतिक बोलींत कोठे तरी सुरू असलेला मराठींत शिरला असावा. मराठींत 'खाऊ, गाऊ, काऊ' वगैरे जीं ऊकारान्त धातुसाधितनामें आहेत तीं संस्कृत खातु, गातु, कवितु वगैरे तुमन्ताचींच अपभ्रष्ट रूपें असावींत.[1]

**४१** मराठींत कांही जे चमत्कारिक प्रयोग आढळून येतात त्यांवरून पूर्ववैदिक भाषेची आणखी एक लकब नजरेस येते.

तो कथण्याचें करतां झाला = स कथयां चकार
त्यांनी जाणण्याचें केलें = ते विदाम् अक्रन्

---

१ राजवाडे, तिङन्तविचार, पृ. १३.

तुम्हीं जाणण्याचें करां = यूयं विदाम् कुर्यात
तुम्हाला इंद्र रक्षिण्याचें करो = इन्द्रः वः पावयां कुर्यात्
तो त्याला वृत्त सांगण्याचें करता झाला = स तस्मै वृत्तं कथयां चकार

वर दिलेल्या वाक्यांच्या जोड्या तपासल्यानंतर असें दिसून येतें की, वेदभाषेच्याहि पूर्वी भूतकालांत व विध्यर्थांत "अयाम्" हा प्रत्यय धातूंना लागत असे. संस्कृतमधील लिट् ( भूतकाळ ) व लुङ ( विध्यर्थ ) ह्या दोन काळाच्या रूपांचा उलगडा करतांना 'अयाम्' असा प्रत्यय न मानतां 'आम्' असा प्रत्यय मानतात. मराठींत ज्याअर्थी कथणें, जाणणें, रक्षिणें, सांगणें इत्यादि धातुसाधितनामांना षष्ठीचे प्रत्यय लागले आहेत त्याअर्थी हा 'आम्' ( < अयाम् ) प्रत्यय मूळचा षष्ठीचाच असावा आणि तो कथय्, विद्, पाव् वगैरे धातुसाधित नामांना लागला असावा असें वाटतें. धातु किंवा बीजें हीं नामासारखीं वापरीत असत. (मंत्र-) दृश्, (मंत्र-) विद् वगैरे धातू हे नामाप्रमाणे अद्यापहि वापरतात. तेव्हा हीं मूळ रूपें घेऊन त्यांना 'आम्' हा षष्ठीचा प्रत्यय वेदपूर्वकालच्या भाषेंत लागत होता. कालान्तराने पाणिनिकालांत व पुढे त्याचा लोप झाला खरा, तरी पण त्याने आपली स्मृति वर दिलेल्या चमत्कारिक प्रयोगांत ठेविली आहे.[1]

मराठींत रूढ असलेल्या 'जाला, जहाला, झाला' ह्या रूपांवरून पूर्ववैदिक भाषेंतील एक निष्ठारूप सिद्ध होतें. 'अस्' ह्या धातूचें ( भूत भूतकालवाचक धातुसाधिताचें ) निष्ठारूप वेदभाषेंत किंवा पाणिनीय संस्कृतांत उपयोगांत आणल्याचें आढळत नाही. मराठींत ज्या अर्थी तें आढळतें त्या अर्थी त्याची उपपत्ति कोठून ? द्राविडी किंवा इतर भाषांतून जर तें आलें नसेल तर वेदपूर्वकालीन भाषेंतील अवशेष राहिला असावा हें उघड आहे. मराठी "जाल" ह्या निष्ठारूपाची उपपत्ति पुढीलप्रमाणे आहे. अस् + त = अस्त = स्त ( अस् धातूचा आद्य अ लोप पावतो. )

स्त = सत ( स्वरविभक्ति ) = जअ ( प्राकृतमधील रूप )

जअ ह्या रूपाला मराठींतील भूतकाळाचा स्वार्थे 'ल' प्रत्यय लागून

---

१ राजवाडे, तिङन्तविचार, पृ. १३.

जअल = जाल = झाल असें रूप झालें. हें धातुसाधित विशेषण असल्यामुळे तिन्हीं लिंगीं व दोन्हीं वचनीं नामाप्रमाणे चालतें. मराठींत दुसरें एक "झालें" असें रूप आहे. तें संस्कृत धातु 'जन्' पासून निघालें आहे. त्याचा आणि वर दिलेल्या 'अस्' धातुपासून निघालेल्या रूपाचा संबंध नाही. स्पष्टीकरणार्थ खाली दोन उदाहरणें दिलीं आहेत.

१ हरिश्चंद्र नामें राजा जाला (झाला)– 'अस्' धातूची निष्ठा.

२ हरिश्चन्द्राला रोहित नांवाचा पुत्र जाला– 'जन्' धातूची निष्ठा.[१]

मराठींतील "असैल" हें भविष्यकालाचें जुन्या वाङ्मयांत आढळणारें 'अस्' धातूचें रूप व त्यापासून प्राप्त झालेलें आधुनिक बोलींतील 'असल' हें रूप असेंच मोठें मनोरंजक आहे. वेदपूर्वीच्या भाषेंत असिष्यत्, सिष्यत् अशीं रूपें रूढ असावींत. त्यांचा अपभ्रंश जुन्या मराठींत भविष्यकाळीं असैल (ला–ली–लें) असा झाला.[२]

मराठींतील 'या' कारान्त धातुसाधितें चिंतनीय आहेत. त्यांवरूनहि पूर्ववेदिक भाषेंतील विध्यर्थी रूप कसें असलें पाहिजे हें समजेल. "हसाया, प्याया, कराया, जाया, याया" वगैरे धातुसाधित रूपें मराठींत नेहमींच्या वापरांत आहेत. संस्कृतमध्ये विध्यर्थी धातुसाधितें तयार करणारे प्रत्यय अनीय, ईय, तव्य, असे तीन आहेत. ह्या तिन्हींपैकी कोणत्या तरी उदा.– तव्य किंवा ईय ह्या प्रत्ययांपासून मराठी 'या' हा प्रत्यय व्युत्पादणें शक्य आहे. परंतु व्युत्पत्ति तितकीशी ठाम बसत नाही. व्युत्पत्तीच्या अवस्था खाली मांडून दाखवितों.

हसाया < हसइ < हसइज्ज < हसेज्ज < हसेय्य.
प्याया < पेया < पेय्य < पेज्ज < पेय.
याया < येया < येय्य < येज्ज < येय.
कराया < करेय्य < करेज्ज < — कार्य.

अशीं बरींच रूपें व्युत्पादिलीं म्हणजे प्रत्यय 'एय्य' असा असावा व त्यापासून मराठी 'या' प्रत्यय निघाला असावा असें वाटतें. ह्या 'एय्यान्त' प्रत्ययास ऋग्वेदांत आधार मिळतो. पुढे दिलेल्या उदाहरणांत

१,२ राजवाडे, तिङन्तविचार, पृ. १८, २१

'तव्य' ह्या विधिप्रत्ययाबद्दल 'एय्य' हा प्रत्यय वापरला आहे.

स्तुषेय्य पुरुवर्पसं ऋभ्वम् (ऋ. १०–१२०–६).

ह्या एय्य प्रत्ययाच्या पुढील अवस्था पुढे दिल्या आहेत.

एय्य > एज्ज > एन्न > एस > यास.

## संस्कृत — वैदिक व पाणिनीय

४२ वेदपूर्वकालीन भाषेचा प्रांत सोडून आपण ज्या वेळेस संस्कृतच्या प्रांतांत येतो त्यावेळेस भाषेच्या स्वरूपाच्या बाबतींत आपणांस अधिक निश्चित पुरावा मिळतो. वैदिक वाङ्मय हें जगांतील पुरातत्त्वाच्या सर्व अंगोपांगांत शिरोभूत व भाषाशास्त्राच्या दृष्टीने अतुल, उच्च, पुरातन व प्रगल्भ असें साधन आहे. संस्कृतचीं स्वरूपें दोन:-- एक वैदिक आणि दुसरें पाणिनीने ज्या भाषेचें व्याकरण रचिलें ती उत्तरकालीन संस्कृत भाषा हें होय. वैदिक व पाणिनीय हीं एकाच संस्कृत भाषेचीं दोन कालिक रूपें आहेत; तेव्हा ह्या दोहोंत असलेला फरक स्थूल दृष्टीनेच सांगावयाचा आहे.

वेदाचें संस्कृत एकच स्वरूपाचें आहे असांतला भाग नाही. वेदाच्या सर्व ऋचा आठ अष्टकांत किंवा दहा मंडलांत ग्रथित केल्या आहेत. सर्व मंडलें कोणत्या ना कोणत्या ऋषीने केलीं आहेत. त्या ऋषींना मंत्रद्रष्टे म्हणतात. पहिल्या व दहाव्या मंडलांचे कर्ते मात्र पुष्कळ आहेत. भाषेच्या दृष्टीने दाही मंडलांत शेवटचें दहावें मंडल उत्तरकालीन असावेंसें वाटतें. दहाव्या मंडलांत सापडणाऱ्या देवताविषयक व वेदांतविषयक ह्या बाबी जरी बाजूस ठेविल्या व केवळ भाषाच पाहिली तरी तें नंतरचें ठरतें. "या ते शविष्ठ नव्या अर्कम्" व "इयं मनीषा इयमश्विना गीः" ह्या ओळींत 'नव्या अर्कम्' व 'मनीषा इयम्' ह्या किंवा असल्या शब्दांचा संधि पहिल्या नऊ मंडलांत होत नाही तो दहाव्या मंडलांत होतो. पहिल्या नऊ मंडलांत 'य्' आणि 'व्' यांचा उच्चार वृत्ताच्या व उच्चाराच्या सोयीसाठी इअ व उअ असा करतात. हे उच्चार दहाव्यांत आढळत नाहीत. पूर्वीच्या मंडलांत 'र्' फार आढळतो तर दहाव्यांत 'ल्' फार आढळतो. शिवाय पूर्वीच्या मंडलांतील ईम्, अवस्यु, विचर्षणि,

वीति, असले जुने शब्द दहाव्यांत सापडत नाहीत. ह्या सर्व पुराव्यावरून वैदिक भाषेंतच दोन स्पष्ट प्रकार दिसतात हें उघड आहे.

वेदाच्या भाषेप्रमाणे ब्राह्मणग्रंथाची भाषाहि स्वरयुक्त आहे. वैदिक भाषेंतील खाचाखुणा ब्राह्मणांच्या भाषेंतहि सापडतात. नामें, क्रियापदें वगैरे दोहोंत सारखींच चालतात. वाक्यरचना सारखीच आहे. वैदिक, ब्राह्मण, सौत्र व पाणिनीय ह्या संस्कृत भाषेच्या चार अवस्था होत.

४३ वेदांच्या भाषेंत अ, इ, उ, ऋ, लृ हे साधे स्वर, ए, ओ हे संयुक्त स्वर व त्यांच्या संधीने होणारे दीर्घ प्रकार हे आहेत. गुण व वृद्धि हे फरक होतात. व्यंजनांच्या उच्चारस्थानांप्रमाणे पांच वर्ग केले आहेत. अर्धस्वर व ऊष्मेहि आहेत. ख्, घ्, छ्, झ्, थ्, ध्, फ्, भ् ह्या व्यंजनांना ऋक्प्रातिशाख्यांत संयुक्त व्यंजनें म्हटलीं आहेत, कारण त्यांच्या उच्चारांत 'ह्' कार येतो. नामें अ, इ, उ, ऋ-कारान्त आहेत व बहुतेक पाणिनीय नियमांप्रमाणे चालतात. व्यंजनांपैकी च्, क्, त्, थ्, भ्, स् इत्यादि व्यंजनें नामांच्या शेवटीं सापडतात. लिंगें तीन आहेत, वचनें तीन आहेत. संबोधनासह विभक्ति आठ आहेत. विशेषणें नामांसारखीं चालतात.

वैदिक भाषेच्या मुख्य खुणा खाली दिल्या आहेत. वर्णप्रक्रिया, प्रत्ययप्रक्रिया व प्रयोगप्रक्रिया ह्यांसंबंधी बहुतेक ठळक ठळक बाबींचा खाली दिलेल्या यादींत अंतर्भाव केला आहे.

१ 'ए' आणि 'ओ' ह्या स्वरांपुढे 'अ' स्वर जरी आला तरी ते दोन्ही स्वर संधीशिवाय राहतात. उदा०—उप प्रयन्तो अध्वरम् । सुजाते अश्व सूनृते । मित्रमहो अवद्यात् ।

२ 'आ' ईपदर्थे सानुनासिक होतो. उदा०—अभ्रा आँ अपः

३ षष्ठीचा द्योतक 'स' मध्ये येतो. उदा०— वाचस्पतिः; दिवस्पुत्रः. 'सः' ऐवजी 'स्य' येतो. उदा०—एष स्य वाजी.

४ वैदिक भाषेंत विश्लेष बेसुमार होत असे. उदा०—तन्व—तनुवम्; विश्वम्—विषुवम्; स्वर्गो-सुवर्गो; त्र्यंबकम्—त्रियंबकम्; वरेण्यम्—वरेणियम्.

५ 'अयस्मयम्' हाच प्रयोग पाणिनीय संस्कृतमध्ये 'अयोमयम्' असा होतो.

६ प्रथमेचें अनेकवचनः–ब्राह्मणासः, नरासः, देवासः.

त्याचप्रमाणें तृतीयेचें अनेकवचन. उदा०— देवेभिः, कर्णेभिः

७ 'आत्मन्' मधील 'आ' चा लोप होतो. उदा०— त्मना देवेभ्यः.

८ वैदिकभाषेंतील कांही महत्त्वाचे आदेश उल्लेखनीय आहेत. लौकिक संस्कृतांतील पाणिनीय प्रक्रियेस धरून झालेलीं रूपें कंसांत दिलीं आहेत. उदा०—पंथाः (पंथानः), अस्मे, युष्मे (वयम्, यूयम्), चर्मन् (चर्मणि), उरुया (उर्व्या), उर्विया, (उर्व्या), मती (मत्या), नाभा (नाभौ), सरसी (सरसि), सखाया (सखायौ), साधुया (साधु), स्वप्नया (स्वप्नेन), नावया (नावा), वसन्ता (वसन्ते).

९ 'प्र' आणि 'सम्' इत्यादि उपसर्ग पादपूरणासाठी दोनदा येतात. उदा०—प्रप्रायमग्निः ; संसमिद्युवसे, उपोप, उदुद.

१० वैदिक क्रियापदांचीं रूपें अगोदर देऊन नंतर कांही पाणिनीय संस्कृत रूपें कंसांत दिलीं आहेत.

वधीं वृत्रम् (अवधिषम्); धारयत्वात् (धारयध्वम्); गमयतात् (गमयत); शृणोत (शृणुत); दधातन (धत्त); जुहुतन (जुहुत); जुहुथन, दीपयामसि (दीपयामः); श्रुधि, श्रुणुधि, (शृणु) पृधि, पूर्धि, रारन्धि, स्नात्वी (स्नात्वा); गृभाय (गृहाण); जभार (जहार); भेदति (भिनत्ति); मरते (म्रियते); स्थेयम्, गेश्म्, गमेम, वोचेम, वर्धन्तु, वर्धयन्तु; करवाव, करवावः; मन्त्रयैते, मन्त्रयैथे (मन्त्रयाते); ईशै; गृह्णायतै; अकरत्, अमरत्, अदरत्, असहत;[१]

११ तुमन्ताचे निरनिराळे प्रत्यय.

से– वक्षे; सेन्–एषे; असे, असेन्–जीवसे; क्से–प्रेषे; कसेन्–श्रियसे; अध्यै, अध्यैन्–आचरध्यै; कध्यै, कध्यैन्– आहुवध्यै; शध्यै–पिबध्यै; शध्यैन्–मादयध्यै; तवै–पातवै; तवेङ्–सूतवे; तवेन्–कर्तवे.

वैदिक भाषेच्या ठळक खुणा वर दिल्या आहेत. ह्या शिवाय बाकी सर्व बाबतींत वैदिक भाषेंत आणि पाणिनीय संस्कृत भाषेंत फारसा फरक नाही.

---

१ रामचंद्रप्रणीत प्रक्रियाकौमुदी. B. S. Series LXXXII, pp. 700–715.

## पाणिनीय संस्कृत

४४ वैदिक भाषेच्या नंतर कालानुक्रमाने पुढील स्थिति म्हणजे संस्कृत भाषा होय. व्यासवाल्मीक्यादि कवींच्या महाकाव्यांनी जिला प्रगल्भत्व आणून दिलें, कालिदासभवभूत्यादि कवींनी जिचें रम्यत्व सिद्ध केलें, दण्डी, बाण वगैरेंनी जिची शब्दसमृद्धि वाढविली, जिच्यांत शंकररामानुजादि आचार्यांनी वेदांततत्त्वें प्रतिपादून कैवल्याची योग्यता आणून सोडली व जिचें व्याकरण करण्याचें श्रेय संपादण्यास पाणिनिपतंजलीसारखे व्याकरणकार लाभले, त्या संस्कृत भाषेची थोरवी काय वर्णन करावी! कित्येक शतकें भरतखंडांतील आर्यांच्या धर्माची, वेदांताची, सामान्य व्यवहाराची भाषा संस्कृत ही होती. ही संस्कृत भाषा वैदिक भाषेचीच पुढची अवस्था आहे, म्हणून त्या आणि ह्या भाषेत तसे मौलिक भेद नाहीत. संस्कृत भाषेचें वर्ण व प्रत्यय किंवा उच्चार व व्याकरण हीं संक्षेपतः पुढे सांगितलीं आहेत.

वैदिक भाषेत जीं स्वरव्यंजनें आहेत तींच पाणिनीय संस्कृतमध्ये आहेत. पाणिनीय संस्कृतमध्ये शब्दसिद्धि पन्नास वर्णांच्या साहाय्याने होते. वैदिक भाषेच्या वर्णप्रक्रियेंत आणि पाणिनीय संस्कृत भाषेच्या वर्णप्रक्रियेंत विशेष फरक नाहीत. दोहोंत आढळून येणारे वर्णप्रक्रियेचे ठळक असे विशेष येथे द्यावयाचे आहेत.

पाश्चात्य आर्य भाषेंत अ ह्या स्वराचीं ह्रस्व अ, इ, उ अशीं जीं तीन सूक्ष्म रूपें सापडतात तीं संस्कृतमध्ये नाहीत. संस्कृत 'इ' स्वर ग्रीक वगैरे पाश्चात्य भाषांत 'ए, अ' अशा स्वरूपांत आढळतो. 'उ' चे प्रतिनिधि 'उ' किंवा ह्रस्व ओ आहेत. उदा– श्रुतः, नु, युग–योग. 'उ' कधी कधी 'ऋ'बद्दलहि येतो. उदा– क्रोष्टु-क्रोष्टृ, त्वष्टुमन्त-त्वष्टृमन्तः. ऋ, ऌ हे स्वर संस्कृतशिवाय दुसऱ्या भाषांत नाहीत. ए, ऐ, ओ, औ हे स्वर संस्कृतमध्येच फक्त संहितस्वरूपांत आढळतात. इतर भाषांत ते संधि न होतां येतात. ह्या स्वरांशिवाय स्वरांचे संधि, गुण, वृद्धि, संप्रसारण हे फरक संस्कृतमध्ये होतात. त्यांचें विवरण अन्यत्र दिलें आहे.

संस्कृतमधील व्यंजनांची वर्गवारी वर दिली आहे. वैदिक भाषेंतील सर्व व्यंजनें संस्कृतमध्ये उतरलीं आहेत. कंठ्य, दन्त्य व ओष्ठ्य

व्यंजनें संस्कृत व पाश्चात्य आर्योद्भव भाषा ह्यांत सारखींच आहेत. कंठ्य व्यंजनाचे दोन्ही प्रकार संस्कृतमध्ये एकच झाले आहेत.

१ क्रविः, Cruor (Lat); शाखा, Szaka ( Lith ); भगः boge ( O.SL ); स्थगयति tego (Lat);

२ कित्, quod (L); सचते, sequor (L); गम्, qiman (Goth).

संस्कृतमधील तालव्य वर्ण मूळच्या कंठ्य वर्णांपासून निष्पन्न झाले आहेत. कंठ्य वर्णांपुढे इ किंवा ए हे तालव्य स्वर आले म्हणजे कंठ्य वर्णांस तालव्यत्व येतें. पाश्चात्य भाषेंतील तालव्य वर्ण संस्कृतमध्ये ऊष्मे किंवा ज्, झ् होतात.

चत्वारः, Quatuor ( L ). रोचते, Lucet ( L ); जानि gens ( Goth ): जामि, geminus ( L ).

दन्त्य व ओष्ठ्य वर्णांचे विकार पुढीलप्रमाणे आहेत.

तनुः Tenuis ( L ), त्रयः tres ( L ), वर्तते Vero ( L ), दश deka (G), सदः Sedeo (L), पितृ Fadar (Goth), कफ Kafa (Av).

मूर्धन्य व्यंजनें द्राविडी भाषेंतून आर्योद्भव भाषांत आलीं आहेत. " रषाभ्याम् नो णः " ह्या सूत्रांत सांगितलेल्या विशिष्ट परिस्थितींत दन्त्य व्यंजनांचीं मूर्धन्य व्यंजनें होतात. उदा०— उष्ण, ऋण, कीर्ण. ऋतुप> उडुप. कृत्रिम > कुट्टिम. ग्रन्थ, निर्ग्रन्थ् > घटते, निघंटु. कृत > कुट. इ.

## प्रत्यय

४५ सर्व सामान्यनामांना थोड्याफार फरकाने खालील प्रत्यय लागतात.

| | ए. व. | द्वि. व. | अ. व. |
|---|---|---|---|
| प्रथमा | स् | औ | अस् |
| द्वितीया | अम् | औ | अस् |
| तृतीया | आ | भ्याम् | भिस् |
| चतुर्थी | ए | भ्याम् | भिस् |
| पंचमी | अस् | भ्यास् | भ्यस् |
| षष्ठी | अस् | ओस् | आम् |
| सप्तमी | इ | ओस् | सु |

ह्यांमध्ये कांही ठिकाणी लिङ्गपरत्वें किरकोळ फरक होतात. उदा०— नपुंसकलिंगी प्र. द्वि. सं. चे प्रत्यय म्, इ, आनि असे आहेत. स्त्रीलिंगी नामांचे प्रत्यय थोडेसे निराळे आहेत. सर्वनामांचीं रूपेंहि थोड्याफार फरकांनी निराळीं होतात. हे फरक सर्वांच्या परिचयाचे असल्यामुळे येथे देत नाहीं. जिज्ञासूंनी एखाद्या संस्कृत व्याकरणांत पहावे.

६ संस्कृत भाषेत क्रियापदांच्या रूपांची जशी संपन्नता आहे तशी दुसऱ्या कोणत्याहि भाषेत नाही. संस्कृतमध्ये धातूच्या मूळ रूपांत आत्मनेपद आणि परस्मैपद असा फरक मानला जातो. 'स्वतःच्या उपयोगासाठी' व 'दुसऱ्याच्या उपयोगासाठी' असा त्या शब्दांचा अर्थ आहे. क्रियेचें फल कर्त्याकडे जाईल अशी ज्या वेळेस अपेक्षा असते त्या वेळेस 'आत्मनेपदी' धातु वापरतात. ज्या वेळेस तेंच फल दुसऱ्याकडे जाईल अशी अपेक्षा असते त्या वेळेस 'परस्मैपदी' धातु वापरतात. संस्कृत भाषा प्रत्यक्ष बोलली जात असतांना हा नियम तंतोतंत जरी पाळला गेला असला तरी पुढे त्यांत फार शिथिलता आली. सध्या त्याचा कांही नियम नाही. धातूंनी मात्र आपलें मूळ आत्मनेपदी व परस्मैपदी स्वरूप कायम ठेविलें आहे.

ह्या पदांच्या फरकांशिवाय संस्कृत धातूंत 'गणांचा' आणखी फरक पडला आहे. संस्कृतमधील एकंदर क्रियादर्शक धातूंचे दहा गण मानिले आहेत. प्रत्येक गणाचें निरनिराळें चिह्न आहे. तें चिह्न धातूस लावून नंतर प्रत्यय लावतात. दुसरा व तिसरा गण ह्यांनाच फक्त चिह्नें नाहीत. प्रत्यय ज्याप्रमाणे सर्वनामांपासून निघाले आहेत त्याप्रमाणे हीं गणचिह्नेंहि सर्वनामापासून निघालीं आहेत. प्रथम व षष्ठ गणाचा 'अ' हा 'अस्मे' ह्याचा अवशेष आहे. चौथ्याचा 'य' आणि दहाव्याचा 'अय' ह्यांत साहाय्यकारी क्रियापदाचा अवशेष असला पाहिजे. सातव्याचा 'न्' व नवव्याचा 'ना' हे व पांचव्याचा 'नु' आणि आठव्याचा 'उ' हे परस्परसंबद्ध असावेत, व त्यांमध्ये 'न्' हा सर्वनामाचा अवशेष असावा.

काळांच्या रूपांच्या दृष्टीनेहि प्रत्ययांचे दोन भाग पडतात. एक सार्वधातुक व दुसरा आर्धधातुक. पहिल्या वर्गांत निरनिराळ्या काळांचे पुरुष-

वाचक व शित् प्रत्यय हे येतात. बाकी राहिलेले सर्व अर्थ व काळाचे प्रत्यय दुसऱ्यांत येतात. क्रियेची पूर्णता व क्रियेचें सातत्य हें कधी कधी अभ्यासाने म्हणजे धातूची द्विरुक्ति करून दाखविलीं जातात. काळ व अर्थ मिळून दहा 'ल'कार आहेत. वर्तमान (लट्), भूतकाळाचे तीन प्रकार (लङ्, लुङ्, लिट्), भविष्यकाळाचे दोन प्रकार (लुट्, लृट्), आज्ञार्थ (लोट्), विध्यर्थ (लिङ्), संकेतार्थ (लृङ्) हीं त्यांचीं नांवें आहेत. ह्या सर्वांचा विचार येथे करणें शक्य नसल्यामुळे मुख्य मुख्य लकाराचे प्रत्यय मात्र देतों. प्राकृत भाषांतील प्रत्ययांशीं व तत्परत्वें मराठीच्या प्रत्ययांशीं त्यांचा संबंध जोडण्यास ह्यांचा फार उपयोग होईल.

| | | परस्मैपद | | | आत्मनेपद | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | ए. व. | द्वि. व. | अ. व | ए. व. | द्वि. व. | अ. व. |
| वर्तमान | प्र. पु. | मि | वस् | मस् | ए. | वहे | महे |
| | द्वि. पु. | सि | थस् | थ | से | आथे | ध्वे |
| | तृ. पु. | ति | तस् | अन्ति. | ते | आते | अते. |
| आज्ञार्थ | प्र. पु. | आनि | आव | आम | ऐ | आवहै | आमहै |
| | द्वि. पु. | — | तम् | त | स्व | इथाम् | ध्वम् |
| | तृ. पु. | तु | ताम | अन्तु. | ताम् | इताम | अन्ताम्. |
| विध्यर्थ | प्र. पु. | ईयम् | ईव | ईम | ईय | ईवहि | ईमहि |
| | द्वि. पु. | ईः | ईतम् | ईत | ईथाः | ईयाथाम् | ईध्वम्. |
| | तृ. पु. | ईत् | ईताम् | ईयुः. | ईत | ईयाताम् | ईरन् |
| भूत | प्र. पु. | अम् | व | म | इ | वहि | महि |
| | द्वि. पु. | स् | तम् | त | थाः | इथाम् | ध्वम् |
| | तृ. पु. | त् | ताम् | अन्. | त | इताम् | अन्त. |

दोन्ही भविष्यकाळांचे प्रत्यय पुढीलप्रमाणे आहेत. उदा.:—

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| प्र. पु. | स्यामि | स्यावः | स्यामः | तास्मि | तास्वः | स्यास्मः |
| द्वि. पु. | स्यसि | स्यथः | स्यथ | तासि | तास्थः | तास्थ |
| तृ. पु. | स्यति | स्यतः | स्यन्ति. | ता | तारौ | तारः. |

ह्याचप्रमाणे आत्मनेपदी प्रत्यय तयार होतात. तसेंच पहिल्या भूतकाळाच्या प्रत्ययांच्या आरंभीं 'स्य' आगम लाविला म्हणजे संकेतार्थाचे प्रत्यय तयार होतात. परोक्ष भूताचे प्रत्ययः—

| | परस्मैपद | | | आत्मनेपद | | |
|---|---|---|---|---|---|---|
| प्र. पु. | अ | व | म | ए | वहे | महे |
| द्वि. पु. | थ | अथुस् | अ | से | आथे | ध्वे |
| तृ. पु. | अ | अतुस् | उस् | ए | आते | इरे |

कृदन्ताचे प्रत्यय— अत्, मान, आन, वत्, तृ इत्यादि.

तुमन्त — तुम्
ल्यबन्त — त्वा, य.
निष्ठा -- त.
चर्करीत— धातूचें अभ्यस्त रूप.

४७ संस्कृत भाषेसंबंधी जी एक नेहमी शंका घेतली जाते तिचा विचार येथे करणें जरूर आहे. संस्कृत भाषा ही कधी बोलली जात नव्हती, बोली म्हणून ती कधी लोकांच्या वापरांत नव्हती, असें कांही विद्वानांचें म्हणणें आहे. संस्कृत भाषेंत जी प्रत्ययांची समृद्धि दिसते तिच्यामुळे व तिच्या एकंदर नियमबद्धतेमुळे ती बोली म्हणून वापरली जाणें अशक्य दिसतें. पंडित मंडळींनी आपल्या मतप्रदर्शनास किंवा वादविवादास भारदस्तपणा आणण्यासाठी संस्कृत ही एक ग्रांथिक भाषा बनविली असावी असें विधान करून संस्कृत भाषेच्या सिद्धतेची ते उपपत्ति लावतात. 'संस्कृत' ह्या शब्दाचाच अर्थ ते 'चांगली नीटनेटकी केलेली, तिला चांगला आकार दिलेली' भाषा असा अर्थ करतात, व ह्यावरून तिच्यांत बोलीचा स्वाभाविकपणा नसून कृत्रिमता असल्याचें ते दाखवितात.

ही वरील विचारसरणी सदोष आहे हें उघड दिसतें. भाषा ही केव्हाहि व कोणाकडूनहि तयार केली जात नाही. पूर्वी कांही विद्वानांनी जागतिक व्यवहाराच्या सोयीसाठी म्हणून एक ईडो किंवा एस्परॅन्टो नांवाची भाषा तयार केली; परंतु ती कायम होऊं शकली नाही. किती जरी मोठे विद्वान् झाले तरी भाषा तयार करणें व तिचा व्यवहारांत उपयोग चालू

करणें हें त्यांच्या आवाक्याबाहेरचें आहे. दुसरी गोष्ट, कोणत्याहि भाषेंतील शब्दांच्या उच्चारांत, प्रत्ययांत व प्रयोगांत फरक झालेले आढळून आले म्हणजे समजावें की, ती भाषा बोलली जात असली पाहिजे. संस्कृतमध्ये अशा प्रकारचे फरक झालेले ज्या अर्थी दिसतात त्या अर्थी ती भाषा बोलली जात असलीच पाहिजे ह्याविषयी शंका नाही. भाषेंत फरक होणें हें भाषेच्या जिवंतपणाचें लक्षण आहे. यास्काचार्यांनी निरुक्तांत संस्कृतमधील स्वरप्रक्रियेचीं पुढील उदाहरणें दिलीं आहेत.

१ आदिलोप :– उदा–स्तः, सन्ति, ( अ लोप )
२ अन्त्यलोप :– उदा–गत्वा, गत ( म् लोप )
३ उपधालोप :– उदा– जग्मतुः, जग्मुः, ज्मा, ग्मा (अ लोप)
४ आदिविपर्यय :– उदा– ज्योतिस् (< द्युत् )
५ वर्णोपजनः– उदा– आस्थत् ( < स्था ), भरूजा ( <भ्रस्ज् )

ह्याशिवाय गुण, वृद्धि, संप्रसारण वगैरे महत्त्वाचे फरक आहेत. व्यंजनसंधि व स्वरसंधि हे तर भाषा बोलली गेली तरच शक्य होतात. ग्रांथिक भाषेंत संधि करण्याची जरुरीच भासणार नाही. वर्णत्याग, वर्णागम, वर्णविपर्यय वगैरे प्रकार होणें हें माणसांकडून एखादी भाषा बोलली गेली तरच होतील. ग्रांथिक साच्यांत बसलेल्या भाषेंत होणें शक्य नाही.

संस्कृतमधील क्रियापदांचीं कांहीं रूपें पाहिलीं म्हणजे ती बोली होती ह्या विधानास बळकटी येते. मराठींत ज्याप्रमाणे 'खा खा खातो; कर कर करतो; पी पी पितो; मर मर मरतो' इत्यादि प्रयोग आहेत त्याप्रमाणे संस्कृतमध्ये 'खाद खादेति खादति,' 'कुरु कुरु इति करोति' असे प्रयोग आहेत. तसेच पुढील प्रयोग बोलींतच शक्य आहेत. उदा०– "ओदनं भुंक्ष्व, सक्तून् पिब, धानाः खादेति एवं अयम् अभ्यवहरति = भात जेव, सातूंची पेज पी, लाह्या खा' अशा तऱ्हेने हा पोट भरतो. जीवनाशं नश्यति, हस्तग्राहं गृह्णाति, दण्डादण्डी, केशाकेशी इत्यादि.

संस्कृत भाषा बोली म्हणून वापरांत होती ह्याला बाह्य पुरावाहि पुष्कळ आहे. यास्काचार्यांनी 'च्छन्दसि' आणि 'भाषायाम्' असे तत्कालीन भाषेचे दोन भाग करून 'भाषायाम्' हा प्रयोग संस्कृतबद्दल वापरला

आहे. तसेंच त्यांनी संस्कृतचे प्रांतिकभेद प्राच्य, उदीच्य असे उल्लेखिले आहेत. संस्कृत भाषा बोली असल्याबद्दल पाणिनीचीं सूत्रेंहि साक्ष देतात : "नादिन्याक्रोशे पुत्रस्य", "एकश्रुति दूरात्संबुद्धौ", "वाक्यस्य टेः प्लुत उदात्तः" "प्रत्यभिवादेऽशूद्रे" इत्यादि सूत्रांत त्याला आधार मिळतो. "सिद्धे शब्दार्थसंबंधे" ह्या वार्तिकावरूनहि संस्कृत बोली ठरते. अशोकवनांत सीतेस हनुमानाने जो श्रीरामचंद्राचा निरोप सांगितला तो संस्कृत भाषेंत सांगितला असें रामायण सांगतें. नाटकें म्हणजे समाजाचे आदर्श; तेव्हा नाटकांतील पात्रें ज्याप्रमाणे प्राकृत भाषा वापरतात त्याप्रमाणे देव, ब्राह्मण, ऋषि, राजे वगैरे पात्रें संस्कृत भाषा वापरतात. तेव्हा ती बोली असली पाहिजे. लॅटिनपासून ज्याप्रमाणे इंग्रजी, फ्रेंच इत्यादि भाषा निघाल्या तद्वत् इकडे संस्कृतपासूनच निरनिराळया प्राकृत भाषा निघाल्या आहेत. अशीं अंतःप्रमाणें व बाह्य प्रमाणें ह्या दोन्हींवरून संस्कृत भाषा ही बोली ठरते.

## प्राकृत भाषा

४८ पूर्ववैदिक, वैदिक व संस्कृत ह्या भाषांचा विचार येथवर केला. ह्यानंतर प्राकृत भाषांचा विचार क्रमाने येतो. प्राकृत भाषांना सुद्धा फार जुनी परंपरा आहे व त्यांचें महत्त्वहि फार आहे. ज्या भाषा अतिप्राचीन कालांत आर्य लोकांच्या बोलभाषा होत्या, ज्यांच्यामध्ये भगवान् महावीर व बुद्धदेव ह्यांनी आपल्या पवित्र सिद्धांताचा उपदेश केला, ज्या भाषांच्या द्वारा जैन व बौद्ध ह्या धर्मांच्या उपदेशाची परंपरा पुढे पुष्कळ विद्वानांनी चालविली, ज्या भाषांमध्ये अशोक राजाने आपल्या मनास झालेली सात्त्विक उपरति आपल्या साम्राज्याच्या चारी दिशांस खोदविली, ज्या भाषांमध्ये प्रवरसेन, हाल, राजशेखर वगैरेंनी आपल्या प्रतिभासंपन्न काव्यनिर्मितीचा परिचय करून दिला, ज्यांच्यामध्ये प्रणीत झालेल्या सारस्वतावर पुढे प्रत्यक्ष संस्कृतमध्ये कांही ग्रंथांची उभारणी झाली, संस्कृत नाटकांमध्ये केवळ वर्णमाधुर्यामुळे ज्या भाषा स्त्रियांच्या तोंडीं घालण्यांत आल्या, व ज्या भाषांपासून भरतखंडांतील आधुनिक बोली प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीने उत्पन्न झाल्या त्या ह्या भाषा प्राकृत होत.

गीर्वाणवाणी ऐकण्याला योग्य, प्राकृत भाषा स्वभावाच्या मधुर, अपभ्रंश भाषा भव्य आणि पैशाची भाषा रसपूर्ण आहेत[१], असा गौरवपूर्ण उल्लेख संस्कृत व प्राकृत ह्या दोन्ही भाषांत सव्यसाचित्वाने काव्यविहार करणाऱ्या राजशेखर कवीने केलेला आहे. अशाच प्रकारचे उल्लेखहि हाल वगैरे कवींच्या ग्रंथांतूनहि आढळतात. "प्राकृत भाषेतील अमृतोपम काव्य जो पढण्याऐकण्याचें न जाणतां जर कामाची तत्त्वचिन्ता करूं म्हणेल तर त्याला शरमच वाटली पाहिजे." असें हाल म्हणतो (गा. स. १–२). "संस्कृत शब्दांचें लावण्य प्राकृत च्छायेनेच जास्त खुलून दिसतें. संस्कृतमध्ये शब्दांचे संस्कार जे असतात त्यांच्यावरहि प्राकृतचा प्रभाव दिसतो (वाक्पतिराज ग. व. ६५)". मोठ्या प्रमाणावर नवीन नवीन अर्थांची निष्पत्ति आणि त्याला अनुरूप सुन्दर रचना ह्या दोहोंनी युक्त अशी प्रबंधसंपत्ति सृष्टीच्या प्रारंभापासून प्राकृत भाषांमध्येच झाली असल्याची ग्वाही वाक्पतिराज देतो (ग. व.). संस्कृत भाषा कर्कश व प्राकृत भाषा सुकुमार आहे. पुरुष आणि ललना ह्या दोहोंमध्ये जितकें अंतर आहे तितकें संस्कृत व प्राकृत ह्या दोहोंमध्ये आहे (क. मं. १). सुन्दर, मधुर, शृङ्गाररसपूर्ण व युवतिजनांना प्रिय असें प्राकृत काव्य श्रुतिगोचर झालें तर संस्कृत पढावयास जातो कोण (जयवल्लभ वज्जा. पृ.६)? अशा रितीने प्राकृत भाषांचे श्रुतिमनोहारित्व, लालित्य, माधुर्य वगैरे गुणांविपर्यींचे उद्गार निरनिराळ्या कवींनी काढले आहेत.

४९ प्राकृत ह्या शब्दाच्या उपपत्तीबद्दल वाद आहे. प्राकृत व्याकरणकारांची ठाम समजूतच अशी होती की, सर्व प्राकृत भाषा संस्कृतपासून निघाल्या व त्याप्रमाणे त्यांनी ह्या 'प्राकृत' शब्दाची व्याख्या केली आहे. वैदिक भाषेला समकालीन प्रादेशिक आर्यभाषा होत्या व त्याचप्रमाणे महाभारतकालीं, पाणिनिकालीं, पातञ्जलकालीं नाना देशभाषा होत्या. ह्या सिद्धांतास इतिहासाचा व इतर प्रमाणांचा आधार आहे. प्राकृत व्याकरणकार प्रकृति (संस्कृत) भवं प्राकृतम्" अशी प्राकृत शब्दाची व्याख्या करितात. पण असा अर्थ कोठेच

---

१ "गिरः श्रव्या दिव्याः प्रकृतिमधुरा प्राकृतगिरः
सुभव्योऽपभ्रंशः सरसरचनं भूतवचनम्" (राजशेखर बा. रा. १–११).

नाही. शिवाय प्राकृतमध्ये तीन प्रकारचे शब्द आहेत. त्यांपैकी तत्सम व तद्भव ह्या दोन्ही शब्दांची मूळ प्रकृति संस्कृत ठरेल. पण देश्य शब्दांची वाट काय ? "प्राक् कृतं प्राकृतं" अशी एक उपपात्ति कोठे कोठे दिली जाते. ही वरीलपेक्षा बरी आहे. परंतु तिला आधार नाही. ह्या गैरलागू व्याख्या आहेत. तेव्हा भाषेच्या स्वाभाविक स्थितीच्या दृष्टीने 'प्राकृत' शब्दाची उपपत्ति निराळी असणें शक्य आहे. "प्रकृत्या स्वभावेन सिद्धम् प्राकृतम्" किंवा "प्रकृतीनां साधारणजनानामिदं प्राकृतम्" ही उपपत्ति भाषाशास्त्राच्या दृष्टीने योग्य ठरते[1]. प्रकृतीचा स्वभाव किंवा साधारण जन हा अर्थ कोश व इतर ग्रंथकार ह्यांना मान्य आहे[2].

५० प्राकृत भाषांचें पुराणत्व वैदिक भाषेवरून सिद्ध होण्यासारखें आहे. वैदिक भाषेतील कांही विशेष पाणिनीय संस्कृतमध्ये सापडत नाहीत; परंतु ते प्राकृतमध्ये सापडतात. त्यावरून प्राकृत भाषांचा प्रवाह स्वतंत्र वैदिक किंवा पूर्ववैदिक कालापासून असला पाहिजे असें मानावें लागतें. पुढे दिलेले प्राकृत भाषांत आढळून येणारे वैदिक भाषेतील विशेष उल्लेखनीय आहेत.

१ प्राकृत भाषांत व्यञ्जनान्त शब्द नाहीत. ह्याच धर्तीवर वैदिक भाषेमध्येहि पश्चात् बद्दल पश्चा (अथ. १०–४–११), युष्मान् बद्दल युष्मा (ऋ. १–१३–१), उच्चैस् बद्दल उच्चा (तै. सं. २–३–१४), नीचैस् बद्दल नीचा (तै. सं. १–२–१४), तावत् बद्दल ताव, स्यात् बद्दल सिया, कर्मन् बद्दल कम्म असे शब्द सापडतात.

२ प्राकृत व वैदिक ह्या दोन्ही भाषांत 'द्' चा 'ढ्', 'ध्' चा 'ह्', 'न्' चा 'ण्' होतो. उदा०—

दुर्दभ = दूढभ (वा. सं. ३–३६ व ऋ. ४–९८)
दुर्नाश = दुर्णाश (शु. य. प्रातिशाख्य ३–४३)
प्रतिसंधाय = प्रतिसंहाय (गोपथ ब्राह्मण २–४)

३ स्वरविश्लेषाचीं उदाहरणें :— तन्वः > तनुवः (तैत्ति. आर.

१ हरगोविन्ददास, पाइअसद्दमहण्णवो, प्रस्तावना.

२ अनेकार्थसंग्रह ८७६, ७. अभिधानचिन्तामणि (३, ३७८).

७-२२१ ), स्व > सुवः ( तैत्ति. आर. ७-११ ), स्वर्ग > सुवर्ग ( तै. सं. ४-२-३ ), रात्र्या > रात्रिया ( मैत्रा. ब्रा. १-१-१ ), सहस्य > सहस्रिय. त्याचप्रमाणे सः चित् ह्याचें सो चित् (ऋ. १-१९-१) होतें.

४ अकारान्त पु. शब्दाच्या प्रथमेचा ए. व. प्रत्यय ओ आहे. उदा०— संवत्सरो अजायत ( ऋ. १-१९०-२ ); सो चित् ( ऋ. १-१९१-१० ).

५ तृतीयेचें अनेकवचन प्राकृतमध्येहि प्रत्ययान्त होतें. त्यालाच अनुरूप वैदिक भाषेमध्ये भिः मध्ये होतें. उदा०— देवेभिः; गंभीरेभिः, ज्येष्ठेभिः.

६ प्राकृतप्रमाणे वैदिक भाषेमध्येहि चतुर्थीबद्दल षष्ठी विभक्तीचा प्रयोग करीत असत.

७ त्याचप्रमाणे द्विवचनाबद्दल बहुवचन कोठे कोठे वापरीत असत. इन्द्रावरुणौ बद्दल इन्द्रावरुणा; मित्रावरुणौ बद्दल मित्रावरुणा; यौ सुरथौ रथितमौ बद्दल या सुरथा रथितमा; दिविस्पृशावश्विनौ बद्दल दिविस्पृशा अश्विना; नरौ बद्दल नरा.

८ संधिनियम प्राकृतप्रमाणे वैदिक भाषेंत आढळतात. हि + एतम् = हेतम्; का + इति = काति ( श. ब्रा. ११-४, ४, ३, ); मे + आयु = मेयु ( गो. ब्रा. पूर्व २-६ ).

वैदिक भाषेने आपलें साहित्यरूप गोंडस दिसण्यासाठी व आपल्या अंगपुष्टीसाठी तत्कालीन जानपद भाषांमधून अनेक शब्दांचा स्वीकार केला. उदा०— ऋग्वेदामध्ये वक ( वक्र ), वहू ( वधू ), मेह ( मेघ ), पुराण ( पुरातन ), तितउ ( चालनी ), उच्छेक ( उत्सेक ). पुढील उत्तरकालीन संस्कृतमध्ये सुद्धा पुढील प्राकृत शब्द आढळतात. उदा०— तितउ ( चालनी ), आवुत्त ( भगिनीपति ), खुर ( क्षुर ), गोखुर ( गोक्षुर ), गुग्गुल ( गुल्गुलु ), छुरिका ( क्षुरिका ), अच्छ ( ऋक्ष ), कच्छ ( कक्ष ), पियाल ( प्रियाल ), गल्ल ( गण्ड ), चन्दिर ( चन्द्र ), इन्दिर ( इन्द्र ), शिथिल ( श्लथ ), मरन्द ( मकरन्द ), किसल ( किसलय ), हाला ( सुराविशेष ), हेवाक ( व्यसन ), दाढा ( दंष्ट्रा ), खिडक्किका ( लघुद्वार ), जारुज ( जरायुज ), पुराण ( पुरातन ).

५१ प्राकृत भाषा ह्या प्रकृतीच्या भाषा म्हणजे सामान्य लोकांच्या बोल-भाषा असल्यामुळे ज्या निरनिराळ्या प्रांतांत जी प्राकृत बोलली जात होती त्या भाषेस त्या प्रांताचें नांव मिळालें; व म्हणून जितके प्रांत तितक्या प्राकृत भाषा असें ठरलें. प्राकृत भाषांच्या संख्येंत जी अनिश्चितता आहे ती ह्यामुळेच; व म्हणूनच "नानाभाषाश्च भारत (शल्य ४९-१०३)" असा उल्लेख महाभारतांत येतो. लौकिक बोलींच्या चल स्वरूपामुळे भाषांची संख्या स्थिर राहणें शक्य नव्हतें. त्यामुळे कोणी चार, तर कोणी पांच तर कोणी सहा असे होतां होतां कोणी एकवीस प्राकृत भाषांचे प्रकार सांगतो. वररुचीने माहाराष्ट्री, शौरसेनी, मागधी व पैशाची असे चार प्रकार आपल्या प्राकृतप्रकाशांत सांगितले आहेत. मृच्छकटिकाचा टीकाकार माहाराष्ट्री, शौरसेनी, मागधी, अवन्तिका व प्राच्या ह्या पांच प्राकृतांचा उल्लेख करतो. भरताच्या नाट्यशास्त्रांत[1] व शेषकृष्णाच्या प्राकृतचंद्रिकेंत[2] सात प्राकृतांचा उल्लेख आहे. माहाराष्ट्री, शौरसेनी, मागधी, व पैशाची हे मुख्य चार व ह्यांशिवाय अर्धमागधी व चूलिकापैशाची हे दोन पोटभेद मिळून सहा प्राकृत होतात. प्राकृत व्याकरणकारांनी माहाराष्ट्रीचेंच व्याकरण सांगून बाकीच्या प्राकृतांच्या विशेष तेवढ्या खुणा सांगितल्या आहेत. ह्या सहांशिवाय इतर प्राकृतांचा उल्लेख व्याकरणांत येत नाही. सर्व प्राकृतांत मुख्य प्राकृत माहाराष्ट्री होय. हिचा उपयोग काव्यांत करीत असत. ही सुतरां साहित्यिक स्वरूपाची भाषा होती. हिच्यापासून विभ्रष्ट झालेले अशिष्ट भेद पुष्कळ होते. शौरसेनी वगैरे इतर प्राकृत माहाराष्ट्रीपासून निघाल्या असेंहि एक मत आहे[3]. माहाराष्ट्री प्राकृत ही महाराष्ट्रांत बोलली जात होती कीं नाही ह्याजबद्दल शंका आहे. बाकीच्या प्राकृत त्या त्या प्रांतांत बोलल्या जात

---

१ मागध्यवन्तिजा प्राच्या शूरसेन्यर्धमागधी । बाल्हिका दाक्षिणात्या च सप्त भाषाः प्रकीर्तिताः ॥ (नाट्यशास्त्र अ. १७, ४८)

२ माहाराष्ट्री तथावन्ती शौरसेन्यर्धमागधी । बाल्हिका मागधी चैव षडैता दाक्षिणात्यजाः (प्रा. चंद्रिका)

३ सर्वासु भाषास्विह हेतुभूतां भाषां महाराष्ट्रभुवां पुरस्तात् ।
निरूपयिष्यामि यथोपदेशः श्रीरामशर्माहमिमां प्रयत्नात् ॥
(रामतर्कवागीश, प्रा. ल., स्तबक २)

होत्या. निरनिराळ्या प्राकृत भाषा बोलणारे समाजांतील घटक कोण होते ह्याविषयी नाट्यशास्त्रांत कांही नियम आढळतात. पद्याची भाषा माहाराष्ट्री; राजस्त्रिया व दूती ह्यांची शौरसेनी; परिचारकांची मागधी; कोळसेविक्यांची पैशाची; सैनिक, राजपुत्र, व्यापारी ह्यांची अर्धमागधी; विदूषकासारख्या अधम पात्रांची प्राच्या; खुषमस्कऱ्यांची आवन्तिकी; शकारांची शकारी; विद्याधरकिन्नरांची बाल्हिकी; गोपालांची आभीरी; मोळिविक्यांची शाबरी; द्यूतकारांची दाक्षिणात्या अशा भाषा बोलल्या जात असत. आद्य प्राकृत जी "पाली" तिचा व उत्तरकालीन अपभ्रंश किंवा अवहट्ट भाषा ह्यांचा नाटकांत उपयोग केलेला दिसत नाही. देव, राजा, ब्राह्मण, भिक्षु वगैरे उत्तम पात्रें अर्थात् संस्कृत भाषेचा उपयोग करीत.

५२ प्राकृत भाषांचे मुख्य प्रकार तीन किंवा चार पडतात. अति प्राचीन म्हणजे वेदकालीन प्राकृत ही त्यांची प्राथमिक अवस्था होय. हा पहिला प्रकार. दुसरा प्रकार मध्ययुगीन प्राकृतांचा. ह्यांत पाली, माहाराष्ट्री, शौरसेनी वगैरे प्राकृत येतात. तिसऱ्या प्रकारांत माहाराष्ट्री, शौरसेनी इत्यादींचे अपभ्रंश किंवा अपभ्रंश म्हणून स्वतंत्र असलेली भाषा ह्या येतात. चौथ्या प्रकारांत सध्या हिंदुस्थानांत रूढ असलेल्या बोली येतात.

मध्ययुगीन प्राकृतांपैकी पहिली प्राकृत म्हणजे पाली भाषा होय. स्थल, काल व विशेषतः उच्चार ह्यांच्या क्रमाने जरी पाहिलें तरी वैदिक भाषारूपी तेजोगोलापासून पाली हीच भाषा पहिलें स्फुलिंग म्हणून बाहेर पडली. गौतमबुद्धाने आपलें तत्त्वसार नाग, वज्जी, लिच्छवी वगैरे लोकांत पाली भाषेच्या द्वारें सांगितलें. निर्वाणविचार किंवा "सर्वं दुःखं दुःखं, सर्वं क्षणिकं क्षणिकं" इत्यादि तत्त्वांची विचिकित्सा ह्या भाषेंतच चाले. बुद्धदेवाची भाषा हीच असल्यामुळे हिचें मूळ बौद्धलोकांच्या मतें वेदाच्याहि मागे अनादि होऊन बसलें.

पाली ह्या शब्दाच्या व्युत्पत्तीबद्दल ठाम मत नाही. कोणी पाली शब्द प्रालि-पोथीच्या पानांची रांग-या शब्दापासून व्युत्पादितात तर कोणी प्रकट >पाअड >पाअल >पाल या मार्गानें तो शब्द आला असें म्हणतात. तिसरे कोणी पाल् हा धातु त्याच्या मुळाशीं मानतात. पाली भाषेच्या माहेरासंबंधीहि अनिश्चितता आहे. अशोकसम्राटाने आपल्या महेंद्र नांवाच्या

मुलाला उपदेशाचा प्रसार करण्यासाठी सिंहलद्वीपास पाठविलें आणि महेंद्र ज्याअर्थी माळव्याच्या राजधानींत– उज्जयिनींत –जन्मला त्याअर्थी पाली भाषा माळवा प्रांतांत बोलली जात असावी. उत्तरेकडील खरोष्ट्री लिपींतील शिलालेखांच्या भाषेंत आणि पाली भाषेंत कांही साम्य नसल्यामुळे पाली भाषा उज्जयिनीच्या आसपासच्या प्रांताची असावी. दुसरें एक मत असें आहे की, पाली ही कलिंग प्रांताची भाषा असावी व तेथून सिंहलद्वीपास धर्मप्रचारकांनी ती नेली असावी. खण्डगिरी येथील शिलालेखांतील भाषा आणि पाली यांची जर तुलना केली तर याच मताला बळकटी येते (फ्रँक). पाली भाषेची उभारणी मागधी भाषेवर झाली असावी असें तिसरेंहि एक मत आहे.

S.K. Chatterjee

पालीशिवाय इतर ज्या मध्ययुगीन प्राकृत भाषा आहेत त्यांचे प्राच्य, प्रतीच्य, उदीच्य, दाक्षिणात्य व मध्यदेशीय असे दिशावार भेद आहेत. त्यांपैकी प्राच्य भाषा पूर्वेकडील पंचाल, कोशल, काशी, विदेह ( उत्तर बहार ) व मगध ( दक्षिण बहार ) इतक्या देशांत बोलली जात असल्यामुळे तिचा विस्तार मोठा होता. ह्या मोठ्या विस्तारामुळे तिच्यांत पुन्हा पश्चिम प्राच्या व पूर्व प्राच्या असे भेद झाले. पश्चिम प्राच्या म्हणजे अर्धमागधी व पूर्व प्राच्या म्हणजे मागधी. प्रतीच्य भाषेंत अशोकाच्या शिलालेखांत वापरलेल्या भाषा येतात. उदीच्य प्रकारांत उत्तरेकडील खोतानी, पैशाची व अपभ्रंशाचे भेद इतके येतात. दाक्षिणात्य भाषेंत माहाराष्ट्री व मध्यदेशीयांत शौरसेनी अशी त्यांची विभागणी आहे. मार्कण्डेयाने आपल्या प्राकृतसर्वस्वांत तत्सम, तद्भव व देश्य असे प्राकृतांचे तीन प्रकार कल्पून तद्भवाचे भाषा, विभाषा, अपभ्रंश व पैशाच असे चार पोटभेद केले आहेत. वर सांगितलेल्या प्राकृत भाषा त्याने विभाषांचे प्रकार म्हणून दिले आहेत.

५३ प्राकृत भाषांच्या नांवांवरून त्या कोणत्या प्रांतांत व कोणत्या लोकांत बोलल्या जात होत्या याची कल्पना येते. मथुरेच्या आसपासच्या प्रांतात व पूर्व पंजाबांत म्हणजे पुराणांतील शूरसेन राजाच्या अमलाखाली जेवढा प्रांत होता तेवढ्या प्रांतांत जी भाषा बोलली जात होती ती शौरसेनी होय. राजगृह आणि पाटलीपुत्र या राजधानींच्या आसपासचा सर्व मगध म्हणजे

सध्याचा बहार प्रांत हा मागधीने व्यापला होता. व सध्या त्या प्रांतांत चालू असणाऱ्या भाषांकडून वरील विधानाला बळकटी येते. बाकीच्या माहाराष्ट्री, पैशाची व अर्धमागधी ह्यांच्या प्रांताविषयी निश्चित मत नाही. माहाराष्ट्री ही तिच्या नांवावरून महाराष्ट्राची भाषा असावी असें वाटतें. विन्ध्य पर्वताच्या दक्षिणेस नर्मदेच्यापर्यंतच्या प्रदेशास महाराष्ट्र देश म्हणत असत. तेव्हा ह्याच देशांत माहाराष्ट्री भाषा चालत असावी असें म्हटल्यास सध्या त्या देशांत बोलल्या जाणाऱ्या भाषांकडून त्याला पुरावा मिळत नाही. माहाराष्ट्रीपासून मराठी भाषा उत्पन्न झाली असें ह्या दोन्ही नांवांवरून वाटतें. "मराठीच्या जन्मदात्री भाषेचें ठिकाण अशोकसम्राटाच्या कारकीर्दीच्या वेळीं बरेचसें उत्तरेकडे होतें. सध्याच्या महाराष्ट्राच्या उत्तरेकडील तो प्रांत असावा. आणि जसजसे त्या प्रांतांत गुजराती भाषा बोलणाऱ्या काठी किंवा गुर्जर लोकांच्या झुंडीच्या झुंडी येऊं लागल्या तसतसे माहाराष्ट्री भाषा बोलणारे लोक खालील प्रांतांत रेटले गेले" असें प्रो. टर्नर यांचें मत आहे. परंतु दोन्ही भाषांची एकंदर घटना पाहिली तर तें विधान टिकत नाही. सध्या ज्या देशाला महाराष्ट्र म्हणतात त्या प्रांताची पूर्वींची भाषा माहाराष्ट्री नसावी. तेव्हा देशावरून किंवा लोकावरून भाषेस जें नांव मिळतें तें माहाराष्ट्रीच्या बाबतींत खरें नाही. महाराष्ट्र म्हणजे पुष्कळ लहान लहान राष्ट्रें-गोपराष्ट्र, मल्लराष्ट्र, विदर्भ, कोंकण वगैरे-मिळून झालेला देश होय असें आम्हीं महाराष्ट्राची वसाहत ह्या प्रकरणांत सांगितलें आहे. माहाराष्ट्री म्हणजे सर्व राष्ट्राची-मोठ्या राष्ट्राची भाषा असा अर्थ आहे. इतर प्राकृत ह्या बोली असतांना जी ग्रांथिक किंवा शिष्ट, मध्यवर्ती भाषा होती तिला माहाराष्ट्री म्हणत असावेत व ह्याच दृष्टीने प्राकृतव्याकरणकार 'शेषं माहाराष्ट्रीवत्' असा हवाला इतर प्राकृत भाषांच्या नियमांत देतात.

पैशाची प्राकृत कोणत्या प्रदेशांत बोलली जात असे यासंबंधी निश्चित मत झालें नाही. 'पैशाची' म्हणजे भूतपिशाचांची भाषा अशी समजूत प्राकृत व्याकरणकार आणि आलंकारिक यांची होती. महाभारतांत उत्तर प्रांतांकडील ज्या लोकांचा निर्देश केला आहे त्यांमध्ये पिशाच लोकांचा उल्लेख आहे. त्यावरून वायव्येकडील डोंगराळ प्रांतांत राहणारे हे लोक असावेत असें वाटतें. "काश्मीराः उरसाः पैशाचाः काम्बोजाः

दरदाः शकाः ” इतक्यांचा निर्देश महाभारतांत केला आहे.[१] हिंदुकुश पर्वताच्या दक्षिणेस डोंगराळ प्रदेशांत व वायव्येकडील डोंगराळ प्रदेशांत ज्या रानटी जाती राहतात त्याच पैशाची भाषा बोलणाऱ्या लोकांचे वंशज असाव्यात[२]. पैशाची भाषेचा ज्याप्रमाणे ‘ चूलिका पैशाची ’ म्हणून एक प्रकार आहे त्याप्रमाणे केकय, शूरसेन आणि पञ्चाल हेहि प्रकार आहेत असें मार्कण्डेय आपल्या प्राकृतसर्वस्वांत म्हणतो. यावरून पैशाची भाषेने पूर्वी सध्या पंजाबांत मोडला जाणारा बराच प्रांत व्यापिला असला पाहिजे. वररुचि व हेमचंद्र वगैरे प्राकृत व्याकरणकारांच्या मतें पैशाची आणि शौरसेनी ह्यांचा फार निकट संबंध आहे. पैशाचीची प्रकृति शौरसेनी आहे असें वररुचि म्हणतो. पैशाचीचे थोडे नियम देऊन नंतर “ शेषं शौरसेनीवत् ( ८-४-३२३ )” असें हेमचंद्र म्हणतो. ह्याच्या उलट पैशाची प्राकृत द्राविडी रानटी लोकांची भाषा असें डॉ. होर्न्ले म्हणतो[३]. तसेंच मेय्ये ह्या फ्रेंच पंडिताने पैशाची प्राकृतला उत्तरेकडील गांधारपंजाबमधील प्राकृतांपासून अलग काढून दरदांची भाषा मानली आहे. आणि अर्वाचीन काश्मीरी, चित्राळी, काफीरी ह्या भाषांची जननी म्हणून समजली आहे.

अर्धमागधी भाषेचा उल्लेख वर आलाच आहे. इतर भाषांप्रमाणे ह्या भाषेला नांव देशावरून पडलें नाही. ही कोशल प्रांताची भाषा असल्यामुळे बुद्धदेव, महावीर ह्या धर्मसंस्थापकांची ती भाषा ठरते. पुढे जैन तीर्थंकरांनी व इतर उपदेशकांनी आपल्या धर्माची सुत्तें सामान्य जनांस सांगण्याकरिता ह्याच भाषेस उपदेशवाहन म्हणून वापरलें व असें करतांना ह्या भाषेंत त्यांनी निरनिराळ्या प्रांतांतील लोकांना सुलभ रीतीने समजण्याकरता इतर भाषांतील बरेच प्रांतिक भेद घुसडले, म्हणूनच ह्या भाषेला प्रांतविशिष्ट असें नांव न येतां मोघम असें अर्धमागधी नांव मिळालें. शूरसेनाच्या प्रदेशाजवळच्या कोशल प्रांतांत ती बोलली जात असल्यामुळे शौरसेनीच्या बऱ्याच खुणा तिच्यांत उतरल्या

१ महाभारत ७-४९९.

Grierson, Ind. Ant., XLIII 144.

Hoernle, Gaudian Grammar, P.XIX.

असल्यावरून "शौरसेन्या अदूरत्वादियमेवार्धमागधी" असें तिच्याबद्दल मार्कण्डेय आपल्या प्राकृतसर्वस्वांत म्हणतो. परंतु मार्कण्डेयाचें हें विधान वस्तुस्थितीशीं कितपत जुळतें हा प्रश्नच आहे. सूक्ष्म दृष्टीने पाहिलें तर अर्धमागधींत पुष्कळ ठिकाणीं मागधी व माहाराष्ट्री ह्या दोन भाषांचें मिश्रण झालेलें आढळतें. अर्धमागधी हें नांव जितकें सार्थ आहे तितकेंच अर्धमाहाराष्ट्री हें नांव सार्थ होईल. "माहाराष्ट्रीमिश्रार्धमागधी" असें अर्धमागधीसंबंधाने म्हणतातच.

५४ प्राकृत भाषांच्या उत्पत्तीचा जसा वसाहतीच्या दृष्टीने क्रम ठरतो तसा उच्चाराच्या दृष्टीनेहि त्यांचा क्रम ठरण्यासारखा आहे. संस्कृतमधील 'वर्तते' आणि 'कृत' हे दोन शब्द घेऊन त्यांचीं सर्व प्राकृत भाषांत रूपें काय होतात हें पाहिलें म्हणजे त्यांचा क्रम आपोआप लागेल[१].

| | | |
|---|---|---|
| १ पाणिनीय भाषा | वर्तते | कृत |
| २ पाली | वट्टति | कत |
| ३ पैशाची | वट्टति | कत |
| ४ शौरसेनी | वट्टदि | कद |
| ५ मागधी | वट्टडि | कड |
| ६ माहाराष्ट्री | वट्टइ | कअ |

संस्कृत भाषेत 'वर्तते' असें रूप होतें. प्राकृतांत प्रायः परस्मैपद सार्वत्रिक आहे. 'र्त' चा 'ट्ट' सर्व प्राकृतांत सामान्य आहे. 'ते' ची 'ति' होणें ही पहिली स्थिति होय. 'ति' थोडी नरमावली म्हणजे 'दि' होते. ही त्याच्या पुढची स्थिति आहे. 'दि' ची 'डि' होणें ही त्याच्याहि पुढची स्थिति आहे, आणि 'इ' होणें ही अगदी शेवटची स्थिति आहे. 'ते' पासून 'इ' पर्यंतच्या मधील अवस्था "ते > ति > दि > डि > ढि > हि > इ" ह्या आहेत. ह्यावरून उच्चाराच्या दृष्टीने पाली, पैशाची, शौरसेनी, मागधी, माहाराष्ट्री असा प्राकृत भाषांच्या उत्पत्तीचा क्रम लागतो. आर्यांच्या वसाहतीच्या दृष्टीने सुद्धा हाच क्रम लागतो.

५५ भाषेच्या बाबतींत नक्की काळ सांगणें फार कठीण आहे. अमुक

---

१ राजवाडे, ज्ञानेश्वरीची प्रस्तावना. पृ. ३४.

एक भाषा मृत झाली केव्हा व दुसरी तिच्या जागीं आली केव्हा या प्रश्नांचीं उत्तरें शतकांतच द्यावीं लागतात. भाषेचें आयुर्मानहि मोठें असल्यामुळे तिला जन्मण्यास व मरण्यास शतकें लागलीं तर त्यांत आश्चर्य नाही. शिवाय एक भाषा मृत होऊन नाहीशी होण्याच्या मार्गास लागली असतांनाच उत्तर भाषा अपभ्रंश म्हणून सुरू असते. त्यामुळे एका भाषेच्या काळांतच दुसऱ्या तज्जन्य भाषेचा काळ मिसळतो. भारतीय भाषांचा काळ ठरवावयाचें म्हणूं लागले तर तीन स्थूल विभाग पडतात. पहिला खि. पू. ५००० पासून खि. पू. १००० पर्यंतचा काळ यांत वैदिक खि. पू. ३००० च्या पूर्वी, ब्राह्मण खि. पू. ३०००, सौत्र, औपनिषदिक इतके प्रकार येतात. दुसरा खि. पूर्व १००० पासून खि. पू. २०० पर्यंत. हा पाणिनीय संस्कृतचा काळ, याची मर्यादा रामायण, महाभारतादि काव्याच्या संस्करणापर्यंत जाते. खि. पूर्व ६०० पासून प्राकृत भाषांचा काळ जो सुरू होतो तो खिस्तोत्तर ६००-७०० पर्यंत टिकतो. ह्या हजार बाराशें वर्षांचे पुनः तीन पोटविभाग पडतात. भगवान् बुद्ध, महावीर यांच्या वेळीं प्राकृतांची भरभराट होती. खि. पू. ६०० ते खि. पू. २०० हा पहिला विभाग. ह्यांत अशोकाचे शिलालेख, पाली भाषा वगैरे येतात. दुसरा विभाग खि. पू. २०० ते खिस्तोत्तर २०० पर्यंतचा आहे. ह्यांत माहाराष्ट्री, शौरसेनी, मागधी, पैशाची वगैरे मान्यतेस पावल्या. हा कालखंड सर्व प्राकृत भाषांच्या उत्कर्षाचा आहे. बृहत्कथा (१०० खि. पू.) ह्याच काळांत लिहिली. वररुचीने आपला प्राकृतप्रकाश ह्याच काळांत लिहिला ( खि. पू. १०० ). अश्वघोषाने आपलीं नाटकें ह्याच काळांत लिहिलीं. ह्या काळानंतर पुढे दोनतीनशें वर्षे प्राकृत भाषा वापरांत होत्या हें नाटकांत वापरलेल्या प्राकृतांवरून सिद्ध होतें. खिस्तोत्तर ४०० पासून खिस्तोत्तर ७०० पर्यंतच्या मधील काळांत वर ज्या प्राकृत भाषा सांगितल्या त्यांचे अपभ्रंश व अपभ्रंश नांवाची स्वतंत्र भाषा ह्या सुरू झाल्या व खिस्तोत्तर ७०० शतकानंतर वर्तमानकालीन बोली उत्पन्न होण्याची भूमि तयार झाली. वर्तमानकालीन बोलींतील वाङ्मय जरी १२०० शतकाच्या सुमाराचें सापडतें तरी त्या वाङ्मयाच्या अगोदर ३००–४०० वर्षं तरी त्या भाषा उत्पन्न झाल्या असल्याच पाहिजेत. थोडक्यांत काळाचें कोष्टक पुढीलप्रमाणे होईल.

| | |
|---|---|
| पूर्ववैदिक भाषा | खिस्तपूर्व ५००० च्या पूर्वीचा काळ |
| वैदिक, ब्राह्मण, सौत्र इ. | ” ५००० ते खि. पू. १००० |
| पाणिनीय संस्कृत | ” १००० ते ” २०० |
| पाली, अशोक शिलालेख | ” ६०० ते ” २०० |
| माहाराष्ट्री, मागधी, शौरसेनी, पैशाची | ” २०० ते खिस्तोत्तर २०० |
| अपभ्रंश | खिस्तोत्तर ४०० ते ” ७०० (५०० ते १०००) |
| मराठी, गुजराती, हिंदी वगैरे वर्तमानकालीन बोलींचा उदय खिस्तोत्तर ७०० | — |

## वर्णप्रक्रिया

५६ पुढे पाली व प्राकृत ह्या भाषांच्या वर्ण व प्रत्ययप्रक्रिया देऊन नंतर प्रत्येक प्राकृतचे विशेष दिले आहेत. प्रथम पाली आणि प्राकृत ह्या दोहोंना साधारण असे स्वरांचे व व्यंजनांचे होणारे फरक देतों.

## ह्रस्व स्वर

१ संस्कृतमधील ह्रस्व स्वर पाली व प्राकृतमध्ये ह्रस्वच राहतात. उ.— वधू > वधू, वहू; अग्नि > अग्गि; अर्थ > अठ्ठ; प्रिय > पिय; वृक्ष > रुक्ख; मुखम् > मुखम्, मुहम्.

२ संस्कृतमधील संयुक्त व्यंजनापूर्वीचा दीर्घ स्वर पाली व प्राकृतमध्ये ह्रस्व होतो. उदा.— वान्त > वन्त; काष्ठ > कठ्ठ; देशान्तरे > देसन्तरे; कान्तार > कण्टार; मात्रम् > मत्तम्.

३ पाली आणि प्राकृतमध्ये ‘ए’ आणि ‘ओ’ ह्यांचे उच्चार ह्रस्व होतात. खरें पाहिलें असतां ‘ए’ ‘ओ’ हे स्वर संस्कृतमध्ये जात्याच दीर्घ आहेत. परंतु संयुक्त व्यंजनापूर्वीचा दीर्घ स्वर ह्रस्व करण्याच्या प्रवृत्तीचा परिणाम ह्यांवर झाला आहे. ‘ए’ आणि ‘ओ’ हे दोन स्वर संयुक्त स्वरांपूर्वीच फक्त ह्रस्व होतात असें नाही तर साध्या एकेरी व्यंजनापूर्वीहि ते ह्रस्व होतात आणि तेव्हा पाली आणि प्राकृतमध्ये त्यापुढील व्यंजन द्वित्त होतें व अशा रीतीने उच्चार सारखाच राहतो.

संस्कृत 'ऐ, औ' किंवा 'अय्, अव्' ह्यांच्या ऐवजी प्राकृतमध्ये 'ए' 'ओ' हे स्वर येतात. उ०— एक > ऍक; एवम् > ऍव्वम्, जेव्वम्; मैत्र > मेत्त; अवक्रम् > ओक्कम्.

कधी कधी 'ए' आणि 'ओ' ह्यांचे आणखी ह्रस्वीकरण होऊन इ, उ हे स्वर त्याबद्दल येतात. उ. प्रमोद > पामुज्ज.

४ अन्त्य दीर्घ स्वर प्राकृतमध्ये ह्रस्व होतात. उ.—देवानाम् > देवाणम्, गणनायाम् < गणनायम्.

५ स्वरभक्तीमुळे संयुक्त व्यंजनापूर्वीचा दीर्घ स्वर पालीमध्ये ह्रस्व होतो उ.- तीक्ष्ण > तिखिण, द्वारम् > दुआलम्, स्त्री > इत्थिअ, क्लान्त > किलन्तो.

६ संस्कृत 'ऋ' चा 'अ, इ, अथवा उ' होतो. हा फरक ऋग्वेद-कालींसुद्धा होत असे. पाली व माहाराष्ट्री ह्या भाषांत 'ऋ' चा 'अ' होतो व शौरसेनी व मागधी ह्या भाषांत 'ऋ' चा 'इ' अथवा 'उ' होतो. उ०— ऋ=अ, कृत > कत, मृत > मत, हृदय > हृअअ (मा.), हदक (अर्ध मा.) ऋ=इ, उ. कृत > क्रिद, (शौ.), मृत > मुद (शौ.), शृगाल > सियाल (मा.)

## दीर्घस्वर

७ अन्त्य दीर्घस्वर व संयुक्त व्यंजनापूर्वीचे दीर्घस्वर हे ऱ्हस्व होतात. बाकी सर्व दीर्घस्वर पाली व प्राकृतमध्ये दीर्घच राहतात. उदा०—काल > काल, माता > माता, क्षीर > खीरम्, मूल > मूळ, देश > देस, देव > देवो, घोटक > घोटक. ई आणि ऊ ह्याबद्दल विशेष विधिनिषेध नाहीत. त्यांच्या ऱ्हस्वदीर्घाबद्दल विशेष भेद नाही. त्यांचे 'इ, उ' हे ऱ्हस्व स्वर व 'ए, ओ' हे दीर्घस्वर आहेत. उदा०—नीड > नेडम्, कीदृश > केरिस, तुण्ड > तोण्ड, पुष्कर > पोक्खर.

८ य्, अय् अथवा ऐ ह्यांचा ऱ्हस्व उच्चार ए, व् आणि अव् अथवा औ ह्यांचा ऱ्हस्व उच्चार ओ असे होतात. उदा०—तैल > तेलम्, पौत्र > पोत्त, सौवर्ण > सोवण्ण.

९ विसर्गाचा लोप पालीच्या काळांतच झाला. शब्दाच्या शेवटीं विसर्ग असेल तर पाली व प्राकृतमध्ये त्याचा ओ किंवा उ होतो. शब्दाच्या मध्ये

जर विसर्ग असेल तर तो विसर्ग पुढच्या व्यंजनांत मिसळून गेल्यामुळे त्याला द्वित्त येतें. उदा०-दुःखम् > दुक्खम्, पुनः > पुणा, देवः > देवो.

## व्यंजनें

१० आद्य व्यंजनें तशींच राहतात. मध्य आणि अन्त्य व्यंजनांत पुष्कळ फरक होतात. मध्य व्यंजनांच्या बाबींत कठोर व्यंजनांचीं मृदु व्यंजनें होतात. मृदुव्यंजनांचा 'य' लघुप्रयत्नतर यकार-होतो व पुढे तें व्यंजन नाहींसेंहि होतें. अन्त्य व्यंजन तर बिचारें निराश्रित असतें. ह्या व्यंजनास 'पीडित वर्ण' असें म्हणत असत. ह्याला अभिनिधान होत असे. हें व्यंजन अर्धोच्चारित कांहीं काल राहून पुढे त्याचा लोप होत असे.

आद्यव्यंजनें:-संस्कृतमधील क्, ग्; च्, ज्; त्, द्; प्, ब् हीं प्राकृतांत जशींच्या तशींच राहतात. दुसरें आणि चवथें हीं व्यंजनें फारशीं संस्कृतमध्ये नाहीत. आद्यस्थानीं असतील तर प्राकृतमध्ये तशींच राहतात. संस्कृतमध्ये न् आणि म् शिवाय अनुनासिकें आद्यस्थानीं असत नाहीत. जैन ग्रंथाच्या भाषेंत मात्र 'न' चा 'ण' होतो. उदा०-नूपुर-णेऊर, नाशयीत-णासेइ. त्याचप्रमाणे दन्त्य वर्णांना प्राकृतमध्ये मूर्धन्यत्व प्राप्त होतें. उदा०-दशति-डसइ. आद्यस्थानचे य्, व्, र्, ल् हे प्राकृतमध्ये कायम राहतात. 'य्' आणि 'व्' ह्यांचा विशेष चमत्कार प्रातिशाख्यांत सांगितला आहे तोच पुढे देतों.

पादादौ च पदादौ च संयोगावग्रहेषु च ॥
ज शब्द इति विज्ञेयो योऽन्यः स य इति स्मृतः ॥

आद्य 'य्' चा 'ज्' होतो. 'व्' चा ब् होतो. उदा०-यावत्-जाव; यन्त्र-जन्तो.

ऊष्म व्यंजनें:—स्, श्, ष् ह्या तिन्हींबद्दल पाली आणि प्राकृतमध्ये 'स्' होतो. कांहीं पूर्व प्राकृतमध्ये श् होतो. उदा०— सकल > शअल, सौंदर्य > सुन्देर; शब्दापयति > सद्दावेदि; शीतल > सीदल.

## प्राकृत वर्णप्रक्रिया-स्वर

५७ संस्कृत 'आ' चा प्राकृतमध्ये विकल्पाने 'अ' होतो. उदा०—

प्रकारः > पायारो, पयरो; प्रचारः > पयारो, पयरो; प्रवाहः > पवाहो, प्रवहो.

२ संयुक्त व्यंजनाच्या पूर्वीचा 'इ' विकल्पाने 'ए' होतो. उदा०—डिण्डिम > डेण्डिमो, डिण्डिमो. पिष्टम् > पेट्ट, पिठ. सिन्दूरम् > सेंदूरं, सिंदूरं.

३ 'त्स,' 'च्छ' च्या पूर्वीचा 'उ' दीर्घ होतो. उदा०—उत्सरति > ऊसरइ, उत्सवः > ऊसवो, उच्छ्‌वासः > ऊसासो.

४ संयुक्त व्यंजनापूर्वीच्या 'उ' चा ओ होतो. उदा०—कुण्ठः > कोंठो, तुण्डम् > तोंड, पुस्तक > पोत्थओ; मुस्तक > मोत्था.

५ संस्कृत ऋ ह्याचीं अ, उ, रि अशीं रूपें होतात. उदा०—अ—कृतम > कयं, तृणम् > तणं, घृतम् > घयं. उ—पितृगृहं > पिउघरं, मातृगृहम् > माउघरं, मातृष्वसा > माउसिआ. रि—ऋक्षः > रिच्छो, ऋद्धि > रिद्धि.

६ संस्कृत ऌ चा इलि होतो. उदा०—कॢप्तः > किलित्तो; कॢन्नः किलिन्नो.

७ संस्कृत ऐ व औ ह्यांना अनुक्रमे ए व ओ आदेश होतात. उदा०—कैलासः > केलासो, वैद्यः > वेज्जो, यौवनम् > जोवणं, कौमुदी > कोमुइ.

## व्यंजनें

१ अन्त्य व्यंजनाचा लोप होतो. उदा०—अन्तर् + उपरि = अन्त उपरी, अंतोवरि; जन्मन् > जम्म; तमस् > तमो; तावत् > ताव; यावत् > जाव.

२ पदामध्ये व स्वरानंतर आलेले क्, ग्, च्, ज्, त्, द्, प्, ब्, य्, व् ह्यांचा प्राकृतमध्ये लोप होतो. उदा०—लोकः > लोओ; नमः > नओ; शची > सई; गजः > गओ; यतिः > जई; राजिः > राई; गदा > गया; रिपु > रिऊ; इ.

३ पदामध्ये असलेले व स्वरानन्तर आलेले ख्, घ्, थ्, ध्, भ् ह्या व्यंजनांच्याबद्दल प्राकृतमध्ये 'ह्' येतो.

ख— मुखम् > मुहं; लिखति > लिहइ;
घ — जघनम् > जघणं; मेघः > मेहो;
थ — मिथुनम् > मिहुणं; कथा > कहा;
ध — बधिरः > बहिरो; बाधा > बाहा;
भ — शोभते > सोहइ; सभा > सहा;

४ त्याचप्रमाणे 'ट्' बद्दल 'ड्;' 'ठ्' बद्दल 'ढ्;' 'ड्' बद्दल 'ल्,' 'न्' बद्दल 'ण्;' 'प्' बद्दल 'व्;' 'व्' बद्दल 'व्;' 'य्' बद्दल 'ज्,' श्, ष्' बद्दल 'स्' असे आदेश होतात.

ट — घटः > घडो; भटः > भडो;
ठ — कुठारः > कुढारः; मठः > मढो;
ड — क्रीडति > कीलइ; तडागम् > तलायं;
न — नयनम् > नयणं; वदनम् > वयणं ;
प — उपमा > उवमा; उपसर्ग > उवसग्गो;
व — अलाबूः > अलावू; शबलम् > सवलं;
य (आद्य)यमः > जमो; यशः > जसो; याति > जाई;
श — कुशः > कुसो; दश > दस; विंशति > विंसइ;
ष — कषायः > कसायो; षाढः > संडो;
विशेषः > विसेसो; शेषः > सेसो;

५ संयुक्त व्यंजनांतील पहिल्या क्, ग्, ट्, ड्, त्, द्, प्, श्, ष्, स् व ह् ह्यामध्ये प्राकृत व्यंजनांचा लोप होतो व दुसरें व्यंजन द्वित्त होतें.

उदा०— भुक्तम् > भुत्तं, दुग्धं > दुद्धं, षट्पदं > छप्पअं, खड्गः > खग्गो, उत्पलं > उप्पलं. मद्गुः > मग्गू. सुप्तः > सुत्तो, श्मश्रु > मस्सु, गोष्ठी > गोट्ठी.

म्, न्, य् हीं व्यंजनें परवर्ण असलीं तरी त्यांचा लोप होतो व पहिला वर्ण द्वित्त होतो. युग्मम् > युग्गं, नग्नः > नग्गो, कुड्यम् > कुड्डम्.

६ संयुक्त व्यंजनांतील ल्, व्, ब्, र् हे वर्ण पहिले किंवा दुसरे असले तरी त्यांचा लोप होतो व राहिलेलें व्यंजन द्वित्त होतें.

ल— उल्का > उक्का, वल्कलम् > वक्कलं,

व -- पक्वम् > पिक्क,
ब -- अब्द: > अद्दो, शब्द > सद्दो,
र -- अर्क > अक्को, दीर्घ: > दिग्घो,

# पालीचे प्रत्यय

## नामें

५८ धम्म, कञ्ञा हे शब्द पाली भाषेंत खालीलप्रमाणे चालतात.

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र. | धम्मो | धम्मा, धम्मासे |
| सं. | धम्म–म्मा | धम्मा |
| द्वि. | धम्मम् | धम्मे |
| तृ. | धम्मेन | धम्मेभि–हि |
| च. } | धम्मस्स | धम्मानम् |
| ष. } | धम्माय | |
| पं. | धम्मा, धम्मस्मा धम्मम्हा | धम्मेभि–हि |
| स. | धम्मे, धम्मास्मिन्, धम्महि | धम्मेसु |

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र. | कञ्ञा | कञ्ञा, कञ्ञायो |
| सं. | कञ्ञे | ,, |
| द्वि. | कञ्ञम् | ,, |
| तृ. | कञ्ञाय | कञ्ञाभि–हि |
| च. व ष. | कञ्ञाय | कञ्ञानम् |
| पं. | कञ्ञाय | कञ्ञाभि–हि |
| स. | { कञ्ञाय<br>कञ्ञायम् | कञ्ञासु |

## क्रियापदें

| | ए. व. | अ. व. | ए. व. | अ. व. |
|---|---|---|---|---|
| प्र. पु. | होमि | होम | ब्रुवे | ब्रूमहे |
| द्वि. पु. | होसि | होथ | ब्रूसे | ब्रूव्हे |
| [illegible]. पु. | होति | होन्ति | ब्रूते | ब्रुवन्ते |

भूतकाळ—अवचम्, अदूसम्, अहुम, अहुम्ह (प्र. अ.) अहुवत्थ [द्वि. अ.]
भविष्य—विचेस्सति, दक्खति.
विध्यर्थ—एय्यामि, एय्यासि, एय्य इत्यादि.
ल्यबन्त—गन्त्वा, दिस्वा, चेत्वान, कातून, सोतूनम्.
निष्ठा—पत्त, इठ्ठ, बन्ध, पिलन्ध.

## प्राकृतमधील नामांचे प्रत्यय

५९ प्राकृतमध्ये ('अ, इ, उ'कारान्त) नामांना खालील प्रत्यय लागतात.

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र. | ओ, ए. ० | आ, ओ (इ, उ-कारान्त) |
| द्वि. | म् | ए. णो ,, |
| तृ. | (ए) ण, णं, णा (इ, उ कारान्त नामांना) | हि |
| च. | — | — |
| पं. | आ, दो, दु, हि | हिंतो, सुंतो |
| ष. | स्स, णो (इ, उ-कारान्त नामांना) | (आ), ण |
| स. | इ, म्मि, हि, सि | सुं, हि |

पुत्त शब्द पुढीलप्रमाणे चालतो.

| | | |
|---|---|---|
| प्र. | पुत्तो, पुत्ते (अर्ध मा.) पुत्तु | पुत्ता, पुत्ताओ (अर्ध मा.) |
| द्वि. | पुत्तम् | पुत्ते, पुत्ता ( ,, ) |
| तृ. | पुत्तेण, पुत्तेणं (शौ. मा.) | पुत्तेहिं, पुत्तेहि (मा. अर्ध मा.) |
| पं. | पुत्ता, पुत्तादो (शौ.) | पुत्तासुंतो, पुत्ताहुंतो, पुत्तेहिं. |
| ष. | पुत्तस्स | पुत्ताणं |
| स. | पुत्ते, पुत्तम्मि (मा) | पुत्तेसु |

इतर आ, इ, उ-कारान्त नामें थोड्या फार फरकाने अशींच चालतात. 'ऋ'कारान्त व व्यंजनान्त नामें बहुतेक 'अ'कारान्त होऊन त्याप्रमाणे चालतात. विशेषणें नामाप्रमाणे चालतात. संस्कृतप्रमाणे त्यांचें 'तरतमत्व' 'अर, यम' हे प्रत्यय लावून दाखवितात.

सर्वनामें—सर्वनामांच्या बाबतींत प्राकृत भाषांत निरनिराळीं पुष्कळ रूप आढळतात. तीं बहुतेक प्रांतिक भाषांत वापरांत असावींत.

### प्रथम पुरुषाचीं रूपें

एक व.— १ अहम् हगे; २ मम्, ममम्, मे; ३ मए मइ; ५ ममाओ ममाहिंतो; ६ मम, मह, मज्झ, मज्झम् महु; ७ मइ, ममम्मि.

अनेक व.—१ अह्मे, हगे; २ अम्ह, णो, णे; ३ अम्हेहिं; ५ अह्मतो, अम्हेहिंतो; ६ अम्हाणं, अम्हम्, अम्ह, म्ह, णो, णे; ७ अह्मेसु, अह्मासु.

द्वितीय पुरुष व तृतीय पुरुष यांचीं रूपें अशाच स्वरूपाचीं आहेत. त्यांत 'अ' च्या ऐवजीं अनुक्रमें 'तु' व 'तें' हीं अंगें घेऊन रूपें तयार होतात.

प्राकृतमधील संख्याविशेषणें पुढीलप्रमाणे आहेत.

एक, दो, दुबे, दोण्णि, तओ, तिण्णि, चत्तारो, चदस्सो, चत्तारि, पञ्च, छ, सत्त, एक्कारस, तेरस, तेरह, चोद्दह, चउद्दस, एकगूणवीस, वीसई, तीसई, तीसम्, असीइम्, सहस्स इ. इ. हीं रूपें नामाप्रमाणे चालतात.

## प्राकृतमधील क्रियापदांचे प्रत्यय

क्रियापदांच्या बाबतींत संस्कृतमधील पुष्कळ गोष्टींचा प्राकृतमध्ये लोप झाला आहे. आत्मनेपद, द्विवचन. संकेतार्थ, एक भूतकाळ ह्यांचा लोप झाला आहे. ह्यांऐवजी कृदन्तांचा उपयोग करीत असत.

### वर्तमानकाळाचे प्रत्यय

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र. पु. | मि, म्हि | मो, म्ह, म्हो |
| द्वि. पु. | सि, हे, से | त्था, थ, ध, ह |
| तृ. पु. | इ, ए, ति | न्ति, न्ते, इरे |

### आज्ञार्थ

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | मु | मो |
| द्वि. पु. | ०, सु, इज्जसु, इज्जहि, इज्जे, हि | ह |
| तृ. पु. | उ | न्तु |

भविष्यकाळ

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | स्सं, स्सामि, हामि, हिमि. | स्सामो, हामो, हिमो, स्साम, हाम, हिम, स्सामु, हामु, हिमु, हिस्सा, हित्था |
| द्वि. पु. | हिसि, हिसे | हित्था, हिह |
| तृ. पु. | हिइ, हिए | हिन्ति, हिन्ते, हिइरे |

प्रयोजका ( णिच् )चे प्रत्यय—अ, ए, आ, आवे.

भू. भू. निष्ठा— इअ. तुमन्त—उम्, ऊण

ल्यबन्त—ऊण, त्ता. कर्मणि—ज्ज.

६० पाली व प्राकृत ह्या भाषांचे उच्चार व व्याकरण ह्यांतील मुख्य बाबी सांगितल्या. ह्या दोहोंच्या व्याकरणांतील साम्यें जशीं वर सांगितलीं तसे त्यांच्यांतील ठळक भेद सांगणेंहि अवश्य आहे. ह्यांपैकी मराठीमध्ये कोण-कोणते विशेष उतरले हे समजण्यास ह्यांचा उपयोग होईल. पालीमध्ये वावरणारा 'ळ' कार प्राकृतमध्ये आढळत नाही. पैशाचीमध्ये 'ल्' बद्दल 'ळ्' येतो. पालीमध्ये 'न्' आणि 'ण्' हे दोन्ही उच्चार आहेत, परंतु प्राकृतमध्ये 'ण्' हा एकच उच्चार आहे. पैशाचीमध्ये मात्र 'न्' आढळतो. असंयुक्त व शब्दाच्या आरंभींचे क्, ग्, च्, ज्, त्, द्, प्, य्, व् हे नऊ वर्ण पालीमध्ये लोप पावत नाहीत, परंतु प्राकृतमध्ये लोप पावतात. तसेंच असंयुक्त व शब्दाच्यामधील ख्, घ्, थ्, ध्, भ् ह्या वर्णांबद्दल प्राकृतमध्ये 'ह' येतो. पालीमध्ये हा फरक क्वचित् होतो.

६१ प्राकृत भाषेचें जें व्याकरण वर दिलें आहे तें माहाराष्ट्रीचें आहे. तें इतर प्राकृत भाषांना कांहीं अपवाद सोडून लागू होतें. हे अपवाद कोणते हें समजण्यासाठी प्रत्येक प्राकृतच्या ठळक तेवढया खुणा पुढे दिल्या आहेत.

पैशाची भाषेंत संस्कृतप्रमाणे व्यंजनें जशींच्या तशींच राहतात; त्यांचा लोप होत नाही. व्यंजनांना आदेश होतात. (१)'द्' चा 'त्' होतो. उदा०—सदनम् > सतनं, प्रदेश > पतेस, मदन > मतन. (२) 'ण्' चा 'न्', 'ल्' चा 'ळ्', 'श्, ष्' चा 'स्', 'ज्ञ्, न्य्, ण्य्' ह्या तिहींबद्दल 'ञ्ञ्,

होतो. उदा०—गुणगण > गुनगन; कुल > कुळ, जल> जळ; शोभा > सोभा, विषम > विसम, पुण्य > पुञ्ञ, ज्ञानम्>ञ्ञानं. (३)'हृदय' मधील 'य' चा 'प' होतो. हृदयम्>हितपकं. (४) ल्यबन्ताचे प्रत्यय तून ढून,त्थून हे तीन आहेत. उदा०—गन्तून, रन्तून, नद्धून, तत्थून (स्थित्वा). (५)विध्यर्थाचा प्रत्यय 'एय्य' व कर्मणि प्रत्यय 'इय्य' असे आहेत. उदा०—हुवेय्य; मिय्यते, दिय्यते. (६) चूलिका पैशाचीमध्ये तिसऱ्या व चौथ्या वर्णां-बद्दल त्याच वर्गांतील अनुक्रमें पहिला व दुसरा वर्ण येतो. उदा०— नकर ( नगर ), मेख ( मेघ ) व 'र्' बद्दल ल् विकल्पाने येतो. उदा०— लह, रह (रथ).

शौरसेनी प्राकृतमध्ये ( १ ) 'त्' आणि 'थ्' हे वर्ण अनुक्रमें 'द्' आणि 'ध्' होतात. ( २ ) 'भू' धातूंतील 'भ्' चा 'ह्' होत नाही. ( ३ ) ल्यबन्ताचे प्रत्यय 'त्ता', 'इय,' 'दूण' हे आहेत. उदा०— भोत्ता, भविय, भोदूण (भूत्वा); पढित्ता, पढिय, पढिदूण [पठित्वा]. 'कृ' व 'गम' ह्या धातूंचीं ल्यबन्तरूपें अनुक्रमें कदुअ व गदुअ अशीं होतात. (४) भविष्यकाळाचा प्रत्यय स्सि आहे. उदा०—भविस्सिदि, पठिस्सिदि. ( ५ ) दाणीं, ता, य्येव, णं, हीमाणहे, हञ्जे, अम्महे, हीही हीं अव्ययें शौरसेनींत विशेष येतात.

मागधी भाषेंत [१] र्, स्, ज् ह्या वर्णांबद्दल अनुक्रमें ल्, श्, य् हे वर्ण येतात. य् बद्दल ज् होत नाही. उदा०—नले [नरे], कले [ करे ], पुलिशे [पुरुषे], [२] द्वित्त व्यंजनाचे फरक पुढीलप्रमाणें होतात. पस्ट [स्पष्ट], उवस्तिदे [ उपस्थिते ], अस्त [अर्थ], यश्के [ यक्षे ], 'तिष्ठ' ह्याचें रूप 'चिष्ठ' होतें. [ ३ ] प्रथमेच्या एकवचनाचें रूप 'ए' कारान्त होतें: एशे मेशे [एषः मेषः]. षष्ठीच्या एकवचनाचें रूप 'आह' किंवा 'स्स' कारान्त व अनेकवचनाचें रूप 'आहं' किंवा 'णं' कारान्त होतें. उदा०— कम्माह [कर्मणः], भीमशेनस्स [ °स्य ]; कम्माहं [कर्मणाम्], नालिन्दाणं. [ ४] प्रथमपुरुषवाचक सर्वनामाचें दोन्ही वचनीं रूप 'हगे' असें होतें.

अर्धमागधींतील उच्चाराचे फरक न देता फक्त व्याकरणाचे फरक देतों. [१] पुंलिंगी—अकारान्त नामास प्रथमेच्या एकवचनाचा प्रत्यय 'ए'. तृतीया एक व. 'सा'. चतुर्थी एक व. "आए" व "आते"; सप्तमी एक व. सिं

हे प्रत्यय आहेत. [ २ ] सर्वनामांचीं विशेष रूपें ' तेब्भो [ तत्–पं. ब. ] तव [ युष्मत् ष. ए. ], अस्माकं [ अस्मत् षष्ठी ब. ] अशीं होतात. [३] क्रियापदाच्या बाबतींत भूतकाल तृ.पु. बहुवचनाचा प्रत्यय 'इंसु' आहे. उदा०- पुच्छिंसु, गच्छिंसु, आभासिंसु. ल्यबन्ताचे प्रत्यय "ट्टु, इत्ता, एत्ता, इत्ताणं, एत्ताणं, इत्तु, च्चा, इया" इतके आहेत. तुमन्ताचे इत्तए, इत्तते हे प्रत्यय आहेत. निष्ठा ' ड ' ह्या प्रत्ययाने सिद्ध होते. तद्धिताचे प्रत्ययहि पुष्कळ प्रकारचे आहेत. प्रत्येक प्राकृत भाषेचें विशिष्ट स्वरूप लक्षांत येण्यासाठी इतका स्थूल निर्देश पुरेसा होईल. स्थलसंकोचामुळे त्या सर्वांचीं उदाहरणें दिलीं नाहीत.

६२ प्राकृत भाषांच्या बरोबर गाथाभाषेचाहि उल्लेख केला पाहिजे. वैदिक संस्कृत किंवा पुढील पाणिनीय संस्कृत ह्या भाषांवर ज्याप्रमाणे प्राकृत बोलींचा परिणाम झाला तसाच उलट संस्कृतनेहि आपली छाप प्राकृत भाषांवर ठेवण्यास कमी केलें नाही. संस्कृतचा त्याग करून बुद्धदेव व महावीर ह्यांनी आपल्या तत्त्वप्रसारासाठी ज्या दोन प्राकृत भाषांचा अवलंब केला त्या पाली आणि अर्धमागधी भाषांनासुद्धा संस्कृत भाषेचें जोकड झुगारून देणें कठीण झालें. पुष्कळ संस्कृत शब्द अविकल तत्सम स्वरूपांत प्राकृतमध्ये वापरलेले दिसतात एवढेंच नाही तर कांहीं ठिकाणीं संस्कृतचे प्रत्ययहि प्राकृत शब्दांना चिकटविलेले दिसतात. बुद्ध आणि जैन धर्मांतील कांही धार्मिक वाङ्मय उदा०—ललितविस्तर, सद्धर्मपुण्डरीक, चन्द्रप्रदीपसूत्र इत्यादि धर्मग्रंथांत अशा तऱ्हेची संस्कृतमिश्र प्राकृत किंवा प्राकृतमिश्र संस्कृत भाषा वापरली आहे. ह्या मिश्रित भाषेला ब्युर्नूफ व राजेंद्रलाल मित्र हे गाथाभाषा म्हणून संबोधितात व ह्या भाषेच्या प्रवृत्तीसंबंधी असे प्रतिपादितात की, संस्कृतपासून पाली किंवा अर्धमागधी निष्पन्न होण्याच्या पूर्वी 'गाथा' भाषा निष्पन्न झाल्या असाव्यात; कारण ह्या भाषेमध्ये संस्कृतचीं कांहीं चिह्नें आणि प्राकृतांचींहि कांहीं चिह्नें आढळून येतात. परंतु ह्या सिद्धांताचा भ्रान्तपणा उघड आहे. एक तर गाथा भाषा ज्या ग्रंथांत आढळून येतात त्या ग्रंथाचा काळ ख्रि. पू. २०० पासून ख्रि. उ. ३०० आहे. व ह्या कालापूर्वी पाली किंवा अर्धमागधी रूढ होऊन बसल्या होत्या. तेव्हा फार झालें तर गाथा भाषा पाली, अर्धमागधीच्या समकालीन म्हणतां

येतील. पूर्वकालीन नव्हतच नव्हत. प्राकृत भाषांवर संस्कृत भाषेच्या परिणामाचें एक ठळक प्रत्यंतर एवढीच 'गाथा' भाषांची किंमत आहे.

## अपभ्रंश

६३ प्राकृत भाषांचा विचार येथवर झाला. त्यानंतर ओघाने अपभ्रंश भाषेचा विचार येतो. ह्या 'अपभ्रंश' शब्दाचा धात्वर्थ 'कमी होणें,' गांवढळ लोकांच्या तोंडांत संस्कृत शब्दाचा होणारा वाईट उच्चार असा आहे. त्या लोकांना शब्दाचा नीट शुद्ध उच्चार करणें कठीण जातें म्हणून ते सोपा उच्चार करतात. ह्याच अर्थाने अपभ्रंश शब्द पतंजलीच्या महाभाष्यांत वापरला आहे, व उदाहरणादाखल त्याने 'गौः' या शब्दाचे 'गावी, गोणी, गोता, गोपोतलिका' इत्यादि अपभ्रंश दिले आहेत.[1] ह्यावरून पतंजलीच्या वेळेपर्यंत म्हणजे खिस्तपूर्व १५० पर्यंत अपभ्रंश हा शब्द एक स्वतंत्र भाषा ह्या अर्थी वापरला जात नसला पाहिजे. नाट्याचार्य भरत ह्यांच्या नाट्यशास्त्रामध्येहि अपभ्रंश शब्द भाषेच्या समानार्थी वापरलेला आढळत नाही. विभ्रंश, विभ्रष्ट अशा शब्दांनी ते शब्दाचे अपउच्चार ओळखतात.

"शबराभीरचण्डालसचरद्रविडोड्रजाः ।
हीना वनेचराणां च विभाषा नाटके स्मृताः ॥ नाटयशास्त्र १७-४९

ह्या श्लोकांत आभीर जातीच्या लोकांचा उल्लेख आला आहे. त्यांच्या भाषेला मात्र खि. स. ३०० पावेतो विवक्षित नांव प्राप्त झालेलें नव्हतें. त्यांच्या व इतर रानटी लोकांच्या भाषांना 'विभाषा' असें संबोधिलें आहे. पुढे त्याच अध्यायांत भरताचार्य कांही भाषांच्या विशेष लकबी सांगतात. सिंध, पंजाब व सौवीर ह्या प्रांतांत आभीर जात रहात असे. तेथील भाषेची लकब पुढील श्लोकांत दिली आहे.

हिमवत्सिंधुसौवीरान्ये च देशाः समाश्रिताः ।
उकारबहुलां तज्ज्ञस्तेषु भाषां प्रयोजयेत् ॥

भरतांनी अपभ्रंश ह्या नांवाने त्या भाषेचा उल्लेख केलेला नाही. केवळ त्या भाषेची एक लकब सांगितली आणि त्या लकबेची भाषा सिंध,

---

१ एकैकस्य शब्दस्य बहवोऽपभ्रंशाः । तद्यथा । गौरित्यस्य शब्दस्य गावी गोणी, गोता, गोपोतालिकेत्येवमादयोऽपभ्रंशाः । महाभाष्य १,१,१.

पंजाब व सौवीर ह्या तीन प्रांतांत बोलली जात होती असें ते सांगतात. परंतु अपभ्रंश हें नांव काठेवाडांतील वलभी राजवटींतील दुसऱ्या धरसेनाच्या लेखामध्ये सापडतें. तो आपले वडील गुहसेन संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश ह्या तिन्ही भाषांत काव्य लिहिण्यांत निष्णात होते असें लिहितो.[1] हा वलभी घराण्यांतील राजा खिस्तोत्तर ६०० च्या मध्यावर झाला. ह्याच सुमाराचा [इ.स. ६००] भामह नांवाचा कवि संस्कृत, प्राकृत व अपभ्रंश अशा तीन भाषा उल्लेखितो. ह्याच्या पुढचा दण्डीने केलेला अपभ्रंश भाषेचा उल्लेख महत्त्वाचा आहे. संस्कृत, प्राकृत व अपभ्रंश ह्यांशिवाय आणखी एक चौथा प्रकार त्याने मानला आहे. परंतु सर्वांत महत्त्वाची बाब म्हटली म्हणजे अपभ्रंश भाषा ही आभीरांची आहे असें त्याने स्पष्ट म्हटलें आहे [ आभीरादिगिरः काव्येष्वपभ्रंश इति स्मृताः ]. आणि पुढे अपभ्रंशकाव्याचें त्याने एक गमक सांगितलें आहे. संस्कृत काव्यांत सर्ग असतात. प्राकृत काव्यांत संधि असतात आणि अपभ्रंश काव्यांत आसार असतात[2]. ह्यावरून अपभ्रंश भाषा आभीरांची होती येवढेंच नव्हे तर त्यामध्ये वाङ्मय प्रसवण्याचीहि पात्रता होती.

खिस्तोत्तर ९०० मधील रुद्रटाची साक्ष ह्या मुद्द्यास धरून आहे. त्यानेहि सहा प्रकारांत भाषांची विभागणी करून त्यामध्ये अपभ्रंश हा एक प्रकार मानला आहे. अपभ्रंशाचे निरनिराळे प्रकार तो मानतो[3].

११ व्या शतकांत होऊन गेलेल्या राजशेखर नांवाच्या कवीने केलेलें वर्णन जरा काव्यमय आहे. त्याने काव्यरूपी महापुरुष कल्पून शब्दार्थौ हें त्याचें शरीर, संस्कृत हें मुख, प्राकृत बाहु, अपभ्रंश जघन,

---

१ संस्कृतप्राकृतापभ्रंशभाषात्रयप्रतिबद्धरचनानिपुणतरान्तःकरणः ।

२ आभीरादिगिरः काव्येष्वपभ्रंश इति स्मृताः
संस्कृतं सर्गबन्धादि प्राकृतं सन्धिकादिकम् ।
आसारादीन्यपभ्रंशो नाटकादि तु मिश्रकम् ।
काव्यादर्श १–३६, ३७.

३ प्राकृत-संस्कृत-मागधपिशाच-भाषाश्च-शौरसेनी च ।
षष्ठोऽथ भूरिभेदो देशविशेषादपभ्रंशः ॥ काव्यालंकार २-११.

पैशाची हे पाय, मिश्र हें उरस्, असे निराळे अवयव मानले आहेत. कविसम्राट् ज्या वेळेस दरबार भरवितो त्या वेळेस तो संस्कृत कवि उत्तरेस, प्राकृत कवि पूर्वेस, अपभ्रंश कवि पश्चिमेस, पैशाच कवि दक्षिणेस बसवितो. परंतु पुढे प्रत्येक भाषेचा देशविस्तार सांगतांना त्याने अपभ्रंशभाषेच्या विस्ताराचें क्षेत्र "सकलमरुभुवष्टक्कभेदानकाश्च" असें सांगितलें आहे. मरुभुवः म्हणजे सध्याचें मारवाड होईल. टक्क म्हणजे पूर्वपंजाब होय. टोंक नांवाचें सध्याचें संस्थान हेंच असण्याचा संभव आहे. भेदानक म्हणजे नक्की कोणता प्रांत हें सांगतां येत नाही.

अपभ्रंश भाषा वापरणारे लोक पुष्कळ होते. राजाचे स्त्रीपुरुषसेवक व हुजरे अपभ्रंश भाषा वापरीत, पंडित संस्कृत वापरीत, काही खालचे लोक प्राकृत वापरीत, नंतर बाकीचे सुतार, लोहार, तेली, तांबोळी, वगैरे सर्व प्रकारचे कारागीर अपभ्रंश वापरीत असत. अपभ्रंश ही "लोकांची भाषा" होती. पुढे ११ व्या शतकाच्याच सुमारास देशपरत्वें अपभ्रंशभाषेचे तीन प्रकार झाल्याचा दाखला मिळतो. उपनागर, आभीर आणि ग्राम्य असे तीन प्रकार असल्याचें नमिसाधु(खि.उ.१०६९)नांवाचा एक काव्यालंकारा-वरचा जैन टीकाकार सांगतो व अपभ्रंश भाषेचा विस्तार मगधामध्ये झाल्या-चेंहि तो म्हणतो.

**६४** अपभ्रंश भाषांचा उल्लेख भामह, दण्डी ह्या ग्रंथकारांनी केलेला वर दिला आहे. त्याचप्रमाणे ६ व्या शतकांत होऊन गेलेल्या वलभी घराण्यां-तील धरसेनाच्या शिलालेखांत आलेला निर्देशहि दिला आहे. त्यांवरून इ. स. ५०० हा अपभ्रंशाचा उदयकाल धरण्यास हरकत नाही असा निष्कर्ष निघतो. परतु त्याच्याहि ३ शतकें मागे अपभ्रंशाचा काल हरमान याकोबी ह्यांनी "पउमचरिय" ह्या ग्रंथाच्या आधारावर नेला आहे. अपभ्रंश भाषांच्या स्पष्ट अशा ज्या खुणा मानल्या आहेत त्या 'पउमचरिय' ग्रंथांत सापडतात व 'पउमचरिय' ह्या ग्रंथाचा काल याकोबी ह्यांच्या मताने खिस्तोत्तर २०० किंवा ३०० येतो. अपभ्रंश भाषाहि त्या काळांत बनल्या असाव्यात असा त्यांचा तर्क आहे. तसेंच तिसऱ्या शत-काच्या उत्तरार्धांत झालेल्या धम्मपद ग्रंथांतहि अपभ्रंशांतील प्रथमेच्या एक-

वचनाच्या 'उ' प्रत्ययाचीं उदाहरणें सापडतात. त्याच सुमाराचा हा आणखी एक पुरावा आहे. मृच्छकटिक व विक्रमोर्वशीय ह्या दोन नाटकांत वापरलेल्या अपभ्रंश भाषांच्या चिन्हांवरूनहि त्या भाषांचा काल ठरविण्यास बळकटी येण्यासारखी आहे. मृच्छकटिक नाटकाच्या दुसऱ्या अंकांत द्यूतकार आणि चन्दनक ह्यांचा संवाद आहे. त्यामध्ये चन्दनकाची भाषा ढक्की म्हणून आहे. हीहि वरील पंजाबकडील भाषा आहे व तीमध्ये अपभ्रंशाच्या उकारादि खुणा दिसतात. मृच्छकटिक नाटकाच्या काळाबद्दल मतभेद आहे व जरी उत्तरकालीन काळ मानिला तरी अपभ्रंशाचा काळ खि. उ. ४०० ठरतो. तसेंच विक्रमोर्वशीयाच्या पुराव्यासंबंधी. ह्या नाटकांत उर्वशी ज्या वेळीं भरताच्या शापामुळे एकदम अदृश्य झाली त्या वेळीं प्रेमाने बेहोष होऊन पुरुरवस् राजा वेड्यासारखे चाळे करूं लागला व त्या वेडाच्या लहरींत त्याने आपलें प्रेमगान अपभ्रंश भाषेंत केलें आहे. कालिदासाच्या काळासंबंधीहि मतभेद आहे. तद्वत् हीं राजाने गायिलेलीं अपभ्रंश काव्यें कालिदासप्रणीत आहेत कीं उत्तरकालीन आहेत ह्याबद्दल मतभेद आहे. तीं जर कालिदासाचीं मानलीं तर अपभ्रंश भाषा खि. उ. ४०० च्या सुमारास सरराहा सुरू होत्या ह्या विधानास दुजोरा मिळतो.

६५ अपभ्रंश भाषेचे निरनिराळे प्रकार, ते ज्या प्रांतांत रूढ होते ते प्रदेश, व त्या प्रकारांच्या कांही ठळक खुणा ह्यासंबंधीची बरोबर कल्पना खाली दिलेल्या प्राकृतचंद्रिकेंतील उताऱ्यावरून व त्यावरील मार्कंडेयाच्या टीकेवरून येईल. प्राकृतचे २७ उपभेद सांगितले आहेत.

व्राचडो लाटवैदर्भावुपनागरनागरौ । बार्बरावन्त्य-पाञ्चाल-टाक्क-मालव-कैकयाः । गौडोढ्रैव-पाश्चात्य-पाण्ड्य-कौन्तल-सैंहलाः । कालिङ्ग्य–प्राच्य–कार्णाट-काञ्च-द्राविड-गौर्जराः । आभीरो मध्यदेशीयः सूक्ष्मभेदव्यवस्थिताः । सप्तविंशत्यपभ्रंशा वैतालादिप्रभेदतः ॥ (प्राकृतचन्द्रिका)

ह्या २७ उपभेदांचीं ठळक गमकें पुढील टीकेंत दिलीं आहेत.

टाक्कं टक्कभाषा नागरोपनागरादिभ्योऽवधारणीयम् । तुबहुला मालवी । वाडीबहुला पाञ्चाली । उल्लप्राया वैदर्भी । संबोधनाढ्या लाटी । ईकारोकारबहुला औढ्री । सवीप्सा कैकेयी । समासाढ्या गौडी । डकारबहुला

कौन्तली । एकारिणी पाण्ड्या । युक्ताढ्या सैंहिली । हियुक्ता कालिङ्गी । प्राच्या तद्देशीभाषाढ्या । ज(भ) ट्टादिबहुलाऽऽभीरी । वर्णविपर्ययात् कार्णाटी । मध्यदेशीया तद्देशीयाढ्या संस्कृताढ्याच च गौर्जरी । रत(ल)हभां व्यत्ययेन पाश्चात्या रेफव्यत्ययेन द्राविडी । ढकारबहुला वैतालिकी । एओबहुला काञ्ची । शेषा देशभाषा विभेदात्— ( मार्कंडेय–प्राकृतसर्वस्व )

अपभ्रंशाचे हे असे २७ प्रकार जरी असले तरी ह्या सर्व प्रकारांत वाङ्मयरचना नाही. जैन उपदेशक ज्या निरनिराळया प्रांतांत धर्मोपदेशासाठी गेले त्या प्रांतांतील बोलींना ते अपभ्रंशाचे निरनिराळे प्रकार समजूं लागले व त्यांच्या ज्या कांही खुणा ठळक रीतीने त्यांच्या मनावर बिंबल्या त्याच मार्कण्डेयाने वर सांगितल्या आहेत. सत्तावीस प्रकारांत कांही द्राविड व कार्णाट भाषांचा अन्तर्भाव केला आहे तो चिन्तनीय आहे. त्यांवरून किती स्थूल मानाने भेद काढिले आहेत हें दिसेल. अपभ्रंशाचे हे इतके २७ प्रकार मानणें बरोबर नाही व शास्त्राला धरून नाही, ही कल्पना खुद्द मार्कण्डेयाला सुद्धा होती. कारण त्याने लगेच पुढे सत्तावीस प्रकारांऐवजीं तीन प्रकार मानले आहेत. तो म्हणतो—

नागरो व्राचडश्चोपनागरश्चेति ते त्रयः । अपभ्रंशाः परे सूक्ष्मभेदत्वान्न पृथङ्मताः ।[1]

व पुढेच "अन्येषामपभ्रंशानामेष्वेवान्तर्भावः"[2] म्हणून सर्व अपभ्रंशांचा वरील तिन्हींत अन्तर्भाव केला आहे. प्राकृतचन्द्रिकाकारानेहि २७ प्रकारचीं लक्षणं सांगितलीं नाहीत किंवा त्यांतील वाङ्मयाचाहि उल्लेख केला नाही. अपभ्रंशाचे मुख्य प्रकार म्हणजे व्राचड, नागर व उपनागर हे तीनच. ह्यांतूनहि हेमचंद्राने साहित्यनिबद्ध अशी जी सामान्य अपभ्रंश भाषा ती एकच मानून तिचें व्याकरण दिलें आहे. हेमचंद्राचा अपभ्रंश आणि मार्कंडेयाचा नागरापभ्रंश हे एकच व त्याचे सध्याचे वारस म्हणजे राजस्तानी व गुजराती ह्या भाषा होत. व्राचड अपभ्रंश सिंध प्रांतात चालू होता. त्यापासून निघालेली भाषा सिंधी. नागर

---

१ प्राकृतसर्वस्व, पृ. ३. २ कित्ता पृ. २२.

आणि व्राचड ह्या दोहोंच्या मिश्रणापासून उपनागर अपभ्रंश झाल्यामुळे त्याचा विशिष्ट असा प्रांत नाही किंवा वारसहि नाही.

६६ अपभ्रंश भाषेंत वाङ्मय निर्माण होण्याच्या पूर्वी पुष्कळ काळापासून बोलभाषा म्हणून ती रूढ असली पाहिजे. कारण चण्डाच्या प्राकृत व्याकरणांत व कालिदासाच्या विक्रमोर्वशीय नाटकामध्ये कांही भाषा अपभ्रंश भाषेमध्ये अवगुंठित केली आहे. कालिदासाचा काळ पांचवें शतकांत मानण्याविषयीं विद्वानांची बरीच एकवाक्यता आहे. तेव्हा खि. उ. ५०० पासून खि. उ. १००० पर्यंतचा काळ अपभ्रंश भाषांच्या भरभराटीचा काळ मानण्यास हरकत नाही. ह्याच्याहि पुढे एक दोन शतकें अस्सल अपभ्रंश वाङ्मय लिहिलेलें आढळतें. ह्या वर्षांच्या अमदानींत अपभ्रंश भाषेंत पुष्कळ ग्रंथ लिहिले गेले आणि ते सर्वमान्य होऊन बसले. विक्रमोर्वशीयम् अंक ४, धर्माभ्युदय, हरिवंशपुराण, स्वयंभूदेव याने केलेलें पउमचरिअ, धनपालरचित भविसयत्तकहा, महेश्वरसूरींची संजममंजरी, महापुराण, यशोधरचरिअ, नागकुमारचरिअ, कथाकोश, पार्श्वपुराण, सुदर्शनचरिअ, करकंडुचरिअ, जयतिहुअणस्तोत्र, विलासवइकहा, सणंकुमारचरिअ, सुपासनाहचरिअ, कुमारपालचरित, कुमारपालप्रतिबोध, उपदेशतरंगिणी, पुष्फदन्दाचे तिसत्थिमहापुरिसगुणालंकार, योगीन्द्रदेवाचें परमात्मप्रकाश, हरिभद्ररचित नेमिनाहचर्यु, इत्यादि अपभ्रंश भाषेंतील उल्लेखनीय ग्रंथ आहेत. ह्या सर्व वाङ्मयांत सर्व प्रकार आहेत. नाटकें आहेत, सूत्र आहेत, चरितें आहेत, कहा आहेत, आख्यानें आहेत, टीका आहेत, पुराणें आहेत. जैनसूरींनी वाङ्मयाचा असा कोणताहि प्रकार अपभ्रंश भाषेंत गुंफण्याचा ठेविला नाही. व त्यामुळेच प्राकृतलक्षण, सिद्धहेमचन्द्र व्याकरण, संक्षिप्तसार, षड्भाषाचंद्रिका, प्राकृतसर्वस्व, वगैरे व्याकरणग्रथांत हिचा सूरींनो व्याकार केला, व प्राकृतपिंगलांत पिंगलाने त्या भाषेंतील छन्दोरचना सांगितली.

अपभ्रंशांत होणारे वर्णांचे व प्रत्ययांचे फरक पुढे दिले आहेत.

## वर्णप्रक्रिया-स्वर

६७ अपभ्रंश भाषेंत साहित्यिक प्राकृत किंवा संस्कृत ह्यामधील ऋ,

ऌ, ऐ, औ, ह्यांशिवाय सर्व स्वर आहेत. 'ए' आणि 'ओ' ह्यांचे ह्रस्व उच्चार फक्त अपभ्रंश भाषेतच आढळतात.

१ 'ऋ'–बद्दल अ, इ, उ, ए, अर्, किंवा रि इतके फरक होतात. उदा०—ऋ=अ–अमय (अमृत), कसण (कृष्ण); ऋ=इ–अलंकिय, घिण्ह (गृह्य), हियय (हृदय); ऋ=उ– पाउस (प्रावृप्), पुहइ (पृथिवी); ऋ=ए-गेह (गृह); ऋ=अर्—करे (कृ), सरे (सृ). ऋ=रि— अम्हारिस, (अस्मादृश्), रिसि (ऋषि).

२ 'ऐ' अणि 'औ' 'बद्दल' 'ए' आणि 'ओ' होतात, किंवा अइ, अउ, इ, उ, इतके फरक होतात, उदा०—ए— देवय (दैवत), नेमित्तिकय (नैमित्तक); अइ—अइरावय (ऐरावत), दइउ (दैव), इ—सिन्न (सैन्यम्); औ=ओ— ओसह (औषध), गोड (गौड); औ=अउ— (गौरव) गउरव, पउर (पौर); औ=उ— सुक्ख (सौख्य).

३ स्त्रीलिंगी आकारान्त नामांचा अन्त्य आ ह्रस्व होतो. उदा०—कमळ (कमला), बाल (बाला), साल (शाला).

४ पुष्कळ शब्दांतील अन्त्य 'अ'चा 'उ' होतो. 'उ' काराचें प्राचुर्य तर अपभ्रंशाचें मुख्य चिह्न आहे. उदा०— एत्थु, जेत्थु, तेत्थु, जासु, तासु.

५ आद्य 'अ' आणि 'उ' यांचा कधी कधी लोप होतो. उदा०—रण्ण (अरण्य), हउं (अहकम्), हेट्ठा (अधस्तात्), वइसइ (उपविशति).

६ 'य' श्रुति व 'व' श्रुति. एखाद्या व्यंजनाबद्दल य् किंवा व् आदेश हे अपभ्रंशात आढळतात. यश्रुति—उदा०— अणेय (अनेक), पायउ (प्रकट), नाय (नाग), लोयण (लोचन), अमय (अमृत), खेय (खेद), पसाय (प्रसाद); वश्रुति — उदा०— असुव (अश्रु), जुवल (युगल), उव्वेव (उद्वेग), उवय (उदय), उवहि (उदधि).

## व्यंजनें

६८ व्यंजनांच्या फरकाच्या बाबतींत अपभ्रंश आणि प्राकृत भाषा ह्यांत फारसा फरक नाही. व्यंजनांचे लोप, आदेश, संयोग, वियोग, विश्लेष वगैरे सर्व प्रकार अपभ्रंशात होतात. सामान्यतः आरंभींचीं व्यंजनें तशींच अविकृत राहतात. त्यांच्यांत फरक होत नाही.

१ शब्दाच्या मध्ये असणाऱ्या व्यंजनाचा लोप होऊन त्या ठिकाणीं स्वर येतो. वर्गांतील चौथ्या व्यंजनांचा मात्र असा लोप होत नाहीं. उदा०—

क् — आउञ्चइ (आकुञ्चति); ग् — मइंद (मृगेंद्र).

च् — अइआरे (अतिचारेण), कयाइ (कदाचित्); ज् —गइन्द (गजेन्द्र ), राआ (राजन्). त् — अइ ( अति ), अवइण्ण (अवतीर्ण); द—उइय (उदित), खेइय (खेदित).

प् — अउव्व (अपूर्व), गयउर (गजपुर), नेउर (नूपुर).

य् — आउस (आयुष), आउह (आयुध); व्—आइद्ध(आविद्ध), पइठ्ठ (प्रविष्ठ).

२ कठोर व्यंजनें नरमावलीं जाऊन त्यांचीं मृदु व्यंजनें होतात. उदा०— क -- मयगल (मदकल); ट — कडक्ख (कटाक्ष); कवडु (कपाट). ठ — पढ (पठ्); ड - पील (पीड्); कील (क्रीडा). प— पाव (पाप), व्वह (पथ).

३ सर्व वर्गांतील महाप्राण व्यंजनांबद्दल 'ह्' येतो. मात्र हीं व्यंजनें आरंभीं नसलीं पाहिजेत. छ् आणि झ् हीं व्यंजनें त्याला अपवाद आहेत. ख् — दुह (दुख), नह (नख), मुह (मुख); घ्— ओह (ओघ),जिणहर (जिणघर); थ्-अह (अथ), कह (कथा), ध्-अहर ( अघर ), अहिटिय (अधिष्टित); फ्-मुक्ताहल (मुक्ताफल), भ्-निहालिउ (निभालित).

४ आद्य 'न' व द्वित्त 'न्न' तसेच राहतात. इतर ठिकाणीं त्याचा 'ण' होतो. उदा.-नयर (नगर), नराहं (नराणां), मन्नइ (मन्यते); अण्णित्तहि, अवगण्णियि.

५ 'य्'बद्दल 'ज्' नेहमी येतो. उदा.-जइ (यति), जक्ख (यक्ष), जाण (यान), अजोएं (अयोगेन), अज्ज (अद्य).

७ अन्त्य 'व' बद्दल 'उ' होतो. इतर ठिकाणीं तो तसाच कायम राहतो. उदा.-उच्छउ (उत्सवः), संभउ (संभवः), वासउ (वासवः). त्याचप्रमाणे दुसऱ्या व्यंजनाबद्दल आदेशाने आलेला 'व' सुद्धा 'उ' होतो. उदा.—मंडउ ( मंडपः ), साउ ( सापः ), दीउ ( दीपः ).

८ अपभ्रंश भाषेची एक महत्त्वाची खूण म्हणजे 'म' बद्दल 'वँ'

होणें ही होय. ही दुसऱ्या कोणत्याहि प्राकृतमध्ये आढळत नाही. अपभ्रंश भाषेतील हा विशेष मराठी व गुजराती भाषांमध्ये उतरला आहे. उदा.— भवँणु ( भ्रमणम् ), भवँरु ( भ्रमरः ), नावँ ( नामन् ), गावँ ( ग्राम ).

९ ऊष्म्यांपैकी 'श्' चा 'स्' होतो, 'स्' तसाच कायम राहतो. 'ष्' चा कधी छ् आणि कधी 'स्' होतो. उदा.—सय ( शत ), सुक्क ( शुष्क ), सोह ( शोभा ); सयल ( सकल ), सिन्न ( सैन्य ); छट्ठ ( षष्ठ ); सोलय ( षोडश ), रिसि ( ऋषि ).

६९ संयुक्त व्यंजनें :—प्राकृत भाषांप्रमाणे अपभ्रंशामध्ये संयुक्त व्यंजनांस निरनिराळे फरक होतात. शब्दाच्या आरंभीं जर संयुक्त व्यंजन असेल तर त्यांतील पहिलें व्यंजन कायम राहून दुसरें व्यंजन लोप पावतें. शब्दांत मध्ये किंवा अन्त्यास संयुक्त व्यंजन आलें तर त्यांतील कधी पहिलें व्यंजन द्वित्त होतें तर कधी दुसरें व्यंजन द्वित्त होतें, तर कधी त्यांच्या दोन्ही अवयवांमध्ये एखादा स्वर किंवा व्यंजन येतें.

१ आद्य संयुक्त व्यंजनें :—उदा.–चुइ [च्युति], जोइंगण [ज्योतिर्गण, वावरइ [ व्याप्रियते ], चाय [ त्याग ]; कय [क्रय], कील [क्रीडा], दुम [ द्रुम ], पयास [ प्रकाश ], पावइ [ प्राप्नोति ], सुव [श्रु].

आद्य संयुक्त व्यंजनांत पहिला अवयव 'स्' असला म्हणजे त्याबद्दल 'ह्' आदेश होतो व तो दुसऱ्या अवयवांत मिसळून त्याला महाप्राणत्व येतें. उदा.—खंभ् [ स्कंभ् ], थण [ स्तन ], थवअ [ स्तबक ], हत्थ [ हस्त ], न्हाण [ स्नान ], न्हवण [ स्नपन ], फंस [ स्पर्श ].

२ मध्य किंवा अन्त्य संयुक्त व्यंजनें:–दुसरा अवयव द्वित्त झाल्याचीं उदाहरणें:– जुत्त [युक्त], रत्त [ रक्त ]; अज्ज [ अद्य ], उब्भड [उद्भट], तप्पर [ तत्परः ]; कम्म [ कर्मन् ], जम्म [ जन्मन् ]; दप्प [ दर्प ], सव्व [ सर्व ], सुक्क [ शुष्क ], अट्ठ [ अष्ट].

पहिला अवयव द्वित्त झाल्याचीं उदाहरणें:—अग्गी [अग्नि], मुक्क [ मुक्त], अन्न [अन्य], कलत्तु [कलत्र], मुच्चइ [मुच्यते], मित्तु [मित्र].

३ संयुक्त व्यंजनाच्या दोन अवयवांच्या मध्ये वर्ण शिरल्याचीं उदाहरणें:– अच्चरिअ [ आश्चर्य ], अरहन्त [ अर्हन्त ], आरिय [ आर्य ], किरिया

[ क्रिया ], किलिन्न [ क्लिन्न ], किलेस [ क्लेश ], अम्बिल [ आम्ल ], ताम्बर [ ताम्र ].

४ कांही संयुक्त व्यंजनांत होणारे फरक वरील नियमांत जे येत नाहीत ते येथे स्वतंत्र दिले आहेत. उदा०— ज्ञ् > णू, न्, न्न्. उदा०— आण [ आज्ञा ], नाण [ ज्ञान ], सन्न [ संज्ञा ]. क्ष् > क्ख्, छ्, झ्. उदा०—अक्खय [ अक्षय ], सछ [ साक्षात् ], झीण [ क्षीण ]. ध्य् > झ् झाण [ ध्यान ], संझा [ संध्या ]. प्स् > छ्—अच्छर [ अप्सरस् ],त्स् > छ्—मछ [ मत्स्य ]. स्म् > भ्—संभल [ संस्मर ], भरति [ स्मरति ].

५ अपभ्रंशांत पुष्कळ वेळां अकल्पित रीतीने एकदम एखाद्या शब्दांत व्यंजन द्वित्त होतें. उदा०— अपराजिय [ अपराजित ], उप्परी [ उपरी ], एक्कमिक्क [ एकैक ], किउ [ कृतम् ], पञ्चविह [ पंचाविध ], पूज्ज [पूजा], पुन्नफलु [ पुण्यफलम् ], बहुग्गुण [बहुगुण], बिन्नो [ द्वौ ], तिन्नि[त्रीणि].

६ अपभ्रंशांत कधी कधी संयुक्त व्यंजन विभागलें म्हणजे पूर्वीच्या अवयवावर अनुस्वार येतो. ही प्रवृत्ति मराठीमध्ये दिसून येते. उदा०—अंचण ( अर्चन ), अंसु ( अश्रु ), चउंरस ( चतुरस्र ), जंपइ ( जल्पति ), दंसण ( दर्शन ), वंक ( वक्र ).

## प्रत्ययप्रक्रिया

७० अपभ्रंश भाषेत नामें स्वरान्त आहेत, व्यंजनान्त नामें नाहीत. स्वरांपैकी सुद्धा अ, आ, इ, उ हेच स्वर शेवटीं जास्त येतात. पुंल्लिंगी व स्त्रीलिंगी नामांना लागणारे प्रत्यय खाली दिले आहेत.

| | पुंल्लिंगी नामाचे प्रत्यय | | स्त्रीलिंगी नामाचे प्रत्यय | |
|---|---|---|---|---|
| | ए. व. | अ. व. | ए. व. | अ. व. |
| प्रथमा | उ, ० | ० | ० | उ, ओ, ० |
| द्वितीया | उ, ० | ० | ० | उ, ओ, ० |
| तृतीया | ण, म् | हिं | ए | हिं |
| चतुर्थी } षष्ठी | सु, स्सु, हो, ० | हं, ० | हे, ० | हु, ० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| पंचमी | हु, हे | हुं | हे | हु |
| सप्तमी | ० | हिं | हि | हिं |
| संबोधन | उ, ० | हो, ० | ० | हो, ० |

पुत्त व कञ्ञा ह्या नामांना अनुक्रमें हे प्रत्यय लाविले म्हणजे अपभ्रंशांतील त्या शब्दांचीं रूपें तयार होतील. हेच प्रत्यय इतर शब्दांना थोड्या फार फरकानें लागतात.

सर्वनामें– अपभ्रंशांतील पुरुषवाचक सर्वनामांचीं रूपें मराठीच्या दृष्टीने महत्त्वाचीं असल्यामुळें जरा विस्तारानें देणें जरूर आहे. त्यांतील बरींच रूपें मराठीच्या प्रांतिक बोलींत आढळतात.

| | प्रथम पु. ए. व. | अ. व. | द्वितीय पु. ए. व. | अ. व. |
|---|---|---|---|---|
| प्रथमा | मइँ, हउं | अम्हइँ, अह्मी | तहुँ, तहु | तुहँ, तुह्मं, तुह्मइ |
| द्वितीया | मइ, मइँ | अम्हइं | पइँ | तुह्म |
| तृतीया | मइं, मए | अह्म, अह्मइँ | पइँ | तुह्मइँ |
| षष्ठी | मज्झु, महु | अह्म, अह्मइँ-हि अह्माण | पइँ, तउ, तइ; तुज्झु, तुद्धु | तुह्मइं, तुह्म तुह्माणं |
| सप्तमी | मइं | अह्मासु | तइँ, पइँ | तुम्हासु |

| | तृतीय पु. ए. व. | अ. व. | प्रश्नार्थक ए. व. | अ. व. |
|---|---|---|---|---|
| प्रथमा | सो, सु, तं | ते, ताइँ, ताए | कोवि, कवणु कोई | किवि, केवि |
| द्वितीया | तं, सो, सा | ” | कोई, को | ” |
| तृतीया | तिं, तेण, ताइ | तेहिँ | केण | केहिं |
| षष्ठी | तहो, तिहिं, तहु | ताइं | कासु, कहो, कहु | कहँ |
| सप्तमी | तहिँ | तेसु | कहिं, कहिंची | केसु |

संख्याविशेषणें:– एक, एक्क, एकल्ल, इक्क; बे, बिण्णी, बेण्णी, दु; तिण्णि; चतु, चयारी, चतारी; पंच; छ, सत्त, अठ, नव, दह, दो, बारह, तेरस, पन्नारस, सोलह, चउवीस, तीस, अठयाल, पंचासय, छठी, सय.

७१ क्रियापदें:– संस्कृत भाषेंत क्रियापदाच्या रूपांची जी संपन्नता होती ती उत्तरोत्तर कमी कमी होत गेली. प्राकृतपेक्षा अपभ्रंश भाषेंत क्रियापदांच्या रूपांत पुष्कळ साधेपणा आला आहे. गणांचा भेद नाहीसा झाला. आत्मनेपद नाहीसें झालें. पुष्कळ अर्थ नाहीसे होऊन मुख्य जरूर तेवढे काळ व अर्थ राहिले.

| | वर्तमानकाळाचे प्रत्यय | | आज्ञार्थ | |
|---|---|---|---|---|
| | ए. व. | अ. व. | ए. व. | अ.व. |
| प्र. पु. | उ, मि. | हुं, मो, मु, म | मि, मु | मो, हं |
| द्वि. पु. | हि, सि, से | हु, ह, ध, इत्था | हि, इ, उ, ए | ह |
| तृ. पु. | दि, दे, इ, ए | हिं, न्ति, न्ते, इरे | उ | न्तु |

भविष्यकाळाचे प्रत्यय

| | ए. व. | अ. क. |
|---|---|---|
| प्र. पु. | सउं, स्सिउं, सामि, स्सिमि | सहुं, स्सिहुं, समो, स्सिमो<br>समु, स्सिमु, सम, स्सिम. |
| द्वि. पु. | सहि, स्सिहि,ससि, स्सिसि<br>ससे, स्सिसे | सहु, स्सिहु, सह, स्सिह<br>सध, स्सिध<br>सइत्था, स्सिहत्था |
| तृ. पु. | सदि, सदे, सइ, सए<br>स्सिदि, स्सिदे, स्सिइ, स्सिए | सहिं, संति<br>सते, सइरे<br>स्सिहिं, स्सिंते<br>स्सिंते, स्सिइरे |

खाली 'कर' धातूचीं सर्व काळाचीं रूपें दिलीं आहेत.

| | | ए. व. | अ. व. | | ए. व. | अ. ए. |
|---|---|---|---|---|---|---|
| वर्तमान | प्र. पु. | करमि | करहं | आज्ञार्थ | करमि | करहं |
| | द्वि. पु. | करहि | करहु | | करहि | करह |
| | तृ. पु. | करइ | करंति | | करउ | करंतु |

भूतकाळाचीं निराळीं अशीं रूपें नाहीत. त्याचीं रूपें भूतभूतकालवाचक धातुसाधितें वापरून सिद्ध होतात.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| भविष्य | प्र. पु. | करेसि | करेस | विध्यर्थ | करिज्जे | करिज्जइ |
| | द्वि. पु. | करेसहि | करेसह | | करिज्जहि | करिज्जहु |
| | तृ. पु. | करेसइ | करेसंति | | किज्जइ— | किज्जउ |

संकेतार्थ— करंतु वर्तमानकाल-धातुसाधित करंत
प्रयोजक— करावइ तमन्त — करणहं
कर्मणि— कीयइ, किज्जइ. ल्यबन्त— करिवि काउ
करेवि करेविणु
करेप्पिणु

अपभ्रंश भाषेंतील बरेच तद्धित प्रत्यय मराठींत आले आहेत. त्यांपैकी मुख्य येथे दिले आहेत.

अर—पलोयर; अल्ल—दुखल्लिय, नवल्ल, पयल्ल, महल्ल; आर—अह्मार-तुह्मार; इक्क—पाइक्क, पारक्क; इर—कंखिर, कंदिर, जंपिर, तंबिर; इल्ल—कुडिल्ल, पहिल्ल; उल — वेलाउल: उल्ल — अब्भरहुल्ल, भेडुल्ल; उ — इत्तडउ, हियडउ; त्तण — दोहत्तण, वड्डत्तण; र — विउणारउ, विवरेउ; ल — पहिल, समग्गलु, वण — दयावणु, दरिसाणु; वत्त — सिरिव, मणिमुज्जावत्तउ; वार — एक-वार, तिवार,

---

# परिशिष्ट


आर्यभारतीय भाषा, वेदपूर्वकालीन बोली, ख्रिस्तपूर्व ५००० पूर्वीचा काळ
प्राकृत बोली
वैदिक, ख्रि.पू. ५००० ते ख्रि.पू. ३००० च्या पूर्वी
ग्रांथिक, ब्राह्मण, सौत्र
३००० ख्रि.पू.
पाणिनीय संस्कृत
उदीच्य
प्रतीच्य
मध्यदेशीय
प्राच्य
दाक्षिणात्य
खोतान
पैशाची
अपभ्रंश
कैकय, टक्क
लहाण्डी
नागर
व्राचड
उपनागर
सिंधी
अशोक शिलालेखी
लाटी, सौराष्ट्री
नागरअपभ्रंश
राजस्तानी गुजराती
शौरसेनी
अवहट्ट
पश्चिम हिंदी
अर्धमागधी
जैन अर्धमागधी
पूर्वी
मागधी
बंगाली
बहारी
आसामी
माहाराष्ट्री व अपभ्रंश
मिश्र प्राकृत.
मराठी

## प्रकरण तिसरें

# मराठी भाषेची उत्पत्ति

७२ भाषेच्या उत्पत्तीचा विचार करतांना ती भाषा ज्या लोकांकडून व ज्या देशांत बोलली जाते त्या लोकांचा व त्या देशाचा विचार करावा लागतो. त्या दृष्टीने आपणास मराठी भाषेबरोबर मराठा समाज व महाराष्ट्र देश ह्यांचा विचार करावा लागेल. प्रथम मराठी भाषेच्या उत्पत्तीचा विचार करून नंतर महाराष्ट्राची वसाहत व मराठा समाजाची घटना ह्यासंबधी ह्या प्रकरणांत आपण विचार करूं. आर्यभाषारूपी मंदाकिनीचा मंद मंद वाहणारा प्रवाह किती पुराण कालापासून सारखा अविरत व अखंड रितीने वाहत आहे, ह्या तिच्या दूरच्या प्रवासांत तिची केव्हा व किती अवस्थांतरें झाली, किती लोकांनी मोठ्या भाविक श्रद्धेने व आत्मिक भावनेने तिच्या साह्याच्या जोरावर आपलें जीवित चालविलें, किती दूरदूरचे प्रांत हिच्या प्रवाहाच्या शाखांनी पावन केले, किती अनन्यभक्तांनी तिची सेवा आराधना करून ऐहिक व पारत्रिक सुख संपादिलें व तिची महती वाढविली, ह्या सर्वांची कल्पना मागील प्रकरणावरून येईल. ग्रीक पौराणिक कथेतील फ्यूनिक्स नांवाच्या पक्ष्यासारखी कांहीशी भाषेची स्थिति आहे. तो जसा स्वतःमरून आपल्या मृत्यूतूनच दुसरा पक्षी उत्पन्न करतो तद्वत् एक भाषा मरून लगेच ती दुसरी भाषा उत्पन्न करते.

७३ कोणत्याहि भाषेस तिचें बोलीचें स्वरूप जाऊन तिला साहित्यिक स्वरूप प्राप्त झालें म्हणजे ती स्वता नाहीशी होऊन ती इतर भाषेस प्रसवते असा सिद्धांत कांही विद्वान लोक मांडतात व त्याला आधार आर्यभाषांचा देतात[1]. वैदिक संस्कृतपासून ज्या वेळेस साहित्यिक भाषा तयार

---

१ श्यामसुन्दरदास, हिंदी भाषा और साहित्य, भाग १ पृ. २८–२९.

झाली त्या वेळेस प्राकृत भाषा निर्माण झाल्या व बोली म्हणून त्यांनी आपलें वर्चस्व गाजविण्यास आरंभ केला. ह्या प्राकृतहि ज्या वेळी साहित्यिक भाषा म्हणून साच्यांत जाऊन बसल्या त्यावेळी बोली म्हणून त्यांनी गाजविलेलें वर्चस्व 'अपभ्रंश' भाषेनें आपणाकडे घेतलें. पुढे कालाच्या ओघांत ह्या अपभ्रंश भाषेची साहित्यिक भाषा म्हणून मूस बनली त्यावेळेस सिंधी हिंदी, गुजराती, मराठी ह्या बोली म्हणून तत्तत्प्रांतीयांच्या मुखांत जाऊन बसल्या, अशी वरील सिद्धांताची विचारसरणी आहे. परंतु हिच्यांतील दोष उघड उघड आहे. एखाद्या भाषेच्या उद्भवास तिच्या पूर्वभाषेचें साहित्यिक स्वरूप जर कारण समजलें तर हिंदी, गुजराती, बंगाली, मराठी ह्या आधुनिक भाषांना सध्या नितान्त असें साहित्यिक स्वरूप प्राप्त झालें असल्यामुळे त्या मरून त्यांच्यापासून दुसऱ्या भाषा निघाव्यात. परंतु तशी तर स्थिति दिसून येत नाही. मराठी भाषा तर तिच्या जन्मानन्तर लगेच सुतरां साहित्यिक बनली, हें मानभावी वाङ्मय व ज्ञानेश्वरी यांवरून उघड आहे व असें असूनहि ती न मरतां तिचा उत्तरोत्तर विकास होत आहे. कोणतीहि भाषा साहित्यिक होणें हें तिच्या उत्कर्षाचें गमक आहे; तिच्या अवनतीचें नव्हे व तिच्या नाशाचें तर नव्हेच नव्हे. उलट साहित्यिक भाषेचें कायमचें न बदलणारें स्वरूपच तिच्यापासून दुसरी भाषा उत्पन्न होण्यास विरोध करतें. बोली जशी परिवर्तनशील असते तशी साहित्यिक भाषा असत नाहीं. परिवर्तनशील बोलीपासूनच दुसरी भाषा उत्पन्न होणें जास्त शक्य आहे. तेव्हा नूतनभाषोद्भवाचें कारण भाषेचें साहित्यिक स्वरूप हें नसून दुसरी कांही कारणें असलीं पाहिजेत. समाजाला धक्का बसल्याखेरीज कोणतीहि भाषा बदलणार कशी? लोकक्रांति, राज्यक्रांति, धर्मक्रांति वगैरेसारखा जबर धक्का समाजाला बसल्याखेरीज भाषा बदलत नाही. आर्यभाषेच्या स्वरूपांत निरनिराळीं अवस्थांतरें ज्या ज्या काळांत झालीं त्या त्या काळांत अशा तऱ्हेची क्रांति झाल्याचें इतिहासावरून दिसतें. मराठीच्या उत्पत्तीच्या बाबतींत असल्या प्रकारची झालेली क्रांति सांगण्यापूर्वी तिची उत्पत्ति कशी झाली हें सांगणें अवश्य आहे.

७४ मागील प्रकरणांत अनुक्रमाने पूर्ववैदिक, वैदिक, संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश इत्यादि आर्य भाषेचीं निरनिराळीं अवस्थांतरें व त्यांचीं रूपे

विशद केलीं. मराठीच्या ह्या पूर्वस्वरूपांचें स्पष्टीकरण करतांना एक दृष्टि समोर होती आणि ती म्हणजे भाषांच्या अंतरंगासंबंधी होय. भाषेचीं जीं बाह्य आणि आंतर अशीं दोन अंगें असतात त्यांपैकी भाषेचें स्वरूप विशद करतांना तिच्या बाह्य अंगाचा विचार न करतां अंतरंगाचाच विचार करावा लागतो. बाह्य स्वरूपांत केवळ शब्दांचाच संबंध येत असल्यामुळे त्यांचा विचार बाजूस ठेऊन वर्णप्रक्रिया, प्रत्ययप्रक्रिया, प्रयोगप्रक्रिया इत्यादि आंतर गाभ्यांतील बाबींचें जें स्पष्टीकरण केलें आहे, त्यावरून त्या त्या भाषेचें यथार्थ स्वरूप दिसेल; एवढेंच नव्हे तर मराठी भाषेचा उद्गम ठरविण्यासहि तें उपकारक होईल. पूर्ववैदिक, वैदिक, संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश इत्यादि भाषांच्या स्वरूपांवरून जर सहज नजर फिरविली तर त्या प्रत्येकीच्या स्वरूपांतील बरींच चिह्नें मराठींत आल्याचें दिसून येईल व अशा रितीने पूर्वींच्या निरनिराळ्या भाषांचीं बरींच साम्यें मराठींत आढळून येतात म्हणूनच मराठीच्या उद्गमासंबंधी विद्वानांमध्ये मतभेद झालेला दिसतो. मराठी भाषा पूर्ववैदिक भाषेपासून निघाली असें एक म्हणतो तर संस्कृतपासून निघाली असें दुसरा म्हणतो, तर तिसरा पालीशीं मराठीचें लेकीचें नातें जुळवितो. कोणी मराठीला प्राकृतोद्भव म्हणतो तर कोणी माहाराष्ट्रीस तिच्या मातृस्थानीं बसवितो. कोणी तिसरा माहाराष्ट्रीस बाजूस सारून अर्धमागधीस तो मान देतो. आणखी कोणी तर हे सर्व पक्ष बाजूस सारून अपभ्रंश भाषेपासून मराठी निघाली हा सिद्धांत स्थापित करण्यास पाहतो. मराठीच्या उद्गमासंबंधी अशा प्रकारचें मतवैचित्र्य आहे. ह्याचें कारण हे जे पूर्वभाषांतील अवशेष मराठींत उमटलेले दिसतात तें होय. पूर्वींच्या प्रकरणांत विवेचिलेल्या पूर्वभाषांचा आणि मराठीचा संबंध आहे; परंतु तो कुळाचा आहे. नात्याचा आहे. आपणास ह्याच संबंध सांगून भागणार नाही. मराठीची उत्पत्ति सांगावयाची म्हणजे ती अमक्या कुळांत झाली, अमकी अमकी तिची आजी, पणजी वगैरे परात्पर नातें सांगणें पुरें पडणार नाही. ती प्रत्यक्ष कोणत्या भाषेपासून जन्मास आली, तिची प्रत्यक्ष जननी—जन्म देणारी--कोण ह्याचाच तलास लाविला पाहिजे.

मराठी भाषेच्या उत्पत्तीचा निर्णय करतांना आपणास मराठीचा सांगाडा तपासला पाहिजे. तिच्या शब्दसंभाराकडे म्हणजे बाह्य स्वरूपाकडे

लक्ष न देतां तिचें आंतर स्वरूप–वर्ण, प्रत्यय व प्रयोग ह्या तिहींची प्रक्रिया तपासून ह्या तिन्ही बाबींत कोणत्या भाषेचा ठसा जास्त दिसतो हें पाहिलें पाहिजे. हें पाहिल्यावर कोणत्याहि एका पूर्व भाषेचा जशाचा तसा हुबेहुब सांगाडा मराठी भाषेने घेतला असें आपणास म्हणतां येत नाही. मराठींतील वर्णोच्चार, नामविभक्ति, आख्यातविभक्ति, सर्वनामें, संख्याविशेषणें, शब्दयोगी व इतर अव्ययें, लहान लहान निपात, विकारदर्शक अव्ययें व वाक्यरचनेचे जे निरनिराळे प्रकार आहेत ते तपासले म्हणजे निरनिराळ्या प्राकृत भाषांचे अवशेष मराठींत उतरल्याचें दिसून येतील. त्यांवरून एका कोणत्या तरी विशिष्ट भाषेपासून–उदाहरणार्थ, पाली, माहाराष्ट्री, मागधी, अर्धमागधी किंवा अपभ्रंश ह्यांपैकीं एकीपासून मराठी भाषा निघाली असें आपणास निश्चित रीतीने सांगतां येत नाही. मराठीच्या उत्पत्तीसंबंधी जे निरनिराळे सिद्धांत आजपर्यंत मांडले गेले आहेत त्यांचा प्रथम विचार करणें जरूर आहे.

( १ ) एक मत असें आहे की, वेदसमकालीन ज्या बोली होत्या त्यापासून मराठी उद्भवली, व ह्याला आधार म्हणजे वेदांत जे संस्कृत भाषेच्या स्वभावाशीं विसंगत व प्राकृत भाषांच्या स्वभावाशीं जुळणारे विशेष सापडतात ते होत. परंतु असल्या ह्या तुटपुंज्या पुराव्यावर मराठी भाषा त्या भाषांपासून उद्भवली असें म्हणतां येणार नाही. त्या भाषांचे कांही त्रोटक अवशेष मराठींत उतरले येवढेंच फार झालें तर म्हणतां येईल. शिवाय भाषेस शिष्ट व अशिष्ट किंवा नागर व ग्रामिक किंवा ग्रांथिक व बोली अशीं दोन स्वरूपें असतात. त्यांपैकी वेदकालीन भाषेंतहि दोन स्वरूपें होतीं हें उघड आहे. व परिणतीच्या दृष्टीने तत्कालीन बोलींतील कांही अवशेषांचें लेण मराठीपर्यंत येऊन भिडणें शक्य आहे. परंतु त्यावरून मराठीस साक्षात् जन्म देणारी ती कशी ठरेल? वेदकालापासून तों थेट खिस्तोत्तर ५००-७०० पर्यंत म्हणजे वर्तमानकालीन भाषांचा उदयापर्यंतच्या कालांत वेदसमकालीन प्राकृत भाषा वापरांत नव्हत्या असा इतिहास साक्ष देत आहे. तेव्हा मराठीच्या जननीचा शोध इतरत्रच आपणास केला पाहिजे.

( २ ) दुसरा एक पक्ष मराठीची जननी संस्कृत भाषा ही आहे असें

मानतो. वर दिलेला पक्ष ज्या कारणाने लंगडा दिसतो तेंच कारण ह्या संस्कृतपक्षासहि लागूं पडतें. केवळ वरवर जरी पाहिलें तरी संस्कृत ही मराठीची साक्षात् जननी ठरत नाही. वर्णांचे बदल, प्रयोगाची भिन्नता, उच्चारांत फरक, वाक्प्रचार वगैरे वगैरे बाबींत दोहींत भिन्नता तर स्पष्ट आहे. मराठी आणि संस्कृत ह्या दोहींत परात्पर नातें आहेच. ह्या दोहींत मध्ये अंतर्वर्ती पुष्कळ अवस्था प्राकृत भाषा म्हणून आहेत. भाषेच्या एकंदर परिणतीच्या किंवा वाढीच्या दृष्टीने अशा अवस्था उत्पन्न होणें अपरिहार्य आहे. तेव्हा मराठीच्या लगत पूर्वी साक्षात् जननी म्हणून संस्कृत भाषेस बसविणें म्हणजे अनैतिहासिक व अशास्त्रीय आहे.

(३) तिसरा एक पक्ष मराठीची उत्पत्ति बालभाषेपासून लावतो. परंतु भाषाशास्त्राच्या व एकंदर भाषिक संशोधनाच्या काळांत असलें ठोकळ मत मान्य व्हावयाचें नाही. बालभाषा म्हणजे प्राकृतभाषा असें समजलें तरी प्राकृत भाषेपासून मराठी उत्पन्न झाली ह्या नुसत्या म्हणण्यांत कांहीच अर्थ नाही. असल्या मोघम विधानाने समाधान व्हावयाचें नाही. प्राकृत पैकी कोणती प्राकृत हें निश्चित सांगून त्याचीं कारणें किंवा त्याच्यासाठी पुरावा दिला पाहिजे.

(४) प्राकृत भाषांच्या क्षेत्रांत आपण आलों म्हणजेहि मराठीच्या उत्पत्तीसंबंधी आणखी कांही मतें पुढे येतात. पाली, मागधी, अर्धमागधी, माहाराष्ट्री, अपभ्रंश इत्यादि भाषांप्रमाणे निरनिराळे पक्ष आहेत. व त्याप्रमाणे त्यांना पुरावाहि सापडतो व तो ते आपआपल्या मताच्या समर्थनार्थ पुढे आणितात. संस्कृत, प्राकृत, व अपभ्रंश ह्यांपैकी कोणत्या भाषेचे कोणते अवशेष मराठींत सापडतात हें पुढील परिच्छेदांत दिलेंच आहे. त्याकडे जर नजर फिरविली तर कोणत्याहि एका प्राकृतपासून मराठी उद्भवली असें आपणास म्हणतां येत नाही. प्राकृतोद्भव व प्राकृतिकोद्भव म्हणून ज्या कांही आधुनिक, वर्तमानकालीन बोली आहेत त्यांपैकी सिंधी, गुजराती, हिंदी किंवा बंगाली ह्यांसारख्या इतर प्राकृतिक वर्तमानकालीन बोली आणि मराठी ह्यांमध्ये फरक आहे. शौरसेनीपासून हिंदी, अपभ्रंशापासून सिंधी व गुजराती, मागधीपासून बंगाली अशा ह्या नवभाषांचा उद्भव मध्ययुगीन प्राकृतांपासून झाला असें म्हणतां येण्यासारखें आहे. अमक्या एका भाषे-

पासून दुसरी भाषा निघाली असें म्हणतांना जी भाषा उत्पन्न झाली तिने मूळ भाषेच्या व्याकरणाचा सर्वच्या सर्व सांगाडा उचलला असें दाखविण्याची जबाबदारी येऊन पडते. बंगालीने मागधीचें सर्व व्याकरणयंत्र जसेंच्या तसें उचललें आहे. त्याचप्रमाणे शौरसेनीचें व्याकरणयंत्र हिंदीने उचललें आहे. तोच प्रकार सिंधी, गुजराती आणि अपभ्रंश—आभीरांच्या भाषांचा आहे. परंतु मराठी भाषेचा सर्व सांगाडा माहाराष्ट्रीपासून किंवा अपभ्रंशापासून तंतोतंत घेतला असें दाखवितां येत नाही. अर्धनारीनटेश्वराच्या देहयष्टींमध्ये ज्याप्रमाणे अर्धा भाग पुरुषाचा व अर्धा भाग स्त्रीचा असा अनन्यसाधारण देखावा दिसतो व त्यावरच सृष्टींतील सर्व रमणीय अशा पसाऱ्याची उभारणी केलेली दिसते, तद्वत् मराठी भाषादेवीच्या देहयष्टीमध्ये अर्धा भाग माहाराष्ट्रीमय व अर्धा भाग अपभ्रंशमय असा अनन्यभाषासाधारण देखावा दिसतो व त्यावरच ह्या भाषादेवीने आपल्या सृष्टिकर्मांचा पसारा थाटला आहे. भाषेच्या पंचप्राणांपैकी निम्मा भाग कारकविभक्तींचा तर निम्मा भाग आख्यातविभक्तींचा. तेव्हा मराठीचा ह्या पंचप्राणांपैकी निम्मा भाग जो कारकविभक्तींचा-नामांचे प्रत्यय वगैरे तो अपभ्रंश भाषेपासून तिला प्राप्त झालेला दिसतो व राहिलेला निम्मा भाग जो आख्यातविभक्तींचा—क्रियापदांचे प्रत्यय वगैरे--तो माहाराष्ट्रीपासून घेतलेला दिसतो.

७५ निरनिराळ्या प्राकृत भाषांमधून ज्या कांही लकबा मराठींत उतरल्या आहेत व ज्यांच्यामुळे मराठीचें जननीत्व त्या त्या भाषेकडे देण्याचा मोह उत्पन्न होतो त्या क्रमाने खाली दिल्या आहेत.

(१) प्राकृत भाषांची आद्य अवस्था जी पाली भाषा तिच्यामधील कांही गोष्टी मराठीमध्ये आलेल्या आढळतात. कांही शब्दांचीं वर्णप्रक्रियेमुळे झालेलीं रूपांतरें पालीमध्ये जीं आढळतात तींच मराठीमध्ये आलेलीं आहेत. तिण (तृण), पाऊस (प्रावृष्), पिळणें (पीडनं), छकडा (शकट), गूळ (गुड), अस्वल (ऋच्छभल्ल), रूख (वृक्ष) इत्यादि शब्द पाली भाषेच्या स्पष्ट छापाचे मराठींत रूढ आहेत. ह्या वर दिलेल्या शब्दांचीं रूपें तृण, पाऊस, पीडण, साटी, रीस, वच्छ अशीं इतर प्राकृत भाषांत होतात. हीं रूपें मराठींत फारशीं रूढ नाहींत व जरी थोडीं कोठे असलीं तरी पालीमधीलहि रूपें रूढ आहेत. दुसरी गोष्ट

पालीमधील 'ळ' कारासंबंधीची. पालीमध्ये 'ळ' कार ही एक विशिष्ट बाब आहे. 'ळ' हा वर्ण पाली--पैशाचीखेरीज इतर प्राकृत भाषांमध्ये नाही. 'ळ' कार संस्कृतमध्ये नाही. वैदिक भाषेंत आहे. तेथूनच तो पालींत उतरला असावा. 'ळ' कार हा मूर्धन्य वर्ण असल्यामुळे इतर मूर्धन्य वर्ण जसे द्राविडी भाषेच्या संपर्काने आर्यभाषेंत शिरले तसा 'ळ' हा वर्णहि त्यांच्या बरोबर द्राविडी भाषेंतून शिरला असावा. हा तेलगू भाषेंतून मराठींत आला[1] असें म्हणण्या ऐवजी जुन्या द्राविडी भाषेंतून जुन्या आर्यभाषेंत व तेथून मराठींत उतरला हें म्हणणें अधिक योग्य होईल. 'शिष्ट मराठी भाषेंत ह्या 'ळ' काराच्या उच्चाराकडे बरीच प्रवृत्ति असलेली दिसून येते. दुर्मिळ, नळ, डाळिंब, ओंजळ, सावळा, सळई, सोमळ, आळें, फळें, काजळ, मिळणें, इत्यादि अनेक संस्कृतोद्भव शब्दांत 'ळ'कारच शिष्टमान्य आहे. जळ, मळीण, पडळ, जळधि, कमळ, सकळ, पाळण, प्रेमळ, इत्यादि शब्दांत तो वैकल्पिक आहे. कित्येक शब्दांत 'ल'कारा ऐवजी 'ळ'कार घातल्यास अर्थ सर्वस्वी बदलतो, म्हणजे ते स्वतंत्र अर्थाचे निराळेच शब्द होतात. उदा:— चूल, चूळ; बोल, बोळ; कळ, कल; गाल, गाळ; नील, नीळ; वेल, वेळ इत्यादि. ह्या उदाहरणांवरून मराठींतील'ळ'काराचें महत्त्व चिंतनीय आहे.' जुन्या पेशवाईकाळच्या मराठी लिखाणांत 'ल' हाच जास्त प्रचारांत असलेला दिसतो. ते 'ळ' दाखविण्याकरितां 'ल' च्या मागे एक 'त्' कार जोडत असत. 'त्ल' हें प्रतीक 'ळ' बद्दल वापरीत असत.

(२)पैशाची भाषेंतील जी लकब मराठी भाषेंत राहिली ती 'ण'व'न' ह्यांसबंधी होय. पैशाचीशिवाय इतर प्राकृत भाषांत 'ण'कार आहे. परंतु 'न'कार नाही. उलट पैशाचींत 'न'कार आहे पण 'ण'कार मुळींच नाही. 'गुणगणगणना' हें पैशाचींत 'गुनगुनगनना' असें स्वरूप धारण करतें. पैशाची भाषेची ही लकब शिष्ट मराठींतहि बरेच वेळां चमकते. उदा:— ऊन (उष्ण), तहान (तृष्णा), कान (कर्ण), रान (अरण्य), जानवें (यज्ञोपवित), विनंती (विण्णतिआ), सुनें (सुण्ण) इत्यादि पुष्कळ.

---

[1] वैद्य, भा. इ. सं. मं. त्रैमासिक १३-१.

शब्दांत संस्कृतांतील अगर प्राकृतांतील 'ण'कारा ऐवजी 'न'कारच मराठींत शिष्टाभिमत आहे.

(३) मागधी ह्या प्राकृत भाषेनेहि मराठींत आपल्या स्मृतीचीं कांहीं चिन्हें ठेवून दिलेलीं आहेत. मागधी प्राकृताचा असा एक विशेष आहे कीं 'र'कार व 'स'कार या दोहोंबद्दल 'ल'कार व 'श'कार हे वर्ण अनुक्रमें येतात. तसेंच संस्कृत 'स्थ' अगर 'र्थ' ह्या जोडवर्णाबद्दल मागधींत 'स्त' होतो. तसेंच 'ष्ट' ह्या वर्णाबद्दल मागधींत 'स्ट' होतो. ह्या प्रकारांपैकीं बरेच प्रकार ग्रामिक मराठींत तर रूढ आहेतच, परंतु बऱ्याच शिष्टांच्या तोंडींहि आढळतात, व क्वचित् त्यांच्या लेखांतहि चमकतात. उदा:- ओशाळणें (अपसर), मिसळ (मिश्र), घोळतो (घूर्णते), जोशी (जोइसी), केशर (केसर), पेलणें (प्ररणम्). क्वचित् ठिकाणीं हा प्रकार विकल्पेंकरून होतो. उदा:- वोख, वाळव; भरभर, भळभळ; खर, खळ; सरभेसळ, सळभेसळ.

( ४ ) अर्धमागधी प्राकृतचे बरेच विशेष मराठीमध्ये आढळून येतात. अर्धमागधी आणि माहाराष्ट्री ह्या दोन्ही भाषा पुष्कळ अंशाने सारख्या स्वरूपाच्या असल्यामुळे अर्धमागधीचे जे विशेष मराठींत आढळतात ते माहाराष्ट्रीच्या विशेषांशीं जुळले तर नवल नाही. जो प्रांत मराठीने सध्या व्यापिला आहे त्यामध्ये जैन धर्मीयांनी आपल्या धर्माच्या प्रसारासाठी पुष्कळ प्रयत्न केला. जैन धर्मीयांची धर्मभाषा अर्धमागधी असल्यामुळे मराठीच्या स्वरूपाच्या घटनेंत अर्धमागधीचा खालील बाबींत संबंध आला आहे.

१ दीर्घ स्वर ह्रस्व करण्याची लकब जी अर्धमागधीमध्ये दिसून येते ती मराठीने उचललेली आहे. उदा०-कुमर ( कुमार ), केलें ( कृतम् ).

२ व्यंजनांच्या बाबतींत अर्धमागधींतील बरेच फरक मराठीने घेतले आहेत. 'त' चा लोप अर्धमागधीप्रमाणे मराठींतहि होतो. भूतकालवाचक धातुसाधितांतील 'त' चा लोप मराठींत नेहमी होतो. 'खादिलें' ह्या एकाच रूपांत तो 'द' च्या स्वरूपांत राहिला आहे.

३ मृदु व्यंजनें कठोर करण्याचा जो अर्धमागधीचा स्वभाव तो

कोंकणी मराठींत कोठे कोठे दिसून येतो. उदा०–मच्चइ < मार्यात, वच्चइ < व्रजति ( वोचूं–कोंकणी मराठी ).

४ व्यंजनांत कधी कधी महाप्राण येतो. उदा०–घेणें < गृह्.

५ आद्य 'द्' चा 'ड्' होण्याची क्रिया अर्धमागधी, माहाराष्ट्री आणि मराठी ह्या तिहींत सारखीच आहे. उदा०–डसतो < डसइ < दशति, डाह < डाहइ < दहति; डोळा, डोलते < डोला, डोल्लइ < दोलयति; डरणें < डरइ < दरइ; डोहळा < डोहलअ < दोहलक.

६ आद्य न् आणि द्वित्त न्न् मराठींत न् आणि न्न् च राहतात. मध्य 'न्' चा 'ण्' होतो. ही प्रवृत्ति अर्धमागधी आणि जैन माहाराष्ट्री मधून मराठींत आली आहे. उदा०–पन्नास < पण्णासअ < पञ्चाशत्. फणस < पनश. प्रत्ययाच्या बाबतींत माहाराष्ट्रीचे जे विशेष मराठींत आलेले आढळतात ते अर्धमागधीचे जर मानिले तर त्यांत फारशी चूक होणार नाही.

(५)माहाराष्ट्री भाषेचें बरेंच ऋण मराठीने घेतलें आहे.माहाराष्ट्री भाषा प्रत्यक्ष बोली असो वा नसो, ती महाराष्ट्राची भाषा असो वा नसो. ती प्रामुख्याने पुष्कळ शतकें ग्रांथिक भाषा म्हणून मोठमोठ्या नामांकित ग्रंथकारांकडून आदरिली जात होती हें खास; तेव्हा अशा शिष्टाभिमत भाषेचा ठसा उत्तरकालीन बोलीवर उठणें साहजीक आहे. माहाराष्ट्री म्हणजे मुख्य प्राकृत व तशा दृष्टीने तिची विचिकित्सा मागे विस्ताराने केलेली आहे ती येथें उपयोगी पडेल. मराठींत उतरलेल्या तिच्यांतील मुख्य मुख्य बाबीच फक्त येथे एकत्र नमूद करतों.

१ अकारान्त नपूसकलिंगी नामें जशीं माहाराष्ट्रींत लिंग बदलत नाहीत तशीं मराठींतहि बदलत नाहीत.

२ मराठींतील द्वितीयेचा 'स' प्रत्यय माहाराष्ट्रींतील षष्ठीचतुर्थीच्या 'स्स' प्रत्ययावरून आला आहे. उदा०–हत्तीस < हत्तिस्स; आगीस < अग्गिस्स < अग्नेः.

३ माहाराष्ट्रींतील आख्यातविभक्तींतील बरेच प्रकार मराठींत उतरले आहेत. काळ व अर्थ ह्याचे प्रत्यय मराठीने माहाराष्ट्रीपासून घेतलेले दिसतात. एकंदर आठ लकारांपैकी लट् (=वर्तमान) मध्ये मराठीने-

अपभ्रंशाला सोडून माहाराष्ट्रीचेंच ज्यास्त अनुकरण केलें आहे. लिङ् (विध्यर्थ), लोट् (आज्ञार्थ), लङ् (अनद्यतनभूत) ह्यांमध्येंहि माहाराष्ट्रीचेंच मराठीने अनुकरण केलेलें आढळतें. मराठींतील कर् ह्या धातूची (लृट्) भविष्यकाळाचीं रूपें माहाराष्ट्रींतील रूपांवरून कशीं आलीं आहेत हें खाली दिलेल्या उदाहरणांवरून कळेल.

करिस्साभि > करिहिमी > करिइइं > करीं + ल = करीन. करिस्सामो > करिहिमो > करिहिमु > करिइउँ > करउं > करूं + ल > करून > करूं. करिस्ससि > करिहिसि > करिइसि > करिशी + ल = करिशील. करिष्यथ > करिहित्था > करिइहा > कऱ्या > करा + ल = कराल.

४ करीत, मानीत, धरीत, घालीत, लिहीत वगैरे सेट् क्रियापदांची वर्तमान कृदन्तें 'इत्' आगम होऊन होतात. हा 'ईकार' माहाराष्ट्रींतून आला आहे.

५ इडागम घेण्याचा व न घेण्याचा किंवा विकल्पाने घेण्याचा गुण मराठीने माहाराष्ट्रीपासून घेतला आहे.

६ इच्छार्थक धातु मराठींत माहाराष्ट्रीद्वारा आले आहेत. उदा.—बुभुक्ष > बुभुक्ख > बुभुक. चिकित्स > चिइच्छ > चेच. ध्यास, प्यास, ईर, रेच इत्यादि.

७ 'मी' ह्या सर्वनामाच्या बाबतींत मराठींतील सर्व रूपें माहाराष्ट्रींतील रूपांशीं जुळतात. अपभ्रंशांतील प्रथमपुरुष सर्वनामाच्या रूपांशीं जुळत नाहीत. एकवचनाचीं रूपें—उदा०—अहम्मि, अम्मि, म्मि > मी. अम्मि, मि > मी, मीं, मज. मए, मइ > मिया, मियाँ, म्याँ. मज्झत्तो, महाहिंतो > मजहूनि. मज्झ > मज. मइ, मि > मी, मज. मेज्चअ > माझ.

अनेकवचनाचीं रूपें—उदा०— अम्हे > आम्ही.अह्मे > आम्हीं. अम्हाहिं > आम्हीं, आह्माँ. अह्मसुंतो > आह्माहुनी. अह्म > आह्मां. अम्हेसु > आह्मांत.

'तूं' ह्या सर्वनामाचीं रूपें कांही थोड्या बाबतींत माहाराष्ट्रींतील 'तुम्' च्या रूपांशीं जुळत नाहीत.

८ मतुबर्थक 'ल' जो संस्कृतमध्ये आहे तो माहाराष्ट्रींत व मराठींत स्वार्थक झाला आहे, म्हणजे त्या 'ल' ला कांही विशेष अर्थ नाही.

९ माहाराष्ट्रींत क्त व क्तवतु प्रत्यय लागून झालेलीं धातुसाधित विशेषणें भूतकालाचें बरेंच काम करीत. तोच कित्ता मराठीने गिरविला आहे. रीतिभूतकाळाच्या रूपांबरोबर वर्तमान व भूत ह्या दोन काळांचीं धातुसाधितें मराठींत भूतकाळ दाखविण्याकरितां योजतात.

१० तारतम्याचा गुण मराठीने माहाराष्ट्रीपासून घेतला आहे.

(६) मराठीमध्ये कांही विशेष असे आहेत की, ते माहाराष्ट्री व अपभ्रंश ह्या दोन्ही भाषांमध्ये आढळून येतात. ते पूर्वीच्या प्राकृत भाषांतून परंपरेने आले असावेत हेंच अनुमान करणें प्राप्त आहे. असे दोन्ही भाषांना साधारण असलेले विशेष खाली दिले आहेत.

१ दंत्यतालव्य व्यंजनें संस्कृतांत नाहीत, माहाराष्ट्रींत व अपभ्रंशांत आहेत. ज् अथवा ज्य् याचा दन्त्यतालव्य 'ज़्' करण्याकडे माहाराष्ट्रीची प्रवृत्ति आहे.

२ नामें व्यंजनान्त न ठेवितां स्वरान्त करण्याची प्रवृत्ति माहाराष्ट्री व अपभ्रंश ह्या दोन्हींमध्ये आहे तीच मराठीने उचलली.

३ संस्कृत एतत् व इदं ह्या सर्वनामांपासून आ प्रत्यय माहाराष्ट्री व अपभ्रंश ह्यांच्या मार्फत मराठींत आला आहे.

४ विशेष्याची जी विभक्ति तीच विशेषणाची ठेवण्याची जी प्रवृत्ति संस्कृत, माहाराष्ट्री, अपभ्रंश ह्यांमध्ये दिसून येते तीच कधी कधी मराठींतहि दिसते.

५ पौनःपौन्यवाचक धातु मराठींत माहाराष्ट्री व अपभ्रंश ह्यांपासूनच आले आहेत. उदा०–ढंढल्ल > ढेंढळ; ढुंडल > ढंडल > ढढुल > धुंडाळ; जग्ग > जाग; चकम्म > चकव.

६ मराठींतील कांही शब्दांचीं लिंगें माहाराष्ट्री व अपभ्रंश भाषेंतील लिंगाप्रमाणे आहेत. उदा.–पाऊस, जन्म, सरा, नयन हे पुंलिंगी. व अंजली, गाठ हे स्त्रीलिंगी आहेत.

(७) आता केवळ अपभ्रंशामधून मराठींत कोणकोणते विशेष आले आहेत ते पाहूं. अपभ्रंश ही आभीरांची भाषा होती व ही आभीरांची जात उत्तरेकडून सिंध प्रांतांतून गुजरातेंत, तेथून कोंकणांत व विदर्भाच्या कांही भागांत येऊन तेथे स्थायी झाली. त्यामुळे अपभ्रंशाचे बरेच अवशेष मराठींत सापडणें शक्य आहे.

नामाला लागणारे विभक्तींचे प्रत्यय मराठीने अपभ्रंशापासून घेतले आहेत. सर्व विभक्तिप्रत्यय अपभ्रंशोत्पन्न आहेत[१].

१ अकारान्त पुंल्लिंगी नामाचें एकवचन 'उकारान्त' होतें. शब्दांतील उपान्त्य वर्ण जर 'य्, व्' किंवा 'ह्' असेल तर मात्र तें रूप ओकारान्त होतें.

२ प्रथमेच्या रूपाप्रमाणे द्वितीयेचीं रूपें तयार करण्याची तऱ्हा मराठी व अपभ्रंश ह्या दोहोंमध्ये एकच आहे.

३ अपभ्रंशामध्ये 'पुत्तेण्' अशा उच्चाराचें रूप होतें. त्यापासूनच मराठी रूप 'पुत्तें' हें उद्भवलें. मेघें, ईश्वरें, ईश्वरेंसीं (ईश्वरेण + समम्) हीं रूपें तशींच आहेत. तृतीया व सप्तमी ह्या विभक्ति एकमेकींबद्दल मराठीप्रमाणे अपभ्रंशांतहि चालतात.

४ तृतीया, षष्ठी, सप्तमी, संबोधन ह्या चार अनेकवचनी विभक्तिप्रत्ययांचे अंत्य स्वर अपभ्रंशाप्रमाणे मराठींत सानुनासिक आहेत.

५ अपभ्रंशांत करेवि, पालेवि वगैरे इकारान्त अव्ययें होतात. त्याचप्रमाणे मराठींतहि 'ऊन' प्रत्ययान्त जीं अव्ययें आहेत तीं 'इ' कारान्त होतात. असलीं इ-कारान्त अव्ययें जुन्या पद्यांत आढळतात. उदा०— जिणूनि, हसुनि इत्यादि.

६ अपभ्रंशांत प्पिणु, पिणु, विणु असे उ-कारान्त प्रत्यय लावून अव्ययें तयार करतात. त्याचप्रमाणे मराठीच्या जुन्या लिखाणांत 'उ' प्रत्ययान्त अव्ययें तयार केलेलीं आढळतात. उदा०— करूनु, घेऊनु, हसुनु इत्यादि.

---

१ राजवाडे ज्ञानेश्वरी व्याकरण, पृ.४९

७ भाववाचक नामें तयार करण्याचा प्रत्यय अपभ्रंश भाषेंत 'प्पण' असा आहे. तोच प्रत्यय मराठीने उचलला आहे.

८ सामान्यरूप साधण्याचा प्रकार मराठीने अपभ्रंश भाषेपासून उचलला असण्याचा संभव आहे. अपभ्रंशामध्येहि नामाचें सामान्यरूप होऊन नंतर विभक्तीचे प्रत्यय लागतात.

९ मराठीच्या जन्मापासून तिच्या काव्याला अन्त्ययमकाचें सुंदर लेणें लाभलें आहे. मराठीप्रमाणे इतर वर्तमानकालीन बोलीमध्येहि अन्त्ययमकाचें प्राबल्य दिसून येतें. हें अन्त्ययमक अपभ्रंश भाषेमधून आलें आहे. अपभ्रंश भाषेंतील सर्व पद्यवाङ्मय अन्त्ययमकयुक्त आहे. संस्कृत, पाली व इतर प्राकृत यांत हा प्रकार नाही.

१० अन्त्ययमकाप्रमाणेच अपभ्रंश भाषेंतील कांही च्छंदाचे प्रकारहि मराठीने घेतले आहेत. प्रचलित च्छंदाचें प्रथक्करण केलें तर दोहोंमधील साम्य दृष्टीसमोर आल्याविना राहणार नाही.

(८) प्राकृत भाषांपैकी निरनिराळे अवशेष जसे मराठींत सापडतात तसे संस्कृत भाषेचे सुद्धा अवशेष मराठींत सापडतात. व ह्यांत कांही फारसें आश्चर्यहि नाही. मराठीच्या उद्गमाच्या पूर्वी व नंतर ज्या कांही सनातनी धर्मीय राजांच्या राजवटी झाल्या त्यांत त्यांनी आपल्या अमदानींत संस्कृत भाषेस आश्रय देऊन तिचा चांगला पुरस्कार केल्यामुळे प्राकृत भाषांच्या काळांत व पुढे देशी भाषांच्या काळांतहि संस्कृतचे कांही ठसे प्राकृत भाषांवर व पुढे देशी भाषांवरहि उमटले. अशा अवशेषाचीं कांही उदाहरणें खाली देतों.

१ ऋ, ॠ, ऐ, औ हे वर्ण संस्कृतांत व मराठींत आहेत. प्राकृतांत नाहीत. ह्यावरून ते संस्कृतामधून आले आहेत हे निश्चित.

२ ङ्, ञ् हीं दोन अनुनासिकें संस्कृतांत आहेत; प्राकृतांत नाहीत. मराठींत संस्कृतसम शब्दांत आहेत. संस्कृत मधूनच तीं आलीं आहेत.

३ मराठींत भावे क्रियापदांचीं रूपें तृतीय पुरुषीं एकवचनीं तेवढीं चालतात. हा गुण मराठीने संस्कृतपासून घेतला आहे. मराठींत कर्ता प्रायः

चतुर्थ्यंत किंवा च-कारान्ताच्या तृतीयान्त असतो. उदा:– मला कळमळतें; मला जाववतें; माझ्याच्याने जाववतें.

४ संस्कृतमधून शब्दांचें ऋण तर मराठीने अमूप घेतलें आहे. तद्भव शब्दांचा भरणा आहेच. परंतु तत्सम शब्दहि कांही कमी नाहीत. एकंदर शब्दसमूहांपैकी जवळ जवळ ११/१५ शब्द अस्सल संस्कृत शिक्क्याचे आहेत. तद्भव शब्दांच्या बाबतींतहि त्यांच्या बरोबरीने मूळ संस्कृतशब्द रूढ आहेत. “ पूर्वीच्या प्राकृत ग्रंथभाषा व त्यांचे अपभ्रंश यांच्या द्वारा अपभ्रष्ट होऊन आलेल्या शब्दांची अंतिम रूपें जशीं आढळतात, तशींच संस्कृतशब्दांचीं स्वतंत्र रूपान्तरें झालेलींहि दिसून येतात. यांपैकी पूर्वपरंपरेने अंगवळणी पडून हाडीमांसीं खिळलेले शब्दापभ्रंश नियमित अर्थाने शिष्टांनी मराठींत मान्य केलेले आहेत.

७६ ह्या सर्व विवेचनावरून व उदाहरणांवरून मराठी भाषा अमुक एका प्राकृत भाषेपासून उत्पन्न झाली असें आपणास म्हणतां येत नाही. सर्व प्राकृत भाषा, अपभ्रंश व संस्कृत ह्या भाषांनी आपआपल्यापरीनें मराठीस जन्माला आणण्यास हातभार लावलेला दिसतो. निरनिराळ्या प्राकृत भाषा बोलणारे निरनिराळे समाज निरनिराळ्या काळीं वरून आर्यावर्तातून अनेक कारणामुळे महाराष्ट्रांत उतरले आणि तेथे स्थायी झाले. त्याच्या संमिश्र बोलण्यानेच मराठी भाषा बनली. महाराष्ट्रदेश ज्याप्रमाणे गोपराष्ट्र, मल्लराष्ट्र, अश्मक, कुन्तल, विदर्भ, कोंकण इत्यादि लहान लहान देशविशेषाचा मिळून बनला व महाराष्ट्राची लोकवसाहत ज्याप्रमाणे निरनिराळ्या लोकघटकांची मिळून झाली त्याचप्रमाणे मराठी भाषा ही निरनिराळ्या प्राकृत भाषांच्या मिश्रणाने बनली. महाराष्ट्रदेश, मराठा समाज व मराठी भाषा ह्यांची घटना वर दिलेल्या रीतीने खिस्तोत्तर ६००–७०० च्या सुमारास झाली.

## मराठीचा उत्पत्तिकाल

७७ मराठी भाषेच्या घटनेच्या बाबतींत कोणकोणत्या प्राकृतचें कितपत अंग आहे ह्याची योग्य कल्पना वरील विवेचनावरून येईल. आतां हा प्रकार केव्हा झाला हें पाहूं. मराठी भाषेच्या पूर्वी लोकांच्या वापरांत

असणाऱ्या प्राकृत व अपभ्रंश ह्या भाषांचा अस्त केव्हा झाला व मराठीचा उद्गम केव्हा झाला हें आपणास ठरविलें पाहिजे. भाषेचा उद्गमकाल नक्की ठरविणें हें फार कठीण आहे. नवी भाषा आस्ते आस्ते लोकमान्य होत असतांना जुनी मुमूर्षु भाषा कांही कालपर्यंत प्रतिष्ठित ग्रंथकार व लोक लिहीत व बोलत असतात. पाली, शौरसेनी, माहाराष्ट्री वगैरे प्राकृत भाषा लोकमान्य होत असतांना पाणिनीय संस्कृत भाषा प्रतिष्ठित लोकांत सुरू होती. अपभ्रंश भाषा सुरू होत असतां चांगले चांगले ग्रंथकार प्राकृत भाषा लिहीत असत. आणि आधुनिक बोली सुरू झाल्यावर देखील पुष्कळ वर्षे अपभ्रंश व प्राकृत भाषांत ग्रंथ लिहिले जात असत. अपभ्रंश भाषेंत तर खि. उ. १२०० पर्यंत चांगल्या उत्तम प्रकारची व पुढे १५०० पर्यंत थोडथोडी ग्रंथरचना झालेली आहे. तेव्हा पूर्व भाषांचा अंत व नवीन भाषांचा जन्म ह्या दोन्ही गोष्टी एकसमयावच्छेदाने होणें शक्य नाही. महाराष्ट्रांत मराठी जन्मास येण्यापूर्वी अमुक एक विशिष्ट प्राकृत भाषा लोकांच्या बोलण्यांत होती असें आपणास सांगतां येत नाही. महाराष्ट्रांतील लोकसमाज कोणतीहि एक विशिष्ट प्राकृत बोलत नसून निरनिराळ्या प्राकृत भाषा बोलणारे निरनिराळे समाज होते व ते एकवटून त्यांच्या मिश्रणाने महाराष्ट्रांतील समाज बनला व त्यांच्या भाषांच्या मिश्रणाने बनलेल्या मिश्र प्राकृतापासून मराठी भाषा बनली. शौरसेनी भाषा बोलणारे राष्ट्रिक लोक, मागधी व माहाराष्ट्री बोलणारे महाराजिक व महाराष्ट्रिक लोक, अपभ्रंश भाषा बोलणारे वैराष्ट्रिक व आभीर लोक महाराष्ट्रांत येऊन मिसळले. त्यांच्या मिश्रणापासून मराठा समाज बनला व त्याच्या भाषांपासून मराठी भाषा बनली. मराठी भाषा प्रत्यक्ष जन्मण्यापूर्वीच्या संधिकालांत एक दोन शतकें एखादी मिश्र प्राकृत किंवा मिश्र अपभ्रंश प्रचारांत असावी.

मराठी भाषेच्या उत्पत्तीचा काळ नक्की ठाम करण्यास खात्रीलायक असा आधार प्राकृत व अपभ्रंश ह्या भाषांवरून मिळण्यासारखा नसल्यामुळे आपणास मराठी भाषेंतीलच आधार घेणें जरूर आहे. मराठी भाषा बोली म्हणून लोकांच्या वापरांत असल्याबद्दलचा जुन्यांतील जुना पुरावा कोणत्या काळांतील आहे हें पाहिल्यानेच मराठीचा उत्पत्तिकाळ निश्चित होईल. मराठीमध्ये उत्तम प्रकारची आदरणीय अशी ग्रंथरचना झालि-

वाहन शक १२१२ ( इ. स. १२९० ) मध्ये झाली होती हें ज्ञानेश्वरीव-रून उघड आहे.[1] मुकुंदराजाचा विवेकसिंधु(श. १११०)व चक्रधरादिकांचें मानभावी वाङ्मय ( श. ११८५ ) हें मराठी वाङ्मय ज्ञानेश्वरीच्या पूर्वीचें समजलें जातें. ज्ञानेश्वरीविवेकसिंधुसारखे ग्रंथ प्रसविण्याची शक्ति कोण-त्याहि भाषेंत तिच्या जन्माबरोबर येणें शक्य नाही. ग्रंथकर्तृत्व हें पायरी-पायरीने वाढत जातें. तेव्हा हे ग्रंथ प्रथमचे नसून मराठीच्या विकासाच्या त्या कालच्या निशाण्या आहेत. त्यांच्या पूर्वी कित्येक ग्रंथ निर्माण कर-ण्याची ताकद मराठी भाषेंत व महाराष्ट्र लेखकांच्या लेखणींत निःसंशय असली पाहिजे. ज्ञानेश्वरीविवेकसिंधूच्यापूर्वी वेदांताशिवाय कांही तरी इतर भावनाप्रधान बालवाङ्मय मराठींत निर्माण झालेंच असलें पाहिजे. हें जें वाङ्मय तेंच मराठीचें बालपण.

ज्ञानेश्वरींत पदोंपदीं आढळून येणारें अनेकविध उपमांचें प्राचुर्य, भाषेचें सौंदर्य, शब्दांचें ऐश्वर्य, कल्पनांचें प्रागल्भ्य, वाटेल तसा आकार घेण्याची भाषेची क्षमता, मनांतील भावार्थ हरतऱ्हेने विशद करण्याची हातोटी वगैरे भाषेंतील वरवर दिसणारे, बुद्धीला पटणारे व हृदयाला उचंब-ळविणारे असे दोन्ही प्रकारचे गुण भाषेंत कांही जन्मतःच येत नाहीत. हीच गोष्ट विवेकसिंधु आणि मानभावी वाङ्मयाची. मराठीच्या लहान-पणच्या बाळसेदारपणाची अंधुक का होईना पण कांही तरी कल्पना करून देणारें वाङ्मय दुर्दैवाने आज उपलब्ध नाही. त्याच्या अभावीं ज्ञानेश्वरी व मानभावी वाङ्मयाच्या पूर्वीचा काळ अंधःकारमय आहे. ह्या निबिड अंधकारांत कोठे कोठे कोपऱ्यांत कांही तुटपुंजी शिलालेख, ताम्रपत्रें, उल्लेख वगैरे साधनें आपापल्या परीने प्रकाश पाडण्याचें काम करतात. ह्या प्रका-शाच्या साहाय्याने थोडीशी वाट काढणें शक्य आहे.शिलालेखांवरून तत्का-लीन भाषेचें अस्तित्व तर सिद्ध होतेंच.परंतु ते'दगडावरील रेघा'या प्रकारचें असल्यानें त्यांच्यांत संस्करण अथवा अर्वाचीकरण सुतरां अशक्य असतें; म्हणून तत्कालीन भाषेचें स्वरूप अजमाविण्यास तीं खात्रीलायक साधनें होत. अशा ह्या खात्रीलायक शिलालेखांवरून मराठीच्या उत्पत्तीचा काळ कोठपर्यंत मागे जातो हें पाहूं.

---

१ शके बारा शतें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें ॥ ज्ञाने. १८-१७९२.

(१) ज्ञानेश्वरीच्या एकच वर्ष पूर्वीचा म्हणजे शक १२११ (इ. स. १२८९) मधील निझामशाहींतील उनकेश्वराचा शिलालेख आहे[१]. ह्या लेखांत रामचंद्र यादव, त्याचा एक नातलग वंकदेव, त्याचा करणाधिप हेमाडी पंडित, त्याचा हस्तक सोमदेव पंडित व माहूरचा रहिवासी सरणनायक, इतक्यांची नांवें असून सरण नायकानें उनकेश्वराच्या देवालयाचा जीर्णोद्धार केल्याचा उल्लेख आहे. लेखांत १८ ओळी आहेत, त्यांपैकी पहिल्या ८ ओळी पुढे दिल्या आहेत.

१ ॐनमो गणाधिपतये नमः स्वस्ती सी सके १२११॥ वीक्रम सवत्सने आ...स्व...

२ प्रताप चक्रवर्तिः स्री रामचंद्रदेवः विजयोप्रत पाद पदुमोपजिविः द्वाचि साहा स्री वकदे

३ वः प्रधान हेमाडिपंडित..तं निरोपीत नाएकु टकतु सोमदेयो पंडितः तस्मिकाले वर्तमाने

४ त्रेता युगी रामुः वनवासप्रसंगी : सरभंगाचआ आस्रमा आले : सरभंग प्रीत्यर्थ : हे उद

५ दक उष्ल केले : तदा काल्ये स्सि देवराचित तीर्थ हे: हरीहरा प्रसादे मातापुरनिवासी क-सी-

६ ष्य: कौंडण्यगोत्रः सरणुना एकः स्तेमेर्वृतेर्वेः सकल प्रासादारंतु केले : तो राम प्रासादं संपुर्ण

७ जाला : तेयाचा नमस्कारु : हरीहरा....देवता सकलासि

८ नमस्कारु त्रिकालः वाचिता विजैया......लटिग्रामु ॥ २ ॥

ह्या पुढे देवालयास दान दिल्याचा उल्लेख आहे. ह्या लेखांतील भाषा संस्कृतमिश्र मराठी आहे. कांहीं रूपें अस्सल मराठी शिक्क्याचीं आहेत.

(२) ह्याच रामदेव जाधवाच्या राजवटींतील शके १२०७ म्हणजे ज्ञानेश्वरीच्या ५ वर्षे पूर्वीचा सासवड (पुणें) जवळ पूर गांवांत एक शिलालेख आहे[२]. ह्यामध्ये अकरा ओळी असून त्यांतील बराच भाग त्रुटित आहे. लेख पुढीलप्रमाणे आहे.

---

१ देशपांडे. भा. इ. सं. मं. त्रै. ९.१. पृ. २९-३०.

२ खरे द. म. इ. सा. खं.१ पृ. ४५

स्वस्ति स्री सकू १२०७
वर्षे प (पा) र्थिव सवछरे
आस्विन (ना) दौ अद्येह स्री
म प्रौ (प्रौ) ढप्रताप चक्रव
र्ती स्रीरामच (चं) द्रदेवविजय
राज्योदे तदपादपदुमोपजिविस
कळक.र्णा (रणा) धिप...हेमाडि पंडि
तो। त बोंइ...दंडनायक स्रीपत प (प्र) मु (भु?)
णें नायक। रामचंद्रदेवों नाडिती जीवि......
ळक कुळ....
....सोडि....

(३) ज्ञानेश्वरीच्या पूर्वी सतरा वर्षे म्हणजे शके ११९५ (सन १२७३) मध्यें कोरलेला पंढरपूरच्या श्री विठ्ठलाच्या मंदिरांतील शिलालेख आहे. ह्यालाच लोक भाविकपणाने चौऱ्यायशीची शिळा म्हणतात. ह्या शिळेस पाठ लाविली म्हणजे मनुष्य चौऱ्यायशी योनींतून मुक्त होतो अशी समजूत आहे. श्री विठ्ठलाचें मंदिर बांधण्यासाठी वर्गणी गोळा करण्यांत आली त्या वेळेस ज्यांनी ज्यांनी मदत केली त्यांचीं नांवें त्या शिळेवर आठ रकाने काढून त्यांत कोरलीं आहेत. ह्या यादींत त्या वेळच्या अनेक व्यक्तींचीं नांवें, व कांही नाण्यांच्या उल्लेख आहे. जरी पुष्कळशीं नांवें असलीं तरी त्यांपैकी कांही नांवें व शब्द मराठी व्याकरणाच्या नियमांनी जखडलेले सापडतात. "चालावेया, पैकाचा, रामचंद्र देवरायें, देवरायासी, करनु, सेंठी, तेयाची, विठ्ठलाची आण" इत्यादि शब्द मराठी वळणाचे आहे. लेखांतील जरूर तेवढा भाग पुढे दिला आहे.

स्वस्ती श्री सकु ११९५ श्रीमुख संवत्सरे फागनिपूर श्री विठ्ठलदेव रायासि तिसा सिति फुलें दांडे आचंद्रार्क चालावेआ नाना भक्त मालीआं दत्त पैकाचा विवरु॥

(४) ह्या लेखाच्या पूर्वीचा शक ११६१ (सन १२३९) मधील नेवासें येथील शिलालेख होय.[1] हा ज्ञानेश्वरीच्या पेक्षा ५१ वर्षांनी जुना

१ खरे, द. म. इ. सा. खं. २ पृ ३, ४.

आहे. ज्ञानेश्वर महाराजानी ज्या खांबाला टेकून बसून ज्ञानेश्वरी लिहिली, त्या खांबाजवळ कणैरेश्वराचें जुनाट हेमाडपंती देऊळ होतें. त्या देवळाच्या एका दगडावरील हा लेख आहे. ह्याची भाषा संस्कृतमराठीमिश्र असून त्यांत सीळू पंडित वृत्तिकाराला १८ निवर्तनें जमीन दिल्याचा उल्लेख आहे. लेख पुढीलप्रमाणे आहे.

स्वस्ति श्री शकू ११६१ विकारी सं
वत्सरे ।। श्री कणैरेस्वरदेवालये ।। पुराण
वृत्तिकारः । शौनकगोत्रीयः । माध्यंदिनः ।।
श्री सीळूपंडितः ।। तथा पांपूवीहरि सीमागारे ।।
पुराणवृत्ती भूमी निवर्तने सर्वनमसें अठरा १८ ईए भूमी
कणैरेश्वरदेऊमूळी ।। हे भूमि देवें पुरुषेण :। जीवणा दिधली ।।

(५) ह्या लेखाच्या पूर्वीचा उपलब्ध शिलालेख शक ११५० [ सन १२२८] मधील आहे.[1] ज्ञानेश्वरीच्या पूर्वी ६२ वर्षे ह्याचा काळ येतो. हा लेख आंबेजोगाई येथे मिळाला असून ह्याला खोलेश्वराचा शिलालेख असें म्हणतात. ह्यांत कोरलेल्या एकंदर ४७ ओळींपैकी पहिल्या ३५ ओळी आणि शेवटच्या ५ ओळी संस्कृतमध्ये आहेत. मधील ४-५ ओळी मराठी आहेतशा वाटतात; कारण त्यांतील मराठी स्पष्ट नाही. संस्कृत मजकूर लिहून झाल्यानंतर तोच मजकूर महाराष्ट्रभाषेमध्ये लिहिला. तदेव महाराष्ट्रभाषयात्र लिख्यते - असें लेखांतच म्हटलें आहे.

तदेव महाराष्ट्र भाषयात्र लिख्यते । ळ । ळ । आम्रेशे लघुब्राड । ३६ थी नाम ग्रामो दत्तः ।। तथा बेढे सुकेडांदेउ । असिदत्त । उदगिरि । रघुवेसिगे विडिवोसह प्रति... लिक ।। तथा आंब्रपुरे

३७ — ढवलोल किं..... तथा पुर । गुरवा सत्रसोम स्वर्ण संबधे.... चौदेसी चौबिडी मात्य प्रातिपाऊँ वातडेआ ।। दोव बिडेसह

३८ ... देसी पालवि बेल पलसपणु सर्वनमस्य ।। ...... आ पालिवे गाढव लोले समीप म १–१...हखंडी मला — देवासमीप

---

[1] खरे द. म. इ.सा. खं. १ पृ. ५५

३९ मला — तथा पूर्वेता मला — पूर्व मले ७ ॥ हा (द्रा) ष्टी (टी) मालिणी प्र……. घाणे ॥ ६ ॥ आंब्रदक्षिणे कासत ॥ तथा पूर्वेता कामड १ ॥ मायप्रविलोणा….कं ॥

४० णा…वा ॥ आंब्रगण पोफला… …

४१ १२॥ पालेआ फलां गूकां ॥ चाटुसी ॥ आडसी — मड

(६) वरील लेखाच्या लगत मागचा लेख खानदेशांत चाळीसगावापासून दहा मैलांवर असलेल्या पाटण ह्या गावांतील श्री भवानीच्या मंदिरांत आहे. हा लेख ज्ञानेश्वरीच्या पूर्वी ८४ वर्षांचा म्हणजे शक ११२८ (सन १२०६) मधील आहे. हा लेख भाषेच्या दृष्टीने अधिक स्पष्ट आहे. लीलावतीचे कर्ते प्रसिद्ध गणिती भास्कराचार्य यांच्या चांगदेव नांवाच्या नातवाने हा लेख खोदविला आहे. देवगिरीच्या सिंघण यादवाचे मांडलीक म्हणून असलेल्या निकुंभ नांवाच्या राजकुलाच्या आश्रयाने ज्योतिषशास्त्राचें अध्ययन अध्यापन करण्यासाठी मठाच्या स्थापनेसंबंधीं ह्यांत उल्लेख आहे. मठाच्या योगक्षेमासाठी कोणकोणत्या गोष्टी द्यावयाच्या त्यांचें त्यांत वर्णन आहे. लेखाच्या शेवटच्या चार ओळी मराठीचें पूर्वस्वरूप प्रगट करितात. ह्या लेखांत 'इया, पाटणी, केणें, तेहाचा, ब्रह्मणा, दिन्हला, तेलिया, मविजे, मवावे' इत्यादि मराठी व्याकरणाने मान्य केलेलीं रूपें आहेत.

२१ स्वस्ति श्री शाके ११२८ प्रभवसंवत्सरे श्रावणमासे पौर्णमास्यां चंद्रग्रहणसमये श्री सोइदेवेन सर्वजनसंनिद्धौ हस्तोदक पूर्व्वकं विजगुरुराचितमठायायस्थानं ।

२२ दत्तं ॥ तद्यथा ॥ इयां पाटणी जें केणें उघटे तेहाचा असि आउं जो राउला होता ग्राहकापासी तो मटा दिन्हला ॥ ब्राह्मणा जें विक(ते)या पासी ब्रह्मोत्तर ते ब्राह्मणी दिन्हले आह

२३ कापासी दामाचा वीसोवा आसूपाठी नग(रे)दिन्हला ॥ तुलदाइयां बैलां सिद्धवे ॥ बाहीरिला आसूपाटी गिधवे ग्राहकापासी । पांच पोफली ग्राहकापासीं ॥ पहि

२४ लेआ घाणे आदाणाची लोटि मटा दिन्हली ॥ जेती घाणे वांहति

तेतीयां प्रति पली पली तेला ॥ येथ ( जें ) मविजे तें मढीजेन मापें मवावें मापाउ मढा अर्द्ध ॥ अर्द्ध

२५ मापहारी । (रु)पाचें सूंक । तथा भूमिः ॥ चतुराघाट विशुद्ध ॐ डुग्रामु पषड बालेआ कामतामध्यें चहूवंटा ॥ एकल वंटा ॥ पंडिताचा कामतु ॥ श्री ते ग्रा

२६ मी चाउरा धामोजीचीअ सोंढिआं

(७) ह्याच्या मागचा परळ येथील सरकारी बंगला बांधीत असतांना सापडलेला शिलालेख हा होय. हा शके ११०९ (स. ११८७) मध्ये कोरलेला असल्यामुळे ज्ञानेश्वरीच्या पूर्वी १०३ वर्षांचा ठरतो. ह्यांत कोंकणच्या अपरादित्य नांवाच्या राजानें श्री वैद्यनाथ देवाच्या पूजेसाठी 'षट्षष्टि' म्हणजे साष्टी प्रांतातील माहुलीजवळ २४ द्राम उत्पन्नाच्या जमिनीची देणगी नमूद केली आहे. ह्यांतील प्रारंभींचा मजकूर संस्कृत असून शेवटच्या दोन ओळींतील शपथ मात्र मराठींत आहे. ह्यावरून एक गोष्ट उघड आहे की ह्या सुमारास शिष्टांची दरबारी भाषा जरी संस्कृत असली तरी सामान्य लोकांची भाषा सररहा मराठी होती; सर्वांना ती शपथ किंवा तो शाप समजावा म्हणून जी भाषा वापरली ती पुढीलप्रमाणे आहे.

२२ ॥ अथ तु जो कोणु हुवि ए शासन लो

२३ पी तेया श्री वैद्यनाथ देवाची भाल सकुटुंबीआ पडे ॥ तेहाची

२४ माय गाढवे झविजे ॥

(८) ह्याच्या अगोदरचा पुरावा एका ग्रंथांतील आहे. यशश्चंद्र नांवाच्या एका लेखकाच्या राजीमतीप्रबोध ह्या ग्रंथांत राजसभेंत बसलेला एक महाराष्ट्रिक एका स्त्रीच्या रूपसंपदेचें वर्णन करितो आहे. ह्या ग्रंथाचा काळ गुजराती संशोधक लालचंद गांधी अकराव्या शतकाचा उत्तरार्ध धरतात.[१] वर्णनाची भाषा पुढीलप्रमाणे आहे.

देव चतुरंगुलाची जीहा, मी कांई सांवओ ? गोमटो मुह, फाफट निलाट चापट्ट, आंखज्याली तार्हांची, धीणी काली, न छोटी न मोटी, कानिचा पाहुली

१ चिं. वि. जोशी, देशी भाषांचें प्राचीनत्व वि. ज्ञा. वि. व. ५९ अं. १२

नाही। काई ताहि तूलि। नाहि उंडी जाणउ सुखकरी कुंडी, वोलती महुरवाणि चालती सुजाणि राउल खरी रूडी अमृत करी इसी कुयडी ॥

(९) मराठीच्या अस्तित्वाचा ह्याच्या मागील दाखला पुढील लेखांत सापडतो. हा शिलालेख[१] मोगलाईतील उस्मानाबाद जिल्ह्यांतील तुळजापूर तालुक्यांतील सावरगांव येथील महामंडलेस्वर कडंबकुलतिलक मारडदेवाने दिलेल्या दानासंबंधीं आहे. ह्याचा काळ '१०८६ शके आश्विन शु० १ गुरौ' असा आहे. ह्याला इंग्रजी तारीख १९ सप्टेंबर ११६४ इसवी अशी येते.

१ सकु १०८६ तारण संव
२ त्सरे आश्विन सुध १ गुरौ कडं ( ब )
३ कुलतिलक महामंडलेस्वर मा
४ रड ( ? ) देवगणक तत्पादपद्मोपजी
५ वि भाली अंबादेवींचेआ कीर्तनासि वीसोवे म
६ माधवनायके लाहिंपनायके मासप्रति द्रा
७ म २ दत्त ( न ) फेडी तो स्वान गावपशुलय
८ स्य यस्य य(दा) (भू)मी तस्य तस्य तदा फ(लं)

(१०) वरील लेखाच्या पूर्वीचा शक १०७९ (सन ११५७) मधील पळसदेव येथील शिलालेख होय. हा ज्ञानेश्वरीच्या पूर्वी १३३ वर्षांचा आहे. पळसदेव हें गांव गारदौंडापासून सहा मैलावर भीमेच्या काठीं आहे. सरडेश्वराच्या देवळावर हा लेख आहे. जाधवांच्या पूर्वी राष्ट्रकूटांच्या राजवटींत मराठी भाषा चांगली प्रचलित होती असें ह्यावरून दिसतें.

१ श्रीचंगदेव दंडनाके विष्णुगृह केले। ईश्वर
२ संवछरीं नीफजले प्रासादी ब स व ण स व
३ गा तेहाचे पुत्त भाउया। स्तंभा
४ निष्कृती सोनेया साहस्रु एकु १००० प्रासादि अस कर
५ वातोचरे भूमी १०० दाउ पसाउ बाहिरा। सकु १०७९
६ मंगल महा श्री।

---

१ खरे, द. म. इ. सा. खं. १२. पृ. २, ३.

(११) ह्या लेखाच्या पूर्वीचा मराठीसंबंधी दाखला एका जुन्या ग्रंथांत मिळतो. मानसोल्लास अथवा अभिलषितार्थचिंतामणि ह्या नांवाचा ग्रंथ शके १०५१ ( सन ११२९) म्हणजे ज्ञानेश्वरीच्या पूर्वी १६१ व्या वर्षी चालुक्य वंशांतील सोमेश्वर ह्या राजाने लिहिला. ह्या ग्रंथांत मराठी रूपें व मराठी शब्द कित्येक ठिकाणीं आले आहेतच; पण विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे ग्रंथामध्ये रागतालाची माहिती देतांना ग्रंथकाराने कांही मराठी पद्यें दिलीं आहेत. असलीं पद्यें किंवा ओव्या महाराष्ट्रांतील स्त्रिया दळतांना कांडतांना म्हणतात असेंहि ग्रंथकार सांगतो. मराठीमध्ये लोकगीतांची परंपरा किती जुनी आहे हें ह्यावरून दिसतें. पद्यें पुढीलप्रमाणे आहेत.

१ जेणें रसातल उणु मत्स्यरूपें वेद आणियले मनु शिवक वाणियले तो संसारसायरतारण मोहंतो रावो नारायणु जो गीची

२ जो गीची जाणे गाइजे बहुपरिरूपे निर्हांगो मय सैकः शेशनले सुलघु शशजन मान वंकसे

(१२) ह्या उल्लेखाच्या अगोदरची मराठीची निशाणी दक्षिणेंत म्हैसूरजवळ श्रवणबेळगोळ येथील शिलालेखामध्ये मिळते. मराठींतील शिलालेखांपैकी हा पहिला आद्य शिलालेख असल्यामुळे ह्याचें विशेष महत्त्व आहे. हा लेख शके ९०५ (सन ९८३) म्हणजे ज्ञानेश्वरीच्या पूर्वी ३०७ व्या वर्षी कोरला. गंग घराण्यांतील राचमल्ल राजाच्या कारकीर्दीत त्याच्या चावुण्डराय नांवाच्या प्रधानाने बाहुबलजी ऊर्फ गोमतेश्वराचा एक अतिशय प्रचंड असा दगडी पुतळा उभारला, आणि सर्व लोकांच्या माहितीसाठी पुतळ्याच्या खाली निरनिराळ्या देशभाषांत ती गोष्ट कोरविली. मराठींतील मजकूर पुढीलप्रमाणे आहे.

श्री चावुण्डराजें करवियलें
गंगराजे सुत्ताले करवियले

ह्या दोनी ओळी एकाच काळीं खोदल्या गेल्या नाहीत. दुसरी ओळ कांही वर्षें मागाहून कोरली असावी. ह्यांत उल्लेखिलेलें गंग घराणें दोन ठिकाणीं नांदलें. एका शाखेने कलिंगांत मुखलिंग शहरीं राज्य केलें व दुसरीने म्हैसूर येथे राहून पश्चिमेकडच्या प्रदेशावर राज्य केलें. ह्या गंग घराण्यांतील मारसिंह, राचमल्ल, आणि रक्कस ह्या तिघा राजां-

च्या अमदानींत चावुण्डराय हा प्रख्यात जैन योद्धा, पण्डित आणि भक्त त्यांचा प्रधान म्हणून होता. अजितसेन हा राचमल्ल आणि चावुण्डराय ह्या दोघांचाहि गुरु होता. राजमल्लाची कारकीर्द इ. स. ९७४–९८४ पर्यंत होती व त्याच काळांत चावुण्डरायाने ह्या अजस्त्र स्तूपाची उभारणी केली.[१] ह्या त्याच्या धार्मिक आणि पुण्यशील कृत्यामुळेच तो जरी प्रधान होता तरी त्याला राचमल्लाने 'राय' ही बहुमानाची पदवी अर्पण केली. ह्याने उभारलेल्या घुमटामुळे ह्याला गोम्मतराय असेंहि म्हणत असत. ह्याने लिहिलेले दोन ग्रंथहि चामुण्डरायपुराण आणि चरित्रसार ह्या नांवाने प्रसिद्ध आहेत.

(१३) मराठी शिक्क्याचे शब्दप्रयोग ह्याच्या मागेहि आढळून येतात. एपिग्राफिआ इंडिका व इंडियन ॲन्टिक्वरी ह्या नियतकालिकांच्या निरनिराळ्या अंकांत जे ताम्रपट व शिलालेख प्रसिद्ध झाले आहेत त्यांतून मराठी शब्द वापरलेले दिसतात. वर जे शिलालेख दिले आहेत त्यांच्या पूर्वीच्या काळांतील म्हणजे शकोत्तर १०४९ पासून ते थेट शकोत्तर ६०२ पर्यंतच्या तेरा लेखांतील मराठी शब्दांची यादी खाली दिली आहे. ती वरून मराठी भाषेच्या अस्तित्वाचा दाखला शकोत्तर ६०२(इ.स.६८०) पर्यंत न्यावयास हरकत नाही.

१ श. १०४९ च्या शिलाहार राजाच्या ताम्रपटांत पुढील शब्द मराठी वळणाचे आहेतः सकु–संवतु, घोरपड, वरवली, ऊसर, मोर, मोव्रली, गाडीमार्ग.

२ श. १०१६ चा ताम्रपट–कोंकण, रिषी, सोमण, संवतु, छेपाटी, माभण (बाव्रण), नोर, राय.

३ श. ९२२ चा शिलालेख—करणिक, थीर.

४ श. ९०० चा ताम्रपट— सांब्राज्य.

५ श. ८३२ चा ताम्रपट—वइरि (वैरी), निशेष, सिंघ.

---

१ Shravanbelgola Inscription Epigraphia, Karnatika, Vol. II (S. B.) No. 974.

६ श. ८१० चा राष्ट्रकूटांचा ताम्रपट—न्हा, पुन्य, जो ( सर्वनाम ), सिंघ (सिंह), दह (दश), चिति (स्थिति), रिपू, इथ.

७ श. ७५७ चा ताम्रपट—येश (यश).

८ श. ७३५ चा ताम्रपट—खळखळ.

९ श. ७२८ चावणीचा ताम्रपट—वारिखेड (सध्याचें वारखेड).

१० श. ६८० चा ताम्रपट—दोसिराज (जोशीराज), भंडारगांवविठ्ठगे (भंडारकवठे).

११ श. ६७५ चा सामानगड येथील ताम्रपट—देऊळवाडे, पारगांव, आइतवाडे.

१२ श. ६२१ चा तालुक्यांचा शिलालेख—सुंक्त, बादावी, हित.

१३ श. ६०२ मधील ताम्रपट—पन्नास, प्रिथिवी (पृथिवी).

(१४) मराठीच्या अस्तित्वाबद्दल शिलालेखाचे पुरावे येथे संपले. मराठीच्या अस्तित्वाचा आणखी एक फार जुना व महत्वाचा पुरावा अपभ्रंशकाव्यत्रयी नांवाच्या ग्रंथांत मिळतो. ह्या ग्रंथात अठरा देशी भाषांचा जो उल्लेख आहे त्यांत "गोल्ल मध्य, मागध, अंतर्वेद्य, कीर, टक्क, सैंधव, मारव, गुर्जर, लाड, कण्णाड, तायिक, कोसस, मरहट्ठ, अंध्र, खस, पारस, बर्बर इतक्या भाषा निर्देशिल्या आहेत. पुढे प्रत्येक देशांतील मनुष्याचें वर्णन करून त्याच्या भाषेंतील अतिशय ठळक अशी लकब सांगितली आहे. "तेरे मेरे आउर्ति जंपिरे मज्झदेसे" (तेरे मेरे आवो असें म्हणणाऱ्या मध्यदेशीयास पाहिलें) हें एका मध्यदेशच्या माणसाचें व त्याच्या भाषेचें वर्णन आहे. असेंच पुढे गुजर व माळवी ह्या लोकांचें व त्यांच्या भाषेचें वर्णन आहे. मराठ्यांचें व त्यांच्या भाषेचें वर्णन पुढीलप्रमाणे आहे. "दढमडह सामलंगे सहिरे अहिमाण कलहसीले य दिण्णले गहिल्ले उल्लविरे तत्थ मरहट्टे". बळकट, ठेंगण्या, सावळ्या अंगाच्या, काटक, अभिमानी, भांडखोर, दिणले (दिलें), गहिल्ले (घेतलें) असें बोलणाऱ्या मरहाठ्यास त्याने पाहिलें[1]. ह्या ग्रंथाचा काळ चैत्र कृष्ण

१ चि. वि. जोशी. वि. ज्ञा. वि. व. ५९ अं. ९.

१४ शके ७०० अपराण्ही असा असल्याचें त्या ग्रंथांचे संपादक लालचंद गांधी सांगतात. ह्या उल्लेखांत मराठी वाक्यप्रयोग जरी न मिळाला तरी त्यावरून इ. स. ७७८ च्या सुमारास मराठा समाज व मराठी भाषा ह्या दोहोंना एक प्रकारचें विशिष्टत्व प्राप्त झालें होतें इतकें मात्र खास.

(१५) प्राकृत भाषांचा बोली म्हणून लोप झाल्यानंतर देशभाषा अस्तित्वांत असल्याबद्दलचा दाखला कांही ग्रंथांमध्ये मिळतो. प्राकृत भाषा आणि वर्तमानकालीन आधुनिक बोली ह्या दोहोंमधील दुवा – विशेषतः हिंदी भाषेच्या संबंधाचा-शोधून काढण्याचें श्रेय रायबहादूर हिरालाल ह्यांना आहे. त्यांच्या प्रयत्नानें सन ९०० पासून १४०० पर्यंतच्या कालाचें ज्या भाषेपासून हिंदी उत्पन्न झाली त्या भाषेंतील साहित्य प्रकाशांत आलें आहे. ह्या दृष्टीने जैन धर्माचें प्राकृतभाषेंतील साहित्य फार महत्त्वाचें आहे. ह्या साहित्याची जर नीट छाननी झाली तर वर्तमानकालीन बोलींच्या उद्गमासंबंधीच्या बऱ्याच बाबींचा उलगडा होईल. प्राकृत भाषांची अमदानी संपल्यानंतर देशभाषा सुरू झाल्या व त्या गुप्त राजांच्या काळांत वापरांत होत्या ह्याबद्दल नारदस्मृति साक्ष देते.

संस्कृतैः प्राकृतैः वाक्यैः यः शिष्यमनुरूपतः ।
देशभाषाद्युपायैश्च बोधयेत् स गुरुः स्मृतः ।।

नारदस्मृतीचा काळ पांचव्या शतकांत समजण्यांत येतो, त्याअर्थी देशभाषा पांचव्या शतकांत सुरू होत्या. बाण ( इ. स. ७०० ) आपल्या हर्षचरितांत असें नमूद करतो की, ज्या वेळेस तो प्रवासास निघाला त्या वेळेस त्याच्या बरोबर इतर भाषांतील कवींबरोबर एक देशभाषाकवि होता.[१] तेव्हा वर्तमानकालीन बोलींच्या आद्य स्थितीचा किंवा उद्गमाचा काळ इ.स. ५०० इ. पर्यंत मागे जातो. निदान हिंदीच्या बाबतींत तर तितका मागे नेला आहे. हिंदीसंबंधी जो नियम देशभाषांच्या संशोधनाच्या जोरावर सिद्ध झाला तोच गुजराती व मराठी ह्यांसंबंधीहि श्वेतांबर जैनांच्या धर्मवाङ्मयाच्या संशोधनाच्या बळावर अवश्यमेव मांडतां येण्यासारखा आहे.

---

१ बाण–हर्षच. उच्छ्वास १

ह्या सर्व विवेचनावरून व दिलेल्या आधारांवरून जे सिद्धांत ठरतात ते हे–

१ मराठी भाषा कोणत्याहि एका विशिष्ट प्राकृतपासून निघाली नसून सर्व प्राकृत भाषांच्या मिश्रणापासून निघाली. त्यांतल्या त्यांत माहाराष्ट्री आणि अपभ्रंश ह्या दोन भाषांचे अवशेष मराठींत पुष्कळ सापडतात.

२ नारदस्मृतींत उल्लेखिलेल्या देशभाषांपैकी एक भाषा जर मराठी धरली तर तिची उत्पत्ति इसवी सनाच्या पांचव्या शतकांत होऊन सातव्या शतकापर्यंत ती हळूहळू उत्क्रांत होत गेली.

३ मराठी वळणाचे शब्दविशेष शक ६०५ (इ. स. ६८३) पासूनच्या शिलालेखांत व ताम्रपत्रांत सापडण्यास सुरुवात होते.

४ मराठी शिक्याचें पहिलें वाक्य श्रवणबेळगोळच्या शक ९०५ (इ. स. ९८३) मधील शिलालेखांत सापडतें.

५ उत्तम दर्जाचें मराठी वाङ्मय बाराव्या शतकांत सुरू झालें.

६ मराठी भाषेस इसवी सन ७०० च्या सुमारास बोलभाषा म्हणून पूर्णत्व आलें असलें पाहिजे.

मराठी भाषेच्या उत्पत्तीचा वृत्तांत येथवर सांगितला. एका भाषेपासून दुसरी भाषा जी उत्पन्न होते ती एका विशिष्ट परिस्थितींतच उत्पन्न होते. भोवतालच्या वातावरणांत जर खळबळ झाली तर भाषाक्रांति होण्यास विशेष मदत होते. लोकक्रांति झाल्यामुळेच भाषाक्रांति झालेल्याचीं उदाहरणें आजवरच्या भाषेतिहासांत आहेत. मग ती लोकक्रांति कोणत्याहि कारणामुळे झालेली असो; राजाच्या जुलुमामुळे होवो, धार्मिक छळामुळे होवो किंवा दुष्काळासारख्या आपत्तीमुळे होवो. लोकक्रांतीमुळे धार्मिककल्पनेंत, राज्यविषयक घटनेंत, लोकांच्या बोलण्यांत उलथापालथ होते. मराठी भाषा उत्पन्न झाली त्या सुमारास अशी ही लोकक्रांति कशी झाली, महाराष्ट्र देश कसा वसला, निरनिराळ्या भाषा बोलणारे उत्तरेकडील समाज महाराष्ट्रांत कसे व केव्हा आले व त्यांच्या मिश्रणाने मराठा समाज कसा बनला हें पुढे सांगितलें आहे.

## महाराष्ट्राची वसाहत

७८ दक्षिणापथ—महाराष्ट्र हें नांव फारसें जुनें नाही. वराहमिहिर ( इ. स. ५०५ ) याच्या ग्रंथांत व सत्याश्रय पुलकेशी याच्या इ. स. ६११ सालांतील बदामीच्या शिलालेखांत महाराष्ट्राचा प्रथम उल्लेख सापडतो. महाराष्ट्र ह्या नांवानें जो प्रदेश सध्या संबोधिला जातो त्या प्रदेशाला पूर्वी 'दक्षिणापथ' ह्या नांवानें ओळखीत असत. दक्षिणापथ याचा दक्षिणेकडील मार्ग व लक्षणेने दक्षिणेच्या मार्गाकडील प्रदेश असा अर्थ होतो. दक्षिणेकडील प्रदेशाची नीटशी कल्पना उत्तरेकडील आर्यावर्तांत राहणाऱ्या आर्यांना नसल्यामुळे त्यांनी ह्या अज्ञात प्रदेशाला दिशादर्शक मोघम नांव दिलें आणि तसें त्याला ओळखूं लागले.

दक्षिणापथ हें नांव फार पुरातन आहे व तें विंध्यपर्वताच्या दक्षिण परिसराच्या खालच्या प्रदेशास लावण्याचा प्रघात होता. पेरिप्लुस ( खि. उ. १००.) हा आपल्या ग्रंथांत दक्षिणापथ ह्या देशास (Dakhinabhades) असें नांव देऊन त्यांत भडोच (Bargaza) पासून द्रविड (Damirica) देशांतील व्यापारी पेठेच्या शहरापर्यंतच्या प्रदेशाचा अन्तर्भाव करतो. हें जें दामिरिच म्हणून शहर पेरिप्लुस सांगतो तें मार्कंडेय पुराणांत सांगितलेलें 'दामरह' नांवाचें शहर असावें। खिस्तोत्तर ३३०च्या सुमारास राज्य करणारा समुद्रगुप्त राजा आपल्या शिलालेखांत दक्षिणापथ म्हणजे नर्मदा नदीपासून तों थेट कन्याकुमारीपर्यंचा प्रदेश असें म्हणतो. ह्याच्या पुढचा ६०० वर्षांनंतरचा राजशेखर ( इ. सन ९००–९४० ) नांवाचा ग्रंथकार हा आर्यावर्त आणि दक्षिणापथ ह्या दोन प्रदेशांच्या मधील मर्यादा 'रेवा' नदी असल्याचें सांगतो. ह्याच काळांतील चालुक्य कुळांतील पहिला राजराज ( खि. उ. ९८५ ) ह्याने दक्षिणापथाची मर्यादा नर्मदेपासून रामाच्या सेतूपर्यंत नेऊन ह्या दोहोंमधील प्रदेश पहिल्या विष्णुवर्धनाने (खि.उ.६०० जिंकल्याचें तो सांगतो.

अशा रीतीने दक्षिणापथाची मर्यादा निरनिराळ्या काळच्या ग्रंथकारांनी सांगितली आहे. उत्तरमर्यादा नर्मदा आणि दक्षिणमर्यादा मात्र अनिश्चित अशी दक्षिणापथाची स्थिति होती. कधी कधी महाराष्ट्र व

दक्षिणापथ हीं दोन्हीं नांवें एकाच प्रदेशास अनुलक्षून स्थूल अर्थाने वापरलेलीं आढळतात. ह्या दक्षिणेकडील प्रदेशाची आर्यांना विशेष माहितीच नव्हती. त्यांच्या परिचयाचा प्रदेश म्हणजे आर्यावर्त व मध्यदेश. तेथेच त्यांचें मांत्रिक पठण, याज्ञिक कर्मे किंवा आत्मिक विवेचन चालें. त्या देशाच्या पलीकडे कोणी आर्य गेलेच तर व्रात्य म्हणून पतित होत व पुन्हा आर्यांच्या समाजांत सामावून घेण्यासाठी त्यांना व्रात्यस्तोमासारखे विधिहि करावे लागत. आर्यावर्ताच्या बाहेर जाण्यासंबंधी असे सक्त निर्बंध असल्यामुळे सध्या जशी जिज्ञासायुगांत मनुष्याची चौकसबुद्धि सर्व विश्वांत चौफेर संचार करते तशी त्या वेळीं संचार करीत नव्हती. दक्षिणेकडे जावयाचें म्हणजे वनवासास जावयाचें असा प्राचीन काळीं समज होता. ह्या धार्मिक निर्बंधांबरोबर निसर्गनिर्मित निर्बंध असल्यामुळे दक्षिणप्रांत आर्यांच्या ताब्यांत येण्यास उत्तरेकडील प्रदेशापेक्षा जास्त काल लागला. विंध्य,पुढे सातपुडा, दोन्ही बाजूंस सह्याद्रीच्या डोंगराळ खबदाडी, २५ कोसांच्या क्षेत्रापेक्षा कोठेहि जास्त सपाट, वसाहतीला योग्य असें क्षेत्र सापडणें कठीण, ठिकठिकाणीं मोठमोठ्या नद्यांचीं खोरीं, डोंगरांच्या आश्रयानें बेसुमार वाढलेलीं दाट अरण्यें, असें जिकडे तिकडे संकटमय क्षेत्र होतें. तेव्हा अशा बिकट स्थितींत निसर्गाशीं वारंवार दोन हात करण्याचे प्रसंग उत्तरेकडील संपन्न व समृद्ध प्रांतांत सुखावलेले आर्य कां ओढवून घेतील! म्हणूनच पुष्कळ काळ दक्षिणेकडील प्रांत दण्डकारण्यच राहिलें आणि त्या दाट अरण्याच्या आश्रयानें राहणारे वा-नर, की ज्यांच्या मनुष्यत्वाबद्दल संशय होता—जांबुवंतासारखे, की ज्यांच्या अंगावर इतके केस की, ह्यांना मनुष्य म्हणावें की अस्वल म्हणावें असा संशय येत असे—अशा प्रकारचे उत्क्रांतितत्त्वाच्या दृष्टीने मधल्या मधल्या स्थिति दाखविणारे जीवसृष्टींतील एकेक नमुनेच दक्षिणेकडील दण्डकारण्यांत वसाहती करून राहत असत. नाही म्हणावयास दक्षिणेकडे कांही संस्कृतिसंपन्न अशा लोकांच्या वसाहती होत्या; परंतु त्या महाराष्ट्राच्या बाहेर असल्यामुळे त्यांचा विचार येथे करीत नाहीं.

७९ **महाराष्ट्राचे तीन विभाग**—महाराष्ट्राच्या वसाहतीसंबंधी एक पौराणिक व दुसरें ऐतिहासिक अशीं दोन मतें मांडतां येण्यासारखीं आहेत.

या दोन्हीं मतांत कालाच्या दृष्टीने फार अंतर आहे. पौराणिक दृष्टीने महाराष्ट्रांतील वसाहत ऋग्वेदसूक्तांच्या संहितीकरणापर्वी, किंबहुना ऋग्वेदांत उल्लेखिलेल्या दाशराज्ञ युद्धापूर्वी झाली असें ठरतें. ऐतिहासिक दृष्टीने हा काल इतका प्राचीन न जातां खिस्तपूर्व ७०० पर्यंत असावा असें ठरतें. पौराणिक मत डॉ० केतकर यांनी आपल्या 'प्राचीन महाराष्ट्रांत' नव्याने मांडलें आहे. या दोहोंपैकी प्रथम पौराणिक मत सांगतों. महाराष्ट्राचे स्थूलमानाने अपरान्त, विदर्भ आणि दण्डकारण्य असे तीन भाग पडतात. त्यांपैकी पश्चिमेकडील अपरान्त ( कोंकणपट्टी ) भृगु व त्याच्या वंशजांनीं फार प्राचीनकाळीं म्हणजे भार्गवरामाच्या--परशुरामाच्या--अवताराच्याहि पूर्वी वसविल्याचें पुराणांवरून ठरतें. कोंकण म्हणजे परशुरामाची कर्मभूमि व " परशुरामाच्या कथेशीं कोंकणांतील कोंकणस्थ, देवरुखे, हैग, नंबुद्री इत्यादि अनेक जातींचा संबंध येतो. भडोचचें जुनें नांव भृगुकच्छ असें आहे. परशुरामाचें पूजन कोंकणांत अनेक ठिकाणीं होत आहे. सोपाऱ्यास आज परशुरामाच्या अनेक प्राचीन मूर्ति उपलब्ध आहेत, इत्यादि प्रमाणांवरून महाराष्ट्राचा पश्चिम भाग भृगुवंशीयांनी वसविला असें ठरतें व रामायणांतहि याला आधार आहे. पश्चिम भाग जसा भृगूंनी तसा पूर्वभाग अगस्त्यांनी वसविला. या दोन पट्ट्यांच्या मधील प्रांत मात्र श्वापदग्रस्त असल्यामुळे तितकासा वसाहतयोग्य नव्हता. इक्ष्वाकुवंशांतील दण्डक नांवाच्या राजाने भृगुवंशांतील च्यवन नांवाच्या ऋषीचा अपमान केल्यामुळे ऋषीने दण्डक राजाला शाप दिला. त्या शापाच्या प्रभावाने विन्ध्यापासून सेतुबंधापर्यंतचा प्रांत ओसाड किंवा अरण्यमय झाला. ' दण्डकारण्य ' या नांवाची उपपत्ति या राजाच्या नांवावरून आहे.

दक्षिणेकडील प्रांताचे जे तीन भाग वर सांगितले त्यांपैकी कोंकण व विदर्भ ह्या दोन भागांची माहिती खाली देत आहें.

(१) कोंकण—कोंकणासंबंधी निरनिराळ्या कथा पुराणांतरीं आहेत. सह्याद्रीच्या उपप्रांतांस आपल्या पर्वतप्राय लाटा आदळून त्याच्या उच्चत्वाच्या स्पर्धेने सूड घेणाऱ्या समुद्रास परशुरामाने मागे हटवून आपल्यासाठी व आपल्या यज्ञकर्मासाठी भूमि तयार केली व चैत्यपुलिन ( चिपळोण ) येथे

स्थंडिल तयार करून त्यासाठी कोळयांच्या जाळयांचीं जानवीं करून त्यांना ब्राह्मणांची दीक्षा देऊन किंवा चितेवरील प्रेतांत प्राणज्योति पेटवून त्यांना ब्राह्मण्य दिलें वगैरे कथा ऐकण्यांत येतात. ह्या प्रांतास पूर्वी अपरान्त म्हणत असत व त्याची मर्यादाहि मोठी म्हणजे उत्तरेस आनर्तापासून तें थेट कन्याकुमारीपर्यंत असे. ह्या प्रांतास कोंकण केव्हा म्हणूं लागले ह्यासंबंधी ठाम प्रमाण मिळत नाहीं. नागांचीं जीं कुळें महाभारतांत सांगितलीं आहेत, त्यांत कुकुण असें एक कुळ सांगितलें आहे आणि तें ह्या प्रांतांत खाली गोकर्णापर्यंत राहत होतें अशासंबंधी तेथे दाखला आहे. तेव्हा ह्या कुकुण नागकुलाचा आणि कोंकण ह्या नांवाचा कांही संबंध असल्यास न कळे. कोंकण ह्या नांवाची उपपत्ति आजपर्यंत पुष्कळांनी निरनिराळया प्रकारांनी दिली आहे.

जुन्या संस्कृत आणि फारशी ग्रंथांत कोंकण हा शब्द निरनिराळया प्रकाराने लिहिलेला आढळतो. संस्कृतमध्ये 'कुकुण, कुङ्कण, कोङ्कण, कोंकण' हीं त्याचीं रूपें दिसतात, तर फारशीमध्ये "केङ्केम्, कंकुण, कोंकम्" हीं रूपें दिसतात. ह्या 'कोंकण' शब्दाच्या व्युत्पत्तीबद्दलहि अद्याप ठाम निर्णय झाला नाही. विद्वान् लोक ज्या कांही निरनिराळया प्रकारांनी त्याची व्युत्पत्ति देतात, त्यांपैकी कांही खाली देतों.

१. कोंकण हा शब्द द्राविडी भाषेंतून घेतला असावा.

२. कानडीमध्ये कोङ्कु असा एक शब्द आहे. त्याचा अर्थ 'उंच-सखल जमीन' असा आहे. कोङ्कु+वन=कोङ्कुवन=कोंकण अशा मार्गाने हा शब्द आला असावा असें वाटतें व कोंकणांत अशी उच्च-नीच जमीन सार्वत्रिक असल्यामुळे या व्युत्पत्तीस दुजोरा मिळतो.

३. फारशीमध्ये कोह(=पर्वत), कुण्ड(=खांच, खड्डा), असे दोन शब्द आहेत. कोहकुण्ड=कोकुण्ड=कोंकण अशा मार्गाने हा शब्द येतो. ह्याचाहि अर्थ पर्वताच्या खाच्यांचा प्रांत असा होऊन तो कोंकणास लागेल.

४. किम् + किण्वम् ( कसली ही वनस्पति ? ) अशा तऱ्हेचा प्रश्न पहिल्या वसाहतवाल्यांनी उन्मादक ताडीसंबंधी विचारला असावा व त्या वरून कोंकण शब्द साधला असावा.[1]

---

१ Chavan. The Konkan. and K. Lang. P. 2.

५. कोंग नांवाचे रानटी लोक ह्या प्रांतांत प्रथम वसले असावेत व त्यावरून या देशास कोंगवन (= कोंकण) हें नांव मिळालें असावें.

६. कोणकोण ह्या नांवाचा एक तालुका गोव्याच्या दक्षिणेस आहे. त्यावरून कोंकण हें नांव आलें असावें.

७. कुकण ह्या नांवाचें एक नागांचें कुल महाभारतांत उद्योगपर्वांत सांगितलें आहे. त्यांची वसति येथे असल्यावरून कोंकण हें नांव त्या देशास मिळालें. ( वामनश्चैलपत्रश्च कुकुरः कुकुणस्तथा.—म. भा. उद्योग. )

८. गंग ह्या नांवाचे राजे म्हैसूर व पश्चिम किनाऱ्याच्या प्रांतांवर सन ७००-१००० इसवीमध्ये राज्य करीत असत. त्यांच्यावरून ह्या देशास करणें हें नांव पडलें असण्याचा संभव आहे. (गंगवन > गोंगवन > कोंकण).

वर दिलेल्या ह्या आठ प्रकारांपैकीं दुसरा व आठवा हे प्रकार मान्य होण्यासारखे आहेत.

कोंकणचा आणि इतर बाह्य प्रांतांचा व्यापाराच्या दृष्टीने संबंध फार पुराण काळचा आहे. इतर देशाचे व्यापारी हिंदुस्थानाशीं जो व्यापार करीत तो कोंकणच्या द्वाराच करीत. पुष्कळ अरबी शब्द दक्षिणेकडील भाषांत जे सापडतात ते ह्याच सुमारास आले असावेत. ख्रिस्ती सनाच्या पूर्वीं कांहीं नाहीं तरी निदान तीन चारशें शतकांच्या सुमारास तरी हा व्यापार चालला असावा. सह्याद्रीच्या पलीकडील दण्डकारण्य मात्र ह्या देवघेवीच्या व्यवहारापासून अलिप्त राहिलें. कोंकणांतील पुष्कळ बंदरांचा उल्लेख जुन्या लेखांमध्ये येतो. त्यावरूनच हें दळणवळण फार प्राचीन काळापासूनचें असावें असें म्हणतां येतें. टॉलेमी ( इ० सन १५० ) ह्याच्या भूगोलविषयक ग्रंथांत सिमुल्ल ( Simulla ) किंवा तिमुल ( Timula) अथवा त्याच्याहि पूर्वींचा जो लेखक प्लिनी ( इ० सन ७७ ) तो पेरिमल ( Perimula ) म्हणून जो उल्लेख करतो, किंवा कान्हेरी येथील शिलालेखांत ( इ० सन २०० ) चेमुल्ल म्हणून जें उल्लेखिलें आहे तें कोंकणांतील चेऊल किंवा चोल होय. ह्याशिवाय पाल, कोल, कुड, राजपुरी, घोडेगांव ह्या गावांचाहि उल्लेख आहे. उत्तरेकडील शूर्पारक (सोपारा) हें तर मौर्यांच्या राजवटींत एक स्तूप तेथे उभारण्याइतकें महत्त्वास चढलें होतें. भडोच

हें बर्गाझा ह्या नांवाने पूर्वीच्या लोकांच्या परिचयाचें होतें. ह्या बंदरांतून माल आंत येट नाशिक–पैठणपर्यंत पोचविला जात असे. तत्कालीन इतर राष्ट्रांना, उदाहरणार्थ, ग्रीकांना, कोंकणची माहिती टॉलेमीवरूनच मिळे. कांही यवन लोक बुद्धधर्म स्वीकारून कोंकणांत वसति करून होते असें दिसतें. कारण कान्हेरी, नाशिक, कार्ले, जुन्नर येथील विहारांना त्यांनी दानें दिल्याचे उल्लेख आहेत.[१]

टॉलेमी हा कोंकणचे पुढीलप्रमाणे चार विभाग करतो–१ सौराष्ट्र–उत्तर गुजराथ; २ लारीके–लाट, दक्षिण गुजराथ, ३ आरिआके=मराठा देश; ४ दामरिके=दामिल म्हणजे तामिल ह्यांचा प्रदेश.[२] ह्यांपैकी तिसरा जो आरिआके किंवा आर्यक म्हणजे आर्यांचा प्रदेश, त्याचे पुन्हा तीन भाग केले आहेत. पहिल्या भागांत मुंबई व दक्षिणचा कांही भाग येतो. दुसरा भाग उत्तर कोंकण, दमणपासून खाली राजापूरपर्यंत, आणि तिसरा भाग दक्षिण कोंकण. ह्या भागांना अनुक्रमें 1 Ariake proper, 2 Sadan's Ariake. 3 Pirate Ariake असें तो म्हणतो.

(२) विदर्भ—विदर्भासंबंधी माहिती पुढीलप्रमाणे आहे. अगस्त्य ऋषीचा प्रवास, त्याचें विदर्भ राजाच्या मुलीशीं–लोपामुद्रेशीं–लग्न, कौंडिण्य नांवाचा ऋषि, भीष्मकाची राजधानी, नलदमयंतीचा विवाह वगैरे सर्व बाबी पौराणिक माहितींत मोडतात. दक्षिणेकडील प्रदेशांचें आर्यीकरण सुरू झालें तें प्रथम विदर्भांतच; म्हणून विदर्भाचा संबंध आर्यांच्या ग्रंथांत यावा हें साहजिक आहे. खुद्द विदर्भ हें जें नांव ह्या प्रांताला मिळालें तें एका राजाच्या नांवावरून मिळालें आहे. यदुवंशापैकीच भोज या नांवाची जी एक शाखा होती त्या शाखेचें राज्य ह्या प्रांतावर होतें. त्या शाखेंत विदर्भ भोज नांवाचा एक राजा होऊन गेला व त्याच्यावरूनच ह्या देशाला विदर्भ हें नांव मिळालें. ऋषभदेव नांवाचा जो राजा होता त्याला नऊ मुलगे होते व त्याने आपल्या नऊ पुत्रांना स्वतःचें भरतखंडाचें राज्य वाटून दिलें. जो देश ज्या पुत्रास मिळाला त्या देशास त्या मुलाच्या नांवावरून नांव

१ Bombay Gaz. Kolaba, Part 4.

२ Periplus P. 93.

मिळालें. कुशावर्त, इलावर्त इत्यादि मुलांमध्ये विदर्भ नांवाचाहि एक मुलगा होता व त्याच्या वास्यास हा देश आला म्हणून त्याला त्याचें नांव मिळालें अशीहि एक कथा प्रचलित आहे. ह्याच विदर्भानंतर[१] कांही पिढ्यांनी भीम झाला. अजपत्नी इंदुमतीचा भाऊ भोज ह्याच विदर्भ राजाच्या वंशांतील. त्याच वंशांत क्रथकैशिक, भीष्मक, रुक्मी व अगदी पुढील म्हणजे चंपू-रामायणाचा कर्ता भोज हे सर्व होऊन गेले. या प्रांतांतील स्त्रिया सौंदर्य, शील वगैरे गुणांबद्दल प्रसिद्ध असत. म्हणूनच येथील राजकुलांतील कन्येशीं विवाह करणें श्लाघ्य समजत. ह्या सर्व पौराणिक संदर्भांवरून इतकें स्पष्ट आहे की, वरील मध्यदेशांतील आर्यसंस्कृतीला रुजण्यास व मूळ धरण्यास योग्य असें क्षेत्र विदर्भ देशच होय. विन्ध्यदक्षिण प्रांताकडे जर कोणतें आर्यस्थान प्रथम झालें असेल तर तो विदर्भच. प्रथम ह्या प्रांताचें आर्यीकरण पूर्णपणें झालें व सरस्वतीदृषद्वतीच्या तटावर जें ब्रह्मकर्म चालें तेंच ब्रह्मकर्म वर्धानदीच्या तटावर सुरू झालें.

सध्या ह्या प्रांतास वऱ्हाड असें म्हणतात. वरील पौराणिक हकीकतीवरून वऱ्हाड हा शब्द विदर्भापासून आला असावा असें वाटणें साहजिक आहे; परंतु वऱ्हाड आणि विदर्भ हे दोन्ही शब्द वर्णपरिणतीच्या दृष्टीने एकच समजणें कठीण वाटल्यावरून आणखी कांही व्युत्पत्ति दिल्या आहेत. अबूल फजल हा आपल्या ऐनिअकबरी या ग्रंथांत वर्धातट हें त्या प्रांताचें नांव देतो. वाचस्पत्य ह्या ग्रंथांत 'विगताः दर्भाः-कुशाः यतः' असा विदर्भ या शब्दाचा विग्रह केला आहे. राजवाडे हे त्या शब्दाचे वर्धा+आहार असे दोन भाग पाडून वऱ्हाड शब्द व्युत्पादितात. चौथा एक 'विराट' या शब्दापासून वऱ्हाड शब्द साधण्याचा प्रकार आहे. त्यांपैकी वर्धा+तट किंवा वर्धा+आहार या दोन व्युत्पत्ति सयुक्तिक वाटतात.

आर्यांची जी वसती दक्षिणेस झाली ती कांही एकदम व सर्व ठिकाणीं सारखी अशी झाली असें नाही. क्रमाक्रमाने सावकाश व दीर्घ कालावधीने जसजसें तेथील अरण्य कमी होऊन क्षेत्र वसाहतयोग्य होऊं लागलें तसतसें आर्य आपला शिरकाव दक्षिणेंत पुढें पुढें करूं लागले. स्थूलमानाने

---

१ भागवत, स्कंद ५, अ. २-२०.

व निसर्गाचे निर्बंध लक्षांत घेतां महाराष्ट्राचे भाग उत्तरेकडून दक्षिणेकडे नागपूर–विदर्भ, गोदाकांठ किंवा गंगथडी, भीमाकाठ किंवा भीमथडी, कृष्णाकाठ, उत्तर कोंकण, दक्षिण कोंकण, इतके पडतात; व हे ज्या क्रमाने दिले आहेत त्याच क्रमाने आर्यांनी तेथे वसाहती केल्या. ह्याला अपवाद फक्त कोंकण. देशापेक्षा फार अगोदर कोंकणपट्टीवरील प्रांत वसविला गेला होता; एवढेंच नव्हे तर व्यापारउदीम वगैरे व्यवहाराच्या दृष्टीने दुसऱ्या तत्कालीन इतर देशांतील लोकांसहि तो परिचित झाला होता. शिवाय, उत्तरेचें दळणवळण कोंकणशीं होण्यास तेथील मार्गहि तसा विशेष बिकट नव्हता. उत्तरेकडील आर्य किंवा पुढे जे जे लोक वसाहतीसाठीं दक्षिणेंत येऊं शकले ते ह्या दोहोंकडील कोंकणपट्टीच्या मार्गानेच होय. तेव्हां हा प्रांत फार अगोदर वसविला गेला होता यांत शंका नाहीं.

आर्यांच्या पूर्वी विंध्याच्या दक्षिणेस कोण लोक राहत होते व ते तेथे कोठून आले, आणि त्यांच्या जाति, धर्म व संस्कृति याबद्दल काय अनुमान बसवावें ह्यासंबंधी विद्वानांमध्ये अद्याप ठाम मत झालें नाहीं. युरोपियन पंडितांचा समज असा आहे की, आर्य ज्या वेळीं आपल्या मूळ वसतिस्थानाहून निघाले व इतर वसाहतयोग्य प्रांतांत ठिकठिकाणीं राहूं लागले त्या वेळीं जशी एक लोकक्रांति झाली तशीच जबरी लोकक्रांति मध्य आशियांतून द्राविडी किंवा सुमेरो अगर तुराणी संस्कृतीचे लोक आर्यांच्या पुष्कळ पूर्वी इतस्ततः भ्रमूं लागले त्या वेळीं झाली. तेच लोक आर्यांप्रमाणे हिंदुस्थानाकडे वळले आणि उत्तरेकडील पर्वतांच्या दऱ्याखोऱ्यांमधून आंत शिरून राहिले. मागाहून जसाजसा आर्यांचा रेटा येऊं लागला तसतसे ते उत्तरेकडील डोंगरांच्या खबदाडींत व दक्षिणेकडे विंध्यपार होऊं लागले. तेच लोक उत्तरेकडे ब्राहुई म्हणून सध्या जे ब्रिटिश बलुचिस्तानांत आहेत त्यांचे किंवा हिमालयाच्या पायथ्याशीं अगर मणिपूर वगैरे ठिकाणीं जे रानटी लोक राहतात त्या लोकांचे किंवा भिल्ल, कोंड, नाग, कातकरी इत्यादि लोकांचे पूर्वज होत.

अशा रीतीने दक्षिणेकडे दोन लोकांच्या दोन निरनिराळ्या भिन्न काळीं वसाहती झाल्या. एक आर्येतर द्राविडी वगैरे लोकांची आणि दुसरी आर्यांची. या दोन्ही वसाहतींचें नक्की काळ सांगणें कठीण आहे.

८०. **पाणिनिपूर्व वसाहत**—दक्षिणेकडील वसाहतींमध्ये कालाच्या दृष्टीने दोन स्थूल भाग पडतात. पहिला पाणिनिपूर्व वसाहती व दुसरा पाणिन्युत्तर वसाहती. पहिल्या अनार्यांच्या व दुसऱ्या आर्यांच्या. अनार्यांच्या वसाहती किंवा पाणिनिपूर्व प्राचीन वसाहतींसंबंधी आणखी-हि एक अनुमान शक्य आहे. एखाद्या वसाहतयोग्य प्रांतांत वसाहत करण्यास लोक बाहेरूनच आले पाहिजेत असें नाही. तेथेच मुळचे तद्देशीय लोक असणें शक्य आहे. दक्षिणेंत जरी दण्डकारण्य होतें तरी त्यांतहि जीवसृष्टीची शक्यता होतीच व जगांतील इतर ठिकाणीं जीव-सृष्टींतील 'अमीबा' या सजीव मांसल गोळयापासून उत्क्रांत होत होत माणूस जर तयार होतो तर दक्षिणेकडील दण्डकारण्यांतच तो कां होऊं नये ? तेव्हा तेथेहि मूळचे लोक तेथील श्वापदांशीं समरस व एकजीव झालेले वन्य, रानटी असे असलेच पाहिजेत. उपरे म्हणून जे बाहेरचे अनार्यलोक दक्षिणेंत पाणिनिपूर्व कालीं आले त्यांची येथे गणना प्रथम नमूद करतों.

प्राक्पाणिनीय लोकांपैकी पहिले नाग लोक. सर्व अनार्य लोकांत 'नाग' लोकांची संस्कृति जास्त उच्च होती व तीमुळे ह्यांना अनार्य म्हणणें कांही लोकांना पटत नाही. उत्तरेकडे सुद्धा यांचा आणि आर्यांचा संबंध फार आला. कुश, अर्जुन, भीम ह्या आर्यांचे आणि नागांचे शरीरसंबंध झाले. नागांचा एक कर्कोटक नांवाचा वंश काश्मिरांत राज्य करीत होता व काश्मिरचा पहिला राजा जो नील तो जातीने नाग होता, असा राजतरंगिणींत उल्लेख आहे. नागपूर, नागपट्टण, नागांव ह्या व इतर पुष्कळ ग्रामनामांत नागांच्या स्मृतीचा अवशेष दिसतो. महाभारत व इतर पुराणें ह्यांमध्ये नागांचा निर्देश पुष्कळ ठिकाणीं आला आहे. पृथ्वीचीं जीं नऊ खंडें पुराणांत मानिलीं आहेत त्यांमध्ये वारुणद्वीप आणि नागद्वीप हीं दोन आहेत[१]. त्यांपैकी वारुणद्वीप ब्रह्मावर्ताच्या पश्चिमेस आणि नागद्वीप ब्रह्मावर्ताच्या दूर दक्षिणेस होतें हीं दोन्हीं द्वीपें महीतलांत पुरातनकालीं मोडत असत. वरुण लोक नागांच्या उत्तरेस व नाग वरुण लोकांच्या दक्षि-

---

१ महाभारत-हरिवंश. २- २ महाभारत-उद्योगपर्व, अध्याय १९-११०.

णेस आणि दोहोंना पश्चिमसमुद्राची मर्यादा असलेली; म्हणजे वर्तमानकालीन सिंधकाठेवाडपासून गोकर्णमलयगिरीपर्यंतचा पश्चिम समुद्राकडील जो मुलूख तो सर्व महीतलांत येत असे. नाग लोक पाताल व रसातल ह्या दोन ठिकाणींहि राहत असत[१]. गोकर्ण, पाताल, रसातल, तल, मलय ह्या सर्वांचा नागदेश म्हणून एकसमयावच्छेदेंकरून उल्लेख नागानंदांत आला आहे.[२] नागानंद नाटकाचा नायक जीमूतवाहन हा मलयपर्वतांतील गोकर्णक्षेत्राजवळ शंखचूडनामक नागाचे प्राण वाचविण्याकरिता सिद्ध झाला. नाग लोकांची राजधानी भोगवती व राजा वासुकी हा होता. नाग लोक उत्तरेकडून खाली दक्षिणेकडे कोणत्या मार्गाने आले ह्याची कल्पना वरान्वेषणासाठी मातलीने उत्तरेकडून खाली जो प्रवास केला त्यावरून बरोबर येण्यासारखी आहे. महीपृष्ठावरून (अरवली व विंध्यघाट) महीतल व तेथून वरुण, तेथून नाग लोकांत, तेथून पातालांत, –दैत्यांचें हिरण्यपूर– सुपर्ण लोक–रसातल (भोगवती) असा त्याचा प्रवास झाला[३]. ह्या मार्गानेच नाग लोक वरून खाली आले असावेत. बुद्धाच्या कालीं नाग लोक बरेच पुढारलेले होते; कारण गौतमबुद्धाने आपल्या मताचा प्रसार ह्या नाग लोकांमध्येच केला असल्याचें कांहीं भित्तिचित्रांवरून सिद्ध होतें. गौतमबुद्ध मध्ये बसलेला आणि त्याच्या भोंवतीं कमरेवर नागाचें वेटाळें व डोक्यावर नागाची फणा घेतलेले असे नाग लोक बसलेले असा देखावा त्या चित्रांत आहे.

वरील सर्व हकीकतीवरून हें सिद्ध होतें की, पाणिनिपूर्व कालीं आर्यांच्या अगोदर नागांचा प्रवेश दक्षिणेंत झाला. नागांचा आणि दक्षिणेकडील प्रांतांचा व विशेषतः पश्चिमेकडील कोंकणचा जास्त संबंध आला; कारण महीतलांचा जो भाग रसातल होता, त्यालाच अपरान्त ( अन्तः प्रान्तान्तिकेषु च ) म्हणत असत. शिवाय, उद्योगपर्वांत १०३ अध्यायामध्ये जी नागांचीं कुलें दिलीं आहेत त्यांत कुकुण म्हणून एक नागकुल आहे. ह्या नागकुलावरून कांहीं आधुनिक प्रचालेत आडनावें राजवाड्यांनी व्युत्पादिलीं आहेत[४]. कांहीं जातींतील नांवांच्या शेवटीं नाक असा शब्द

१ कथासरित्सागर–तरंग, २२. २ नागानंद, अंक ५, श्लोक १९.
३ उद्योगपर्व, ९८–९९–१०२. ४ इतिहाससंग्रह, व. ५.

येतो. महारांत घोंडनाक, रामनाक इत्यादि नांवांच्या शेवटींहि हा शब्द येतो. त्या शब्दाचा आणि नाग ह्यांचा संबंध येतो की काय? व त्या लोकांचा ह्या नाग लोकांशीं संबंध आहे की काय?

दुसरी जात वानरांची. हेहि डोंगरी लोक होते. ह्यांचें मूळ वसतिस्थान ऋष्यमूक पर्वत. वालिसुग्रीवादि ह्यांचे नायक. तसेंच रावण, कुंभकर्ण, बिभीषण ज्या कुलांत होऊन गेले तीं राक्षसांचीं कुलें, रावणाची बहीण कुंभीनसी इजपासून उत्पन्न झालेले मधुदानव वगैरे दानवांचीं कुलें, ह्या सर्वांच्या वसाहती महाराष्ट्राच्या खालीं दण्डकारण्याच्या पलीकडे होत्या, एवढेंच नव्हे तर चांगल्या सुसंपन्न स्थितींत व आर्यांच्या तोडीच्या संस्कृतींत नांदत होत्या.

ह्याशिवाय महार, मांग, गोंड, भिल्ल, वारली, कोळी, ठाकूर, वध्र, मल्ल धनगर, काथोडी, कातकरी ह्या एतद्देशीय लोकांच्या वसाहतीहि महाराष्ट्रांत होत्या. महार हे राजपुतान्यांतील व काठेवाडांतील मेहेतर लोकांपैकीच होते की काय? भिल्लांच्या वसाहती खानदेशांत आहेत. गोंड हे गोंडवनांत राहत असत व ह्यांची वसति वऱ्हाडांत जास्त होती. गोंडवनाच्या पलीकडे शबर जातीचे लोक आपल्या शबरखंडांत राहत असत. साबरमतीच्या खोऱ्यांत शबरांची वसति असावी असा तर्क शबरमती ह्या नामसादृश्यावरून करावासा वाटतो. वारली लोक कोंकणांत व नर्मदेच्या आसपास राहत असत. नर्मदेजवळ ठक्कर नांवाचे लोक (तस्कर > ठक्कर) राहत असत. मल्ल म्हणून एक फिरती जात होती. वध्र म्हणजे आधुनिक वडारी नांवाची द्राविडी जात असावी.

या सर्व जातींबरोबरच ऐतरेयब्राह्मणांतील आख्यायिकेंत उल्लेखिलेल्या लोकांचा निर्देश केला पाहिजे. विश्वामित्रास शंभर मुलगे होते. त्याचें आणि त्याच्या मुलांचें कांही थोडेंसें बिनसल्यामुळे त्याने त्यांना निरनिराळ्या १०० प्रांतांत घालविलें. त्या मुलांचीं नांवें मूतिब, पुलिंद, शबर, वगैरे होतीं. ह्यावरून एवढेंच अनुमान निघणें शक्य आहे की, आर्य व मूतिबादि लोक एकवंशीय असून अधर्माचरणामुळे ते पतित झाले असावेत.

८१ अशा रीतीने या पाणिनिपूर्व कालांत महाराष्ट्रांत जी वसाहत झाली तिच्या संबंधीचा हा आढावा झाला. आर्यांची वसाहत विंध्याच्या खाली

नव्हती. साधारण स्थूलमानाने असें म्हणतां येईल की, आर्यांची वसाहत जी दक्षिणेकडे झाली तिजसंबंधी पौराणिक कथांचें भारूड बाजूस सारून जर ऐतिहासिक दृष्टीचा निकष लावला तर पाणिनीच्या नंतर ती झाली असें सिद्ध होतें. पाणिनीच्या अष्टाध्यायीमध्ये दक्षिणेकडील कोणत्याहि देशाचा उल्लेख नाही. तद्धित प्रकरणांत 'तस्यापत्यम्' (४-१-९२) व 'जनपदशब्दात् क्षत्रियादञ्' (४-१-१८) ह्या सूत्रांवर जो ऊहापोह केला आहे तो सर्व उत्तरेकडील प्रदेशाचा आहे. विंध्यदक्षिण असा त्यामध्ये नामनिर्देश नाही. बरें, पाणिनीच्या दृष्टिपथांत किंवा श्रुतिपथांत आलेल्या यच्चयावत् संस्कृतसम शब्दांचा व्याकार व त्यांचा सोपपत्तिक निर्देश करण्यास तो चुकला नाही. त्याची दृष्टि व कृति अशा दृष्टीने सर्वव्यापी समजली जाते. तेव्हा अशा सर्वव्यापी ग्रंथाची व्याप्ति दक्षिणेकडे ज्याअर्थी वळत नाही त्याअर्थी आर्यांचें लक्ष दक्षिणेकडे त्याच्या काळीं गेलें नव्हतें हें खास. तेंच पुढे कात्यायन-पतंजलीच्या वेळेस पाहा. मूळ पाणिनीय सूत्रांची व्याप्ति कमी दिसून आली किंवा त्यांतील निर्देश कोता दिसून आला तर पूरक माहिती कात्यायन आपल्या वार्तिकांत देतो व ह्याचकरिता कात्यायनाची प्रवृत्ति आहे. वार्तिकांमध्ये व पतंजलीच्या महाभाष्यामध्ये दक्षिणेकडील उल्लेख येतात. कात्यायन मात्र 'पाण्डोर्ड्यण्' [वा. २६७१] या वार्तिकांत पाण्ड्यांचा निर्देश करतो आणि पाण्ड्य हे दक्षिणेकडील राजे होते. पतंजलिहि दाक्षिणात्यांचा उल्लेख करतो. 'सरसी' हा शब्द 'मोठें सरोवर' ह्या अर्थी दाक्षिणात्यांमध्ये वापरतात, असें तो म्हणतो. त्याअर्थी या दोहोंच्या दरम्यान आर्यांची वसति दक्षिणेकडे झाली असावी हें उघड आहे. पाणिनीचा काल खिस्तपूर्व ७०० आहे. आर्यांचा दाक्षिणेशीं व तत्परत्वें महाराष्ट्राशीं संबंध त्यानंतरचा आहे.

कात्यायन आणि पाणिनि या दोहोंमध्ये कांही नाही तरी तीनशें वर्षे तरी गेलीं असावींत. पतंजलीचा काल महाभाष्यांत आलेल्या 'अरुणद्यवनः साकेतम्' या उदाहरणांत उल्लेखिलेला यवन जो मिनण्डर यावरून खिस्तपूर्व १५० ठरतो.

८२ ह्या सर्व पुराव्यावरून पाणिनीनंतर व कात्यायनाच्या पूर्वी बुद्धकाळाच्या आरंभीं उत्तरेंत जो एक भली मोठी लोकक्रांति झाली त्या वेळीं उत्तरे-

कडील निरनिराळ्या प्रांतांतील निरनिराळ्या प्रांतिक भाषा बोलणारे आर्य लोक व त्यांच्यावर उपजीविका करणारे कांही इतर थोडेसे अनार्य असे दक्षिणेत आले व त्यांनी आपल्या वसाहती थाटल्या आणि त्या वसाहतीहि सर्व काळीं सारख्या थाटल्या नाहीत. कलिंग व अपरान्त म्हणजे पूर्वेकडील आणि पश्चिमेकडील कोंकणपट्टी या प्रथम व्यापिल्या आणि त्या मार्गानेच आर्य खाली कांजीवरमपर्यंत जाऊन तेथील प्रांतहि त्यांनी वसविला. उत्तरेकडील विदर्भ प्रांतहि त्याच्या अगोदर व्यापिला. त्या तिन्ही प्रांतांचे निर्देश फार प्राचीन कालापासून येतात. छान्दोग्य उपनिषदांत कौडिण्य वैदर्भी नावांच्या ऋषीचा उल्लेख आहे. त्याच्या नांवावरून कौण्डिण्यपूर गांव वसलें. हेंच पुढे नल-दमयंतीच्या वेळीं भीष्मकाचें राज्यनगर म्हणून प्रसिद्धीस आलें. असाच कलिंग व अपरान्त यांचा उल्लेख आर्यांचा प्रदेश म्हणून येतो. विदर्भ, कलिंग व अपरान्त या प्रांतांत ज्या वेळीं वसाहत झाली त्या वेळीं दण्डकारण्यांत वसाहत नव्हती. कांही कांही ठिकाणीं 'महाराष्ट्र' या शब्दाची व्याप्तिहि हल्ली आहे त्याहून पुष्कळ भिन्न सांगितली आहे. महाराष्ट्रें तीन होतीं व तीं 'अश्मक, कलिंग व अपरान्त' हीं तीन होत असें महाभारतांत नमूद आहे.

विदर्भाचीं जीं विदर्भ, कैशिक, भोज, भोजकट, वर्धातट व महाराष्ट्र हीं सहा नांवें आहेत त्यांत महाराष्ट्राचा समावेश आहे. विदर्भ आणि महा-राष्ट्र हीं नांवें समान अर्थानें उपयोजिलीं आहेत. त्याला आधारहि पूर्वीच्या ग्रंथांत मिळतो. राजशेखर कवीच्या बालरामायण नांवाच्या नाटकांत एक प्रसंग घातला आहे. त्यांत पुष्पक विमानांत बसून श्रीरामचंद्र, सीता व सुग्रीव हीं तिघें लंकेहून परत जात असतां सुग्रीव प्रत्येक देशाचें वर्णन करतो—

सुग्रीव—भरताग्रजायमग्रे महाराष्ट्रविषयः
राम—सोऽयम् सुभ्रु परो विदर्भविषयः सरस्वतीजन्मभूः
सीता—यत्रोत्पन्ना मे पितामहश्वशुरस्य गृहिणीन्दुमती।

—बालरामायण १०-७४.

त्याचप्रमाणे मुरारि हा कवीहि आपल्या अनर्घ्यराघव नाटकांत "इदमग्रे महाराष्ट्रमण्डलैकमण्डनं कुण्डिननाम नगरम्।" असा, कुंडिननगर हें महा-राष्ट्रांतील राजधानीचें शहर म्हणून उल्लेख करतो.

विदर्भ म्हणजे महाराष्ट्र हे जसे उल्लेख सापडतात तसेच अपरान्त म्हणजे महाराष्ट्र असेहि उल्लेख सापडतात.

यावरून महाराष्ट्र या देशाची व्याप्ति नीट ठरली नव्हती असें दिसतें. महाभारतांत गोपराष्ट्र, मल्लराष्ट्र, पांडुराष्ट्र अशा महाराष्ट्रांतील निरनिराळ्या उपभागांचा उल्लेख केला आहे. गोपराष्ट्र म्हणजे गोप नांवाचे जे गोचारणजीवी लोक होते त्यांचा देश. यांचे नायक कृष्ण, बलराम वगैरे. यांचा देश मूळचा उत्तरेकडे मथुरेजवळ; परंतु या गोपांची एखादी वसाहत दक्षिणेकडे महाराष्ट्रांत असावी असें महाभारतांतील निर्देशावरून अनुमान संभवतें. हें गोपराष्ट्र नाशिकच्या आसपासचा प्रदेश होय. दुसरें मल्लराष्ट्र. यांतील मल्ल नांवाचे रानटी लोक होते. त्यांचें निर्दलन खंडोबानें केलें म्हणून त्याला मल्लारी असें नांव पडलें असावें. मल्ल हा शब्द कांहीं लोकांत नांवाच्या शेवटीं उपपद म्हणून लावतात. हे दक्षिणेंतून वर आले असावे. मल्ल याचा अर्थ पर्वत असाहि आहे व त्या अर्थानें माळवा इत्यादि ग्रामनामांत तो उपयोजिला आहे. तेव्हा मल्लराष्ट्र म्हणजे डोंगराळ प्रदेश असाहि अर्थ संभवनीय आहे. गोपराष्ट्राच्या खालचा प्रदेश मल्लराष्ट्रांत मोडत असावा. पांडुराष्ट्र म्हणून जो उल्लेख येतो तो पाण्ड्याच्या प्रदेशाबद्दल आहे. याचाहि अंतर्भाव महाराष्ट्रांत होत असावा. याशिवाय, समुद्रगुप्ताच्या एका शिलालेखांत देवराष्ट्राचा उल्लेख आहे. हें देवराष्ट्र खाली सातारा जिल्ह्यांत दक्षिणेकडे आहे. हेंहि महाराष्ट्रांत गणलें जातें. वर दिलेलीं सर्व राष्ट्रें व अश्मक, अपरान्त, विदर्भ हे मोठे विभाग, हें सर्व मिळून महाराष्ट्र बनलें आहे.

८३. **पाणिन्युत्तर वसाहत**—महाराष्ट्रांत पाणिनिपूर्व कालांत वसलेल्या लोकांची गणना मागे केली. आता पाणिनीनंतरच्या कालांत महाराष्ट्रांत वसलेल्या लोकांची गणना करतों.

(१) ह्या कालांत उत्तरेकडून जे लोक खाली उतरले ते सर्व आर्य ह्या मानववंशांतील होते. नाग नांवाचे लोकहि उत्तरेकडूनच महाराष्ट्रांत शिरले परंतु ते पाणिनीच्या अगोदर शिरले. नागांसंबंधीची माहिती मागे दिलीच आहे. आता आर्य लोकांच्यासंबंधी विचार करूं. आर्य लोकांतील मुख्य घटक ब्राह्मण. सरस्वतीदृषद्वतींच्या दुआबामध्ये राहिलेल्या ब्राह्मणांनी

विंध्योत्तर प्रदेशांतील राजकर्तृक वगैरे जुलमांना, किंवा त्यांच्या यज्ञयागादिक धार्मिक व्यवहारांतील व्यत्ययांना किंवा जैन व बौद्ध ह्या अवैदिक पाखंडी मतांच्या त्रासाला कंटाळून देशान्तर केले. अशीहि दंतकथा आहे की, दक्षिणेकडील राजाने यज्ञासाठी वरून मगधांतून सारस्वत ब्राह्मण खाली आणविले. तेव्हा अशा निरनिराळ्या कारणांनी उत्तरेकडील निरनिराळ्या भागांतून कांही ब्राह्मण पश्चिमेकडील अपरान्ताच्या मार्गाने खाली उतरले व कांही पूर्वेकडील कलिंगाच्या मार्गाने खाली उतरले. ब्राह्मणांपैकीं सारस्वत ब्राह्मण पश्चिमेकडून व नंबुद्रि ब्राह्मण पूर्वेकडून प्रथम खाली उतरले. त्याच वेळीं कांही ब्राह्मण विदर्भामध्ये स्थायिक झाले. त्यांच्यापैकी कांही खाली खानदेश, नगर व नाशिक ह्या प्रांतांत उतरले व कांही कोंकणांत आडव्या मार्गाने (तापी खोऱ्यांतून) उतरले असावे. खानदेश, विदर्भ, नगर, नाशिक ह्या प्रांतांतील यजुर्वेदीयांची वसति जुनी असावी. सध्या सातारा, सोलापूर, पुणें वगैरे प्रांतांत जे देशस्थ ब्राह्मण आहेत, त्यांच्यापैकी बरींच कुटुंबें दुर्गादेवीच्या दुष्काळांत खालून—कर्नाटकांतून वर चढल्याबद्दल कांही घराणीं सांगतात. कोंकणस्थ ब्राह्मणासंबंधी जीं निरनिराळीं विचित्र अनुमानें कांही विद्वानांनी काढलीं आहेत त्यांतील एकहि अनुमान बुद्धीला पटत नाही. विदर्भापर्यंत सर्व ब्राह्मण एकत्र असावेत. त्यांपैकी कांही कोंकणांत गेले व कांही पूर्व मार्गाने दक्षिणेंत गेले व तेथून दुर्गादेवीच्या दुष्काळांत वर सरकले. नाही तर धार्मिक, सामाजिक, सांस्कृतिक वगैरे दृष्टींनी कोंकणस्थ व देशस्थ इतके एकरूप असतांना एकाने म्हणावें हे चितेपासून पावन झाले, दुसऱ्याने म्हणावें ते इजिप्ताहून आले, तिसऱ्याने म्हणावें चैत्यासंबंधी धार्मिक कृत्यें करण्यासाठी वरून खाली आले, चौथ्याने हे तुर्की ब्राह्मण अशियामायनरमधून काठेवाडांत आले व तेथून कोंकणांत उतरले असें म्हणावें, पांचव्याने तर मत्स्योपजीवी कोळ्यांना परशुरामाने जानवीं देऊन जे ब्राह्मण केले ते कोंकणस्थ असें म्हणावें, हें खरोखर आश्चर्य आहे. विदर्भ, खानदेश व जोगाईआंब्याजवळचा प्रदेश जोंपर्यंत ब्राह्मणमय होता तोंपर्यंत हे सर्व एकत्र होते. पुढे वसाहतकर्मांत ह्यांची त्यांची ताटातूट झाली. हे जे खाली आले ते नर्मदा नदीपासून भीमेपर्यंतच्या मुलुखांत सह्याद्रीच्या उतरणीवर देवगिरीपासून पैठणापर्यंतचा मुलुख व्यापून वसाहत करून राहिले.

कारण, या महाराष्ट्रीयांचे उल्लेख नाशिक, जुन्नर, कान्हेरी येथील शिलालेखांत आले आहेत. याच प्रांतांत पूर्वस्थायी झालेल्या नाग लोकांशीं यांचें मिश्रण होऊन त्यापासून हल्ली मराठ्यांत मोडत असलेल्या जाती उत्पन्न झाल्या असाव्या.

(२) पाणिनीच्या नंतरच्या कालांत ज्याप्रमाणे ब्राह्मण उत्तरेकडून दक्षिणेकडे निरनिराळ्या कारणांमुळे आले आणि वसाहतकर्मास प्रवर्तले, त्याप्रमाणे त्यांच्याबरोबर आर्य समाजांतील क्षत्रिय, वैश्य, शूद्र व इतर घटकहि दक्षिणेकडे महाराष्ट्रांत आले असावे. "उत्तरेकडील महापद्मादि दुष्ट शूद्र राजांच्या, जैन-बौद्धादि पाखंडांच्या व व्रात्यशूद्रादि उत्पथांच्या जुलमाला कंटाळून स्वधर्म, स्वराज्य व स्ववृत्ति यांचा अनुभव घेण्यास दक्षिणारण्यांत बौद्धकालाच्या प्रथम ज्वानींत म्हणजे शकपूर्व सहाशेंच्या सुमारास वसाहती करण्यास शिरले." मगधांतून जे लोक आले ते महाराष्ट्रीय होत. या महाराष्ट्रीय शब्दाचाच अपभ्रंश महरट्ट असा होतो. महाराष्ट्रिक आणि महाराजिक हे एकच होत. यांचा निर्देश 'महाराजाट्ठन्' या पाणिनीच्या सूत्रांत आला आहे. हे क्षत्रिय होते. यांची वृत्ति राजाची होती. ह्यांची व पुढे उल्लेखिलेले राष्ट्रिक व वैराष्ट्रिक ह्यांची राज्यशकट हांकण्याची पद्धत 'गणराज्या' सारखी होती. त्यामध्ये गणनायक असत. अशा तऱ्हेचा एक गणनायक नाणेघाटांतील कोरीव लेण्यांत खोदला असून त्याखाली 'महारठीगनकयिरो' (महाराष्ट्रीगणकवीरः) असा निर्देश आहे. गणराज्यांतसुद्धा बहुनायकी, गणनायकी, एकनायकी, महाजनकी असे प्रकार असत. ह्यांची भाषा मागधी व माहाराष्ट्री असे.

(३) क्षत्रियांपैकी दक्षिणेंत आलेले दुसरे राष्ट्रिक लोक होत. अशोका-(ख्रि. पू. ३२७)च्या शिलालेखांत जे रास्टिक म्हणून उल्लेखिलेले आहेत ते हे राष्ट्रिक. ह्यांचा मूळ देश कुरुपांचाल. राष्ट्रिकांनाच 'राजा' म्हणून अभिषेक करून घेण्याची पात्रता असे आणि त्यांनाच 'अभिषिक्त राजे' असें संबोधीत[१]. (ये के च कुरुपांचालानां राजानः सवशोशीनराणां राज्याय एव ते अभिषिंच्यन्ते राजेत्येतान् अभिषिक्तान् आचक्षते)[२]. राष्ट्रिक शब्दाचा

१ राजवाडे, महाराष्ट्राचा वसाहतकाल, पान १५८.

२ ऐतरेयब्राह्मण, अध्याय ३८.

जमिनीचा धारा घेणारा अधिकारी असा अर्थ दिला आहे; परंतु वर दिलेल्या माहितीवरून हा नवीन अर्थ सहज दिसत नाही. राष्ट्रिकांची उत्तरेकडील प्राकृत शौरसेनी ही बोली होती. ह्या लोकांनी आपली वसाहत दक्षिणेकडे बेळगांवाकडे, सोलापुराकडे, स्थूलमानाने बीडपासून सौंदत्तीपर्यंतच्या टापूत केली. तिकडील कांही ग्रामनामांत उदाहरणार्थः—रट्टपाटी, रट्टगिरी, रट्टपली, रट्टेहल्ली वगैरे नांवांत राष्ट्रिकांचा स्मृत्यवशेष आढळतो.

(४) क्षत्रियांपैकी दक्षिणेंत आलेली तिसरी जात वैराष्ट्रिकांची. यांचा मूळ उत्तरेकडील प्रदेश उत्तर कुरु आणि उत्तर मद्र यांमधील विराट् या नांवाचा होय. पुण्याच्या दक्षिणेकडचा जो 'वाय देश' म्हणून प्रसिद्ध देश आहे त्याच प्रांतांत हे वैराष्ट्रिक स्थायी झाले. विराट्देश, वैराटगड, वैराडगड वगैरे नांवें वैराष्ट्रिकांचीच साक्ष देतात. वैराष्ट्रिकांची मूळ भाषा अपभ्रंश व त्या भाषेसह ते खालीं उतरले.

(५) महाभारतांत देशांच्या नांवाची जी एक यादी दिली आहे त्या यादींत विदर्भानंतर रूपजीविक व अश्मक हीं दोन राष्ट्रें दिलीं आहेत. रूपजीविक म्हणजे सौंदर्याबद्दल ख्याति असलेले किंवा रूपावर उपजीविका करणारे लोक असा अर्थ निघेल. महाराष्ट्राच्या आसपासचे हे कोण लोक असावेत ह्याविषयीं नक्की मत होत नाही. ब्रह्मदेशांतील लोकांना रूपोपजीवी म्हणतात; परंतु त्याचा विदर्भाशीं संदर्भ काय ? भडोचच्या आसपासच्या प्रदेशास प्राग्ज्योतिष असें म्हणत. तेथील तर लोक हे नसतील ना ? अश्मक हे आधुनिक मराठ्यांचे पूर्वसंबंधी आहेत. त्यासंबंधी पुरावा आपल्यास बौद्धग्रंथांत मिळतो. बुद्धाच्या वेळीं प्रसिद्ध असलेल्या ज्या सोळा लोकांची याद बौद्धग्रंथांत दिली आहे त्यांत अश्मक हें नांव आहे. त्या वेळेस अश्मक हे लोक गोदावरीच्या वरच्या भागाच्या तीरावर होते असा स्पष्ट उल्लेख आहे. अश्मकांची राजधानी पैठण ही होती. 'अश्मक' या शब्दाचें पाली भाषेंत 'अस्सक' असें रूप होतें व तें अश्वक याचेंहि रूप असूं शकेल[१]. त्यावरून त्यांना अश्वक असेंहि नांव कोठे कोठे दिलेलें आढळतें. परंतु महाभारतांत उल्लेख आहे तो अश्मकांचा आहे, अश्वकांचा नाही.

१ Rhys Davids—Buddhist India, P. 28.

(६) वर दिलेल्या लोकांशिवाय आणखी भोज, महाभोज, सतियपुत, पेतेनिक, केरळपुत्त, पाण्ड्य, चोल इत्यादि दक्षिणेकडील लोकांचा उल्लेख अशोकाच्या शिलालेखांत आला आहे (खिस्तपूर्व ३२७). भोज हे मूळचे मथुरा प्रांतांतील. भोज शब्दाला स्वार्थे ‘ल’ प्रत्यय लावून ‘भोसले’ हा शब्द व्युत्पादितात. मथुरामंडळाजवळच सात्वत नांवाचे लोक होते. सतियपुत म्हणजे सात्वतपुत्र, ‘सात्यकी’ हा सात्वत कुळांतच जन्मला. यादव कुळांचा आणि सात्वतांचा संबंध होता. सतियपुत म्हणजे सत्यपुत्र असें गौरीशंकर ओझा म्हणतात. सातपुड्याशीं त्यांचा संबंध डॉ. केतकर लावतात व ते आंध्रभृत्यच असावेत असें डॉ. भांडारकरांचें मत आहे. पेतेनिक म्हणजे प्रतिष्ठानचे, अर्थात् पैठणकडील लोक. पाण्ड्य हे दक्षिणेकडील, त्यांचा उल्लेख कात्यायन आपल्या वार्तिकांत करतो. चोल म्हणून जे लोक वर सांगितले आहेत त्यांचा आणि चूलिकापैशाची भाषेचा कांही संबंध आहे कीं काय ?

(७) वैश्यांपैकी दक्षिणारण्यांत वसाहत करण्यास जे आले त्यांच्यामध्ये मुख्य आभीर होत. आभीर लोक मूळचे उत्तरेकडचे. ते हिंदुस्थानच्या उत्तरेकडे पश्चिमेस सिंधुनदीच्या तीरावर राहत असत अशाबद्दलचा महाभारतामध्ये (२-३२-११९२) उल्लेख आहे. त्यांचा व तत्कालीन आर्यांचा फारसा सलोखा नसावासें दिसतें. त्यांच्याकडे ते शत्रुत्वाच्या दृष्टीने पाहत असत. सरस्वती नदी जी एकदम अदृश्य झाली ती ह्या आभीर लोकांच्या दुष्टाव्यामुळेच; परंतु त्यांचा मूळचा युद्धप्रिय असा स्वभाव असल्यामुळेच त्यांची गणना चांगल्या योद्ध्यांमध्ये होत असे व ते दस्यु जातींतील असून देखील त्यांचा उपयोग व्हावा म्हणून आर्य लोक त्यांना आपल्या सेनेमध्ये सामील करण्यास उत्सुक असत. द्रोणाचार्यांनी जो सुपर्णव्यूह रचला त्यामध्ये या आभीर जातीच्या दस्यूंना त्यांनी प्रमुख स्थान दिलें होतें. दुसऱ्या एका आभीरांच्या टोळीने अर्जुन द्वारकेहून श्रीकृष्णाच्या विधवा पत्नीसमवेत परत येत असतांना व पंचनदांत प्रवेश करण्याच्या प्रसंगी त्याच्यावर हल्ला केल्याचें महाभारतांत नमूद आहे. त्यांना गवळी, गुराखी, लुटारू, म्लेंच्छ इत्यादि नांवांनी संबोधलें आहे. बाप ब्राह्मण आणि आई अम्बष्ठ ह्यापासून झालेल्या संततीस मनु आभीर असें संबोधितो.

ह्यावरून इतकें दिसून येतें की, आभीर कोणी तरी कुडवे लढवय्ये, लुटारू, सतत फिरणारे असे कोणत्या तरी जातीचे लोक असावेत. आणि इतर शक, ग्रीक, यूएची, कांबोज इत्यादि जातींचे लोक जसे हिंदुस्थानांत उतरले, तसे त्यांच्याबरोबर हेहि उतरले असावेत, व नंतर पंजाबमध्ये त्यांनी सिंधूच्या काठीं वसति केली असावी. हा त्यांच्या वसाहतीचा काल साधारणपणें खिस्ती शकाच्या आरंभास असावा. दुसऱ्या व तिसऱ्या शतकांमधील शिलालेखांत त्यांच्यासंबंधी उल्लेख केलेले आढळतात. खि. उ. १८१ मधील क्षत्रप राजा रुद्रसिंह ह्याच्या लेखांत रुद्रभूति नांवाच्या त्याच्या आभीर जातींतील सेनापतीचा उल्लेख आहे. शिवदत्ताचा मुलगा ईश्वरसेन हा जातीने आभीर राजा होता अशासंबंधी माहिती खि.उ. ३०० च्या नाशिकच्या लेण्यांतील शिलालेखांत मिळते. खि. उ. ३६० मध्ये समुद्रगुप्ताने अलाहाबाद येथे एका स्तंभावर एक लेख कोरविला आहे. गुप्त साम्राज्याच्या मर्यादेपलीकडे दक्षिणेस आणि नैऋत्येस राजस्थान आणि माळवा ह्या देशांमध्ये ज्याप्रमाणे मालव नांवाची एक प्रतापशाली जात राहते त्याप्रमाणे त्यांच्याबरोबर तेथे आभीर नांवाची जात राहते असें समुद्रगुप्त आपल्या लेखांत म्हणतो. पंजाबमध्ये सिंधूच्या काठीं हे लोक जर खिस्ती शकाच्या आरंभीं होते असें मानिलें तर त्यांना माळव्या राजस्थानांत यावयास सुमारे तीनशें वर्षें लागलीं. माळव्यामध्ये त्यांचा वास सुमारे खि. उ. ४०० मध्ये होता. त्यांतील कांही मेळ्यांनी आपलें नेहमी फिरण्याचें व्यसन कमी केलें असावें. पायास बांधलेला भोंवरा काढून आपल्या युद्धप्रियतेचा उपयोग राज्ययंत्र चालविण्याकडे केला असावा हें नाशिकच्या लेखावरून स्पष्ट आहे. झांशीच्या दक्षिणेस अहिरवाड आणि संयुक्त प्रांतामध्ये अहारवाड अशीं जीं दोन ठिकाणें सापडतात त्यांचा आणि आभीरांचा संबंध असावासा दिसतो. दोन्ही शब्द संस्कृत आभीरवटिका अथवा आभीरवाट ह्या दोन शब्दांशीं विशेष वर्णांची ओढाताण न करतां सांधतां येण्यासारखे आहेत. कांही टोळ्यांनी येथे राज्यें स्थापिलीं असावींत व कांही टोळ्या पुन्हा दक्षिणेस व पश्चिमेस मुलुखगिरी म्हणा किंवा पोटगिरी म्हणा करण्यास निघाल्या असाव्यात. कारण, खिस्ताब्द आठव्या शतकांत ज्या वेळेस सुराष्ट्रावर कांठी लोकांनी हल्ला केला त्यावेळेस तो प्रांत आभीर लोकांच्या

ताभ्यांत होता असें एन्थोव्हेन आपल्या पुस्तकांत म्हणतो. तेच आभीर लोक दक्षिणेकडे आल्याचा पुरावा फेरिस्ता आपल्या इतिहासांत देतो. खानदेशमधील असीरगड हा अस-अहीर ( आभीर ) ह्या आभीर जातींतील पुरुषानें बांधल्याचें तो म्हणतो. दक्षिणेंत सहाव्या सातव्या शतकापर्यंत आंध्रभृत्य राजे राज्य करीत होते. त्यांच्या राजवटीनंतर आभीर लोकांची राजवट महाराष्ट्रांत सुरू झाली असें कांही पुराणांत सापडतें.

पुराणामध्यें आभीर राजे म्हणून ज्यांचा उल्लेख येतो त्यांच्यापैकीच एक शाखा 'त्रैकूटक' म्हणून बहुतेक असावी. खि. उ. २५० च्या सुमारास क्षत्रप कुलानंतर त्यांचा उदय झाला. आणि 'हैहय' ह्या नामाभिधानानें त्यांनी आपलें राज्ययंत्र चालवून आपली सत्ता 'त्रिकूट' ह्या शहरीं खि. उ. ४५५-६ च्या सुमारास बद्धमूल केली. उत्तर महाराष्ट्र आणि दक्षिण गुजरात ह्या प्रांतांवर त्यांनी आपला अम्मल ४१० पासून ५०० पर्यंत-चालुक्यांकडून त्यांना बाधा होईपर्यंत-निर्वेध रीतीनें चालविला. 'त्रिकूट' म्हणून जी त्यांची राजधानी होती ती पुष्कळ अंशानें पुण्याजवळचें 'जुन्नर' गांव असावें.

८४ अशा रीतीनें दक्षिणारण्यांतील वसाहतकर्मांचा पाणिन्युत्तरकालापासून ते इ. स. ६०० कालापर्यंतचा इतिहास आहे. खिस्तपूर्व ५०० च्या सुमारास या लोकक्रांतीस सुरुवात झाली. त्या वेळेस एक लोकक्रांति झाली. व त्यामुळे भाषाक्रांतिहि झाली. दुसरी लोकक्रांति खिस्तिसनाच्या आरंभीं झाली व त्या वेळेसहि दुसरी भाषाक्रांति झाली. वरील माहितीवरून आणखीहि एक गोष्ट स्पष्ट होईल की, उत्तरेकडून दक्षिणेकडे जे लोक आले ते निरनिराळ्या प्रांतांतून आले आणि येतांना ते आपल्या निरनिराळ्या भाषा घेऊन महाराष्ट्रांत आले. अर्धमागधी, शौरसेनी, माहाराष्ट्री, मागधी वगैरे भाषा निरनिराळ्या प्रांतांत ज्या रूढ होत्या त्याच भाषा त्यांनी खाली आणल्या. त्यामुळे या सर्व लोकांच्या भेसळीनें जो एक महाराष्ट्रांत मिश्र अपभ्रंश सुरू झाला त्यामध्यें शौरसेनी, माहाराष्ट्री, मागधी व इतर उत्तरेकडील किरकोळ बोली या सर्वांच्या खुणा सापडतात. तेव्हा मराठी ही अमुकच एका प्राकृतपासून उद्भवली असें न म्हणतां या सर्व प्राकृतांच्या भेसळीपासून ती उद्भवली हें म्हणणें जास्त सयुक्तिक व इतिहासास धरून आहे.

धर्मप्रसारासाठीहि पूर्वी पुष्कळ वेळां लोकक्रांति झाल्याचीं उदाहरणें आहेत. ख्रिस्तपूर्व २४६ मध्ये सम्राट् अशोकाने थेरो महाधम्मरक्खितो महाराष्ट्रांत धर्मप्रसारार्थ पाठविल्याचा उल्लेख ‘ महावंशांत ’ आहे. त्याच्या-जवळ ८४००० शिष्य होते; त्यांपैकी १३००० महाराष्ट्री होते.

महाराष्ट्राचें वसाहतकर्म याप्रमाणे संपूर्ण झालें. ‘यजुर्वेदी व ऋग्वेदी ब्राह्मणांनी जोसकी व कुलकरण आटोपलें. देशपांडे वगैरेंनी वतन मिळविलें. अल्पसंख्याक भोज-यादवादि क्षत्रियांनी व महाराष्ट्रिक, राष्ट्रिक, वैराष्ट्रिक इत्यादि क्षत्रियांच्या नागांशीं झालेल्या मिलाफाने क्षत्रिय समाज बनविला. त्यांनीच पाटील, कुणबी, देशमुख वगैरे वतनांचा आणि अधिकारांचा आटोप केला. आभीरांनी, गुह्यकांनी वैश्यवृत्ति चालविली. नागशूद्र, अतिशूद्र व पंचम यांनी अंत्यजातीचीं कर्में चालविलीं.’

## महाराष्ट्राचा इतिहास

८५ महाराष्ट्राच्या वसाहतकर्मांच्या विवेचनाबरोबरच आपल्याला तेथील राजवटींचा विचार थोडक्यांत केला पाहिजे. वसाहत कायम, स्थिर झाली म्हणजे साहजिकच राजदंडाची जरूरी भासते व त्या त्या वसाहतवाल्यांमधून राजन्याची शक्ति उत्पन्न होते. राजकीय सत्तेबद्दल ज्या वेळेस आपण विचार करतो त्या वेळेस पौराणिक वगैरे भाकड कथांवर आपणास विश्वास ठेवून चालत नाही. ऐतिहासिक दृष्टयाच त्याचें विवेचन आपणास करावें लागतें.

( १ ) महाराष्ट्रावर पहिली राजसत्ता मौर्यांची होती ह्याबद्दल ठाम असा शिलालेखाचा पुरावा मिळतो. सम्राट् अशोकाने आपल्या स्वभावांत नैतिक परिवर्तन झालेल्याचे लेख आपल्या साम्राज्याच्या चारी टोकावर प्रजेचें मन हिंसेपासून वळविण्यासाठी त्या त्या प्रांताच्या बोलींत खोदविले. त्या लेखांपैकी एक लेख महाराष्ट्रांतील ठाणे जिल्ह्यांत सोपारा येथे, दुसरा महाराष्ट्राच्या पूर्व सरहद्दीवर जबलपुराकडे रूपनाथ येथे, तिसरा अग्नेयीच्या कोपऱ्यास निजामशाहींत मस्की येथे आणि चौथा महाराष्ट्राच्या दक्षिण टोंकास सिद्धापूर येथे असे महाराष्ट्राच्या चार सीमान्तावर खोद-विले आहेत. ह्यावरून ह्या सीमान्तर्गत प्रांत अशोकाच्या साम्राज्यांत येत असावा. अशोकानंतरच्या बिंदुसार राजाने जरी आक्रमण कांही केलें नाही तरी

पुढच्या चंद्रगुप्त मौर्याची सत्ता महाराष्ट्रावर होती. मौर्यसत्तेचा व मौर्य घराण्याचा स्मृत्यवशेष मराठ्यांमधील "मोरे" ह्या आडनांवांत राहिला आहे. मौर्यांची सत्ता ख्रिस्तपूर्व ३२१ पासून १८४ पर्यंत होती.

( २ ) मौर्यांच्यानंतर ख्रिस्तपूर्व एक दोन शतकांपासून ख्रिस्तोत्तर दोन शतकांपर्यंत शातवाहन अथवा आंध्रभृत्य ह्या राजांचा अम्मल महाराष्ट्रावर होता. हें घराणें सनातनी होतें कीं अन्यधर्मीय परकी होतें ह्यासंबंधीं अद्याप मतभेद आहे. राजवाडे हे त्यांना हिंदुधर्माचे कट्टे पुरस्कारक समजतात. ते आळूची भाजी व भात खाणारे, त्यांच्या रथाच्या बैलाचे कान चिरफाडलेले व आंध्र राजांचे आपणांस सेवक म्हणविणारे असे होते अशा अर्थाचीं मोठीं मनोरंजक अनुमानें राजवाडे ह्यांनी शातवाहनासंबंधी राधामाधवविलास-चंपूच्या प्रस्तावनेंत काढलीं आहेत. महाराष्ट्रावर राज्य करणारे महाराष्ट्रीय घराणें हें पहिलें होय हें निश्चित आहे. राजसत्तेबद्दल ह्या घराण्यांत आणि खङ्गाराट घराण्यांत बऱ्याच वेळां चकमकी झाल्या. नहपाण खङ्गाराटानें शातवाहनांचा पराभव केल्याचा उल्लेख नाशिक व कार्ले येथील शिलालेखांत आहे. परंतु पुढे लगेच शातवाहन गौतमीपुत्र आणि पुलमायी ह्या दोघांनी खड्गाराटाचा पराभव करून आपला प्रदेश पुन्हा काबीज केला. कांही काळाने पुन्हा शातवाहनाचें नष्टचर्य ओढवून त्यांच्या गौतमीपुत्राचा पराभव माळव्याच्या रुद्रदामन् ह्या क्षत्रप राजानें केला व अशा रीतीने शातवाहनांची राजवट संपली.

(३) शातवाहनानंतर महाराष्ट्राच्या पश्चिमभागावर त्रैकूटक नांवाचे राजे ख्रिस्तोत्तर तिसऱ्या शतकाच्या मध्यापासूनच राज्य करीत असल्याबद्दलचा दाखला कान्हेरी येथील शिलालेखांवरून मिळतो. ह्या राजांची सत्ता आपल्या नांवाचा राजशक सुरू करण्या इतकी बद्धमूल झाली होती. त्रैकूटकांचा शक इ. स. २४९ पासून सुरू होतो.

(४) त्रैकूटकांनंतर महाराष्ट्रावर सार्वभौमत्व वाखाटक राजांनी गाजविलें ह्यांच्या साम्राज्यांत सर्व महाराष्ट्र येऊन पुन्हा त्याच्या उत्तरेकडील प्रांत येत असे. ह्यांच्याच अमदानींत उत्तरेकडील सम्राट् समुद्रगुप्ता- णेंत स्वारी केली. कालिदासाने आपल्या रघुवंशांत रघूने केलेल्या ह्या समुद्रगुप्ताच्या स्वारीचेंच आहे कीं काय अशी विद्वानां

समुद्रगुप्ताच्या ह्या स्वारीचें वर्णन त्याच्या एका शिलालेखांत आहे. त्यांत एरंडपल्लीचा दमन आणि देवराष्ट्राचा कुबेर ह्या दोन राजांचा त्याने पराभव केल्याचा उल्लेख आहे. एरंडपल्ली म्हणजे खानदेशांतील एरंडोल व देवराष्ट्र म्हणजे सातारा जिल्ह्यांतील (तासगांव तालुका) देवराष्ट्र हीं गांवें होत. देवराष्ट्राजवळच जें शंकराचें स्थान आहे त्यास सागरेश्वर अथवा समुद्रेश्वर असें म्हणतात. ह्यावरून समुद्रगुप्ताच्या नांवाचा ह्याच्याशीं संबंध असावा असें वाटतें. कांहीं विद्वानांच्या मतें हीं दोन्हीं स्थळें मद्रास इलाख्यांत आहेत. तें कसेंहि असो महाराष्ट्रांतील वाखाटकांना कांहीं समुद्रगुप्ताने त्रास दिला नाही.

(५) वाखाटकानंतर कलचूरी घराण्याचा महाराष्ट्राशीं संबंध आला. ह्या घराण्याने त्रैकूटकांचाच राजशक सुरू केला होता त्यावरून कदाचित् हें घराणें त्यांच्यापैकीच असावेंसें वाटतें.

(६) कलचूरीचा पराभव मंगलीश नांवाच्या चालुक्याने करून चालुक्यांची सत्ता महाराष्ट्रांत जी स्थापित केली ती निर्वेधपणें खिस्तोत्तर ७५३ पर्यंत मोठ्या भरभराटीने चालली. ह्यांचा अंमल ९९००० गांवांवर व महाराष्ट्राच्या तीन विभागांवर चालला होता अशा मजकुराचा एक शिलालेख आहे.

(७) मध्ये कांही काळ चालुक्यांच्यावर गंडांतर येऊन त्यांना राष्ट्रकूटांकडून हार खावी लागली. राष्ट्रकूट घराण्यांपैकी १९ राजांनी खि. उ. ७५३ पासून ९७४ पर्यंत पूर्वीच्या मराठवाड्यांत असलेल्या मान्यखेट (मालखेड) येथे अविच्छिन्न सत्ता गाजविली. अशोकाच्या शिलालेखांत उल्लेखिलेले राष्ट्रिक ते हेच राष्ट्रकूट-रट्ट असावेत. ह्या वंशांतील दुसरा कर्क ह्या राजाचा चालुक्यवंशीय तैलप नांवाच्या राजाने आपली गमावलेली सत्ता पुन्हा दोनशें सवादोनशें वर्षांनंतर मिळविली. चालुक्याचें मोठें साम्राज्य असून त्यांत कांही मांडलीक राजे होते. ह्या मांडलिकांपैकी सेउणदेशीय मांडलीक आणि माळव्याचा भोज ह्यांच्या [illegible]की झाल्या. शेवटीं सेउणचंद्रानें चालुक्यसत्ता कायम केली. चालु[illegible] अंमल इ. स. ११८९ पर्यंत निर्वेध चालला. पुढे शेवटचा सोमेश्वर [illegible]नंतर त्याचे मांडलीक आपआपसांत भांडून आपल्या जागींच [illegible]ध्यवर्ती चालुक्यसत्तेचा नायनाट झाला.

चालुक्यानंतर यादवांची राजवट सुरू झाली. ह्यांचा मुख्य प्रस्थापक भिल्लम नांवाचा राजा होता. यादव घराण्याच्या शाखा दोन : एक दक्षिणेकडील द्वारसमुद्राची शाखा व दुसरी उत्तरकडील देवगड-देवगिरीची शाखा. ह्या दोन्ही शाखा आपआपसांत भांडत असत. शेवटीं भांडणांत देवगिरीचा सिंघण राजा विजयी झाला व त्याच्याच वंशाने पुढे १४ व्या शतकाच्या आरंभापर्यंत राज्य केलें. तो इ.स. ११८९ पासून ते १३०७ पर्यंतच्या काळांत यादवांच्या कुळांत एकंदर ७ राजे झाले[१]. मराठा धर्म, मराठी भाषा, मराठी वाङ्मय ह्यांच्या दृष्टीने यादवांची राजवट ही उल्लेखनीय आहे. यादवांचा भाग्यरवि विभवगिरीच्या अत्युच्च शिखरावर असून त्याच्या सुखद अशा उष्म्यांत पूर्ण स्वराज्याचा आस्वाद उत्तर महाराष्ट्रदेश घेत असतांना मराठी भाषा व मराठी वाङ्मय ह्यांचा आरंभ व परिपोष झपाट्याने झाला. यादवांचें राज्ययंत्र सुरळित चालल्यामुळेच संत, संन्यासी, कवी ह्यांना स्वस्थता लाभली व अव्वल दर्जाचें काव्य निर्माण होऊं शकलें. 'क्षितीशु' जर 'न्यायातें पोशिता' असा असला तर प्रजा सुखी कशी असणार नाही! असें सूख प्रजेला कृष्ण, महादेव व रामदेव ह्यांच्या कारकार्दीत लाभलें. परंतु दुर्दैवाने जाधवांच्या रामराज्याचीहि शब्दशः शंभर वर्षे भरल्यासारखीं झालीं. महमदीयांची नजर दक्षिणेकडे फिरली व अल्लाउद्दीनाच्या नेतृत्वाखाली त्यांच्या झुंडी येऊन यादवांची राजवट उखडली गेली. शेवटीं तर मलीक काफूरने शंकरदेव यादव याला ठार मारून यादव सत्तेचा अंत केला.( —)

---

## परिशिष्ट

पूर्ववैदिक, संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश इत्यादि अवस्थांतून मराठीपर्यंत येण्यांत भाषेची परिणति कशी झाली हें खाली दिलेल्या उदाहरणांवरून स्पष्ट होईल.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ संस्कृतः— | जनो | वृक्षात् | फलानि | गृह्णाति |
| पालीः— | जनो | रुक्खा | फलाइं | गह्णाति |

---

(१) १ भिल्लम (११८९-११९१) २, जैत्रपाळ (११९१-१२१०)-३ सिंघण (१२१०-१२४७) ४ कृष्ण—कन्हर (१२४७-१२६०) ५ महादेव (१२६०-१२७१) ६ रामचंद्र (१२७१-१३०९) ७ शंकरदेव (१३०९-१३१२).

| | | | | |
|---|---|---|---|---|
| प्राकृतः— | जणो | वच्छाहि | फलाइं | गेण्हइं |
| अपभ्रंशः— | जणु | वच्छहे | फलाइं | गिह्णइ |
| मराठीः— | जन | वृक्षाहून | फळें | घेतो |

२ पूर्ववैदिकः— सागरह् वूपरय् तर्णं धरतय् तळे रत्नानय् गालयतय्
संस्कृतः— सागरः उपरि तृणं धरति तले रत्नानि गालयति
पालीः—— सागरो उपरि तिणं धरेति तले रतनानि गालेति
प्राकृतः— साअरो अवरि तणं धरइ तले रआणाणि घालइ
अपभ्रंशः—सायरु उवरि तणु धरइ तलि रयणइं घल्लइ
मराठीः— सागर वर तण धरितो तळीं रत्नें घालितों

३ पूर्ववैदिकः—शवुध्धं कयुदर्शं वल्हयुतव्यं शुवुध्धं कयुदर्शं लयुखयुतव्यम् युदम् शयुक्षयुतेव संपद्यतय्.

संस्कृतः—शुद्धं कीदृशं वल्हितव्यं शुद्धं कीदृशं लिखितव्यम् इदम् व्याकरण-शिक्षितेन संपद्यते.

प्राकृतः—सुध्द्धं किह वल्हिअव्वं सुध्धं किह लिहिअव्वं इअम् व्याकरण सिक्खिएँ समज्जइ.

अपभ्रंशः—सुद्ध किह वल्हिअव्वं सुद्ध किह लिहिअव्वं इअं व्याकरण सिक्खिएँ समज्जइ.

मराठीः—शुद्ध कसें बोलावें शुद्ध कसें लिहावें हें व्याकरण शिकल्याने समजतें.

४ पूर्ववैदिकः—चृत्वारय् शरृङ्गा तृयोस्य पादा द्वय् शयुर्षयु सप्त हस्तासवृऽस्य ।

वैदिकः—चत्वारि शृङ्गा तृयोस्य पादा द्वे शीर्षे सप्त हस्तासोऽस्य ।

संस्कृतः—चत्वारि शृङ्गाणि तृयोऽस्य पादा द्वे शीर्षे सप्त हस्ताः अस्य ।

प्राकृतः—चत्तारि शिङ्गाइं तिण्णि अस्स पाआ दुण्ण सिस्से सत्त हत्ता अस्स ।

अपभ्रंशः—चत्तारि सिङ्गाइं तीण्ण अस्स पाआ दुण्ण सिस्सा सत्त हत्था अस्स ।

मराठीः—चारीं शिङ्गें तीन याचे पाय दोन शीर्षें सात हात याचे ।

---

# प्रकरण ४ थें

# मराठीचे कालिक भेद

## यादवकालीन मराठी भाषा

८६ भाषेच्या एकंदर जीवनावर राजवटींचा किंवा त्या त्या कालाच्या राजकारणाचा बराच परिणाम होतो. राज्यक्रांतीबरोबर धर्मक्रान्ति, समाजक्रान्ति व भाषाक्रान्ति झाल्याचीं उदाहरणें प्राचीन इतिहासांत सापडतात. कोणत्या क्रान्तीमुळे कोणती क्रान्ति होते, कोण कोणाला कारण होते ह्यासंबंधी मतभेद राहील. परंतु राज्यक्रान्ति, धर्मक्रान्ति, समाजक्रान्ति, विचारक्रान्ति, भाषाक्रान्ति इत्यादि क्रान्त्या ह्या साधारणपणें समसामयिक अशा असतात हें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. राज्यक्रान्तिहि भाषेला बरीच जाणवते. मोठमोठे कवि व लेखक हे विचारामध्यें क्रान्ति घडवून आणतात व त्यामुळे भाषाक्रान्ति होत असली पाहिजे, अशीहि विचारसरणी कांहींकांची असणें शक्य आहे. परंतु कवि, लेखक वगैरेंच्या वाङ्मयाने लोकांच्या बोलींत--रोजच्या व्यवहाराच्या भाषेंत--क्रांति किंवा पालट होते हें तत्त्व आम्हांस मान्य नाहीं. त्या वाङ्मयाने विचारपरिवर्तन होत असेल. त्या वाङ्मयाने लेखनशैली बदलत असेल. परंतु त्याने भाषेंत फरक पडत नाहीत. एकाच काळांतील ग्रांथिक भाषेंत निरनिराळ्या लेखनरीति किंवा लेखनशैली असतात ह्याचें कारण प्रतिभासंपन्न वाङ्मय हें होय. प्रतिभासंपन्न वाङ्मयाने भाषा स्थिरावते, ती शिष्टमान्य होते, तिला नागर स्वरूप प्राप्त होतें. असल्या उच्च व तेजस्वी वाङ्मयाने विचारपरिवर्तन किंवा लेखनरीतिपरिवर्तन होत असेल परंतु त्याने भाषापरिवर्तन होत नाही. भाषापरिवर्तन होण्यास राज्यपरिवर्तनच व्हावें लागतें असें आम्हास वाटतें, व ह्या मतास अनुसरूनच मराठी भाषेच्या उद्गमापासून तो तिच्या वर्तमानकालीन स्थितीपर्यंत जे कालखंड पडतात त्यांना नांवें त्या त्या काळच्या मुख्य कवींवरून

न देतां त्या त्या काळच्या राजवटीवरून दिलीं आहेत. मराठीचा ग्रंथनिविष्टकाल जर शकोत्तर १२०० धरला तर त्या सुमारास यादवांची राजवट होती. ह्याच कालांत पुष्कळ महानुभावी साधु, मुकुंदराज, ज्ञानेश्वर, हे होऊन गेले. पुढे बहामनी राज्य सुरू झालें. ह्या कालांत एकनाथ, दासोपंत वगैरे साधुसंत झाले. पुढे शिवशाही सुरू झाली. ह्या काळांतील विचारपरिवर्तक कवि रामदास—तुकारामादि झाले. त्यानंतर पेशव्यांची अमदानी आली. तेव्हा मोरोपंत, वामन पंडित, श्रीधर, मुक्तेश्वर हे कवि झाले. पेशव्यांनंतर आंग्लाई सुरू झाली व ह्या काळांत नांवाजण्यासारखा कवि जरी कोणी झाला नाही तरी चिपळोणकर, आगरकर, टिळक ह्यांनी आपल्या लेखणीची चमक दाखविली. मराठी भाषेचे असे जे पांच कालखंड पडतात ते १ यादवकालीन, २ बहामनीकालीन, ३ शिवकालीन, ४ पेशवेकालीन, ५ आङ्ग्लकालीन—हे होत. ह्यांपैकी पहिल्या यादवकालीन भाषेचा विचार खाली केला आहे

८७ मराठी भाषेच्या उद्गमाची हकीकत मागे दिलीच आहे. उद्गमकाळाच्या सुमारची मराठीमध्ये झालेली ग्रंथनिष्पत्ति कांही उपलब्ध नाही. त्या काळचे जे कांही वाङ्मयावशेष उपलब्ध आहेत त्यांच्या आधारावर मराठीच्या जन्मकाळच्या स्वरूपाच्या खुणा आपणास सांगतां येतील.त्यावेळची मराठी भाषा बोलीच्या स्वरूपांतच होती; वाङ्मयाच्या किंवा साहित्याच्या स्वरूपांत नव्हती. साहित्याचें लेणें जें तिच्या अंगावर चढलेलें दिसतें तें तिच्या जन्मानन्तर कांही तरी तीन चारशें वर्षांनंतर. ह्या काळांत कांही साहित्यनिष्पत्ति झाली नसेल असें म्हणतां यावयाचें नाही. कांही थोडेसें साहित्य म्हणा, अगर लोककथा म्हणा; ह्या स्वरूपाचा वाग्व्यापार झालाच असला पाहिजे. दुर्दैवाची गोष्ट इतकीच की, तो सध्या उपलब्ध नाही. चालुक्य, त्रैकुटक, राष्ट्रकूट वगैरे राजवटींचा आश्रय त्या काळांतील मराठी भाषेच्या शब्दसृष्टीच्या ईश्वरांना मिळालाच नसेल असें कसें म्हणावें ? मराठीचे प्रथम प्रथमचे जे लेखावशेष सापडतात ते यादवकाळांतीलच आहेत. यादवकालीन मराठीचें स्वरूप दाखविण्याचा जो प्रयत्न केला आहे व त्यासाठी जें साहित्य गोळा केलें आहे तें यादवकालांत जे माननीय ग्रंथकार होऊन गेले त्यांच्या ग्रंथांवरूनच केलें आहे. ग्रंथांच्या बाबतींतहि ज्यांच्या

संहितेच्या अस्सल स्वरूपाबद्दल खात्री आहे असेच ग्रंथ घेतले आहेत. ह्या ग्रंथांच्या जोडीलाच यादवकालीन शिलालेखांवरून मिळालेलें भाषिक साहित्यहि घेतलें आहे. शिलालेखांवरून मिळालेलें भाषिक साहित्य मात्र पुराव्याच्या दृष्टीने अव्वल दर्जाचें असतें. कारण, शिलालेख म्हणजे दगडावरील रेघच असल्यामुळे तीवरील भाषेच्या अंतरंगांत अर्वाचीकरणासारखे दोष उत्पन्न होणें सुतरां अशक्य असतें. शिलालेख व ज्ञानेश्वरी ह्या मुख्य आधारांवरूनच पुढे दिलेली यादवकालीन भाषेची रूपरेखा आखलेली आहे.

यादवकालीन मराठीभाषेचें स्वरूप पाहिलें म्हणजे एक प्रकारचें कोडेंच वाटतें. जन्मानंतर थोड्याच काळांत ही अर्भकी आपल्या प्रभावाने, सौंदर्याने, गांभीर्याने, प्रसादाने, भूषणाने, व लालित्याने सर्वांस दिपविणारी अशी कशी झाली, लहानशा काळांत हें असलें प्रशान्त, प्रबुद्ध व प्रौढ स्वरूप तिला कसें प्राप्त झालें, व ह्याच्या पूर्वीचें लहानपणचें तिचें बाळसें, तिचा लडिवाळपणा, तिचा दुडपणा वगैरे अजमावण्यास कांहीच साधन कसें असूं नये ह्याबद्दलचें कोडें उलगडत नाही. मराठी भाषा जी एकदम पुढे येते ती अशा दिपविणाऱ्या स्थितींत येते. तिला परिस्थितीहि चांगली उपकारक अशी होती. यादवराजे सरस्वतीच्या ह्या कण्ठमणींची चांगलीच वास्तपूस्त करीत असत.

८८ देवगिरीकर यादवांची शंभर वर्षांची राजवट महाराष्ट्रियांस बरीच सुखाची व भरभराटीची झाली असें दिसतें. यादव राजे जसे शूर व पराक्रमी होते तसेच ते धार्मिक, उदार, गुणग्राही व न्यायप्रिय होते. आदिनाथ, आदिनारायण व महानुभाव अशा सर्व पंथीयांना त्यांचा उदार आश्रय असे. भिल्लम यादवाच्या पदरीं प्रसिद्ध ज्योतिषी भास्कराचार्य याचा मुलगा लक्ष्मीधर हा मुख्य पंडित होता. ह्याच सुमारास भिल्लमाच्या अधिराज्यांत शारंगधर नांवाच्या मांडलिकाच्या सत्तेखाली मराठीचा आद्य कवि मुकुंदराज याने आपला विवेकसिंधु रचिला[1]. बल्लाळ नृसिंहाचा मुलगा

---

१ शके अकरा दाहोत्तरू। साधारण संवत्सरू। राजा शारंगधरू। राज्य करी॥ एसा समयो सर्वोत्तमु। तेथ मुकुंद द्विजोत्तमु। विवेकसिंधु मनोरमु। निर्मिता झाला॥ विवेकसिंधु उ. प्र अ. ११

जयन्तपाळ याच्या प्रोत्साहनानेहि तो ग्रंथ लिहिला गेल्याचें कवि लिहीत आहे[1]. भिल्लमाचा नातु सिंघण हा तर स्वतांच पण्डित होता. त्याच्या पदरीं असलेल्या चांगदेव (भास्कराचार्याचा नातु) ह्याने ज्योतिषाच्या अध्ययनाध्यापनासाठी पाटण येथे विद्यामठ स्थापला. ह्याचा शके ११२८ मधील पाटणचा शिलालेख मराठींतील एक आद्यलेख म्हणून प्रसिद्ध आहे. कन्हरदेवाचा आश्रय महानुभावांना चांगलाच होता. तो आपल्या धाकट्या महादेवरायासह लोणारास श्रीचक्रधरस्वामीच्या दर्शनास जात असे. कन्हरानंतर महादेव व त्याचा पुतण्या रामदेव व ह्या दोघांचा 'करणाधिप' हेमाडपंत ह्यांची कारकीर्द वाङ्मयनिर्मितीच्या दृष्टीने महत्त्वाची आहे.

रामदेवराव जाधवाची कारकीर्द मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनी नोंदली जाण्यासारखी झाली. "भाषेच्या जुनाटपणाने, विषयाच्या गांभीर्याने, प्रतिपादनाच्या हृदयंगमत्वाने, वाणीच्या माधुर्याने व भक्तिभावाच्या उत्कटत्वाने जो मराठींतील 'आद्यग्रंथ' गणला जातो, ज्याला पंढरीचे वैष्णवपंथी भाविक विठ्ठलभक्त 'आई' ह्या प्रेमळ नांवाने संबोधितात, ज्याचीं शीतल व उज्ज्वल किरणें मोरोपंतापर्यंत धार्मिक कवींना स्फूर्तिप्रभादायक झालीं, व आजमितीसहि ज्याच्या वाचनांत अनेक भक्तवीर व वाङ्मयप्रेमी रसीक रममाण होतात तो ज्ञानदेवी नांवाचा काव्यमय भक्तिप्रधान तात्त्विक ग्रंथ ह्याच रामदेवाच्या काळीं श्रीमद् ज्ञानेश्वरांनी रचिला." ह्याच वेळचे निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, सोपानदेव, मुक्ताई, नामदेव व त्याचें सर्व कुटुंब, गोरा कुंभार, सावता माळी, विसोबा खेचर, नरहरि सोनार, बंका महार, चोखा मेळा, परसा भागवत, राका कुंभार, जोगा परमानंद, जगमित्र नागा, कान्होपात्रा, सेना न्हावी, सजन कसाई, कूर्मदास वगैरे वगैरे आदिनारायण पंथाचे प्रवर्तक व अनुयायी आपआपल्या परीने मराठी भाषेची सेवा करीत होते.

८९ सनातनधर्मीय संतकवींच्याबरोबर दुसऱ्या ज्या कांही कवींचा निर्देश करणें जरूर आहे ते महानुभावी साधुसंत होत. वाङ्मयनिर्मितीच्या दृष्टीने हे महानुभावी साधुसंत सनातनी साधुसंताच्या बरोबरीचे होत ह्यांत शंका

१ नृसिंहाचा बल्लाळ। तेयाचा कुमरू जयन्तपाळ॥ तेणें करविला गदारोळ। ग्रंथरचनेचा॥ वि. सि. ७–१५५.

नाही. ह्या पंथाचे आद्य संस्थापक श्रीचक्रधर स्वामी होत. हे मूळचे सामवेदी गुर्जर. संसारतापास वैतागून ह्यांनी संन्यासदीक्षा घेतली आणि महानुभाव पंथ स्थापिला. चक्रधरांची मराठींत ग्रंथरचना कांही उपलब्ध नाही. त्यांच्या नांवावर जी एक चौपदी प्रसिद्ध आहे तींत मराठी आणि हिंदी ह्या दोन्ही भाषांची खिचडी आहे. त्यांच्या नांवावर कांही 'सिद्धांतसूत्रें' आहेत. हे जरी मुळचे गुर्जर प्रांतांतील होते तरी ह्यांना मराठी भाषेचा अभिमान होता. "कानडदेशा, तेलंगदेशा न वचावें, महाराष्ट्रीं असावें" अशा प्रकारचा मराठींबद्दल अभिमानदर्शक असा त्यांचा दण्डक त्यांच्या अनुयायांना होता. मराठीसंबंधी हाच त्यांचा अभिमान त्यांच्या अनुयायांत बरोबर उतरला; व ज्याप्रमाणे सामान्य जनाला निर्वाणामृत पाजण्यासाठी बुद्धदेवाने संस्कृतचा त्याग करून धर्ममताचें वाहन म्हणून पालीचा स्वीकार केला त्याप्रमाणे ह्या महानुभावांनी संस्कृतचा त्याग करून मराठीचा स्वीकार केला. "ब्रह्मविद्येस माझीये स्वामीचा सामान्य परिवारू नागवैल की, भणोनि हे केशवा संस्कृत सूत्रबद्ध प्रकरण न करी तूं" असा उपदेश नागदेवाचार्य केशवास करितात. चक्रधराचा पट्टशिष्य व ज्याला महानुभावांच्या मतप्रसाराच्या दृष्टीने आद्य आचार्य म्हणतात तो नागदेवाचार्य बीडकर होय. ह्या आचार्यांची मराठी ग्रंथरचना आढळांत नाही. चक्रधराच्या शिष्यगणांत विद्वान् म्हटला म्हणजे महीन्द्र व्यास होय. ह्याने आपल्या धर्मसंस्थापकाचें – चक्रधराचें– लीलाचरित्र गायिलें. हा ग्रंथ खि. उ. १२६० चें सुमारास म्हणजे ज्ञानदेवाच्या पूर्वी अजमासें २५-३० वर्षें रचण्यांत आला. नागदेवाचार्यानंतर भास्कर व्यास ऊर्फ भानुभट्ट हे महानुभाव आचार्यपदारूढ झाले. ह्यांनी शिशुपालवध, उद्धवगीता हे दोन ग्रंथ ज्ञानदेवीच्या पूर्वी १६।१७ वर्षेंच तयार केले आणि आपलें नांव त्या ग्रंथांतील भाषाप्रभुत्व, कोमलपदलालित्य, वर्णनकौशल्य, कल्पनावैभव, इत्यादि गुणांत ज्ञानदेवाच्या बरोबरीने कायम केलें. ह्यांच्यानंतर भावे व्यास, गोपाळ पंडित ऊर्फ आनेराज व्यास, केशव व्यास हेहि नांवाजण्यासारखे महानुभाव ग्रंथकार होऊन गेले. पैकी पहिले आनेराज व्यास हे रामदेव राजाच्या धाकट्या राणीच्या पदरीं पुराणिक म्हणून होते. महानुभावांच्या पहिल्या पिढींतील व ज्ञानदेवसमकालीन आणखी एक दोन व्यक्तींचा

निर्देश करणें जरूर आहे. एक चक्रधर स्वामीची शिष्या व नागदेवाचार्यांची चुलत बहीण 'रूपाई' ऊर्फ महदंबा ह्या नांवाने प्रसिद्ध आहे. हिचे 'ढवळे'–बायकांचीं गाणीं– प्रसिद्ध आहेत. दुसरी प्रसिद्ध व्यक्ति दामोदर पंडित हे होत. ह्यांचा प्रसिद्ध ग्रंथ "वच्छहरण" हा ज्ञानदेवीच्या पूर्वी बाराच वर्षे म्हणजे खि. उ. १२७८ च्या सुमारास लिहिला गेला. ह्या सर्व महानुभावी संतकवींना रामदेवराव जाधवाचा आश्रय होता. ह्या सर्वांच्या बरोबर रामदेवराव जाधवाच्या आश्रयास नरसिंह, शल्य, नरेंद्र हेहि तीन अयाचित होते. ह्यांनी लिहिलेलीं नलाख्यान, रामायण व रुक्मिणीस्वयंवर हीं काव्यें आदरणीय आहेत. महानुभावी वाङ्मय हें बरेंचसें गद्य स्वरूपांत आहे. ह्या गद्याची भाषारचना साधी व सरळ आहे. त्यांत पाण्डित्याचें प्रदर्शन नाही. वाक्यें लहान लहान तुटक तुटक अशींच बहुतेक असतात.

वाङ्मयाच्या दृष्टीने महानुभावी ग्रंथांची ही थोरवी झाली. परंतु तत्कालीन भाषेचें स्वरूप निश्चित करण्यास ह्या वाङ्मयनिकषाचा कितपत उपयोग होईल ही शंका आहे. महानुभावांचें हें आद्यवाङ्मय यादवकालीन जरी असलें तरी तें सर्व संकेत लिपींत आहे. संकेत लिपीचा जनक रवळव्यास होय व तो एकनाथसमकालीन होता. तेव्हा ह्या सर्व वाङ्मयावरून एकनाथकालीन लेखकांचा हात फिरला गेला हें खास व त्यामुळे भाषेचें यादवकालीन वळण जाऊन त्या जागीं एकनाथकालीन वळण आलें. यादवकालीन भाषेचा आराखडा पुढे जो दिला आहे तो देण्यांत ह्या महानुभावी वाङ्मयावर फारशी भिस्त ठेविली नाही. शक्य तेथे असंशयित स्थलीं तें विचारांत घेतलें आहे. आद्य कवि जो मुकुंदराज त्याने लिहिलेल्या विवेकसिंधु हा ग्रंथहि तत्कालीन भाषेच्या स्वरूपाच्या दृष्टीने प्रमाण मानतां येत नाही. त्याच्या भाषेमध्येहि अर्वाचीकरण बरेंच झालें आहे. तेव्हा सर्व भिस्त राजवाडे यांनीं संपादिलेली ज्ञानेश्वरी व यादवकालीन शिलालेख ह्यांच्यावर येऊन पडते. पुढील विवेचनास हेंच साहित्य आधारभूत आहे.

मराठी भाषेचें अस्सल अगदी निष्कलंक असें मराठी स्वरूप यादवकालांत पहावयास सापडतें. वैदिक–प्राकृत–अपभ्रंश इत्यादि अवस्थांतून परिणत होत होत मराठी ह्या पदाप्रत प्राप्त झालेली भाषा यादवकालांतच

दिसते. संस्कृतचें तिच्यावर वर्चस्व नाही किंवा फारशीचा तिच्यावर वर्चस्व नाही. इंग्रजी वगैरे फिरंगी भाषांचा तर तिला वासहि लागलेला नाही. असें तिचें शुद्ध स्वरूप पुढे दिलें आहे.

## वर्णप्रक्रिया—स्वर

९० यादवकालीन भाषेंत होणारे वर्णांचे फरक पुढे दिले आहेत. त्यांमध्ये भाषेंत आढळणारे शब्द त्यांच्या यादवकालीन स्वरूपांत देऊन ज्या वर्णांचा तो फरक वाटतो तो त्याच शब्दाच्या पुढे कंसांत दिला आहे. वर्णांचे फरक जे दाखविले आहेत ते आदि, मध्य व अन्त्य ह्या क्रमानेच दाखविले आहेत. उदाहरणांतील शेवटचीं एकदोन उदाहरणें शिलालेखांतील आहेत.

१ ह्रस्व स्वरः—कुमर ( आ ), ऱ्हदया ( ऋ ); यऱ्हवी ( ये ); ग्रिह ( ऋ ), व्रिधि ( वृ ); त्रुपवर ( ऋ ); वाळुवंठ ( अ ), आत्रूदा ( ऋ ), नैरुत ( ऋ ), रुते ( ऋते ), काइं ( ही ), परियसावा, ( परीस ), कसवटी ( कसोटी ).

२ दीर्घस्वरः—माहासुखासी ( अ ), आइकै ( ऐ ); सोईरे ( हि ) आह्मुई ( नी ), साहाजे ( अ ).

३ संयुक्त स्वरः—येदुकुळी ( अ ); जैसे तैसे ( अ ); अतिशो (अय), ठाॐ ( वो ); राखौंडी ( ओ ), वैत्ति ( वेत्ति ), से ( सइ ), हातुपाॐ ( य ), अभिप्राॐ ( यो ), तान्हैला ( न्हे ), भिए ( य ), उपेगा ( उपयोग ), सोहंभाॐ ( वो ), दीॐ (वा).

वर दिलेल्या स्वरांच्या फरकांवरून असें दिसून येईल की, यादवकालीन मराठींत पूर्वीचे सर्व स्वर आहेत. संस्कृतमधील दीर्घ ॠ मात्र आढळून येत नाही. ह्रस्व 'ऋ' सुद्धा तत्सम शब्दांतच आढळतो. इतर तद्भव शब्दांत त्याबद्दल 'रु' किंवा 'रि' येत असत. शब्दांतील आद्य 'अ' चा उच्चार विवृत म्हणजे 'आ' होत असे. 'ए,' 'ओ' व 'ये', 'वो,' ह्यांच्याबद्दल यादवकालांत बराच घोटाळा झालेला दिसतो. एकाबद्दल दुसरा वर्ण आलेल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. 'ए आणि ओ' बद्दल 'ये आणि वो' येणें ही द्राविडी—कानडी अथवा तेलगू—भाषांची प्रवृत्ति

मराठीने ह्या काळांत उचलली. हीच प्रवृत्ति पुढील काळांतहि दिसून येते. निरनुनासिक स्वर कित्येक वेळां सानुनासिक होत असे.

## व्यंजनें

९१ (१) अल्पप्राण कठोर—चिलिसी (कि), मिच्छा (क्ष), मंगळवेट (ढ), आती (थ), चवंति (च्य), गछति (च्छ).

२ अल्पप्राण मृदु—निगाला, रिगाला (घ); अनेगी, अनेगे (क), जूझ (य), आंडौरी (त), पुडील (ढ), निदसुरे (ज), बांदिती (ध), आत्रूदा (धा) कुबार (भ), डिखल (ढ).

३ महाप्राण कठोर व मृदुः—खवणेया (क्ष), मुखक (ष), संतोखेली सुवेख, वीखो (प) सांघितली (ग), होथी (त), डिखल (क), संवछेरे (त्स), सांघ (सांग–संख्या), वेवस्छा (स्थ), जुझ (ध्य), भणौनि, भणती (म्ह).

४ अनुनासिकें:—निरनुनासिक स्वर कित्येक वेळां सानुनासिक होतो. उदा० इवँ, मेँ. न><ण वरून (ण), जाळीण (न), म्हनेरे (ण), सर्पिनी (ण), तेने (ण), वानी, (ण).

५ अर्धस्वरः—येव्हढे (ए), संसारसायर (ग), सोमदेयो, (व), आलविले (ळ), कल्लोल (ळ), वोल्हवण, कव्हण, वोगर (ओ), वोलखे (ओ), उपावो (म), किल्विप (म), येकमेका (ए), वोलखे (ओ), सवंसारा (ं), जऱ्हे (इ).

६ ऊष्मेः—गुडाकेषः (श), असक्त (श), दुःपूर (दूष्पूर), सृष्ट (सृ). वैशेल (स), षोविला (ख), रत्नषचिति (ख), रषमाल (ख), लिषित (ख), दष्यणायने (क्ष), सेत (श), सुक्लपक्ष (श), सिहाण (श, च), स्वष्ती (स), आसयो (श), सरभंग (श), मार्गसिर (श), वंसु, अतष्करण (ाः), सूष (ख).

महाप्राण ह—निहाळिजे (भ), जिहा, तिहा (व्ह), सोहोपा (०).

७ संयुक्त व्यंजनें:—योगात्घनंजय (द्ध), युद्ध्यस्व (ध्य), तत्व (त्त्व), पूज्यस्य (श्च).

८ वर्णसंयोगः—म्हालक्षुमी (महा), म्हाजन (महा), कुलकणी (करणी).

९ वर्णवियोगः—सरावण, वरुषा, लक्षुमी, पदुम (पद्म), रकुमिणी, पृथुवी, सुराव, उजियेडे.

१० द्वित्त:—रेफानंतर नेहमी वर्ण द्वित्त होतो. उदाः —कर्द्दमी, कीर्त्ति, धर्म्म, कर्म्म, तैर्द्दत्तान, झल्लकति, मूर्त्तिचेति.

वर्णागमः—वर्णियिला, आइक ( अभिकर्ण ).

व्यंजनांच्या फरकांवरून पुढील गोष्टी दिसतात. यादव कालांत 'ळ' हा मूर्धन्य उच्चार नव्हता. पुढील काळांत हा विशेष रूढ झाला. एकतर हा 'ळ' वैदिक–पाली–पैशाची ह्या भाषांतून मराठींत आला असावा किंवा जसे इतर मूर्धन्य उच्चार द्राविडी भाषांतून मराठींत आले, तसाच हा 'ळ'-हि आला असावा. यादवांच्या नंतरच्या काळांत मराठीचा पूर्वेस तेलगूशी व दक्षिणेस कानडीशीं जो संबंध आला त्याचाहि हा परिणाम असूं शकेल. पेशवेकालीन भाषेंतहि 'ल' चेंच प्राचुर्य दिसून येतें. 'ळ' च्या उच्चारास सुरवात मात्र ह्या काळांत झाली असावी असें पंढरपूरच्या शिलालेखांतील 'ळ' वरून वाटतें. तसेंच तालव्य व दन्त्यतालव्य ह्या दोन उच्चारांत फरक करण्याची प्रवृत्तिहि ह्याच काळांत सुरू झालेली दिसते. कारण, 'विचार' 'जोति ह्या शब्दांबरोबर 'विच्यार व ज्योति' असे य–मिश्र शब्दहि वापरलेले आढळतात. हीहि एक द्राविडी भाषांची लकब मराठीने उचलली. कोणी म्हणतात ही मंगोली भाषांची लकब गुजराती व मराठी ह्या भाषांनी उचलली. 'ख' बद्दल 'ष' वापरलेला दिसतो. रेफानंतरचा उच्चार द्वित्त होत असे.

## नामविभक्तिप्रत्यय

९२ प्रथमा–एक. व. प्रत्यय–'उ, अ, ओ, आ, ऐं' उदा०–गणेशु, अनुग्रहो, देओ, संशयो, दिओ, ठाय, सूर्यो–र्यू, विस्मो, आश्रो, उद्धारु, नारायणु, ब्राह्मणु, दुबेलु, सौंदरु, केणें. अनेकवचन प्रत्यय--ए. उदा–अभिप्राये, ठाये, राये, फुलें, दांडे, विशेष, भाग, गणेश, अभिप्रायें, ठाये राये.

द्वितीया–ए. व. प्रत्यय–'उ, आ, एया, ते, आ, इया.' उदा–राज्यं (करीत), जीर्णोद्धारु. गोसावियाते. विशेष, भाव, अभिप्राये, भावाँ, रायाँ.

तृतीया–ए. व. प्रत्यय–'ऍं, ऍंन, ने.' उदा–ईश्वरें, राणेन, सेतुगुडेन. हरिदेवें, पुरिचेन, लेकरुवें, मत्स्यरूपें, सर्वज्ञें, सकळै, नायकें, सोनारें, ब्राह्मणीनें; अनेकवचन प्रयत्य–ईं, इँ.उदा. मांडळिकेंहीं, येहीं. पंडितीँ, देवीँ, भटीँ–टिँ, लोकपालीँ, सज्जनीँ, अभिप्राइँ.

चतुर्थी – ए. व. प्रत्यय--इया, एया, आ, सी. उदा.–चौकीचिया, दारवंठेया, पन्हेया, देवा, तेयासी विठलरायासी, तुसी, ब्राह्मणी, मढा, सागरा, सूर्यांते, वाया, योगभ्रष्टासी; रसाँ, देवाँ, मेघाँसी, मेघाँते, भूताँते, रावाँ, ठायाँ.

पंचमी प्रत्यय-आंनि, औनिया, हूनी उदा:–मेघाहुनि, मेघौनि, समुद्रौनि, मूडाहूनि; सनकादिकाँहूनि, मुडाँहूनि.

पष्ठी प्रत्यय--चा, चीं, चें. उदा.—विठलाची, संयमाचेनि, नाभिकाराचा, उजलाचे, व्यासाचा, देवा, कृष्णा, भीष्मा

सप्तमी प्रत्यय—,इ आंतु. उदा.—देउळीं, देवळांतु, सकुटुंबीं, पाटणीं देहे, आसुपाठी, ग्रामांतु, चरणीँ, तरंगीँ, पायीँ. घरीँ, उदयीँ, ठाईँ, वेळे, प्रासे. दोखांचा, पायाँ, दिआँ.

सामान्यरूप—सभे--आतु-भीतरीं. ग्राहकापासी, आसुपाठी इ. इ.

## सर्वनामाचीं रूपें

प्रथमा--तुआ, कव्हणी, जो, जें, काइ, कोणहु.

द्वितीया--मा, मिये, तां, इया.

तृतीया--तिया, मिया, जेणे, तेया, तिआ.

चतुर्थी--तेयाते, येया, आपुलेया, ऐसेया. तेया, तयातें, तयासी.

पष्ठी--जेयाचा, जेयाचे, तेयाचे, तेयांची, जेयांचेया, केहाचा. तेहाचा, जेहाचे, तेहाचे,

यादवकालीन भाषेच्या प्रत्ययप्राक्रियेवरून ज्या गोष्टी स्पष्ट होतात त्यांपैकीं प्रथमेचा 'उ' प्रत्यय ही एक मुख्य गोष्ट आहे. ह्या प्रत्ययास मूळ आरंभ अपभ्रंश भाषेत झाला व तोच पुढें बहामनीकाल, शिवकाल व पेशवेकालापर्यंत पद्यांत दिसून येतो. अकारान्त नामाचें प्रथमेचें एक.- व. रूप 'उ' कारान्तच ठेवण्याचा पद्यांत शिरस्ताच पडला. सध्या जरी कोणीं ओवी लिहिली तरी त्यांत आधुनिक कवि देखील प्रथमेंत 'उ' कारान्त नामें वापरील. विसर्गाचा 'ओ' होऊन त्याचें ह्रस्व स्वरूप 'उ' झालें असा ह्याचा क्रम आहे. गणु, रामु, बाळु, नरु, महादु इत्यादि रूपांत सध्या सुद्धा हा प्रत्यय वापरण्यांत येतो. तृतीयेचा एँ, इँ, पंचमीचा औनि वगैरे प्रत्यय हळूहळू उत्क्रांत

झालेले दिसतात. आणखी एक बाब मुख्यत्वाने दिसते ती षष्ठीच्या प्रत्ययाची व सामान्यरूपाची. ही एकच बाब यादवकालीन भाषेचा जुनेपणा सिद्ध करण्यास पुरेशी आहे. 'जेया, तेया, जेयाचे, तेयाचे, दारवंठेया; चालावेया, करणेया' वगैरे रूपें हीं प्राचीन आणि 'जया, तया, जयाचे, तयाचे, चालावया, करणया' हीं रूपें उत्तरकालीन व ह्यांच्या पुढची म्हणजे 'ज्या, त्या, ज्याचे, त्याचे' इत्यादि हीं रूपें होत. ह्या स्वरूपांचा हा क्रम कालाच्या दृष्टीने आहे. 'जेयाचे, तेयाचे,' ह्या रूपांपेक्षांहि 'जेहाचे, तेहाचे' हीं रूपें शिलालेखांवरून जुनाट ठरतात. यादवकालीन शिलालेखांतील शब्दांच्या रूपांसारखी राजवाडेसंपादित ज्ञानेश्वरींतील रूपें आहेत म्हणूनच ती ज्ञानेश्वरीची प्रत जुनाट आहे.

यादवकालीन भाषेतील विभक्तींच्या विशेषतः षष्ठीच्या प्रत्ययांसंबंधी आणखी एक महत्त्वाची गोष्ट आहे. ह्या प्रत्ययांबरोबर एक 'न' मध्ये येतो. 'तुझे–नि नामे अपयशी; येणे संग्रामाचे–नि अवसरे' ह्या उदाहरणांत तुझे आणि संग्रामाचे' ह्या षष्ठ्यन्त नामांना 'नि' हा आगम लागला आहे. हा 'नि' कधी नामांना व कधी सर्वनामांनाहि लागतो. उदा.—भरंवसे-नि ऐसे-नि कैसे-नि. हा 'नि' मराठीच्या कांहीं प्रांतिक बोलींतहि वापरलेला आढळतो. उदा—मीनी; मना (कोंकणी), बास-ने, भूक-न (महाडो) मराठींत ज्याप्रमाणे प्रत्ययांतील हा 'न' कार आढळून येतो त्याप्रमाणे गुजराती, राजस्थानी, पंजाबी, हिंदी इत्यादि आर्योद्भव बोलींमध्येहि तो आढळतो[1]. प्रत्ययांत 'न' कार मिसळण्याची ही प्रवृत्ति कानडी वगैरे द्राविडी भाषांतहि दिसून येते. 'नी, निन्न, निन्निम्, निन्नोल' वगैरे कानडी सर्वनामांच्या रूपांत तो दिसून येतो. तसेच सर्व अकारान्त पुंलिंगी नामांच्या प्रत्ययांत 'न' आगम येतो. मराठीवर हा एक कानडीचा परिणाम असावा.[2]

ज्ञानेश्वरीमध्ये शब्दयोगी अव्यये चार विभक्तींच्या आश्रयाने सापडतात.

१ द्वितीया उदा.—हेवाचूनि; ते नित्य त्यागसहितें, ईश्वरूवाचूनि, हा ठावोवरी.

२ तृतीया उदा.—जीविनें-सीं, भरंवसेंनि, नानाभूतें-सहितें भर्तारेंहीन

---

1 J. Bloch F. L. M. 201. 2 Jahagirdar B.O.R. A. 1930.

३ चतुर्थी " —मेघासीं, कीर्तीसी,
४ सप्तमी " —माजी, आत.

## क्रियापदाचे प्रत्यय (आख्यातविभक्ति)

९३ (१) वर्तमानकाळ-प्रत्यय 'ए,मी,त, ताती,' उदा.—धांडोळित, करीत आस, जाणौ, आइकै, चाखे, अनुभवी, आटवी, बोले, दाटे, उठी, घेइ, निघे; बाधिती, झांकवती, करीती, त्यजीती ओलगाविती, प्रगटविती, ठेविती, तोंडे धुती. आपडे, वीए. लोपी,

२ भूतकाळ--प्रत्यय,'ल, नला. न्नला.' उदा—सरले, निगाला आरंबळैला, सांघीतली, वाणियले, दिन्हली,स्वीकरिन्नली, सांगितेनली, अभिवंदिला, उत्तरिला, भणितला, जितिएला, घरिएला, उघटे दिन्हलीं, बोभाविली, खोविन्नली, टेविलिआ, सिके, झाले, केला, भूतला, सूतला, सकले. काढिन्नला, पातला.

३ भविष्यकाळ--प्रत्यय, 'एल, ऐल.' उदा.-होववैल, असैल, अभिनवैल, सांडिजैल (कर्मणि), नव्हैल, उरैल. नाशैल, निवैल. वसिजैल, होए.

४ आज्ञार्थ--परिसै, जाई, सुनु. घेई, न्हव्हावा, वाळवावे, करावे, विध्यर्थ, आशीर्लिङ्—ओ—बाधो, करो, मांगो, अवधारिजो.

५ कर्मणि--म्हणिपे, वधिजति, वरिजैल, पाविजैल, विचारिजति.

६ कृदन्त--प्रत्यय--'औनिया, एया, णे, आ, णेया.' उदा.—गेलेया, घालावेया, हरौनिया, विकतेयापासि, कराया, चालावेया, सांडिलेया, घरौनिया, कालासिला.

७ तुमन्त—हिंडो (निघाला), आणू, मागो, करो.

८ ल्यबन्त--प्रत्यय—नि, ऊनी, ओनि, औनि, उतन. उदा.--झालौनिया रिगौनि, भवडौनि, जाऊनि, उठौनि, करवून, शोधोनु, हासौनि, करवुतुन (णिच्), म्हणौनि, ठाऊनि, विझौनि, भिऊनु, देखौनु, धरुनु, घेऊन हारपोनी,

९ पौनःपुन्यवाचक—घांघवधिता, गंगावती.

अव्ययें—तें, तेथोनि, पुढारी, तथा, स्वाहा, जैं, यऱ्हवी,तऱ्ही, सांपेचा, म्हणौनि, आह्मुई, कडौनु, ताथु, तऱ्ही, आचंद्रार्क, अर्थां तव, (दोखां) वरी,

(रसाँ) लागौनि, (कल्प)वेन्हीँ, (क्षण)वेन्ही, (धामीँ)हीन, (देवीँ)वीण धर्मैवीण, (क्षण)वाचौनी,

तद्धित—दादुल, करितेन. अंधितेन, रूपडे, शरीराबाहीरीलीकडे.

नी-प्रत्यय--जेहाचेनि, मनाचेनि, श्रवणाचेनि, आनंदाचेनि.

यादवकालीन भाषेतील क्रियापदांचीं रूपें वर दिलीं आहेत त्यांवरून काळांच्या प्रत्ययांची कल्पना येईल. वर्तमान काळाचीं जर रूपें पाहिलीं तर त्यांमध्ये दोन प्रकारच्या प्रवृत्ति असल्याचें दिसून येईल. एक 'त' कारान्त धातुसाधित विशेषण घेऊन त्याच्यापुढे 'अस' ह्या धातूच्या वर्तमानकाळाचीं रूपें लाविल्याने वर्तमानकाळ साधणें ही प्रवृत्ति. उदा.—आचरत+आहाती= आचरताती, बोलताती, वर्तताती, इ. करीत + आहो = करितों (अ. व.) चिन्तितु + आहासी, दिसत + से = दिसतसे, वर्ततसे, किजतसे, इ. दुसरी फक्त कृदन्त वापरून वर्तमानकाळ साधणें ही प्रवृत्ति. उदा. —तिन्ही लोक डळमळित, मेरुमान्दार आन्दोलत, समुद्रजळ उसळत कैलासवर.

कृदन्तें वापरून वर्तमानकाळ साधण्याची प्रवृत्ति कानडीमध्येहि दिसून येते.

यादवकालीन विध्यर्थाचीं रूपें-अर्चिजती, पविजती, वधिजती, राहाटिजे, निरीक्षिजे, बाधिजे अशीं होतात. हीं सर्व 'इज'अन्त रूपें विध्यर्थाचीं आहेत. 'इज' हा मराठी प्रत्यय प्राकृत 'इज्ज' संस्कृत 'य' ह्या कर्मणि प्रत्ययापासून आला आहे. तसा जर तो आला असला तर त्याचा मूळचा कर्मणि अर्थ जाऊन कर्तरि अर्थ त्याला प्राप्त झाला असला पाहिजे. कानडी भाषेंतील कर्मणि प्रयोगाची कथा वरीलप्रमाणेच आहे.

## मराठीचा अन्य भाषांशीं संबंध

९४ ह्याच यादवकालांत मराठीचा द्राविडी भाषेशीं व त्यांतल्या त्यांत कानडी व तेलगु ह्यांच्याशीं संबंध आला. मराठी भाषा ज्या प्रांतांत सध्या बोलली जाते त्या प्रांतांत मराठी भाषेच्या पूर्वी कानडी व तेलगू ह्या भाषा प्रचलित होत्या. आंध्र काय किंवा त्यांच्यानंतरचे आंध्रभृत्य शातवाहन काय, हे दोघेहि कानडी भाषेचे कट्टे कैवारी होते. कानडी भाषा एके काळीं कावेरी नदीपासून तो उत्तरेस गोदावरी नदीपर्यंतच्या प्रदेशांत

बोलली जात होती असें अमोघवर्ष म्हणून एक कन्नड कवि आहे तो म्हणतो. कुमारीलभट्टाने पञ्चद्रविडांत तामील, तेलगु, कानडी ह्यांबरोबर महाराष्ट्र आणि गुजरात ह्या दोहोंचाहि निर्देश केला आहे. कुमारीलभट्टाचें हें परिगणन बऱ्याच दृष्टीने भाषिक स्वरूपाचें आहे.

मराठी भाषेच्या जन्माच्या वेळीं मराठीचा आणि कानडी, तेलगू ह्या द्राविडी भाषांचा अशा रीतीने संबंध अतिनिकट आल्यामुळे कानडी-तेलगूच्या कांही खुणा मराठी भाषेवर उमटल्या ह्यांत कांही नवल नाही. वर्णोच्चार व व्याकरणविशेष ह्यांत कानडीचा कोठे कोठे मराठीवर परिणाम झाला आहे ह्याचें दिग्दर्शन वर त्या त्या ठिकाणीं केलेंच आहे. ट्, ठ्, ड्, ढ्, ण् व ळ् हे मूर्धन्य उच्चार द्राविडी भाषेतून आल्याचा उल्लेख मागे केलाच आहे. दन्त्यतालव्य उच्चारहि कदाचित् द्राविडींतून आले असावेत. नामांच्यापुढे शब्दयोगी अव्ययें लावून विभक्तींचें अर्थ साधणें, शब्दाच्या शेवटीं 'न' घालणें, षष्ठीच्या प्रत्ययांतील 'च'ची उपपत्ति, 'त'कारान्त धातुसाधित विशेषणापासून वर्तमानकाळ साधणें, 'इज' अन्त विध्यर्थी रूपांची उपपत्ति, म्हणों, बोलों, करों इत्यादि मराठी तुमन्तांची साधनिका इतक्या बाबी कानडीपासून मराठीने घेतल्या असें कांही विद्वानांचें मत आहे. ह्यांतील कित्येक बाबी उदा०:-शब्दयोगी अव्ययें नामांना लावणें व कृदन्तापासून वर्तमानकाळ साधणें, ह्या बाबी शुद्ध आर्य शिक्क्याच्या असून आर्यभाषेच्याच प्रवाहांतून मराठीस मिळाल्या आहेत हें मागील प्रकरणांत केलेल्या विवेचनावरून उघड होईल. ज्ञानेश्वरींत आढळून येणारे कानडी शब्द उल्लेखनीय आहेत. "अडालु (भय), उळीग (सेवा), ओगर (जेवण), उडव, कतकटा, कडसण, मातु, मेच्चु, सावळे" इत्यादि.

ह्या काळांत मराठीचा फारशी भाषेशी संबंध न आल्यामुळे फारशीचा परिणाम कांही झालेला दिसत नाही. मानभावी वाङ्मय, शिलालेख वगैरे यादवकालांतील साहित्यांत फारशी शब्द आढळून येत नाही. ज्ञानदेव-समकालीन नामदेव मात्र 'तुर्की मूर्ति फोडिल्या' अशी महंमदीयांबद्दल तक्रार करतो; इतकेंच नव्हे तर त्याच्या अभंगाच्या संहितेंत कांही फारशी शब्द सापडतात, 'व' हें फारशी अव्यय तो नेहमी वापरतो. ह्याचें कारण

एक तर नामदेवाच्या अभंगाची संहिता एका नामदेवाची नव्हे, व दुसरी गोष्ट तिच्यांत बरेंच अर्वाचीकरण झालेलें आहे.

## यादवकालीन भाषेचे नमुने–१ विवेकसिंधु, इ. स. ११८८

शंकरोक्तीवरी। माझी बोलली वैखरी। ह्मणोनि घरोवि चतुरी। शास्त्र-बुद्धि ॥ ४७ ॥ अहो युक्तिचेनि प्रसंगे। शास्त्राते ह्मणती उगे। तरी माझे बोल वाउगे। का होतील पां ॥ ४८ ॥ जैसें आपुलेनि पवित्रपणे। लक्ष्मीयेसी आणीले उणे। ह्मणोनि मस्तकी नारायेणे। तुळसी वंदीली ॥ ४९ ॥ विवेकसींधुमीतरी। जो मुमुक्षु अवगाहन करी। त्यासी श्रीहरी भेटे साक्षात्कारें ॥ ५० ॥ विवेकसींधुची शब्दरत्नें। कंठी धरीजे प्रयत्ने। तरी जनकाचेनि महीमाने। श्लाघ्यता पावे ॥ ५१ ॥ लवण समुद्रीचीं मुक्तें भुशणें। होती कीरू समस्त। परी भुशीतया हीसी मुक्तत्वें। विवेकसींधुची कीं ॥ ५१ ॥ अहो विवेकसींधुची पुर्वार्द्ध। क्षीरसींधुपरीस अगाध। जेथे निर्गुण निजबोध भेटे। विष्णुस्वरूप ॥ ५३ ॥ मज निमिष्ये निमिष्याचा श्रमु। तेथे काइसा ग्रंथाचा उद्यमु। परी फळला मनोधर्मु। सदैवाचा हा ॥ ५४॥ नरसींव्हाचा बळाळु। ह्याचा कुमर जैतपाळु। तेणे करविला हा रोळु। ग्रंथरचनेचा ॥ ५५ ॥ भगीरथाचेनि दैवयोगे। विस्व सुश्नात होये गंगे। तैसे जैतपाळाचेनि प्रसंगे। जग सुखी होय पै ॥ ५६ ॥ म्या आपुली निजवाणी। पवित्र केली येंही वचनि। प्रती पावो पीनाक-पाणी। मुकुंद म्हणे ॥ १५७ ॥

अध्याय ७ ( माझ्या संग्रहांतील पोथीवरून )

## २ मानभावी वाङ्मय इ. स. ११९०

साठी लक्ष देश महाराष्ट्र। तेथिंचे शिहाणे सुभटू। वेदशास्त्र चातुर्याची पेठू। भरैली तिये देशीं ॥ ऐसे ते महाराष्ट्राये सुंदरू। वरी महाराष्ट्रभाषाच-तुरू। तेहीं वसविलें गंगातीरू। क्षेत्र त्र्यंबकूवेन्हीं ॥ पश्चिमे त्र्यंबकूपूर्वे सागर-वेन्हीं। द्वादश योजनें उभय गंगातीरीं। ऐसे तें गंगातट महाराष्ट्रीं। वसिजे पुण्यातन॥ तिये महाराष्ट्रीं गंगातीरी महंतु: तेथ सदां ईश्वरावतारू क्रीडतु ॥ देश म्हणजे खंडमंडळ। जैसे फलेठाणापासौनि दक्षिणेसि मन्हाटी भाष जे-तुलां टाइं वर्ते तें एक मंडल। तयासि उत्तरे बालेघाटाचा सेवट असे।

ऐसें एक खंडमंडळ । मग उभय गंगातीर तेहि एक खंडमंडळ । आन तयापासौनि मेघकरघाट ते एक मंडळ । तयापासौनि आवघे वराडः तेहि एक मंडळ । पर आघवीचि मिळौनि महाराष्ट्रचि बोलिजे । किंचित किंचित भाषेचा पालट असे म्हणौनि खंडमंडळे म्हणावीं । मग ऐसे मंडळींचा पैला मंडळासि जाए आन पैले मंडळींचा ऐलासि ए । तया पुरुषाचे तेचि सेवट जाणावे ॥

सर्वज्ञें भणीतिलें 'इंद्रे ॐ गावांतु बार्ता काइ मातुः ' ' जी कांहीं नाहीं जीः' सर्वज्ञें भणीतिलें 'वार्ता कैसी यां कांहीं नाहीं ? राज्यांतरू जालेंः रामदेवो रावो राज्यीं बैसला, आमणदेवो खालि उतरिलाः देवगीरि पालटीली॥ तथा हा नव्हे लोकु पळतु असेः ॥ हा होएः जा वार्त्ता शोधा, तुमचे ए गांवीं सोइरे असतिः आन वार्त्ता कैसी नाहीं ॥ कैसे कांहीं नाहींः एसणें राज्यांतर जालेः आमणेदयाचे डोळे काढीलेः रामदेवो राजीं बैसलाः ए नव्हे कीं: घायालें जातें असेतिः भणौनि सर्वज्ञें तया खाटारें श्रीकरे दाखवीलेंः सर्वज्ञें भणीतिलेंः एक वेळ शोधा यां जा ॥ छ ॥ हो कां जी भणौनि इंद्रभट मागुते गेलेः शोधिलेः एवोनि सर्वज्ञांपुढे सांघीतिलेंः ' साच जीः हें काइ हो अपूर्वः ' तेही भणितिलेंः हाती सेहाणी मारिलाः पाटूसेहाणी भेदिला नरसिंह देॐ पळालाः आमणदेआचे डोळे काढिलेः रामदेऊ राॐ राजीं बैसलाः ऐसे शोधौनु आलेः सर्वज्ञां पुढारां सविवरु सांघितलेंः तंव लोकु घरां वेंघोनि पाहात असेः मग गोसावी देऊळा तु बीजें केलें. ॥ १२ ॥

लीलाचरित्र ७२५.

## ३ पंचतंत्र (तेरावें शतक)

पिंगलकु पुसे । दमनकु साघे । म्हणे कोणे एके नगरिं । यज्ञदत्त नामें ब्राह्मणु असे । तो दुर्बलु । तयातें ब्राह्मणीनें म्हणितिलें । तुम्हि कांहिं उदीम न करा. आम्हि अवघे भुकें मरत असों । तंव तो चहुंकडे हिंडों निघाला । वाटेस जातां येके अरण्यि पातला । तयासि तृषा लागलि । म्हणोनि उदकारणे हिंडतां तंव एक अड देखिला । तणें झांकिला असे । तया आतु पाहे तंवं देखिलें । व्याघ्रु । सर्पु । वान्नरु । सोनारु । ऐसे चौघे तया अडामध्यें पडिले असति । ते तया यज्ञदत्त ब्राह्मणें देखिले । तेहिं तो ब्राह्मणु

देखिला मग चौघेहि तयातें म्हणति। आमुतें या अडांतुनु बाहेरि काढि। तंवं तो विचारि। म्हणे यांसि बाहिर काढितां पुण्य होईल।

महाराष्ट्रकवि (भावे), ११ पृ. १५.

## ४ ज्ञानेश्वरी— इ. स. १२९०

माझा मऱ्हाटा चि बोलु कवतिके। परि अमृतातें हीं पैजेसीं जींके। ऐसीं अक्षरें चि रसिकें। मेलवीन ॥ १४ ॥ जिये कोवलिकेचेनि पाडें। दीसति नादिचे तरंग थोकडे। वेधें परिमलाचें बीक मोडे। जेयाचेनि ॥ १५ ॥ आइका रसालपणाचेया लोभा। किं श्रवणिं चि होथि जीभा। बोले इंद्रियां लागे कलभा। येकमेकां ॥ १६ ॥ साहाजें शब्दु तरि विषो श्रवणाचा। परि रसना म्हणे कां रसु चि आमुचा। घ्राणासि भावो जाये परिमलाचा। हा तो चि कां होईल ॥ १७ ॥ नवल बोलतिये रेखेची वाहाणी। दावितां डोलेयां हीं पुरों लागे आणि। ते म्हणति उघडिली कां खाणि। रूपांची हे ॥ १८ ॥ जेथ संपूर्ण पद उभारे। तेथ मन चि धांवे बाहिरे। बोलुभुजांहीं आशे भरे। आलिंगावेया ॥ १९ ॥ ऐसां इंद्रियें आपुलालां भावि। झोंबतां परि तो सरिसेपणें चि बुझावी। जैसा एकला जग चेववी। सहस्रकरू ॥ १० ॥

ज्ञानेश्वरी ( राजवाडे ) ६,१४–२०.

## ५ वेळापूर येथील शिलालेख–इ. स. १३००

स्वस्ति श्री शकु १२२२ सर्वरि सं ( व )। स ( त्स ) रे ज्येष्ठादौ श्रीमत्प्रोढ। प्रतापचक्रवर्ति श्रीराम। चंद्रदेव विजयराज्योदयित। दुपादपदु-मोपजीवी सर्वाधि। कारी श्रीजोइदेव तं ( त ) नि ( त्रि ) रोपि। त ब्रह्म-देऽ्राणे तद्भ्रातर बाइ। देऽ्राण माणदेशासंबंध वे। लापुर तेथल ध ( र्मं ) स्थल वटेस्व। राचे गुण मठअ केले वा वोव। र बाइदेवें दत पाली तो स्वर्गा। जाए न प ( पा ) ली तो नरका जाए लेष। क दामोदर पंडित सुत माइदेव मंगलं ॥

खरे, द. म. इ. सा. खं. २ पृ. ९.

## २ बहामनीकालीन मराठी भाषा–इ. स. १३५०–१६००

९६ मराठी भाषेच्या कालखंडांपैकी तिच्या उद्गमाजवळचा असा महत्त्वाचा ‘ यादवकालीन ’ कालखंड सांगून त्या खंडांत मराठीचें स्वरूप कसें होतें ह्याचें विवेचन येथवर केलें. आता दुसऱ्या कालखंडांत मराठी भाषेचें स्वरूप कसें होतें हें पाहूं. यादवकालांत मराठी भाषा तिच्या वयोमानाप्रमाणे जरी बाल्यावस्थेंत असली तरी एकंदर तिच्या गुणांवरून पाहतां तिच्यांत विचाराचें व आचाराचें पावित्र्य, स्वरूपाचा उज्ज्वलपणा व रेखीवपणा, अलंकारलेण्यांचें ऐश्वर्य, चालचलणुकीचा भारदस्तपणा, मुद्रेचें गांभीर्य, ओज वगैरे मनाला चकित करून टाकण्यासारखे गुण होते. यादवांच्या आश्रयाखाली मराठीभाषामंदाकिनी अशा नितांत रमणीय रीतीने वाहत होती. परंतु यादवांच्या आश्रयाचा आल्हाददायक ऊष्मा फार दिवस टिकला नाही. त्या राजवटीचा महमदीयांच्या टोळधाडीने धुव्वा उडवून दिला, आणि वाङ्मय व इतर आधिभौतिक क्षेत्रांत जें कांही अमूप पीक उगवूं घातलें होतें त्याचा नायनाट होऊं लागला. यादवांच्या अस्ताबरोबर महाराष्ट्र देश आधिदैविक व आधिभौतिक अशा दोन्ही प्रकारच्या आपत्तींत सापडून महाराष्ट्रांतील समाजव्यवस्था, ग्रामव्यवस्था, पेहराव, कल्पना, धर्म, आचार व भाषा इत्यादि बाबी विस्कळीत झाल्या. तुर्कांनी हिंदूंच्या मूर्ति फोडण्यास सुरुवात करून उत्तर हिंदुस्थानांत जो धार्मिक आक्रांत केला तोच दक्षिणेंत करण्यास ह्या कालापासूनच त्यांनी सुरुवात केली. ह्या राजक्रांतीने सर्व महाराष्ट्र देश मुळासकट हादरून गेला. ह्या राज्यक्रांतीला आरंभ जरी तेराव्या शतकांत झाला होता तरी तिचे भयंकर परिणाम चौदाव्या शतकांतच भोगावे लागले. देवगिरीच्या जाधवांची मध्यवर्ती केंद्रसत्ता नाहीशी झाल्यावर तिच्यावर अवलंबून असलेल्या इतर बांडगुळासारख्या सत्ता उखडून टाकण्यास मुसलमानांस वेळ लागला नाही. अशा रीतीने हिंदु भाषा, धर्म व संस्कृति ही त्रयी ज्या राज्यांच्या आधारावर होती तो आधारच काढून टाकल्यामुळे तिला लुळी पांगळी करून तिच्या ठिकाणीं महमदीयांनी आपली भाषा, धर्म व संस्कृति ही त्रयी स्थापण्यास सुरुवात करून थोडयाच वेळांत सर्व क्षेत्र काबीज करण्याचा चंग बांधला.

ह्याच सुमारास राज्यक्रांतीच्या ह्या आधिभौतिक संकटास जोडून दुसरें-हि एक आधिदैविक संकट महाराष्ट्रास गांजण्यास सज्ज झालें. हें संकट म्हणजे चौदाव्या शतकाच्या शेवटचा दुर्गादेवीचा मोठा दुष्काळ हें होय. ह्या दुष्काळाची प्रत्यक्ष गांजणूक चांगली बारा वर्षे महाराष्ट्रास भोवली. ह्या दुष्काळांत चहोंकडे अन्नान्नदशा झाल्यामुळे व जिकडे तिकडे अवर्षण पडल्यामुळे गावचे गाव उजाड होऊं लागले. धान्याचा कण व पाण्याचा थेंब जिकडे सापडेल तिकडे लोक धाव घेऊ लागले. असल्या आपत्तींत धर्म, भाषा व संस्कृति ह्यांकडे लोकांचें लक्ष राहिलें नाही ह्यांत आश्चर्य नाही.

अशी जरी विपरीत परिस्थिति होती तरी मनुष्याचा स्वभाव व विशेषतः त्याचा सात्त्विक परिपोष ह्याने वर डोकें करण्यास सोडलें नाही. मनुष्याची सात्त्विकवृत्ति ही कंदुकासारखी आहे. कंदुकास जितका जोरांत खाली आपटावा तितक्याच जोराने तो वर उसळी मारतो. महमदीयांकडून होत असलेला धार्मिक छळ आणि दुर्गादेवीच्या दुष्काळाचे परिणाम ह्या आपत्ति जितक्या जास्त लोकांना गांजूं लागल्या तितक्या त्यांच्या सात्त्विकवृत्ति जास्त जोर करूं लागल्या असें तत्कालीन इतिहासावरून दिसून येतें. अल्लाउद्दिन खिलजी व त्याचा सेनापती मलिक काफूर ह्यांनी देवगिरीच्या यादवांचा पराजय करून मुसलमानास दक्षिणची वाट मोकळी करून दिली. पुढे थोड्याच दिवसांत महमदी संस्कृति हुसेन गंगो बहामनी ह्याने खाली दक्षिणेंत आणिली आणि खुद्द मराठवाड्यांत तिला बद्धमूल केली. कांही दिवसांनी मुख्य केंद्रवर्ती एका शाहीच्या पांच शाखा झाल्या. बहामनी राजे किंवा त्यापासून उत्पन्न झालेल्या उत्तरकालीन त्यांच्या पांच शाखा ह्या धर्माच्या बाबतींत इतक्या कडव्या नव्हत्या. हिंदु म्हणजे सर्व काफर आणि त्यांनी जर धर्मांतर केलें नाही तर त्यांना आडवें चिरावें इतक्या पराकाष्ठेचा धार्मिक वेडेपणा त्यांच्याजवळ नव्हता. कांही बादशहांचे गुरु तर कित्येक हिंदु साधुसंत होते. कांहींनी त्या बादशहांस भक्तीचें वेड लाविलें. कांहींनी त्यांना पंढरीच्या विठोबाचा ध्यास लाविला. कांहींनी बादशहाचे असाध्य रोग बरे केले. त्यांच्या सहानुभूतीने महाराष्ट्रांतील ब्राह्म व क्षात्र तेजांना बहामनी दरबारांत बराच अवसर मिळाला. विजापूर, बेदर, भागानगर, अहमदनगर वगैरे दरबारांत त्यांच्या बुद्धीस योग्य क्षेत्र मिळे व म्हणूनच

त्या दरबारांत कित्येक विद्वद्रत्नें, साधुरत्नें व वीररत्नें चमकून गेलीं.

९७ बहामनी काळांत महाराष्ट्रांत कविहि चांगले नाणावलेले होऊन गेले. नरसिंहसरस्वती व जनार्दनस्वामी ह्या दोघांच्या वाङ्मयकृति जरी विशेष उपलब्ध नसल्या तरी ह्या दोघांनी ज्या शिष्यांना उपदेशामृत पाजलें त्या शिष्यांच्या वाङ्मयकृतीने मराठी भाषेचें पुष्कळ ऐश्वर्य वाढविलें. गंगाधरसरस्वती ह्यांचा गुरुचरित्र हा ग्रंथ माहित नसलेला हिंदु मनुष्य विरळा. ह्या ग्रंथाचीं मोठ्या भाविकपणाने पारायणें करणारे कित्येक लोक अद्यापि आहेत. महानुभावी पंथांत दत्तोपासना आहे व दत्तचरित्रेंहि आहेत. त्यांच्या पंथावर मात करण्याकरिता सनातनी धर्माच्या दृष्टीने हें दत्तमाहात्म्य रचिलें असावें असें वाटतें. ह्याच काळचा एक मोठा संत भानुदास होय. विजयनगरच्या श्रीकृष्ण राजाने पंढरपूरची श्रीविठ्ठलाची मूर्ति विजयनगरास नेली होती ती भानुदासाने पंढरपुरास परत आणिली आणि वारकरी पंथाची स्थापना केली. ह्याच भानुदासाच्या कुळांत एकनाथस्वामी जन्मास आले. जनार्दन स्वामींनी त्यांना अनुग्रह दिला. एकनाथस्वामींची मराठींतील ग्रंथरचना अमूप आहे. भागवत, रामायण, रुक्मिणीस्वयंवर, स्वात्मानुभव, आनंदलहरी, अनुभवानंद, गीतासार, मुद्राप्रकाश हे त्यांचे मुख्य ग्रंथ होत; परंतु ह्या सर्वांपेक्षा अत्यंत महत्त्वाची अशी त्यांची भाषिक कामगिरी म्हणजे त्यांनी संशोधिलेली ज्ञानेश्वरी ही होय. पूर्वीची ज्ञानेश्वरीची संहिता लोकास समजण्यास अडचण पडूं लागल्यामुळे एकनाथस्वामींनी ज्ञानेश्वरी संशोधून संपादिली व तीच संशोधिलेली प्रत सध्या सर्व वारकरी संप्रदायांत 'आई' ह्या प्रेमळ व सन्माननीय नांवाने आदरली जात आहे. एकनाथस्वामी हे भागवतधर्माचे एक प्रमुख पुरस्कर्ते व प्रणेते होत.

नाथांचा समकालीन दुसरा मोठा लेखक म्हटला म्हणजे दासोपंत हे होत. ह्यांचें लेखनभांडार अर्णवासारखें विस्तृत व अगाध आहे. सव्वालाख पदार्णव व सव्वालाख गीतार्णव हे दोन साहित्यार्णव त्यांनी निर्माण केले आहेत. ह्या दोन समुद्रांशिवाय अवधूतराज, ग्रंथराज, वाक्यवृत्ति हे ग्रंथ निराळेच. ह्यांचे कांही ग्रंथ पासोडीवर लिहिलेले उपलब्ध झालेले आहेत. ह्यांची भाषा शुद्ध, सतेज व भारदस्त आहे.

एकनाथ व दासोपंत ह्या दोन दिग्गजांशिवाय इतर कवीहि ह्या काळांत

पुष्कळ होऊन गेले. नाथ-पंचकांतील विठा रेणुकानंदन, जनीजनार्दन, रामाजनार्दन, प्रेमदास महालिंगदास, नरसिंव्ह, विरेश्वर, रंगनाथ व नामदेवाच्या नांवावर मोडणारा विष्णुदासनामा हे त्यांपैकी मुख्य होत. ह्या साधुसंतांनी आपल्या वाणीच्या सामर्थ्याने मराठीची जोपासना करून एका बाजूने फारशी भाषेचा हल्ला होत होता तरी त्यांनी मराठीचें सत्त्व कायम राखिलें.

९८ ह्या कालखंडांत मराठी भाषेचें स्वरूप विशद करण्याचा प्रयत्न पुढे केला आहे त्यामध्ये एक निराळाच मार्ग अवलंबिला आहे. एकनाथकालीन पद्यवाङ्मयांत आढळून येणारी भाषा जर पाहिली तर ती भाषा आणि उत्तरकालीन मुक्तेश्वर, श्रीधर व महिपति वगैरे कवींची भाषा पाहिली तर ह्या दोन्ही भाषांत कालाचें अंतर विशेष असून देखील त्या भाषांच्या स्वरूपांत फरक दिसून येत नाही. भाषेचा एक प्रकारचा साचा ठरून गेल्यासारखा आणि तोच उत्तरकालीन संतांनी गिरविल्यासारखा दिसतो. ह्यामुळे एकनाथकालीन भाषेचें स्वरूप उकलून सांगणें बरेंच धोक्याचें काम होतें; म्हणून येथे एक नवीनच मार्ग स्वीकारिला आहे. आणि तो म्हणजे पाटांगण येथील अस्सल ज्ञानेश्वरी आणि एकनाथस्वामींनी संशोधिलेली ज्ञानेश्वरी ह्या दोहोंच्या भाषांची फक्त तुलना करतों. ह्या तुलनेवरून एकनाथकालापर्यंत मराठी भाषेचें स्वरूप कितपत रूपांतरित झालें होतें हें कळून येईल. ज्ञानेश्वरीचें संशोधन व संपादन केल्याचें प्रत्यक्ष एकनाथस्वामीच सांगतात. "शके पंधराशतें सारोत्तरीं । तारणनाम संवत्सरीं । एका जनार्दनें अत्यादरीं । गीता ज्ञानेश्वरी प्रति शुद्ध केली ॥ ग्रंथ पूर्वीच अतिशुद्ध । परी पाठांतरें शुद्धाबद्ध । ते शोधूनी एवंविध । प्रतिशुद्ध सिद्ध ज्ञानेश्वरी ॥" ज्ञानेश्वरीची अतिशुद्ध असलेली संहिता पाठांतरांनें फार अशुद्ध झाल्यामुळे एकनाथाने ती शुद्ध केली. अर्थात् तिला एकनाथकालीन भाषेचें वळण मिळालें. तेव्हा ज्ञानेश्वरीच्या दोन्ही संहितेंतील भाषेचीं रूपें समोरासमोर ठेविलीं म्हणजे एकनाथकालीन भाषेचें स्वरूप आपोआप स्पष्ट होईल.

भाषेच्या निरनिराळ्या क्षेत्रांत दोहोंची तुलना पुढे दिली आहे.

## वर्णप्रक्रिया

| यादवकालीन | बहामनीकालीन | यादवकालीन | बहामनीकालीन |
|---|---|---|---|
| रुतु | ऋतु | तेव्हां इं | तेव्हां हि |
| रिणिया | ऋणिया | कर्तुत्व | कर्तृत्व |
| हांइ | हाडी | बेहों | भिवों |
| गाजति | गर्जती | उभगला | उबगला |
| मांडिलेया | मांडलेया | काइ | कांय |
| कैसीकैसी | कसकसे | एसणे | येसणे |
| सांघैन | सांगेन | काइसे | कायसे |
| तोखे | तोषें | सुआवा | सुवावा |
| आनी | आणि | वोझे | ओझे |
| ढेंढे | धेंढे | एॐ भाॐ | येवों भावो |
| ठावों | थावो | निसाण | निशाण |
| साचाचि | सत्यचि | सेजारा | शेजारा |
| वोइरणा | वैरणा | दोसें | दोषें |
| आइकैं | आइका | खेलणें | खेळणें |
| उपेगु | उपयोग | सकल | सकळ |
| रोसे | रोषे | दलवाडें | दळवाडें |
| निगाले | निघाले | चले | चळे |
| उलंडौनि | उतोनि | जाला | जाहाला |
| नोहे | नव्हे | गुंतले | गुंथाडे |
| वेचले | वेचिलें | वेऱ्ही | वरी |
| वर्णापरौता | वर्णापरता | पुडुती | पुढती |

## प्रत्ययप्रक्रिया

| | | | |
|---|---|---|---|
| तेयांतें | तयांतें | आत्मराजु | आत्मराज |
| वेदरायाचिये | वेदरायाचिया | एया | इया |
| सांख्यवेदांताचा | सांख्यवेदांताच्या | बोलाचिया | बोलाचे |
| निरूपणाचा | निरूपणाच्या | तूझा | तुझ्या |

| | | | |
|---|---|---|---|
| लोकांचेया | लोकांचिया | आनु (ठावो) | आन (ठावो) |
| डोलेया | डोळया | नांव | नाम |
| मानु | मान | वरिखे | वर्षे |
| देयावा | द्यावा | तलहाटी | तळवटी |
| भक्तु | भक्त | भाक | भाष |
| देवो | देव | पैं | (लोप) |
| चांदिणेयांचा | चांदिणियाचा | मियां | म्यां |
| पडिभरू | पडिभर | केसी | केशीं |
| तुसीं | तुजसीं | उठी | उठती |
| तैया | तया | आंतु | आतुल |
| ऐसैसा | ऐसा | वाहाणी | वाहणी |
| उभूनि | उभऊनि | निगालेया | निघालिया |
| म्हणौनि | म्हणोनि | आगा | अगा |
| वसौं | वसोत | ऱ्हदयवेऱ्हीं | हृदयवरी |
| जाएं | जाये | म्हणिपे | म्हणिजे |
| (मी) जालां | (मी) जाहालों | पुडुती | पुढती |
| विघरौनि | विघरोनि | राहाटी | राहटी |
| मोडौनि | मोडूनि | सिंक | शिंक |
| जाला | जाहाला | होंत | होतसे |
| तुकविला | तुकियेला | चंद्र | चांदु |
| (श्रीकृष्ण) म्हणे | (श्रीकृष्ण) म्हणती | विकोशु | विकास |
| नव्हे | नाहीं | देवो म्हणति | देव म्हणे |
| आत्मेनसी | आत्मेनिसीं | नवी पालवी | नवँ पल्लवी |
| निरूपजैल | निरूपजेल | मेघीं (तृतीया) | मेघें (तृतीया) |
| होइजैल | होइजेल | सकल | सगळा |
| आतेल | आतल | दिवो | दिवस |
| दाहीं (हातीं) | दाहें (हातीं) | पांचै | पांचहि |
| जचौनि | जाचोनि | लागि | लागी |
| पुरुषा | पुरुखा | आरिसा | दर्पण |

| | | | |
|---|---|---|---|
| पावया | पावया | विसरलेति | विसरले |
| ऐसेनि | हे | होये | होतसे |
| भींति | भिंती | जहि | जिहीं |
| तूझे | तुझे | वायुसिं | वायूसीं |
| पसेरेंसि | पसेरेसीं | जालेया | जालिया |
| जाणसि | जाणसी | होये | होय |
| व्यक्तिसेजारा | व्यक्तशेजारा | कोण्हे | कवणे |
| चि | ( लोप ) | वेचता | वेचिता |
| हो | जी | भवंडिजे | भंवडिजे |
| आडाड | आड आड | आधारु वांचौनि | आधारा वांचूनि |
| जिवा | जीवा | होतु | होतां |
| आझुइं | अद्यापि | तूंकूनि | तुकोनि |
| निमलणे | न मिळणें | वेडेया | वेड्या |
| विषिचें | विषयींचें | ऐया | यया |
| पांडुसुता | पंडुसुता | इये | ये |
| ते चि | ते जी | इये | हेहि |
| विषि | . विषयीं | सवितेया | सवितया |
| बोलौनि | बोलोनि | ना | ना, ना |

यादवकालीन मराठी भाषा आणि बहामनीकालीन मराठी भाषा ह्या दोहोंत किती फरक पडला हें वर दिलेल्या स्वरप्रक्रिया व प्रत्ययप्रक्रिया ह्यांच्या तक्त्यांवरून स्पष्ट होईल. यादवकालीन मराठीचें जें शुद्ध मराठी–देशी–स्वरूप होतें तें बहामनी कालांत अधिकाधिक संस्कृतमय बनूं लागलें. रुतु, रिण, साच, उपेगु, हि, कतुंत्व ह्या अस्सल देशी उच्चारांच्या ऐवजी ऋतु, ऋण, सत्य, उपयोग, इ, कर्तृत्व असे संस्कृत शब्द येऊं लागले. 'ल' च्या ऐवजी 'ळ' येऊं लागला. 'स' च्या ऐवजी श किंवा ष, 'ख' च्या ऐवजी 'ष', 'ढ' व 'ड' च्या ऐवजी 'घ' व 'थ' असे फरक होऊं लागले.

प्रत्ययप्रक्रियेंत तर उघड उघड फरक दिसतात. एका सामान्य-रूपाच्या बाबतींतील फरक मराठीच्या दोन्ही अवस्थांतील अंतर दाखविण्यास

पुरेसा आहे. तेया, तेयातें, लोकाचेया, डोळेया, देयावा वगैरेंबद्दल तया, यया, तयाते, लोकांचिया, डोळ्या, द्यावा असे स्पष्ट फरक होऊं लागले. नामाचें प्रथमेचें एकवचन, सर्वनामाचीं रूपें, ल्यबन्ताचें रूप वर्तमान व भविष्य ह्या काळाचीं क्रियापदाचीं रूपें ह्या बाबतींतहि बहामनी-कालीन मराठींत स्पष्ट असा फरक दिसतो. ' मानु, पडिभरू, आत्मराजु ' ह्यांबद्दल ' मान, पडिभर, आत्मराज ', ' तुसी, मिया, कोण्डे ' ह्यांबद्दल ' तुजसी, म्यां, कवणे ', ' म्हणौनि, मोडौनि, बोलौनि ' ह्याबद्दल ' म्हणोनि, मोडोनि, बोलोनि ', ' म्हणे, नव्हे, उठी ' ह्यांबद्दल ' म्हणती, नाही, उठती ', ' सांघैन, ऐल ' ह्यांबद्दल ' सांगेन, एल ' अशीं रूपें येतात. हीं सर्व रूपें भाषेच्या उत्तरकालीनत्वाची साक्ष पटविल्याखेरीज राहत नाहीत.

## मराठीचा अन्य भाषांशीं संबंध

२९ फारशीः—ह्या कालखंडांत स्थूलमानाने इ. स. १३५० पासून १६०० पर्यंतचा काळ घेतला आहे. इ. स. १३१८ पर्यंत महाराष्ट्रांत यादवांचेंच राज्य होतें. पुढे त्यांचा उच्छेद होऊन महमदीयांनी इ. स. १३१८ पासून दख्खनचें राज्य आपल्या स्वाधीन करून घेऊन १३४७ पर्यंत तें दिल्लीहून चालविलें. नंतर मात्र हुसेन गंगो बहामनीने दिल्लीशीं असलेला आपला संबंध तोडून दक्षिणेंतच राज्य स्थापिलें. तें १४९२ पर्यंत बेदरास, १४८४ पर्यंत वऱ्हाडांत, १४८९ पर्यंत अहमदनगरास, १४९९ पर्यंत विजापुरास व १५१२ पर्यंत गोवळकोंड्यास चालू होतें. ह्या सालानंतर दक्षिणेंत बरीदशाही, इमादशाही, निजामशाही, आदिल-शाही, कुत्बशाही अशा निरनिराळ्या शाह्या १६५६, १५७२, १६३७, १६८६ व १६८७ पर्यंत अनुक्रमें चालल्या. अशा रीतीने खुद्द मराठ-वाड्यांत फारशी भाषा बोलणाऱ्यांची कारकीर्द सुरू झाली. राजवटच फार-शीची कैवारी असल्यामुळे फारशीचा परिणाम तत्स्थानीय मराठी भाषेवर झाल्यास नवल नाही. ज्ञानेश्वरी किंवा महानुभावी वाङ्मय ह्यांत सांपडणारें मरा-ठीचें शुद्ध स्वरूप फारशीने हळूहळू कलुषित होऊं लागलें. फारशी मराठीचा संबंध जो ह्या कालांत सुरू झाला तो पुढे त्यांच्या राजवटी होत्या तोपर्यंत चालला एवढेच नव्हे तर पुढे पेशवाईमध्ये सुद्धा ढिलावला नाही.

एकनाथस्वामीच्या कालापर्यंतच्या १००-१५० वर्षांच्या संबंधांत हा परिणाम किती झाला होता हे खाली दिलेल्या एकनाथाच्या 'अर्जदास्तावरून' कळून येईल.

"अर्जदास्त अर्जदार बंदगी बंदेनवाज अलेकं सलाम साहेबांचे सेवेसी; बंदे शरीराकार जीवाजी शेखदार बुधाजी कारकून प्रगणे शरीराबाद किल्ले कायापुरी सरकार साहेबांची आज्ञा घेऊन स्वार झालों तो प्रगणे मजकुरी येऊन सरकारकाम करावयास लागलों तो प्रगणे मजकूरचे जमेदार दंभाजी शेट्ये व कामाजी महाजन व मनीराम देशमुख व ममताई देशपांडे व क्रोधाजी नाइकवाडी ऐसे हरामजादे फार आहेत ते सरकारकामाचा कयास चालू देत नाहीत. दंभाजी शेट्या कचेरीस येऊन जोम धरून बसतो. मनीराम देशमुख आपलें काम परभारें करून घेतो. ममताई देशपांडीण इणे तमाम प्रगणा जेरदस्त केला. क्रोधाजी नाइकवाडी याणे तमाम तफरका केला. इ० इ०

हा एकनाथ–वाङ्मयांतील फारशीमय मराठी गद्याचा एक मासला आहे. ह्यांतील एकंदर शब्दांपैकी जवळ जवळ ५० टक्के शब्द फारशी आहेत. फ़ारशीचें वर्चस्व कोणत्या थरावर गेलें होतें हें स्पष्ट होण्यास वरील उतारा पुरेसा आहे. फारशी–मराठीच्या दोनशें वर्षांच्या संबंधाचा जर हा परिणाम तर मग फारशी त्याच्याहि पुढे २००–३०० वर्षें राजभाषा म्हणून जर नांदती तर मराठीचें काय झालें असतें ह्याची कल्पनाच करवत नाही. जेत्यांच्या भाषेपुढे जितांची भाषा टिकाव धरू शकत नाही असा आजपर्यंतचा इतिहास साक्ष देत आहे.

'राजसत्ता मुसलमानी असल्यामुळे सरकारदरबारांत फारशी भाषा सुरू झाली व हळूहळू सरकारकामासंबंधे सर्व कागदपत्र फारशींत राहू लागले. 'अर्ज' दारांच्या 'फिर्यादी' 'काजी' पुढे जाऊन त्यांचा 'फैसला' किंवा 'इन्साफ' होऊं लागला. अग्रवादी, पश्चिमवादी, व्यवहार वगैरे पूर्वापार धर्मग्रंथांत आढळणाऱ्या संज्ञा नाहीशा झाल्या व त्यांच्या जागा मुसलमानी शब्दांनी घेतल्या. पत्राबदली 'कागद' आले व त्यावर प्रमाणाकरिता 'गोही' होत असत त्या साक्षी झाल्या. 'मोकदमांचे'

'अधिकारी' झाले आणि त्यांना प्रतिवर्षी मिळणाऱ्या 'वार्षिक वेतनाचे' ऐवजी 'सालिना मुशाहिरा' मिळण्याचा 'सिलसिला' पडला. लोक स्वतःच्या बापाचें नांव 'पिते' म्हणून न लिहितां 'बिन' योजून लिहूं लागले. राजेलोकांच्या सभोवतालच्या मंडळींत तर साफच बदल झाला. राजसभेंत 'बैसणाईत' होते तेथे दरबारी आले. राजाबरोबर स्वारींत 'सवंदळी', 'दांडिवस', 'हाडपी', 'बारी', 'सागाळिय', 'चवरघरू', 'भांडारी', 'वेचकरू', 'देवहारू', 'दिवटे', 'बडवे' वगैरे सेवक असत ते आता दिसेनासे झाले. झुझुमल, अनुभीग, राईक, पाईक, मांडलीक, राऊत, रजपुत (शत्रधारी सैनिक किंवा शिपाई) वगैरे हुद्दे आणि पदव्या ऐकूं न येतां जमादार, हवलदार, शिलेदार, ह्या पदव्या आता नव्याने ऐकूं येऊं लागल्या.[१]'

'व' हें उभयान्वयी अव्यय, 'ला' हा द्वितीयेचा प्रत्यय, विशेषण विशेष्याच्या पुढे ठेवणें, 'अ' ह्या स्वराचा तोकडा उच्चार, शब्द व्यंजनान्त उच्चारण्याची लकब, 'गी, दार, बाज, खाना' ह्यांसारखे शब्दसिद्धीचे प्रत्यय, वगैरे विशेष जे मराठींत आढळून येतात ते फारशी भाषेंतूनच आले आहेत व ते ह्याच काळांत आले आहेत.

ह्याच बहामनीकाळांत पश्चिम किनाऱ्यावर मराठीचा आणि पोर्चुगीज भाषेचा संबंध येण्यास सुरवात झाली. पूर्वीच्या 'ल' बद्दल 'ळ' ज्यास्त प्राचुर्याने येऊं लागला. कानडी भाषेशी संबंध जो यादवकालांत सुरू झाला तोच ह्या कालांत हळूहळू दृढावत चालला. (मराठी आणि इतर भाषा ह्यांचा परस्पर संबंध पुढे स्वतंत्र प्रकरणांत विवेचिला आहे.)

## बहामनीकालीन भाषेचे नमुने

### १ चोंभा—उषाहरण, इ. स. १३००–१४००

तेथे कैसे काय वर्तले ॥ १८–१० ॥ कैसी लावन्याची रासी। ती येथें पाहुनु उर्वसी। कैसा येकुची तापसु। पाहिं न टळेची तीयेसी ॥ ११ ॥ तीयेची पाहुनी रूपरेषा। काईसीया सुरनायेका। तीलोतमा न

१ भावे म. सा. १ पृ. १९१.

पवे सरी। नव्हे नव्हेची मेनीका ॥ १२ ॥ ऐसे रूपाचें लावण्य। पण उघडी वस्त्रहीण। हातीं घेऊनीयां आधाटी। फांकला रंगध्वनी आकर्षले त्रीभुवन ॥ १३ ॥ गीताचेन नादें। चरें विसरलीं स्वापदें। हरणीं वोडवीले कर्ण। तीयें राहीलीं नादबोधें ॥ १४ ॥ हरणु गोरी उभा करावा। मग पार्थीयें वींधावा। ते ही वीसरले आपणचें। नीवर्तले दुस्ट भाव ॥ १५ ॥ नादें व्यापिलें अंबर। पंक्षु जाती नेघती चारा। वीसरौनु येक जाले। पंचानन आणी कुंजर ॥ १६ ॥ ठेलीया समुद्राचीया लता। वाहों वीसरलीया सरीता। गगनीं वारा मंदु जाला। सैरा धडधडीतु होता ॥ १७ ॥ रागध्वनी कार्नी पडिला। सूर्याचा रथुची रांगला। नेणो चुकलें दीनमान। अरूणु हाकुं वीसरला ॥ १८ ॥ प्रकटलें मोहोनास्त्र। आकर्षले यादववीर। वरौती वास पाहात ठेले। भुमी पडले हातीयेर ॥ १९ ॥ चैतन्य आकर्षिलीं। पांचै इंद्रीयें येक जाली। जीव घेउनी गेली मोहोनी। देहे वैरीया समर्पिली ॥ १८-२० ॥ (भा. इ. सं. अ. १८३३ पृ. ५२)

## २ पर्शरामपंडितकृत पर्शरामोपदेश, इ. स. १३५६

गत तिथि दुणा। वारु चतुर्गुणा। नक्षत्र मेळविजे। ध्रुवक ४ मेळविजे ॥ तिंहिं भागु। उरलेये। शेष लोह पाहिजे। एके जल। दोहो स्थल। शून्य आकाश। स्थली सावली। जली आडाउ। आकाशी सावलीये। आडाउ तीर दार। हे जयेति। आडवार। आदित्या पासौनु। नक्षत्रे ९ उत्तमें। दाहावें मध्यम। तया पुढील २ उत्तमे। वरिला तिहीं खेळु पांडु १७ उत्तमें। वीसाठायीं च लाहे निर्वचैल। २२। लोह होईल। पूर्ण यश पाविजैल। हातीयेरें सांडिती। फल होईल। आदित्यवारी। शनिवारी। वृषभ, कन्या, मकर, मिथुन, तूल, कुंभ हे खोंचिति। सोमवारिं बृहस्पतरिं, मिथुन, तूल, कुंभा पडती। कर्क, वृश्चिक, मीन हे खोंचती। मंगळवारी। शुक्रवारी कर्क, वृश्चिक, मीनु, धनु, सिंहु, मेषु हे सा ६ राशी मरती। वृषभ, कंन्या, मकर हे खोंचती। तिथिवारु दिशे यात्रा किजे। ते दिशा येकत्र किजे। तिहीं भागु दीजे। उरे शेष तो ध्रुवक राशींचें जीव-नक्षत्र। २ ने गुणिजे। ध्रुवक मेळविजे। तिंहीं भागु दिजे। शेष उरे तो ग्रहें। जाणिजे। जयाचे राशीवरि बुध, गुरु बैसती तिये राशिचेयां करवी ।

यात्रा कर्विजे। दुर्गयात्रा बुध जया विये। राशीवरि बैसे। तया कर्ि कर्विजे। आउ। वि। पू। वा। द। ई। प। सूर्योदयाचीये ठाउनु। येणें क्रमे चौ घाडिये भ्रमण जाणावे। जयाचिये पाठि पडे तो जया पावे। इति भूपाळवल्लभः॥ समाप्तिमुपागमत्॥ [राजवाडे खं. ८ प्र.]

## ३ नागांव येथील शिलालेख–इ. स. १३६७

६ स्वस्तिश्री हिजरत ६९ सकु संवतु १२८९ पळवंग सवंसरे आधेअ + +
श्रीमत्य प्रौढिप्रतापचक्रवर्ति माहाराजाधिराज श्रीहंबिरु राओ
ठाणें कोकणराज्यं क्रोति सत्ये-तस्मिन् काळे प्रवर्त्तमाने धरमादि –
– पत्र लिखितं यथा सर्वव्यापारिसिहिप्रो तंनिरोपित अठागर अधि —
– कारिआ कुसना अह्यसण नाकाचा सेणवै देऊं प्रोण्होन्ह वेळित स —
– + रंध चिचावळित्राम पैकी तेथिला मिजिगिति सिहिप्रो केळि तेथे मरंगी –
– आ ळावेयालागी आठागर समंध मुख्य नागवें आगरुपैकि कोतळवाडि
१ नारदे कवळिआपैकि भाटाळि १ उरौ वाडिआ २ ससिम फळ भोगा स–
हित श्रीरायाजा प्रधानु सिहिप्रो सिहिप्रो विकति सडाउनि चिचवळिये चिये
मिजिगिति

वर मींघा मळिया कातिळवाडी विक्रिता द्रामा १६० नारदे कवळिआ जि–
ये भाटाळैये विक्रिता द्रंम ४० उरैवाडिआ २ विक्रिता द्रामा सते २००
हे दाम वरत सकोश कवळिआ मुख्य करूनि समाळि आगारियांस मागिउ–
।डीळि घाअटा साळगोपाळवादनिचे तळे अठि अवाटातु राहनाईं वाडि–
– आ दातारे हिन करुनि जाळिआ म्हणौनि समळि आगरियांस त्याति वि–
– कळिते गुंतिकैवाह्य सोडवुनि सिहिप्रो लागौनि वाडिआ विकिळि आहे
+ वाडिआ कोण्हि दातारु ठमेठळित गुंती करि तर समष्टि आगरियांहि प्रति–
(का) रावें हा धरमु सिहिप्रोचा तितिवड समष्टि आगरियांहिं समाग्रि प्रति·
पाळावें

झाडेआचि जमेतिस जेतुके आगर साहिआ डंखे पाठे तेतुके आगरास आप्र–
झाडावें ति रोपडवा वाडि सिंहिप्रो सासनाविषय भोगवारां हा धरमु समग्रि प्र–
– तिपाळावा आघाटणें पूर्व दिसें नाऊ म्हातारे याचि वाडि उत्तर दिसे
चोरलेवाडि पश्र

—चिम दिसे पठिआरावाडि दक्षिण दिसे कोणिष्टियाची वाडी ऐसि आघाटणे चि-
—आ। रविवार तिआहि पालक वरतइ काण्हा कवळिआ पोगुवाअ रास देऊ-
वेद म्हातारियाचा घरमुदेउ विउम्हातारेआचा वाडरेपैकी दावंदेउकघाट—
—आ अंबेयारि सोम्हाळ म्हातारा राढत नागदेउ भाई दार्युम्सदे सेटि—
साउ म्हातारा ताइदेउ कावंदे म्हातारा सवद म्हातारा गोरु म्हातारा
साजकार सोमदेअ जोटादेअ वारैकरु वरतअ मुपल पाटैलु नागला पाटलु—
बैजकरू हे जन १८ मुख्य करूनि समग्रि प्रतिपाळावे अंप्राचे साक्षिता—
नागावं जमतेपैकि टैगु माहामद्र दाउवार आयाशजि दाउवार आया—

## ४ ज्ञानेश्वरी—एकनाथी प्रतीवरून इ. स. १५८४

माझा मऱ्हाटाचि बोल कौतुकें। परि अमृताते हि पैजा जिंके। ऐसी अक्षरें रसिकें मेळवीन। जियें कोंवळि कचेनि पाडे। दिसती नार्दीचे रंग थोडे। वेधें परिमळाचें बीक मोडे। जयाचेनि। आइका रसाळपणा-चिया लोभा। कीं श्रवणींचि होती जिभा। बोले इंद्रिया लागे कळंभा। एकमेकां। सहजे शब्द तरी विषो श्रवणाचा। परि रसना म्हणे रस हा आमुचा। घ्राणासि भाव जाय परिमळाचा। हा तोचि होइल। नवल बोल तीये रेखेची वाहाणी। देखतां डोळयांहि। पुरों लागे धणी। ते म्हणती उघडली खाणी। रूपाची हे। जेथ संपूर्ण पद उभारे। तेथ मनचि धांवे बाहिरे। बोल भुजाहीं आविष्करें। आलिंगावया। ऐसीं इंद्रियें आपुलाला भावीं। झोंबतां परि तो सरिसेपणें बुझावी। जैसा एकला जग चेववी। सहस्रकर ॥ ६, १४—२०.

## ५ ग्रंथराज—इ. स. १५७८ सुमार

कवणीं म्हणैल प्राकृत। नव्हे हें ब्राह्मणाचें मत॥ तरी ते मूर्ख अत्यंत। ऐसे जाणावे॥ ८—१००॥ अपार चातुर्य जालें। परि ते चाडा चरण गेले। दारोदार लागले। उदरासाठीं॥ १॥ चाडाचि सर्वत्र गोड। चाड ते वाडाहूनि वाड। चातुर्य फळे ते उघड। जिंके चाडाचि॥ २॥ इत्यादि वेदवचनें। सर्वथा येथ प्रमाणें। जें वेदशास्त्रें पुराणें। आदि करूनि॥ ३॥ आत्मार्थेचि प्रिय सकळ। जाणोनि ऐस समूळ। विवेकें

आहातत्वचि केवळ । जाणावे ऐसे ।। ४ ।। आता आत्मज्ञानाचियाचाडा। सांडोनि व्युत्पति उदंडा । वेदवादाचाहि दवडा । करूनियां ।। ५ ।। श्रीसद्गुरूचे चरण । हृदई बळकठ धरून । कानडेंना मऱ्हाठें वचन । आइकावें ययाचें ।। ६ ।। जेणे होतो ब्रह्मसाक्षात्कारू । तोचि जाणावा बीजमंत्रु। तेणेविण वाग्व्यापारू । संस्कृत जें ।। ७ ।। तें सूस जाणावें निकण । कासया करावें कंडण । उपनतां चितें वारेन । सर्व जाये ।। ८ ।। ब्रह्मज्ञानाचा विचारू । तेथे शब्दाचा काइसा व्यापारू । यालागीं तो पामरू । पंडितु नव्हे ।। ९ ।। म्हणोनि हे प्राकृत । परंतु तत्त्वज्ञान धनामृत । जतन करावें अत्यंत ग्रंथाचेनि आकारे ।। ११० ।। श्रीदिगंबरानुचरू म्हणे । आतां पुरें पुरें बोलणें । ग्रंथे ग्रंथराज येणें सिद्धांतु भोगावा ।। १११ ।।

## ३ शिवकालीन मराठी—इ. स. १६००—१७००

१०१ बहामनीकालानंतर शिवकालचा विचार येतो. ह्या कालखंडांत इ. स. १६०० पासून १७०० पर्यंतचा काल घेतला आहे. शिवकालापर्यंत मराठी भाषेची हयात जवळ जवळ एक हजार वर्षांची झाली होती. ह्या हजार वर्षांच्या अवधींत झालेल्या मराठी भाषेच्या अवस्थांतरांपैकी दोन अवस्थांतरें आतापर्यंत विशद केलीं. शिवकालामध्ये झालेल्या तिसऱ्या अवस्थांतराचा उलगडा येथे केला आहे. यादवकालांतील भाषेचें शुद्ध स्वरूप बहामनीकालांत कलुषित इतकें झालें की मराठी भाषेचा मराठीपणा शिल्लक राहतो की नाही ह्याबद्दल संशय उत्पन्न झाला. शिवशाहीच्या उदयाच्या आनंदाने महाराष्ट्रांतील एकंदर वातावरणास एक प्रकारची भरती आली. महमदीयांच्या आक्रमणशील संस्कृतीने बहामनीकालांत महाराष्ट्रांतील लोक प्रथम प्रथम दबले गेले. ते पुन्हा पूर्णपणें आपल्या भानावर येण्यास तीनशें वर्षें लागलीं. मधून मधून स्वसंवित्तीचे झटके मराठा समाजाला आले नाहींत असें नाहीं. परंतु पूर्ण जाणीव येण्यास किंवा परकी संस्कृतीचें जहर पचनीं पडून शरीरांत आत्मसात् होण्यास तितका काळ जावा लागला. भानावर एकदा आल्यानंतर मात्र चहोंकडून सावरण्यास सुरवात झाली. समाज, धर्म, नीती, आचारविचार, पोषाख इत्यादि क्षेत्रांत ढासळलेली बाजू सावरण्याचे जे कांही प्रयत्न झाले त्यांत मुख्य

प्रयत्न श्री शिवाजी महाराजांनी केला. ह्याच कारणास्तव ह्या कालखंडास आम्हीं शिवकाल हें नांव दिलें आहे. शिवकालीन भाषेचें विवेचन खाली दिलें आहे.

## शिवकालीन भाषेची स्वरप्रक्रिया

१०२ वर्तमान मराठीप्रमाणे शिवकालीन भाषेमध्ये बहुतेक सर्व स्वर आहेत. ऋ, ॠ, ऌ, ॡ हे चार स्वर फार करून उपयोगांत येत नाहीत. बाकीचे दहा स्वर प्रामुख्याने उपयोजिले आहेत. ह्रस्व दीर्घाचा विधिनिषेध फारसा पाळलेला दिसत नाही. वर्तमानकालीन स्वरांचीं रूपें शिवकालीं कशीं होतीं हें खालील तक्त्यावरून दिसून येईल; व त्यावरून त्या कालच्या उच्चाराची दिशाहि कळेल. स्वरांचीं वर्तमानकालीन रूपें पुढे कंसांत दिलीं आहेत. उदाहरणांत आद्य, मध्य, अन्त्य असा क्रम आहे.

अः— अमच्या, अम्हास, अण, अश्रिवाद, असंका, ( आ ); सदभट, हरकत, ( इ ), विस्णदास ( उ );

आः— लाखोटा, काबजती, हिमात, पायमाली प्रामाथीनाम (अ);

इः— मापिक, हरीवख्त ( इ ); सिलेमान ( उ ); क्रिष्णगौड ( ऋ ). गाइत्रीची, विषइ ( यी ).

उः— लुखोबा, देउ, मशारनुले ( अ ); उचापती, उसुल, उलखिले ( व ); व्रुनी, क्रुस्णा, त्रुणे, जाग्रुती, पित्रु, ( ऋ ).

ऊः— धर्मादाऊ. पेडगाऊ, नाचणगाऊ ( व ).

ऋः -- ह्रवळांचा ( उ ).

एः— सत्येस्वर, धर्मपरायेण, छेत्रपती ( अ ); वेवसाव ( य ).

ऐः सैद, गै ( य )

ओः दुष्कोळ ( आ ); नोबत ( औ ); मोकाम ( इ ); अभ्योदयार्थ, ( उ ); पारवा ( उ ); विस्तो ( व ); भोगोटा ( व ).

औः— वडिगौ, पडिगौ, औलियाद, उपद्रौ वडिगौ, ( अव किंवा ऑव याबद्दल ) वौस ( ˜ अनुनासिक ).

वर दिलेल्या स्वरप्रक्रियेच्या तक्त्यावरून दोन तीन गोष्टी नजरेस येतील. उच्चाराप्रमाणे लिहिण्याचा शिवकाली रोख दिसतो. त्या उच्चारांवर जरी ग्रामिक उच्चारांचा परिणाम झालेला दिसला तरी तो मुळाच्या जवळ जवळ बराच येतो. उच्चारावर फारशी उच्चारांचा परिणाम झालेला उघड उघड दिसतो. "अ, इ, उ, ऋ, ऐ ह्या स्वरांना फारशी भाषेंत स्वतंत्र प्रतीकें नाहीत. त्यामुळे मराठींतील विशेषनामें फारशी बोलणाऱ्यांच्या तोंडून व फारशी नांवें मराठ्यांच्या तोंडून उच्चारिलीं जातांना वरील स्वरांच्या बाबतींत विशेष फरक झाला आहे.[1]" ह्या स्वरांचा परस्पर विपर्यय झालेला वरील उदाहरणांत दिसून येईल. सदभट, विस्णदास हीं त्याचीं उदाहरणें होत. वडिगौ, पेडिगौ, उपद्रौ, छेत्रपती, सत्येस्वर हेहि फारशी उच्चाराचेच परिणाम होत. अन्त्य 'व' चा 'उ' करून व त्याला पूर्वीच्या 'अ' मध्ये सामावून 'ओ' किंवा 'औ' उच्चारण्याची लकब आर्योद्भव भाषांची सुद्धा समजली जाते.

## व्यञ्जनप्रक्रिया

१०३ कवर्गः— कः– दुकोळ (ष्क). खः– खंदिल (क); लायख (क); झरोखा (का); तुम्हाविखी (षयीं). गः– बग (क).

चवर्गः— छः– छवछर (सं. त्स); पस्छमेस (श्चि). जः– ज्याजती (स); जेष्ठ (ज्ये); जोखालत (चो); जूज (झुंज).

टवर्गः— डः– देव्हडी, आशड (ढ). ढः– ढीवर (ध).

तवर्गः— थः– थापना, थीरावीळया (स् लोप). दः– मज्बुद (त); आदिकारपण (ध); समुदि, (ध). सरहद्द (द्द); विदमाने (द्य); आधात (त). धः–धाशत (दह); साधर (द). नः– गुजरान्, निशान्, काहडनी, तनाव, (ण); पनाळ, कोनेरीभट (न्ह). सिनलकी (न्द).

पवर्गः— बः– कार्बारी (भा), खूब (प), सिताबी (फी). मः– समजी (संभाजी).

अर्धस्वरः— यः– यैस्यास (ऐ). वः– वळखिले (ओ, अव); वोढियाचे (ओ).

---

१ राजवाडे खं. ८ प्रस्तावना.

ऊष्मेः— शः- अश्विवाद, आशड (ष); विशइ, नामषोश. भूशेणें (ष). षः- पलंगपोष (स). षाती, षदषदा, देषोनिया, खरे षोटे. पाषान, षडे (ख). सः- सिवजी, स्रावण, स्याहाणे, सुद; येस्यास, गोस्ट, सेणवी, मसाहती, विस्णदास, अभिसेक, साहाजी, स्याहाजी (श); तसवीस. (ज).

ळः— ळाता. कळहो, ळहान, ळपवुनीया ळिघाड, ळाजा (ल).

हः— निहकाम (ष्).

ह्या उदाहरणांवरून व्यञ्जनप्रक्रिया स्पष्टपणें नजरेंत येईल. ण बद्दल न, श आणि ष ह्यांबद्दल स, सररहा येतात असें वरील उदाहरणांवरून दिसेल. त्याचप्रमाणे ढ बद्दल ड, य बद्दल इ, ये, यै, ऐ असे वर्ण येतात. फारशी मराठीच्या संसर्गाचा परिणाम विशेषतः कंठस्थानीय वर्ण, दन्त्य-तालव्य वर्ण, महाप्राणमिश्रित वर्ण इत्यादि वर्णांच्या बाबतींत झाला आहे. हा फरक स्पष्ट करून सांगणें फार कठीण आहे. हा प्रत्यक्ष उच्चारांवरूनच कळण्यासारखा आहे. "काझी, कुराण" इत्यादि शब्दांचे उच्चार हीं त्याचीं उदाहरणें होत.

ह्याशिवाय वर्णप्रक्रियेचे महत्त्वाचे फरक खाली दिले आहेत.

१ वर्णागमः— भगत (भक्त), लक्षम, लक्षुमी (लक्ष्म, लक्ष्मी); खातीरेस, (खात्रेत, खात्रीस), प्रतिवरुसी (प्रतिवर्षी); दरमियान.

२ वर्णसंयोग अथवा आन्तर स्वरलोपः— द्वा (दुवा); यांचेथे (यांचे येथे); त्यापण (त्यांनी + आपण); ऱ्हातीच (राहतीच); उप्रांतीक (उपरांतीक); इ.

३ अनुनासिकलोपः— वौसीचा (वं); आदेशा (अं); समजी (संभाजी), टकसाल (टं).

४ वर्णलोपः— धर्माधिरण (क लोप); आपदेभट, महादेभट (व लोप); दुकोळ (ष् लोप); थापना (स् लोप). विलातीत (य लोप), मशारा (हि लोप).

५ समानोच्चारितवर्णलोपः— दरोज (दररोज).

६ महाप्राणः— धाशत (दहशत).

७ अर्थभेदः-- वजीर, गुजरान, अवलाद, काबाडी, कारकून.

८ लिंगभेदः — हजामत; सफर; नजर; (मूळचे नपुंसकलिंगी); बाग; पायपोस; खुर्दा-मूळचे नपुंसकलिंगी.

९ निभृत अः — नुक्सान; ज्वान; गफ्लत; लायक्; गनीम्; जाम्दार; कार्खाना; छप्रपलंग, हवल्दार; भर्जरी; पश्मी इ.

१०४ वर्णप्रक्रियेचे निरनिराळे प्रकार येथवर सांगितले. ह्यांवरून शिवकालीन मराठी भाषेत औच्चारिक बाबतींत आर्यवंशाची मराठी आणि मोगल किंवा तुराणी वंशाची फारशी ह्या भाषांमध्ये कसा झगडा चालला होता हें दिसून येईल. एकीकडे मातृभाषेतील जन्मापासून किंवा अनुवंशिक प्राप्त झालेले औच्चारिक संस्कार आणि दुसरीकडे राजदरबारांत व इतर व्यवहारांत क्षणोक्षणीं कानावर आघात करणारे राजपुरुष व त्यांचें अनुकरण करणारे इतर पांढरपेशे उपजीवी नोकर यांचे औच्चारिक संस्कार हे दोन झगडणारे पक्ष होते. "शब्द व्यंजनान्त न उच्चारिता स्वरान्त उच्चारण्याची लकब मराठी भाषेमध्ये आहे. ही लकब मराठीने प्राकृत व अपभ्रंश ह्या भाषांपासून उचलली[1]." ह्या तिच्या स्वभावामुळे फारशी भाषेतून मराठीमध्ये जे जे व्यंजनान्त शब्द आले ते सर्व शब्द स्वरान्त झाले. शब्दांत अंगभूत असलेलें आंतर व्यंजन सुद्धा स्वरान्त केलें. परंतु इतर स्वरांच्या उच्चारांत आणि ह्या स्वरयुक्त व्यंजनांच्या उच्चारांत थोडा फरक राहिला. स्वरांचा निभृत उच्चार करण्याचा एक नवीनच प्रकार मराठींत चांगल्या जाणत्यांच्या तोंडांत रूढ होऊन बसला. पुणें, नगर, नाशीक, खानदेश ह्या महाराष्ट्रांतील जिल्ह्यांत विशेषतः गांवढळ लोकांच्या भाषेंत हा निभृत उच्चाराचा प्रकार तितकासा रुजलेला दिसत नाही. वर सांगितलेल्या प्रांतांच्या ग्रामिक भाषेंत पड'ला, घेत'ला, मारि'ला, जेव'तो, करि'तो, खोक'तो, जाग'तो, कुठ'ले, इथ'ले इत्यादि शब्दांतील आंतर स्वर सावात उच्चारिले जातात. आपल्या नागर भाषेसारखे पड्ला, घेत्ला, मार्ला, जेव्तो, कर्तो, खोक्तो, जाग्तो, कुठ्ले, इथ्ले असा ते उच्चार करीत नाहीत. ह्यावरून नागर भाषेतील उच्चारांवर जितका फारशीचा परिणाम झाला तितका ग्रामिक भाषेतील उच्चारांवर झालेला दिसत नाही.

---

१ Dr. Grierson, L.S.I. 7 Intro.

## प्रत्ययप्रक्रिया विभक्तिप्रत्यय

१०५ प्रथमा एकवचन-प्रत्यय ' उ '. उदाः- नेमु, झुंझारराऊ, कौलु जाबु, माहाराजसाहेबु, संबंधु, जीऊ, महमदापुरु, सादत सैद हुसेनु. (फारशी विशेषनामांना सुद्धा हा उ प्रत्यय लागलेला आहे). स्त्रीलिंगी-राती (झाली) हकीकती, मुदती, आगी ( लागली ). माये.

प्रथमा अनेकवचन— उदाः- १ [पंचवीस] होनु; कामेंकाजें. २ [ तुमचे ] बाबे; वादे [ उभे केले ]. ३ रैयान्, देयासान्, नाडकर्णीयान्, देशमुखान्, महाजनान्, हुद्देदारान्, मोकदमान्, कारकुनान्. [ह्या प्रत्येक अनेकवचनाच्या रूपापुढे ' ई ' हा षष्ठीचा प्रत्यय लाविला आहे व त्याने तो पुढील शब्दाशीं जोडिला आहे. ]

२ द्वितीयाः— प्रत्यय. 'सी'. उदाः- महालासी, आपणियासी. गाऊ [मारिताती], रयतीस [ पैके लावून ], मसलतेस.

द्वितीयेचा प्रत्ययरहितहि उपयोग केला आहे. त्या रूपास स्थलकालदर्शक द्वितीया किंवा क्रियाविशेषणरूप समजावें. उदा-खान सातारा आला. सन सीत चालिलें आहे. द्वितीयेसाठी 'ला' प्रत्ययहि वापरलेला आहे. हा 'ला' प्रत्यय 'रा' ह्या फारशी प्रत्ययापासून निघाला आहे असें राजवाड्यांचें मत आहे. ज्या अर्थी 'लागी' हा प्रत्यय द्वितीयेचा असून त्याच अर्थी आहे त्या अर्थी तो 'लग्' ह्या धातूपासून निघाला असावा, हेंच मत ज्यास्त सबल दिसतें.

तृतीया-प्रत्यय 'एँ' उदाः- एकनाथ भटें, महाराजें, जगदळें, विठोबें, अंबाजी घोरपडें ( सांगितलें ), आत्मसुखें (घेतलें). ईं-उदाः- इजारदारीं ( गुंता केला ), हेजिबीं. हीं-उदाः- तेहीं ( शिकस्ती खादली.)

चतुर्थीः – द्वितीयेप्रमाणे- ( आपले ) सुने ( पुसिलें ).

पंचमीः- प्रत्यय 'हून'-घरींहून.

षष्ठीः-प्रत्यय 'चा' उदाः-गांवीचा, साहेबाची. 'ई'-ह्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. मौजे, किल्हे, देसायानी, मोकदमानी इ. स—आपणास ( वतनास संबंधु नाही. )

सप्तमीः-प्रत्यय 'इ'-लोकीं (एदिलशाही); उत्तरे ( पडवी ), पश्चिमे, पूर्वे. ठाना ( जमा करणें ). ( त्याचे ) हवाला ( केले ). कीर्ति बावे

( तकसीर कीजे ), ( हरीच्या ) कथे ( नाही विश्वास).

सामान्यरूपः—कितवेया ( मध्ये ), गोलिया ( नी ), आपली ( खुसीने ), घराणिया, सातारिया, मुकाबलिया, इत्यादि.

विभक्तिलोपः—मौजे शिरवाब चालले ( सप्तमी ); अबदुल चस्मकोर दिल्हे ( चतुर्थी ), केसो त्रिमल लेहाया पाठाविली ( तृतीया ). मलिकअंबर भोगवटा आहे ( षष्ठी ). बाबा हाजी बुन्हाण मालूम केलें ( तृतीया ). पेसजी कारकीर्द जो गुन्हा केला ( सप्तमी ).

## सर्वनामविभक्ति

प्रथमाः—ए. व.—तूं, मी, जे, ते, ( स्त्रीलिंग ), ते ( माये ) जे, ते ( वर्तणूक ). जे, जे, (वस्तभाव). कोण्ही, कोन्ही, कोण्हे. कोण्हीक. अ. व.—आम्ही, तुम्ही. इत्यादि.

द्वितीया —यैसियास, यैसी, तुज, आपणियासी, आपणासी, हें आपले लिहिलें, ( आपणांस ह्या अर्थी दिसतो ).

तृतीया.—मिया, तुवा, त्यान्हे, त्याणी, तेणप्रमाणे. हीं—तेहीं, येहीं ( रांडपण घातले पाहिजे ), कोण्ही, तिहीं.

चतुर्थी.—द्वितीयेप्रमाणे— [ तुज ] देहान्त प्रायश्चित्त द्यावें.

पंचमी.—तधी—पासूनी.

षष्ठी.—माझिए. अमच्या, तुझे, तुमचे, आमचे, आपली, आपला इ—इची, आपुलेवी. येर्थाचिया. स—विशेष फरक नाही.

सामान्यरूपें—आपली खुसी विसा वर्षाचा भोगोटा. च्यारी पांचशे घोडा. गैरी लोकी पैस करून. अठा दिवसा ते येथील हुकुमे नाही. निमे बापपोटी खावी. गैरा उखदामधे.

विशेषणांच्या बाबतींतहि फारशीमराठीमध्ये विलक्षण द्वंद्व माजलेलें दिसून येतें. मराठीचा स्वभाव विशेषणें विशेष्याच्या पूर्वी वापरण्याकडे आहे; तर त्याच्या विरुद्ध फारशीचा स्वभाव विशेषणें विशेष्यानंतर वापरण्याकडे आहे. पुष्कळ ठिकाणीं विशेषणांचीं सामान्यरूपें झालेलीं आहेत. उदाहरणें—दिवसा दहामध्ये पर्जन्य पडेल. किल्लेमजकुरी मशारनुले. कोटमजकुरी. हकीकती कैसी. चावर निमे होती. कोठी बळकटी केली. हरबाजी वडील घरीं असता.

## क्रियापदांचे प्रत्यय

१०६ वर्तमान. प्र. पु. ए.– तपे, पचे, ठेळो, गातो, नाचोतो, दाषवितो. अ.–आपण होए. द्वि. पु. ए.–तू असिजे, तूं खूर्दखद केसें नेतो, होसी, बुजाविसी, काढून अहेस. अ.—[ तुम्ही किताबती घेऊनु ] आलेसी, चालिसेस. तृ. पु. ए.—मजरा आस. एसी खुर्दखताची रजा होए. अ.—करितातो, आहेती, असेती, देतातो, खातातो. [ सर्व घरेंत ] फिरतें, होतुसे. भिल्ली म्हणेत. महाराजा करतुसे.

भूत—जालें, मारिला, दिधले, आनिली, बैसले, खादली. घरिली, म्हटिले, बोलिलें, हालिळे, ठविलें, पुसिले, पडिली, साधिली, हाटिला, चालिला, असेली, निजली.

भविष्य—उमर असेली, येईना, पवाडेल, चालशील. [तेणेंप्रमाणें तुझा निवाडा] करून. [ ज्या अर्थी येथे 'न' दिसतो त्या अर्थी प्रचलित अनुस्वार उच्चारिला जात असावा ].

कर्मणि—चालवींजे. तूं येईज. जाईजे. असीजे दीजे, कीजे, [ मिया तुवा ] खाईजे; दिधला अस; शहाजी राजे धरिले; करीत जाणे.

अकरणरूप—हो न देणें; कसूर हा न देणें; ने दु; नेवो. आपण ने दूच. नये बोळो, नेठवी.

कृदन्त—लिहलें, चिंतिलें.

विध्यर्थ— देखावे, पुरावी, उपमावे, वर्त्तवो.

ल्यबन्त—लेहाया, लेहाण्या वाचावया, आलिया, म्हणउनु, करुनु, पाहोनु; फिराऊनु; सांगोन; म्हणौऊनु; अणौउनु; चालउनु; स्मरोनु; लेहानु; राखोनु; हिरोणु; बोलोनु; पोहाचाऊन; कुल मारून; न कळोनु; परिसुणु.

णिच्—वळून [वळवून], देवाऊन, देवउनु, देवणें देविर्तील. त्यानें वडिलास नागवण पडवली. आमचे जीऊ वाचविले, पुढेहि वाचिले [वाचविले] पाहिजे.

क्रियाविशेषणअव्ययें दोन प्रकारचीं आढळतात : १ विभक्तिप्रत्यय शब्दांना लावून झालेलीं. कधी कधी प्रत्ययांचा लोप केलेला आहे. २ क्रियाविशेषण अव्ययें मूळचींच म्हणून.

पहिला प्रकार.—बहूता रीतीं; सुखें, लेकरीं [ खाणे ]; सन सीत

[ चालिले आहे ]; राती दिवस. [ तुम्ही ] खुसी [ घरवाडा ] बांधणें; जोरावारीने पिढीदरपिढी देशपांडियेपण आहे; साला साले; सालबसालने. टाणेदार याचे आंगे हरकती केली.

इतरः—उगेच, रोज, दरोज, यैसा मामला काये बदल केला! [जमीन पूर्वीप्रमाणे] पुढा अनुभविणें; तव, हल्ली, हालीं. येणेप्रमाणे वाराची वार दुमाले करणें. बरजोर ताकीद करून जाणे. जोवेरी. तधीपासून. [लंबे] दूरी [ केले ]. सडी आलिया. [ तूं ] बेसक [येईजे]. हरीवख्त, मागत्यान, तऱ्ही, तर्थी.

## शब्दयोगी अव्ययें

विशेषणांप्रमाणे ह्यांच्या बाबतींतहि पश्चाद्गामी आणि पूर्वगामी अशा दोन्ही प्रकारांनी अव्यय वापरण्याची प्रवृत्ति शिवकालीन भाषेमध्ये रूढ झालेली दिसते. पूर्वगामी वापरण्याचा स्वभाव फारशीचा आहे. पश्चाद्गामी वापरण्याचा स्वभाव मराठीचा आहे.

१ उदाहरणें.—त्यावरी, तुजवरी, माणसाकरवीं, आपणापासुनु. साबाजीपंताबराबरी, देवणकारबराबरी, तधीपासून, आम्हापासी, वरीलीकडुनु, अनाकारणें, मेलियावरी, जोवेरी, याउपेर, मांडिलियाकारणें, जोवरी तोवरी, मागती, दिवानातुनु, तऱ्ही, बाहीर, नजदीक.

२ देखत परवाना, खालते, किल्ले कोंढाणा खाले राहुनु; देऊळ गांवीची वाट तेथुनु, बरहुकूम.

उभयान्वयी अव्ययेंः—आण ['इ' चा लोप], यैसे जे, जे, म्हणौनु, तऱ्ही, जैसे जैसे, तैसे तैस, ऐशियास.

उद्गारवाचकः—बस, हां, अलबत, बेशक, बेलाशक, खूप, [illegible], छे, छी, अफसोस, शाबास; खूश, फू. [ रा. खं. ८ ]

## शिवकालीन प्रयोगविशेष

गनीमास घेरा केले.
जीवें मारिला गेला.
त्यास मोकळ देणें.
दरीबाब सरंजाम होए.

त्यास हे नामाकुल [illegible]
विलायती खराब [illegible]
हरयेक परगडा, एकेक काजी.
दादी केली पाहिजे.

पटेलगीस दखल जाला.
गावगना हिंडोन संचणी करा.
म्हटिले ते न होती. न कीजे.
हो ने दिता.
(लंबा) कागद न दाखवीच
आपले तरफेन कुसुर हो न देणें.
तिजपाशी दिघले की वाटून दे.
असे अवलाद अफलाद चालवीजे.
असल मिसल फिराउनु दिजे.
श्रीच्या करणीस कांही चालत नाही.
साहेबाचे मसलतेस येऊन एकतारी केली.
बाजपक्ष्याचे हातून तुमचें मांस काढून घारीस टाकून लूट करवूं.
मुलेपणाबद्दल भांडाभांडी झाली.
वनवास विक्षेप केला.
(राघोजी) यासी मारा करून मारिला
तुम्ही पांढरीच्या कामास आला आहां.
गोही खातिरेसी आणतां [विठलाका देऊ] खरा निघाला.
दिव्यीं उतरणें.
[झुंझारराउ] मसलतीमध्ये खर्चला.
शिराघडाच्या चिठ्या टाकल्या.
कार्यप्रयोजन लिहीत जाणें.
त्याची हुजती घेणें. हुजती गेले.
ह्याकरिता आम्ही खेदी.
याची अडखेरी चालवीजे.
जोरावारीने कलह आरंभिला.
वतन चालवत येणें.
देवाचा पाला घालणें.
अर्जानी जाले.
दुंबाला कीजे.
ते [फर्मानें] मोगलाचे फितवेयामध्ये गूम जाले.
कीरे सीरभारी दिघली न वचे.
शिरजोरी करणें.
सी साला उगवणी करणें.
घसघस करणें.
श्रीदेव मसीद आपणास क्रिया लावील.
ह्याचें लिगाड तुम्हास लावणार नाही.
त्यास सुईच्या अग्रावरील मृतिका देत नाही.
तो राजक्रांत जाला.
परागंदा होऊं लागलेत.
दुधभात व बेलभंडार याची क्रिया केली.
मुलकास कौल जाले.
कारकुनासी पुसी केली.
आपले भाऊबांदगासि आहेती.
[आपणास रंगोजीस] बरेंपण होतें; वैर नव्हतें.
चंद्रसूर्यो तपे तववरीं रवरवी पचे.
जूज कीस्त फार झाली.
येकाचें दुख तें सवाच दुख यैसें जाणोनु.

१०८ शिवकालीन भाषेच्या व्याकरणाच्या निरनिराळया ज्या बाबी येथवर सांगितल्या त्यांवरून प्रत्येक शाखेमध्ये फारशी भाषेचा मराठीवर किती परिणाम झाला हें दिसून येईल. पुरुषवाचक सर्वनामें, संख्यावाचक विशेषणें, लहानलहान अव्ययें, उच्चारसिद्धि, शब्दसिद्धि ह्या बाबी म्हणजे भाषेचा गाभा होय. बाह्य लौकिक व्यवहाराच्या अनुषंगाने भाषादेवीच्या देवालयाच्या आंतर गाभाऱ्यापर्यंत यावनी भाषेचा शिरकाव झालेला दिसतो. ह्या सर्व पुराव्यावरून तीनशें वर्षांच्या संसर्गाने शिवशाहीच्या पूर्वार्धांतील मराठी जवळ जवळ फारशीमय झालेली दिसते. तिच्या मूळ स्वभावाची ओळख बुजून तिला Perso-Aryan म्हणण्याकडे कल होतो. अशा तऱ्हेने कायमचीच ती Perso-Aryan होते कीं काय अशी भीति होती. परंतु शिवशाहीमध्ये जी राज्यक्रांति झाली तीमुळे ती भीति नाहीशी होऊन तिला तिचें स्वत्व मिळालें. शिवाय परकी संस्कृतीच्या जहराने घायाळ न होतां उलट तें पचनीं पाडून आपणांत सामावून घेण्याची शक्ति मराठा समाजांतहि असल्यामुळे मराठी भाषेवरील हल्ला तितकाच थोपविला गेला. मराठीचें सत्त्व कायम राखण्यास तत्कालीन साधुसंतांची कामगिरीहि कारणीभूत झाली. तिचें महत्त्व थोडक्यांत सांगणें जरूर आहे.

१०९ शिवाजीसारख्या राज्यक्रांति करणाऱ्या वीरांनी केवळ जाणून बुजून स्वधर्मपरित्राणासाठी परकीयांशीं जी झोंबाझोंबी सुरू केली तिचा परिणाम स्वधर्माबरोबर स्वदेश आणि स्वभाषा ह्यांच्या जोपासनेंत झाला. साधुसंतांनी पुरुषार्थ साधण्याच्या हेतूने वाङ्मयनिर्मिति केली. धार्मिक ठेवा संस्कृत भाषेच्या दुर्गम कोटांत ठेविल्यामुळे सामान्य लोकांच्या हातास तो पोहोचेना. बरें, संस्कृत म्हणजे देवांची भाषा आणि मराठी म्हणजे चोरांची असें ते मानीत नसत. अध्यात्माची कोडीं मराठींत उकलण्याची जी परंपरा ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ ह्यांनी घालून दिली, तीच पुढे रामदास, वामन, तुकाराम ह्यांनी चालविली. संस्कृत — मराठींचा झगडा एकनाथ स्वामी व हरि पंडित ह्यांच्यामध्येच होता असें नाही; तर तो पुढे शिवकालामध्येहि दिसून येतो. राधामाधवचंपूचा कर्ता जयराम पिण्ड्ये हा संस्कृतचा अभिमानी असून संस्कृत कवींना सिंह म्हणतो आणि प्राकृत कवींना मर्कटें म्हणतो. ज्ञानेश्वराने संस्कृतांतील भांडार दाखविण्या-

साठी जो ‘ भावदीप ’ घेतला तो पुढे वामनाने ‘ यथार्थ ’ रीतीने दाखवीपर्यंत तेवतच होता. मध्यंतरी ह्या दीपावर बहामनी काळांत प्रतिकूल वातावरणामुळे बरीचशी काजळी गोळा झाली हें खरें; परंतु लगेच वातावरणांतील वावटळें नाहीशीं होऊन स्थिरस्थावर झाल्याबरोबर आलेलें काजळ झाडून काढून पुन्हा त्या दीपाची शिखा प्रज्वलित केली. झगडा झाला संस्कृत-मराठींत; परंतु त्याचा परिणाम मात्र फारशीस नामोहरम करण्यांत झाला. पूर्वी जें एकदा बीं रुजत घातलें त्याला पीक शिवकालांत बेसुमार आलें. वाङ्मय व भाषा ह्यांच्या वृद्धीस राजाश्रय मिळाला. शहाजीराजे ह्यांच्या आश्रयाखालीं असलेल्या ३५ कवींची याद जयराम पिण्ड्ये याने आपल्या चंपूमध्ये दिली आहे. शिवाजीराजे यांनी भुखण कवीला आश्रय दिल्याचें प्रसिद्धच आहे. भोवतालीं ताम्रांचें काहूर माजल असतांना एकनिष्ठ भावनेने तुकारामाच्या कीर्तनांत शिवाजी राजे तन्मय होऊन रंगल्याची आख्यायिका प्रसिद्धच आहे. रामदासांच्या चरणीं सर्व राज्य अर्पण करून केवळ श्रीप्रसाद म्हणून राज्यव्यवहार शिवाजीने पुढे चालविल्याचें कांही संशोधक सांगतातच. शाहीरांस उत्तेजन लोक व राजा ह्या दोघांकडून मिळत असे. प्रत्यक्ष जिजाई मातोश्रीने अग्नीनदासास बोलाविल्यावरून अफजलखानाच्या वधाचा “ त्याने कडाका गाईला ” व म्हणूनच त्याच्या “ चढविले हाताला लंगर सोन्याचे दोन ” व त्यास एक गांव बक्षीस दिला. ह्याशिवाय तुळशीदास, यमाजी हे शाहीर होतेच. ह्या भाषिक हल्ल्यामध्ये सुद्धा मराठी कविबारगीरांनी शिवकालीं चोहों बाजूंनी एकदम गनीमी मारगिरी करून फारशीच्या विरुद्ध धुल्लड उडवून दिली. भाषिक उलाढाल व वाङ्मयीन खटाटोप ह्यांत शिवकाल हा कसा चिरस्मरणीय कालखंड आहे हें पुढे दिलेल्या कवींच्या नांवावरून कळून येईल. मुक्तेश्वर, रमावल्लभदास, शिवकल्याण, लोलिंबराज, शामराज, तुकाराम, बोधलेबुवा, निंबराज, मोरया गोसावी, गणेशनाथ, विठ्ठलदास, सेना न्हावी, शेखमहंमद, रामदास, गंगाधर, रंगनाथस्वामी, आनंदमूर्ती, केशवस्वामी, वामन पंडित, नागेश, विठ्ठल बीडकर ह्या सर्व संतमंडळींच्या कामगिरीने शिवकाल म्हणजे वाङ्मयाच्या खटाटोपांत चिरस्मरणीय असा कालखंड झाला आहे. ह्यांशिवाय रामदास, तुकाराम व इतर संत ह्यांचा शिष्यगण

व वेणाबाई, आक्काबाई, बहिणाबाई ह्या स्त्रिया आपआपल्या परीने हात-भार लावीत होत्या. ह्या सर्वांचा जनपदामध्ये परिणाम झाल्यानेच फारशीचा लोंढा थोपवितां आला. हे प्रयत्न जरी निर्हेतुक झाले तरी ह्यांचा परिणाम झालाच. प्रत्यक्ष उघड उघड वार खुद्द छत्रपतींनीच केला. कोणत्याहि प्रकारचें महमदी चिन्ह पाहिलें की महाराजांच्या कपाळाची तिडीक उठवी. दरबारांत, घरीं दारीं, जिकडे पहावें तिकडे फारशी शब्दांचा बेसुमार भरणा झालेला. तेव्हा हे शब्द खड्यासारखे निवडून काढून टाकण्याकरिता राजदरबारांत नेहेमीं जरूर लागणाऱ्या शब्दांचा राजव्यवहार-कोश करण्यास रघुनाथ पंडितास त्यांनी आज्ञा केली व अशा रीतीने त्यांनी मराठीच्या शुद्धीकरणाचा प्रथम उपक्रम केला.

११० फारशीपुढे मराठी भाषा नेस्तनाबूद न होण्याचें आणखी एक कारण आहे व तें प्रामाणिकपणाने कबूल केलें पाहिजे. तें म्हणजे भाषेला बहामनी राशियतींतील बादशहांनी दिलेला आश्रय हें होय. १४ व्या शतकापासून ते १७ व्या शतकापर्यंत मराठा प्रांत आणि मराठी भाषा हे दोन्ही पारतंत्र्याच्या कर्दमांत रुतलेले होते, व जरी मराठी भाषेला हाता-पायांत बेड्या घालून बादशहाच्या दरबारीं खेचली होती तरी दरबारांत तिचा पक्ष घेणारे पुष्कळ वाली तिला भेटले. सन १५२९ मध्ये बुऱ्हाण निजामशहाने महाराष्ट्री ब्राह्मण आपल्या दिवाणगिरीवर नेमला. ह्याच्या कारकीर्दींत ब्राह्मणी कारकुनाच्या फर्देशाहीस चांगलाच वाव मिळाला असावा आणि त्यायोगे मराठीची जोपासना झाली असावी. सन १५५५ मध्ये इब्राइम आदिलशहा विजापूरच्या तख्तावर बसला. हा मराठ्यांच्या शौर्यधैर्यादि युद्धोपयोगी गुणांचा चाहता होता. त्यांच्या व्यवहारज्ञानाची पारख करणारा, हिंदु मुसलमान असा दुजाभाव उत्पन्न झाला असतां हिंदूंचा कैवार घेणारा अशा सत्प्रवृत्तीचा हा बादशहा असल्यामुळे ह्याच्या अमदानींत मराठी भाषा आणि मराठा समाज ह्यांना सुस्थिति प्राप्त झाली. राज्यव्यवहारांत व व्यवस्थेत मराठी भाषा व समाज ह्यांना योग्य मान मिळूं लागला. मोठमोठ्या हुद्यावर पुष्कळ मराठ्यांची योजना झाली, इतकेंच नव्हे तर दरबारांत मराठीचा शिरकाव झाला. आणि सर्व बादशाही दप्तरहि मराठींत ठेवण्याविषयीं बादशहाचें फर्मान निघालें. खुद्द

बादशाहानेच मराठी भाषेची तळी उचलल्यावर मग तिला हातभार लावण्यास साहजिकच दरबारांतील हिंदु मुत्सद्दी पुढे आले. आदिलशाहींत मुरारजगदेव, यानतराव, निजामशाहींत साबाजी अनंत, कुत्बशाहींत अकरस मानजी, मधो मानजी, ( आकण्णा, मादण्णा, जायण्णा लिंगरस ) ह्या सर्वांनी एक जवळ जवळ परंपराच स्थापिली. ह्या परंपरेचा आद्य प्रवर्तक हेमाद्रिपंत म्हणावयास हरकत नाही.

१११ फारशी भाषेबरोबर आपणास इतर कांही अविंध भाषांचा विचार केला पाहिजे. ह्यांमध्ये तत्कालीन राजकारणांत अथवा व्यवहारकारणांत ज्या युरोपीय सत्तांनी महाराष्ट्रांत ढवळाढवळ केली त्यांच्या भाषांचा अंतर्भाव होतो; उदा. पोर्चुगीज, डच, फ्रेंच, इंग्लिश. फारशीचे परिणाम ज्याप्रमाणे मराठीच्या रोमरंध्रीं खिळले, तसे ह्या भाषांचे खिळले नाहीत. त्यांच्या परिणामास गाभ्यांत शिरण्यास वाव मिळेपर्यंतच त्यांच्या राजवटी परस्परांकडून उखडल्या गेल्या. शिवाय त्यांच्या संस्कृतींत व भाषेत असलेला एक प्रकारचा तुसडेपणा किंवा आडमुठेपणा हाहि कारण झाला. मराठीच्या शब्दसमूहांत कांही शब्दांच्या प्रतीकांतच त्यांनी आपला स्मृत्यवशेष ठेविला आहे.

पोर्चुगीजांचा मराठीस उपसर्ग पंधराव्या शतकापासून भोवूं लागला. त्याच्या धर्मप्रयत्नाच्या विवेचनास हें स्थल योग्य नव्हे. किनाऱ्यालगतची ओसरीच ते व्यापून राहिले नाहीत तर आपले पाय हळुहळू आंत पसरून घराचा ताबा घेण्यास ह्या पोर्चुगीज पाद्री भटांनी सुरुवात केली. अहमदनगरच्या निजामशहाच्या खानजाद्यास पोर्चुगीज भाषा सफाईने बोलतां येत होती असें म्हणतात. ह्या पाद्री भटांचे पाय त्यांचे शेजारी आणि भाईबंद डच, फ्रेंच, इंग्रज ह्यांनी उलटवून फेकण्याच्या पूर्वीच ते थोडे थोडे रुतून बसले होते व तेवढ्या कालांतच आरमारी शब्द, हत्यारांचीं नांवें, खलाशाची भाषा, पोषाखाचे शब्द, सैन्यांतील हुकूम, धर्मासंबंधी परिभाषा, कांही युरोपीय पदार्थांचीं नांवें, कांही पशुपक्ष्यांचीं नांवें, अशा पुष्कळ शब्दांचें लोण मराठींत आणून सोडिलें. उदा.—चेंपें, शिरपेंच, कुतनो, फालतु, कंपु, कपिना, काडतूस, घमेले, गर्नाल, पिस्तुल, परात, बतेला, काफर, साबण, कार्दी, मेस्त्री, फर्मा इत्यादि पोर्चुगीज शब्द

आहेत. शिवकालीन विशेषनामांचा उच्चार विलक्षण रीतीने करीत. उदा०—मराठा, सोइराबाय, राजे पंडितो, गंभिरराव इ. इ.

## शिवकालीन भाषेचे नमुने

### फादर स्टीफन्स–इ. स. १६१५

[१] परम शास्त्र जगीं प्रघटावेया। बहुतां जनां फळसिद्धि होवावेया। भासा बांधोनी मराठिया। कथा निरोपिली १२१ जैसा इरळामाजी पुस्प मोगरी। कीं परिमळामाजी कस्तुरी। तैसी भासामाजी चोखाळ। भासा मराठी १२२ जैसी पुस्पांमाजी पुस्प मोगरी कीं परिमळांमाजी कस्तुरी। तैसी भासांमाजी साजिरी मराठिया १२३ पक्षिआंमधे मैओरू। वृक्ष्यांमधें कल्पतरू। भासामधे मानु थोरू।। मराठिया १२४ तारांमधे बारा राशी। सतवारां माजी रविसशी। बोली मराठिया १२५ (अवस्वरु१)

[२] जे कामवट तेयां वेळीं। घडिती बुरिंजाची बांदावळी। ते भासा वेगवेगळी। बोलते जाहाले २८ अवचित तेयांची बोली। घरोघरीं वेगवेगळी जाहाली। ऐसी विपरित करणी वर्तली। तिये ठाईं २९ येके भासेचे जे हाती। ते हेरांच्या भासा नेणती। चुना मागितलेया गुंडे देती। आणोनियां ३० येक मागती गुंडे पासाण। येर देती चुना। यापरी तेयां कामवटां जना। आरंभले भांडण ३१ भासा जाहाली वेगवेगळी। राहिली बुरिंजाची बांदावळी। मग मनुक्षे हिंडुनी भूवस्तळीं। वेगवेगळ्या देसीं राहिले ३२ येके भासेचे होते पइले। ते येरां भासां चेयां सांडोनी गेले। वेगवेगळे। देसोंदेसीं ३३ (अवस्वरु ८)

### २ तुकाराम इ. स. १६३३ सुमारें–वीठळ १३५

बाळ बापा म्हणे काका : तरी तो काये नीपरादः ।। १ ।। ध्रु० ।। जैसा तैसा भाव गोड : पुरवी कोड वीठळ : ||छ|| सापरेसी म्हणता घोडा : तरी का तोंडा : न रुचे : ।। २ ।। तुका म्हणे अरुश बोळ : ।। नव्हे बोळ : आहा च : ।। ३ ।। छ ।।

### वीठळ २६६४

चंदन तो चंदनपणें : सहजगुणें : संपन : ।। १ ।। ध्रु० ।। वेधळीया

धन्ये जाती : भार्गे होती सन्मुप : ॥ छ ॥ परीसा आंगीं परीसपण : बाणोंनी ते राहीळें ॥ २ ॥ तुका म्हणे कैची षंती : सुजाती ते ठाईंची : ॥ ३ ॥ छ॥

## वीठळ १८६७

देव बराडी बराडी : देठासाटीं घाली उडी : ॥ १ ॥ देव भ्येड देव भ्येड : राषे बळीचे कवाड : ॥ २ ॥ देव भावीक भावीक : होये दासांचे सेवक : ॥ ३ ॥ देव हो या देव हो या : जैसा म्हणे तैसा तया : ॥ ४ ॥ देव ळाहान देव ळाहान : तुका म्हणे आणोरणं : ॥ ५ ॥ छ ॥

## वीठळ ३०५१

वाघे उपदेसीला कोळ्हा : सुखें खावें द्यावें मळा : ॥ १ ॥ ध्रु. ॥ अंतीं मरसी तें न चुके : मज ही मारीतोसी भुके : ॥ छ ॥ येरू मळा मळा : निवाड तुझ्या तोंडे जाळा : ॥ २ ॥ देहे तो जान्हार : घडेल हा उपकार : ॥ ३ ॥ येरु म्हणे मनीं : येसे जावें समजोनी ॥ ४ ॥ गांठी ठकां ठकां : त्यांचा धर्म बोळे तुका ॥५॥ छ ॥ (जगनाडी गाथा)

## ३ मुक्तेश्वर-इ. स. १६३५ सुमारें

पूर्व दिशेनें क्षालिलें मुखा । कुंकुम रेखिलें त्या तिलका । अरुणोदय बोलिजे ॥ भार्गवाचार्य उदया येत । तव अपार क्रमुनिया पंथ । पुढें जान्हवी जळाचा वात । शीतळ मंद पातला ॥ कुकुट रव करितां का का । भयें पळ सुटला उलुका । भोग द्यावया चक्रवाका । चक्रवाकी चालिल्या ॥ गगन समुद्री मुक्ताफळे । अरुण चंचुनें कनकमराळें । वेंचोनि घेतां कळा कुशळें । नाहींच केली नक्षत्रें । व्योम नर्मदेमाजी थोर । कार्तवीर्य सहस्रकर तारा बाणलिंगाचा भार । निवटोनि करी परौता ॥ कापडी चालिले तीर्थपंथे । सोहमस्मि चिंतिते ज्ञाते । भक्त स्मरती हरिहराते । प्रेमभावे आवडे । (म. सा. पृ. १५७)

## ४ रामदास-१६५९ इ. स.

गृहासी आग लागली । देखोनि कां बोंब केली । लोकांची मांदी मेळविली । आगी विझवाया कारणें ॥ तैसी परमार्थी बोंब मारावी । कांहीं काढाकाढी करावी ॥ हळू हळू सोडवावी । मिटी प्रपंचाची । प्रपंच धुडका

पेटला । मध्ये परमार्थ जळूनि गेला । ऐसे देखोनि तुम्हांला । कैसे बरें वाटतें । मुक्ताफळ आणि दिव्यांबर । नाना वस्तूंचें भांडार । भस्म करूनि वैश्वानर । विझोनि जाई जेंवीं । तैसा प्रपंच हा परमार्थासी । जाळोनि भोगूं नेदी आपणासी । आयुष्य गेलिया प्राणियासी विमुख होय । जरी हा प्रपंच शाश्वत जाणतों । तरी आम्ही यासीच धरितों । हा अशाश्वत म्हणोनि रडतो । तुम्हां भोंवतीं । (जुना दासबोध)

## ५ श्रीशिवाजीराजे–इ. स. १६७५

मशहुरल हजरती राजश्री जिवाजी विनायक सुभेदार व कारकून सुबे मामले प्रभावळी प्रति राजश्री शिवाजी राजे दंडवत दौलतखान व दरियासारंग यांसी यैवज व गल्ला राजश्री मोरोपंत पेशवे यांणीं वराता सुबे मजकुरावरी दिधल्या; त्यास तुम्ही कांही पावलें नाही म्हणोन कळों आलें. त्यावरून अजब वाटलें की, ऐसे नादान थोडे असतील. तुम्हास समजले असेल की, याला यैवज कोठे तरी यैवज खजाना रसद पाठविलिया मजरा होईल म्हणत असाल. तरी पद्मदुर्ग वसवून राजपुरीच्या उरावरी दुसरी राजपुरी केली आहे. त्याची मदत व्हावी, पाणी फाटी आदिकरून सामान पावावें, या कामास सामान बेगीने पावावें ते नाही. पद्मदुर्ग हबशी फौजा चौफेर जेर करीत असतील. आणि तुम्ही यैवज न पाठवून आरमार खोळंबून पाडाल. येवढी हरामखोरी तुम्ही कराल आणि रसद पाठवून मजरा करूं म्हणाल त्यावरी साहेब रिझतील कीं काय ? हे गोष्ट घडायची तऱ्ही होय. न कळे की हबसियानी कांही देऊन आपले चाकर तुम्हाला केले असतील. त्याकरता यैसी बुद्धि केली असेल. तरी यैशा चाकरास ठाकेठीक केले पाहिजेत. ब्राह्मण म्हणून कोण मुलाहिजा करू पाहतो ? या उपरी तऱ्ही त्याला यैवज व गल्ला राजश्री मोरोपंतीं देविला असे तो देवितील. तो खजाना रसद पावलियाहून अधिक जाणून तेणेप्रमाणें आदा करणें की ते तुमची फिर्याद न करीत व त्यांचे पोटास पावोन आरमार घेऊन पद्मदुर्गाचे मदतीस राहात ते करणे. याउपरी बोभाट आलियाउपरी तुमचा मुलाहिजा करणार नाही. गनिमाचे चाकर गनीम जालेस यैसे जाणून बरा नतीजा तुम्हास पावेल. ताकीद असे. रवाना. (रा. खं. ८ ले. ३१)

## ४ पेशवेकालीन मराठी भाषा

११३ ह्या कालखंडामध्ये आम्हीं साधारणपणें १७००–१८५० पर्यंतचा १५० वर्षांचा काल धरिला आहे. प्रत्यक्ष पेशव्यांच्या उदयास्ताच्या काळाबरोबर जरी हा कालखंड तंतोतंत बसला नाही तरी भाषेचा विचार करितांना ही १५० वर्षांची स्थूल मर्यादा कांही वावगी नाही. शिवशाहीचा व त्याबरोबरच स्वराज्यस्थापनेचा उत्साह व आनंद ओसरून मराठयांच्या हाडींमासीं शंभुछत्रपतीच्या अमानुष वधामुळे व शाहूच्या कैदेमुळे एक प्रकारची सूडाची भावना सळसळत होती, व त्याच भावनेने राजारामाच्या कारकीर्दींत व पुढे कांही दिवस राज्यशकट चालला; परंतु शाहूच्या सुटकेने सर्व परिस्थिति एकदम बदलून एकीच्या भावनेने संघटित झालेल्या मराठशाहींत दुहीचें बीं पेरलें गेलें. राजयंत्र चालविण्याची शिवकालीन कल्पना आणि शाहूकालीन कल्पना ह्यांमध्ये फार अंतर होतें. स्वार्जित स्वराज्याबद्दल जो एक जागता अभिमान होता तो शाहूकालीं राहिला नाही. दिल्लीपतीच्या मोहबतीने आपण मुक्त झालों व त्याच्याच मोहबतीने आपण तख्तनशीन झालों आहों, तेव्हा त्याच्या कृपाकटाक्षाप्रमाणे मराठयांचें राज्ययंत्र फिरलें पाहिजे अशी शाहूची कल्पना होती. शिवशाहीमध्ये लावलेलें स्वराज्याचें रोपडें पुढे शाहूशाहीमध्ये जरी पेशव्यांच्या करामतीने जोरांत फोफावलें व अश्वत्थवृक्षाप्रमाणे वर, खाली, चहूंबाजूंस सर्वव्यापी म्हणून त्याची परिणति झाली तरी शाहूच्या वर दिलेल्या कल्पनेच्या पिशाचाने शाहूलाच पछाडलें एवढेंच नव्हे तर सर्व हिंदुस्थानास गवसणी घालण्यास निघालेल्या कर्तृत्ववान् व्यक्तींसहि त्याने पछाडण्यास कमी केलें नाही. दक्षिणच्या सहा सुभ्यांच्या चौथाईसरदेशमुखीसंबंधीच्या सनदा बादशहापासून शंकराजी मल्हार व सय्यदबंधू ह्यांच्या मार्फत शाहूला आणवाव्या लागल्या; तेव्हा शाहूचें राज्य बादशाहतीच्या सावलींत वाढणारें राज्य अशीच त्यांची कल्पना झाली. ज्या ज्या वेळीं बाजीराव, चिमाजी आप्पा आपल्या बारगिरांसह उत्तरेकडे चढाईस जात त्या वेळीं बादशाहतीस न दुखवण्याबद्दल तो त्यांना सक्त ताकीद देत असे. मुख्य केंद्रवर्ती राजसत्तेची परकीयांबद्दल भावना ही अशा प्रकारची होती. हीच परकीयांबद्दल आत्मीयत्वाची भुरळ त्यांना भाषेसंबंधी पडली.

परिस्थितींतील हाच परानुवर्तित्वाचा ठसा शाहूकालीन किंवा पेशवेकालीन भाषेंत उमटल्यास नवल काय? मूळ समजूतच तशी होती म्हणून पेशवाई जरी ब्राह्मणशाही झाली तरी तिच्या अमदानींत मराठी भाषेच्या बाबत किंवा मराठा धर्माच्या बाबत जितकी जाज्वल्य ज्योत शिव व शंभु ह्या छत्रपतींच्या काळांत तेवली तशी शाहूकाळीं तेवली नाही हें खास. फारशी भाषेची मगरमिठी जी बहामनी कालांत बसली ती शिवकालांत तशीच राहिली किंवा थोडीशी ढिलावली; परंतु पेशवाईंत मात्र ती ज्यास्त जखडून आवळली गेली; व शिवशाहींत जे कांही भाषेसंबंधी थोडेसे प्रयत्न झाले ते निरर्थक झाले. बरें, पेशवेकालीन लेखक कोणी इतरजातीय होते असें नाही. सर्व लेखक चांगले ब्राह्मण, प्रभू किंवा सारस्वत ह्यांपैकीच कलमबहाद्दर होते. प्रतिनिधि, सुमंत, सचिव, मुतालिक, चिमणाजी दामोदर, नारो राम, आनंदराव रघुनाथ, कृष्णराव जोशी, शंकराजी केशव फडके, वासुदेव जोशी, पाटणकर दीक्षित, रेठरेकर, पुरंदरे घराणें, हिंगणेबंधु, अंताजी माणकेश्वर, नारो शंकर, पटवर्धन मंडळी, लिमये, जिवाजी गणेश, पेठे, सखाराम बापु, नाना फडणीस इ. इ. वगैरे सर्व चांगले प्रबुद्ध, सुसंस्कृत मंडळी होती. ह्यांपैकी कांही, उदाहरणार्थ, परशराम त्र्यंबक प्रतिनिधि व कृष्णराव खटावकर ह्यांसारखे काव्यहि करित असत. परंतु ह्यांना मराठी भाषेस फारशीच्या कचाटींतून सोडवितां आलें नाही. राजदरबार, घरव्यवहार, बाजारहाट, सैन्यमुकाबला वगैरे हरएक क्षेत्रांत फारशीमय मराठीच वापरली जात होती असें तत्कालीन पत्रव्यवहारावरून दिसतें.

मराठी व फारशी यांचा संबंध दृढावण्यास आणखीहि एक कारण झालें. शिवाजीच्या वेळीं फार मुलुखगिरी झाली नाही. संभाजीचा काळ दंगलींत व गोंधळांतच गेला. तोच गोंधळ राजारामाच्या कारकीर्दींत चालला; तरी लोकांनी थोड्याच वेळांत सावरून स्वराज्यवृक्षाची मशागत सुरू केली. परंतु मुलुखगिरीची परमावधि पेशवाईच्या प्रथमार्धांतच झाली. बाजीरावाच्या घोड्याच्या पायास तर भोवराच होता. दक्षिणेंतून उत्तरेंत, उत्तरेंतून कोकणांत, कोकणांतून निजामाकडे व निजामाकडून कर्णाटकांत अशी मर्दुमकी करून त्या सर्वांचा आढावा देण्यासाठी पुन्हा साताऱ्यास शाहूछत्रपतीच्या चरणांशीं, अशा सारख्या येरझाऱ्या त्याच्या चालल्या होत्या.

"फौज फिरे आणि कर्ज फिटे" हा त्या कालचा राजमान्य शिरस्ता पडल्यामुळे जो तो त्या शिरस्त्याचाच अवलंब करी. बरें, मुलुखगिरीमध्ये हर्षामर्षाचे प्रसंग यावयाचे ते महमदीयांशीं किंवा अन्यभाषीयांशीं. तेव्हा अशा ह्या धुमश्चक्रींत कोण कोणाचे किती शब्द घेतो, कोणाच्या भाषेचा परिणाम आपल्या भाषेवर झाला, यांजकडे लक्ष देण्यास कोणास फावत नव्हतें. परकीयांचें राजकीय जोकड मोडून फेकून देण्याकडे जेथे सर्व शक्ति वेचण्याची अहमहमिका चाले, तेथे परकी शब्दांचें उच्चाटण करण्याकडे लक्ष नसल्यास आश्चर्य नाही; म्हणूनच आपणांस बहामनी कालांत मराठीच्या भोवती जी एक फारशी भाषेची पोलादी चौकट घातली गेली त्याच चौकटींत पेशव्यांच्या ब्राह्मणशाहींतहि मराठी भाषा जखडलेली दिसते.

ही झाली मराठीच्या नांदत्या घरांतील गोष्ट. परंतु ह्यासारखीच परिस्थिति तिच्या माहेरघरीं–मराठवाड्यामध्ये–मराठी भाषेसंबंधी होती. पेशवाईच्याच काळांत ह्या मराठवाड्यांत निजामउल्मुलुक ह्याच्यासारखा धोरणी, हुशार व मिठास असा अधिकारी दक्षिणचा सुभा म्हणून कारभारावर होता. बहामनी बादशाही किंवा तिचीं झालेलीं उत्तरकालीन शकलें किंवा त्यांच्यानंतर आलेली निजामत ह्या सर्वांची एक गोष्ट नांवाजण्यासारखी होती, ती ही की, ह्या सर्व राजीयती महमदी धर्माच्या होत्या तरी त्यांचा धर्माचा कडवेपणा इतका विकोपास न गेल्यामुळे इतर दृष्टीने स्थानिक लोकांत त्या सामावून गेल्या होत्या. ह्या सत्तांबद्दल तेथील लोकांना परकीपणा वाटला नाही. उलट ह्या राजीयती म्हणजे स्वराज्यच व आपल्या मर्दुमकीस, हुशारीस पूर्ण वाव देणाऱ्या आहेत अशी त्यांची समजूत होती; व त्यामुळें अजाणताच त्यांच्या धर्मावर, भाषेवर महमदीयांच्या सान्निध्याचा परिणाम झाला. मराठीवरील फारशीचा परिणाम दृढावण्याचें हें आणखी एक कारण.

११४ पेशवाईच्या काळांत वामन पंडित, गजेंद्रमोक्षाचा कर्ता कचेश्वर, संप्रदायपरिमळकार निरंजनमाधव, रुक्मिणीहरणाचा कर्ता शामराज, कृष्ण दयार्णव, पाण्डवप्रतापाचा कर्ता श्रीधर, मध्वमुनि, व सर्व कवींचा चरित्रकार महिपतिबुवा इत्यादि कवींनी मराठी भाषेची उत्तम सेवा केली. ह्या त्यांच्या

सेवेनें मराठी भाषेला एक सुसंस्कृत असें वळण लावलें. ह्यांच्या भाषेला आपण पण्डिती भाषा म्हणूं. सामान्य भाषेहून किंवा राजदरबारच्या भाषेहून ही बरीच निराळी होती. ही भाषा सामान्य लोकांना न पेलल्यामुळे व त्यांच्या रोजच्या व्यवहारापासून ती फार दूर असल्यामुळे हिचें क्षेत्र पण्डितापुरतेंच मर्यादित राहिलें. तेव्हा सामान्य व्यावहारिक भाषेचा एक आणि ह्या पण्डितांच्या काव्यांतील ग्रांथिक भाषेचा दुसरा असे दोन नमुने पेशवाई-तील भाषेचे दिसतात; पैकी दुसऱ्या नमुन्यांत अर्वाचीकरण झालें असल्या-मुळे पेशवेकालीन भाषा अजमावण्यास तो नमुना फारसा उपयोगी पडणार नाही. त्याला त्या काळच्या व्यावहारिक पत्रव्यवहारावरून मिळणारा नमुनाच पाहिला पाहिजे. पेशवेकालीन भाषेमधील निरनिराळ्या बाबींचा उलगडा पुढे केला आहे.

## वर्णप्रक्रिया—स्वर (विकृत स्वर कंसांत दिला आहे.)

११५ आदि मध्य अन्त्य

अ—क्रपा (ऋ), सवशय(ं), ठराविला (अ), साडश्वर (आ), मृत्य, हेत (उ)
जैसे ( अ ) अपरमित, उदासन ( इ )
धृतानसार ( उ ).

आ—लाखोटे, शाह, माजोरी ( मुजोरी ).
माहाभारत ( अ )

इ—द्रिस्टि ( ऋ ), क्षिणक्षिण ( अ ), सप्तरिसी ( ऋ ).

उ—द्रुस्टि ( ऋ ), कर्तुत्व ( ऋ ), विरुध्य ( ओ )

ए—येथास्थित (अ), येश (य), संशये, येथाज्ञान, वेस्तावेस्त (अस्ताव्यस्त),
पारायेण ( अ ).

ऐ—बैसला, टैराव ( अ ).

ओ—दिसोन ( ऊ ), भरोसा, दढोतर ( दढतर ).

औ—भौंश ( ं ).

स्वरसंयोग—औघा ( अवघा ), आपल्याधीन.

स्वरवियोग—मुख अवलोकन, ईश्वरी इच्छा, आइकणें, सवशय, उदिया.

## ११६ वर्णप्रक्रिया—व्यंजनें

| | आदि | मध्य | अन्त्य |
|---|---|---|---|
| क | | पुरस्कर ( स ) | |
| ख | | पखवाजी ( क ) | नख्त (क) |
| ङ | | तङ्गचाई ( ण ) | |
| च | | राचकारण, पुण्याचवळ ( ज ), फडच्या ( श ) | |
| शुद्ध तालव्य—विच्यार, च्यार, प्रयोज्यन, भोज्यनास, राज्यास | | | |
| छ | | वसोछर्ग, वसोछार्ग, संवछर ( त्स ) | |
| ज | जाली, जाहाली (झ) | त्याजप्रमाणे ( च ) | औरंगाबाज ( द ) |
| ड | | लडाई ( ढ ) | |
| ण | | घण्याचे ( न ) | कुलीण (न) |
| द | | सकलाद ( Sack-cloth ) | |
| न | | वर्तनुक ( ण ) | सामदान (म), बातनी (म) |
| फ | | शफत ( प ) | |
| ब | | हुबरीतुबरी ( म ) | |
| म | | | डाळिंभे ( ब ) |
| म— | मंधु ( ब ), मांधून ( ब ), | परमाणगी ( व ) | |
| य | | युध्य | |
| र | | त्याजकरून ( ड ) | |
| ल | | बदलामी ( न ), गलबल ( ड ) | |
| व— | वलख ( ओ ) | वोक | |
| श— | शीमा, शेनापती, | सांडश्वर (स), बर्श, हर्षामार्ष, औशध. | |
| ष— | षोध ( श ) | | |
| स— | सिव्या (श), सत ( श ), | रसानगी ( व ) | गोस्ट ( ष ) |
| ह | | काहाडणें ( ढ ), ठहरतलि | |
| ळ = ल्ल | | सुरल्लीत, कल्लावे | |

वर्णागमः—काहाडणें, ठहरणें ( ह ), विज्यापुर, विच्यार ( य ).

वर्णलोपः—सकलाद ( सॅकक्लॉथ ), निर्गल ( निर्अर्गल ), सियासहस्त्रायु

( एका 'सह'चा लोप ), राजकी वर्तमान ( यलोप ), प्रकर्ण, प्रजन्य ( पर्जन्य ). 'य' हा नेहमी 'ये' म्हणून उच्चारिला जात असे.

तृण—त्रृण, तृण, त्रुण, त्रण
श्रुत—श्रुत्य, श्रुत, श्रुत } इतक्या प्रकाराने लिहीत असत.

वर्णसंभ्रमः—पेशवाईतील मराठी भाषेंत पुढील वर्णासंबंधी संभ्रम होत असे. उदाः—स् >< त्, ज् >< द्, न् >< ल्, च् >< त्, प् >< त्. उदाः—

अपसूक–अपसूत, अपसूप; निपचीत–निपचीप, उघडीप–उघडीक, पुरस्सर--पुरस्कर, जपणें--जतणें, पर्यायेकडून--पर्यायेकरून, मुखेकडून-मुखेकरून, अदमासे--अजमासे, निजसुरे--निदसुरे, नित्सुरे; यथास्थित--यथास्छित, गुजरणें--गुदरणें, नुकसान--लुकसान, तसबीर--तजबीर, तसवीस--तजवीस, नजर--नदर, खाजगी--खासगी, खानगी; मिनेदार--मिन्नेगार, वाजवी--वाजबी, मेजवानी--मेजमानी, पंचेताळीस-पंचेचाळीस, सदतीस--सडतीस, सततीस; तरबेद--तरबेज, जहांबाज--जहांबाद, अमदाबाद--अमदाबाज, किमखाप--किनखाप, ताबडतोब--ताबडतोड.

११७ वर दिलेल्या स्वरप्रक्रियेच्या उदाहरणांवरून ज्या गोष्टी प्रामुख्याने नजरेस येतात त्या ह्याः—

१ बहामनीकालीन व शिवकालीन मराठी भाषेंत उच्चाराच्या बाबतींत आर्यवंशाची मराठी आणि मोगल अथवा तुराणी वंशाची फारसी ह्या दोन भाषांमध्ये जो झगडा सुरू झाला तोच पुढे पेशवेकालांतहि चालला. एकीकडे मातृभाषेंतील जन्मापासून किंवा आनुवंशिक प्राप्त झालेले उच्चार आणि दुसरीकडे राजदरबारांत व इतर व्यवहारांत क्षणोक्षणीं कानावर आघात करणारे राजपुरुष आणि त्यांचें अनुकरण करणारे इतर पांढरपेशे उपजीवी नोकर यांचे उच्चार ह्या दोहोंमध्ये तो झगडा चाले. फारशीचा परिणाम कंठ्य, दन्त्य--तालव्य वर्ण, महाप्राणमिश्रित वर्ण इत्यादि वर्णांच्या बाबतींत जास्त दृग्गोचर होतो.

२ शब्द व्यंजनान्त न उच्चारितां स्वरान्त उच्चारण्याची जी लकब मराठी भाषेने प्राकृत व अपभ्रंश भाषांपासून उचलली तीच मराठीने फारशी भाषेवर लादली. उदा. गुजरान्, निशान् वगैरे फारशीमधील जे

व्यंजनान्त शब्द मराठींत आले ते सर्व स्वरान्त झाले.

३ ह्याच प्रवृत्तीने शब्दांत अंगभूत असलेलें आंतर व्यंजन सुद्धा स्वरान्त झालें. उदा. सर्कार>सरकार, अप्कारी>अपकारी, जर्तार>जरतार.

४ ह्याच्या उलट फारशी भाषेची एक लकब शब्दांमधील 'अ' निभृत म्हणजे अस्पष्ट किंवा अर्धा, तोकडा उच्चारण्याची मराठींत आली. उदा. गवत्, नवल् इ.

५ ए, ऐ, ओ, औ हे उच्चार जेव्हा शब्दाच्या आरंभीं येतात तेव्हा त्यांचा उच्चार ये, यै, वो, वौ असे केले जातात. ही लकब सर्व द्राविडी भाषांमध्ये आहे. तीच पेशवेकालीन मराठीने कानडीच्या संसर्गाने उचलली असावी. ऐसीजे > यैसीजे, ऐवजी > यैवजी, यथा > येथान्याय एक > येक, ओक > वोक, औषध > वाषध, वोषध.

मूर्धन्य, तालव्य व ऊष्मवर्ण ह्यांच्या उच्चाराच्या बाबतींतहि द्राविडी भाषांचा संसर्ग दिसून येतो.

| ११८ | नामविभक्ति | सर्वनामें |
|---|---|---|
| प्र. — | गोष्टी, स्वाम, अनीत, यादी (अनेकवचन) हेत, मृत्य, प्रकृत | कोण्ही, कोन्ही |
| द्वि. ( प्रत्यय- स, सी. ) | पुणियास, नबाबासी, डेरियासी, साहेबा, मरातिया | |
| तृ. ( प्रत्यय- एँ, हीं, शीं.) | जबानी ( सांगता ), नबाबाहीं, त्याणीं, याणीं, जातीनशीं--सी प्रकारें; घाटें, चोरटियांनी, श्रीमंतांहीं, राजश्रींहीं | कोणे, कोणे प्रकारे |
| पं. ( प्रत्यय- हून. ) | तलेगांवीहून ( आला आहे ) ( होऊन ह्या ल्यबन्तापासून 'हून' हा प्रत्यय आला आहे. ) | |
| ष.(प्रत्यय- चा,स,ला.) | मियाखानास निषेध ( चा ) | आपल्याले, कोण्हाचा, कुणाच्याने |
| स. (प्रत्यय- इँ, आँ) | रायपुरीं, (आम्ही) सातारां (गेलों), रात्रौ. हला, सला हे शब्द स्त्रीलिंगी वापरीत असत. तफावत ( पुंल्लिंगी ) | जे, हे, ते ( स्त्रीलिंग ) |

सामान्यरूप—उदाः-हत्तीची लडाइमधी, पुणियास, याचे सिंगी, हातची बंदखेचा गोळा, चांभारगोंदेयास, पेशवियांची, शहरबाहेर, इतकियावर, उपाध्येयास, बोललियाचा अर्थ, यादीवरी, कारखानेयांत, पुणेयांत, असेलिया, मुरारराव सोंडुरावर आहेची खबर आली.

विशेषणें—१ विशेष्याच्या पुढें विशेषण. उदा. खुळ मातबर, सरदार मातबर. २ विशेषणाचें सामान्यरूप. उदा. कितीका दिवसांत, दो चौ घटकास, कुली ठाणी वरचील, नासमज माणूस, फटकाल गोष्टी, बुडिवी पेटारा, आम्ही पुर्वी केवढी होतो.

## ११९ क्रियाविभक्ति.

| | प्र. पु. | द्वि. पु. | तृ. पु |
|---|---|---|---|
| वर्तमान | (आपणच) आहेत (आम्ही) ऐकतोंत, (आम्ही करारांत) येत नाहींत. | | बोलताती, म्हणताती, आहेती, असेति, म्हणताहेत. |
| भूत | मागो, जावो, करो (हीं रूपें आशीर्लिंगापासून आलीं कीं काय ?) | तुम्ही आलेस | बैसला; दिधल्या, बळावला, निर्मला, जाला, एकिले, बोलिले. |
| भविष्य | (आम्ही) करून, जाऊन | | (स्थापना)होय(ऐशी केली पाहिजे) (विकल्प) आसल, (उपयोगी) पडे (ऐसा), |
| आज्ञार्थ | (लाऊन द्याल तर न) लावणें. | (रोजमरा द्यावा) लागतो. | (तू) येणें. |
| विध्यर्थ | | | (बहुत काय) लिहिणें. |

तुमन्त म्हणों (लागले), सांगूं (पाठवितो), (शब्द) लागों [दिल्हा नाहीं].

ल्यबन्त कृपाळून, पुसोनि, जुपून.

कर्मणि कृपा कीजे, लिहिजे, दीजे.

णिच् देवावे.

अकरणरूप— ठेवले न पाहिजे.

कृदन्त लिहिलीं [पत्रें], ठेवरे [ठेवी], बोलाऊन [करून].
जेवण्यासी, मिळताऊ, पोहणाऊ, होये न होये करावें, घराऊ.

## अव्ययें

क्रियाविशेषण अव्यय– परिच्छिन्न, अविलंबेंच [करतो], उपरांतिक, निश्चयरूप, वरचेवरी, मागती, बहोत, मधल्यामधी, आतल्याआत, शहर-बाहेर, लवनिमिष्य, देखतदेखत, महिनाभरा, जवळी, उपरा, वरी, जात्येसमई, यैवजी, उदियाआजी, सदंतर, कालीच, कालकाला, यदारंभी, गेल्यादारभ्य, आल्यादारभ्य, क्षणक्षण, तऱ्ही, जऱ्ही.

उभयान्वयी– म्हणो, होयेस्तवर, म्हणवून, त्यास.

शब्दयोगी– [ विप्रामाणसा- ] वाचून, [ आज्ञापत्र ] समागमे-मलोजी [ पावलें ], तुम्हासांगाते.

**१२० नामविभक्तिप्रत्ययांवरून उघड दिसणाऱ्या बाबी.**

१ यादवकालीन प्रथमेचा प्रत्यय ‘ उ ’ हा शिवकालापर्यंत होता. पेशवाई मराठीमध्ये तो फारसा आढळून येत नाही.

२ सामान्यरूप चमत्कारीक तऱ्हेने होत असे. उदाः— हत्तोची लढाईमध्ये.

३ विभक्तीचे प्रत्यय कधीकधी वाक्यास लावीत असत. उदाः– आहेची खबर.

४ सामान्यरूप हें षष्ठी विभक्तीच्या प्रत्ययाच्या अवशेषापासून बनलें आहे असें मानतात. परंतु त्याहून भिन्न असें एक मत पेशवेकालीन भाषेच्या पुराव्यावर पुढे येणें शक्य आहे. सार्वनामिक प्रत्ययावरून तें बनलें असावें असें वाटतें. उदा०:– “ पुणें यास, कारखाने यांत, उपाध्ये यास, बोलणें याचा, इतकियावर ह्या रूपांवरून पुण्यास, कारखान्यांत, उपाध्यास, बोलण्याचा, इतक्यावर, हीं रूपें बनलीं.

५ विशेषण आणि विशेष्य ह्यांचा स्थानभेद. ७

## शब्दविशेष

**१२१** पेशवेकालीन मराठीमध्ये जे कांही मनावर ठसण्यासारखे व जोरदार असे शब्द आढळतात त्यांपैकी कांही खाली देतों.

अक्षतमरिष्ट, इदंन्याये, उभामार्ग [ जकात ], उपरोधिक [ कमी-

अधिक ], अपरोक्ष, इतला, उचापत, उपरशब्दी, आंतरभाव, बाहेरभाव, उपरान्त, आमदरफ्त.

कुश्पिष्ट, कटकट, कमकसर, गर्गशा, [ फौजेचा ] गाद्दा, घावडाव, कुचोद्य, करार, [ नक्की ]; खामखा खानखा, खायेमखा; किलावा, कौल, कमरबंदी, छिटपाट, जंगजोड, झांबडाझांबड.

चौकी बसवणें, छबिना, जथणे.

टुमा, टक्कापैका, ठेचगा, ढालढकल, डौल, नक्षा.

ताबीन, त्वष्ट, तष्ट; दबाव, द्वामुषाण, घातुपोपण, निरवणूक, त्यादारभ्य, दुरंदेशी, दिलभरी, दुरोखी, निर्गमला, तिवट, दुखणारु, दरद, निशा.

पोटाग, पोटतिडीक, पायगोवा, पायउतारा, फलादेश, भाईचारा, प्रतिपक्ष, पान्हव, पुरजे, फितवाफांदडा, भुकेबंग, मनोधारणा, पुस्तपन्हा, परिछिन्न, बेइबुदी, मलई, पासोडी, पैवस्ती, बालाग्र, बदनक्ष, मवासी, पुरसीस, बिराडराखे, बजिन्नस, मनश्चील, रूपरान्त, लागभाग, वाराधाणी [ होणें ], रुबरू, उरुबरू; लुगारे, वसवसा.

रासकर्दन, रफाकत.

शकटभेद, [ प्रकृतीस ] सावकाश, स्थलमोड, सविस्तरपूर्वक, शशोपंज, सकलाद, स्थलभरीत, सामानपूर.

हर्षामर्ष, हुबरीतुबरी, हालखुद, हिल्लाहरक, हिसका, हरोली.

अर्थभेदः — वजीर, कारकून, हवालदार, जमादार, फटकाल, वाडा, देवडी, राणीवसा, खबरदार. ह्या शब्दांच्या अर्थात फरक झाला आहे.

## प्रयोगविशेष व म्हणी

१२२ राजकारणें करणें. खुळ उभे करणें,–माजणें. गरिबाचा दुवा घेत असावें. हिसका पडला, गुता उरकला. तुमचें गोत्रघटित होलकरासी, नारोपंतासी नसतें तर हे लिहिणें उचित. ध्यानांत भरत नाही. आमचें लोकांचें कैसें विकतें. धुळीचे दिवे खात जाल. चढ देणें, भर देणें. होषा खादला. सिधांतसे ऐकतों. आलस असिला न पाहिजे. क्रिया देणें. क्रिया करणें. क्रोधे येऊन [ नरम येऊन ] बोलले. बिडाहून पत्र आलें की अमल

बंद केला म्हणून. जें मुलें आहेत तें राज्याकडे पाठऊन दिल्हीं. कारभारा-विशीं कान पाडिले आहेत. कारभारास वाकीफ नाही जे तुम्हासी जाबसाल करावा. कारकून म्हणतो जे [ संस्कृतच्या 'यद्'च्या धर्तीवर वाक्यरचना ]. निरोपाचीं वस्त्रें जाहालीं. यांचें गंतव्य होत नाही. डावाडोलसें असमाधान आहेत. या झाडास येरंड्याचीं फळें आलीं. सर्वा गोष्टीस भयाची प्रीत आहे. लहान माणसाचे पंक्तीस वसावें लागतें हाच मृत्य आहे. रवानगी यैवजाची करावी [ दूरान्वय ]. त्यास यैवज द्यावयासी नाही. यैसे तीन पत्रें आलीं ते आम्हास बजिनस दाखविलीं. सेवकाचें पत्र राज्यानी पहावयास मागत असतात. घोडा स्वाधीन नसल्यास बसणारा काय करील. हत्तीचें तोंडीं लाकूड देऊन कार्य बिघडलें. होणेरास उपाय नाही. जीवाचा सतका माल व इजतीचा सतका जीव. कोणाचे डोळयांत मर्यादा राहिली नाही. माणुस माणसास खावयाचा काल आला आहे. आपआपल्यांतच पाय तुडविताहेत. जितके फितुरांत होते त्यांचें शीड उभारलें. आपण ज्या पाण्यांत बुडा म्हणिजेल त्या पाण्यांत बुडावयास सिध आहों. पैजार खाऊन दंतभग जाला. शुस्क वृक्षास पलव फुटून पुस्पित फळित होतो तद्वत्. ईश्वराक्ष यैवज देणें तो [ अन्तस्थ ह्या अर्थी ]. ऊष्णकालीं माशादि फार होतील. उगाच बसावें हे मर्जी. अवसान ओळखणें. सहजाची आरती, सहजाचा गजर. सुनें रान सांपडल्यावर स्वापदाची प्रबलता होते. श्रीमंताचा आमचा स्नेह चिखलपाण्यासारखा आहे. चिखल पाण्यास सोडत नाही व पाणी चिखलास सोडीत नाही. त्या चिखलमातीने आपण इमारत बांधूं. चार आभाळें उठलीं असतील तीं उठतील. श्रमी चाकर, दुष्मन बराबर. दिवे लावणीचा कौल देऊन रयत आणिली पाहिजे. चिखलाचे बाहुलीस जसा चिखल पाहिजे तितका लावावा व पाहिजे तितका काढावा तसा प्रकार हा नव्हे. कळीचा वास जेथे तेथे श्रीचा अभाव. मनुष्य मनुष्या खाऊ म्हणतो. उदक स्वच्छ गोडहि त्यासारखे तेंच. तो सल्यास येऊन थोडा-बहुत खंडदंड करून येऊन भेटला. प्रकृतीस सावकाश नाही. जमावाचा डौल दाखवावा. कल्पवृक्षाखाली झोलीस गांठी द्याव्या हें अपूर्व. सखाराम-पंत केवळ कोशकीटकाप्रमाणें कैद झाले. चौघांनी चारी तनवा धरल्यावर शिबीर उभें रहातें. अंगावर आल्या गोणी, बळी चढे दुणी. लढाईचा

दंगा पुरवतो, उपासाचा दंगा पुरवत नाही. गेल्याचें घर, मेल्याची बायको. उदकापासून वृक्ष झाला त्याला उदक तारतें, बुडवीत नाही. विना माणसावाचून भिंती भांडत नाहीत. टीच भरली; चमक भरली. जियाल्याची खूण मेल्यावाचून जात नाही. सश्याचे पारधीस वाघाचे साहित्य करावें लागतें. जैसे मरतिया अमृतपान द्यावें, यैसें जालें. ना अस्मान ना जमीन असा प्रकार जाला. सूज्ञेष्वलमतिपल्लवितेन. आम्ही कच्चा धाग्याचे बांधलेले आहोंत. विहिरींत उतरून शिडी काढून घेतली; बर, ईश्वरसत्ता. ब्राह्मणाची व्यवस्था होय यैशी केली पाहिजे. हत्तीची लढाईमधे मरण झाडाचें. स्वामीचे चरण सेवकाचे मस्तकीं आहेत. अंगुष्ट्याचा दशाशीर करून दाखवितात. तथापि आपण कूर्मदृष्टीचे देखण्यांत कमी न करावी. त्यांची बुधि अल्पायु आहे; चिरंजीव व्यवहार कांही दिसत नाही. आमच्या बाहीमध्ये आग ठेविली आहे. दुर्ग जर दुर्गामध्ये राहिला तर कसें. मिठाचे उणेपणाने लवणशाकाचे वाईट होईल. विसंचा संच करणें. कोणाचें मडकें कोणाच्या मडक्यांत नाही. असत्या पदार्थी बापू थोर. मुखश्री दिसत नाही. असा हिसका पडेल हें कानींमनीं नव्हतें. ऊब जिंकणें. फौज फिरे कर्ज मरे. सुटले केश पाठीस शरण टक्का पैका. बिगाड करील तर खिचत खातील. मर्यादा परागंदा होते. कोळसा उदकें उगाळितां सारें उदकच काळे, तेव्हां उदक व रंग निवडून जातां कसें घडेल? अकलेच्या भरें क्षीर नीर वेगळे करणार येसा क्वचित. एके बाईकोस दोन भ्रतार ते स्नेहें चालतात हें कसें घडेल?

## १२३ पेशवेकालीन मराठी भाषेचे नमुने

### १ श्रीधर— इ. स. १७१२

अभिमन्यूचे शब्द कोमळ। अर्जुनें ओळखिलें तत्काळ। रथारूढ पार्थ घननीळ। आले जवळ धांवोनी॥ सौभद्रें नेत्र उघडिले। पार्थें अंग धरणीस टाकिलें। अभिमन्यूस पोटां धरिलें। पार्थें मांडिलें शोकातें॥ 'अरे माझिया सुकुमारा। बाळा अभिमन्या सुंदरा। मजवांचून राजकुमरा। कां आलासि रणभूमी'॥ अभिमन्यु स्मरत नामावळी। जवळी आले कृष्ण वनमाली। उकसा-बुकसी ते वेळीं। पार्थवीर स्फुंदत॥ पार्थाचिया कानीं। हळूच अभिमन्यू बोले वाणी। मी पडिलों घोर रणीं। याचा खेद मज

वाटेना ॥ मी निश्चेष्टित पडिलों येथें । मज लत्ताप्रहार केला जयद्रथें । तेणे सर्वांग तिडकतें । हें मज दुःख अतिभारी ॥ ऐसें ऐकून वचन । संबोखून बोले अर्जुन । तुझें उसनें मी घेईन । कांही खेद न करावा ॥ (पां. प्र. २९अ.)

## २ कृष्णदयार्णव — इ. स. १७४० सुमारें.

मंगलोत्साह घरोंघरीं । शोभा आनंद नगरोंनगरीं । दुःखशोक दोषदरिद्री । सुखसागरीं बुडाले । हृदयशल्यें विरोनी गेलीं । ब्रह्मानंदें मनें निवालीं । सुहृद्भावें प्रेमाथिलीं । भूतें भूतळीं परस्परें । नगरोंनगरीं घरोघरीं । प्रतिशरीरीं सर्वांतरीं । ब्रह्मानंदाचिये गजरीं । गोष्टी दुसरी हारपिली । श्रीकृष्णाचा जन्मकाळ । तेणें आनंदभरित जळ । सर्वभूतात्मा गोपाळ । सुखसुकाळ सर्वांसी ॥

## ३ नानासाहेब पेशवे— इ. स. १७४६

॥ श्री ॥

पु॥ राजश्री रामचंद्र बाबा स्वामी गोसावी यांसी—विनंती उपरी. तुमचा व राजश्री मल्हारजी होळकर यांचा परस्पर पेंच वाढला आहे, म्हणोन वर्तमान बहुतांमुखें ऐकिलें जातें; ऐशास आपले घरांत, सरदारांत काडीमात्र द्वैतभाव नसावा हा उत्तम पक्ष आहे. तथापि घर आहे तेथे बोलीचाली आहेच; परंतु परस्पर कु-रसता कोणी बाळगीत नव्हते. सर्वहि एकचित्तें करून ज्यांत धन्याचें हित व नक्ष तोच मनसुबा करीत गेले. श्रीकृपें व वडिलांचे पुण्येंकरून जें ज्यांणीं चित्तांत आणिलें, तें सिद्धीतें पावत गेलें. यशावह कर्मे तुम्हींच संपादिलीं. नक्ष, लौकिक लोकोत्तर म्हणावा तैसा जहाला व पुढेहि तुम्ही कोणी स्वामिसेवेस चुकतां असा अर्थ नाही. सर्व प्रकारें या दौलतीचे तुम्ही स्तंभच आहां. उचित मनसुबा असेल तो करितां व करालच, संदेह नाही. परंतु घरांत घरभेद सर्वस्वी नसावा. यामार्गे हरएक गोष्ट तुमच्या चित्तांत आली, आणि मल्हारबाचे न आली; तथापि तुमचें सांगितलें त्यांणी केलें, अथवा त्यांणी मनसुबा चित्तांत आणिला तुमच्या मनास न आला. तत्रापि त्यांचा मनोभाव तुम्हीं सिद्धीस नेला. म्हणोनच उत्तमा प्रकारें सोभा जहाली. एकतत्वी फौज, एकदील, कोणाचाहि बुद्धिभेद चालला नाही. प्रस्तुत तुमची परस्पर कुरसता. याजकरितां या

राज्यांत काय, मोगलाईत काय, उमद्या उमद्यांचे घरीं मनमाने तैशा चर्चा करितात. आमचें कोणांस सुख आहे ऐसें नाहीं. परंतु वडिलांचे तपोबलें आमची फौज भारी, सरदार एकदील, मर्द, कर्ते. अस्मानहि कडाडलें, तथापि आपल्या मर्दानगीस, हिमतीस अंतर करणार नाही, व केलें नाही. ज्यांच्या मर्दुमी व दिलेरीची तारीफ सर्वहि करितात; ऐसें असतां कोणाचे वस्तु दम मारवला नाही, व फोडाफोडहि कोणी करूं सकलें नाही.......

## ४ मोरोपंत— इ. स. १७८०

पाय धरुनि पार्थ म्हणे, ब्रह्मांडीं अघन माय बा ! पाहे । तूंचि हरी पंक हरिल अमृताचा न घन माय बापा हें. ।। नमुनि क्षमस्व म्हणतां, प्रकट करुनि रूप वाहुनी कवळी । अधराप्रति स्मिताने, स्वयशाने, त्रिभुवनासहि ढवळी. ।। जो दीनबंधु उजरी देऊनियां अभय पाशुपत नातें, । बोल असे हरी जो स्वपद स्मरतांचि आशु पतनातें ।। सर्वत्र रणीं विजयी तूं नारायण सखा नरा हो रे । स्वप्नींहि अयश तुझिया अवलंबुनि पदनखा न राहो रे. ।। ( महाभारत कि. यु. )

## ५ भाऊसाहेबांची बखर

भाऊसाहेब यांचे तोंडास खरस आली. हाणा मारा म्हणावयाचे राहिले. तोंडापुढे कोणी ओळख्या आला तरी तोंडाने मात्र हुंकार देऊन मानेचे संज्ञेने दाखऊं लागले. अंगावरी ब्रह्मांड येऊन कोसळलें. परंतु हिंमत धरली नाही. भाऊसाहेब याजप्रमाणें पराक्रमी दुसरा होणें हें असाध्य गोष्ट. पूर्वी युद्धांत अतिरथी महारथी झुंजले, त्याप्रमाणे भाऊसाहेबीं विरथीपणें शर्थ केली. पुढे कांही इलाज चालेनासा झाला. दुराणी येऊन वर्षले आंत रवदळारवदळ क्षणभर बहूतच केली. त्यांत भाऊसाहेब व जनकोजी शिंदे यांची गत कैशी जाली हे न कळे. उभयतां खासे कोणीं दृष्टीने पाहिले नाही. गयफ झाले किंवा अस्मानांत गेले की पृथ्वींत गेले हें ईश्वरी कौतुक ब्रह्मादिकांस न कळे, तेथे मानवियांस काय कळेल. ( पृ. १५३ )

## ५ आंग्लकालीन मराठी-इ. स. १८५०

१२४ पेशवाईच्या कालानंतर आंग्लाईचा काल येतो. ह्या कालाचा आरंभ ऐतिहासिक दृष्ट्या जरी पुष्कळ अगोदर असला तरी तो आपण आपल्या भाषिक कालखंडाच्या दृष्टीनें १८५० च्या सुमारास धरिला आहे. इंग्रजांची अमदानी जी सुरू झाली ती कोकणांत व तिच्या सुराज्याचें व स्वास्थ्याचें सुख प्रथम लाभलें तें तेथीलच लोकांना. त्यांच्या शिक्षणाचें, सुधारणेचें, संस्कृतीचें बीं तेथे रुजून तेथील लोक इतरांपेक्षा त्यांच्याशीं लवकर समरस होऊं शकले. नवीन पादाक्रांत केलेल्या प्रदेशांत इंग्रजांनी ज्या कांही सुधारणा सुरू केल्या त्या अर्थात् ह्या लोकांच्याच सल्यानेच केल्या असल्या पाहिजेत. ह्या लोकांत मुंबईच्या व कोंकणच्या लोकांचा भरणा विशेष होता. त्यामुळे इंग्रजांच्या अव्वल अमदानींत त्यांनी जें भाषाशिक्षण सुरू केलें त्यावर त्यांच्या भाषेचा परिणाम साहजिकच झाला. पेशवाई उलटल्यानंतर लगेच भाषेत फरक झाल्याचें नजरेस येतें. यादवकालापासून ते पेशवाईपर्यंत मराठीवर परकी भाषेचे हल्ले झाले तरी तिच्यांत एक तऱ्हेचा अस्सल 'मराठी' पणा होता. तिला तिच्या देशीकार लेण्यानें मोठी शोभा आली होती. आंग्लाईमध्यें ही तिची साधी शोभा नष्ट झाली.

सध्या प्रचलित असलेल्या शिष्ट मराठीचें स्वरूप इंग्रजी अमदानींत ठरलें. पेशवाईकालांतील मराठी भाषेंत फारशी व अरबी शब्दांचा जो बेसुमार भरणा होत होता तो कमी झाला व त्याऐवजी संस्कृत शब्द वापरण्यांत येऊं लागले. संस्कृतच्या आश्रयाने आंग्लकालीन मराठीला जें भारदस्त व पोक्त असें स्वरूप प्राप्त झालें तें नवीन इंग्रजी राज्यकर्ते फारशी शब्दाचे द्वेष्टे होते किंवा संस्कृताचे विशेष अभिमानी होते ह्या कारणानें नव्हे. इंग्रेजी अमलाच्या अव्वल अमदानींत विद्याखातें जें स्थापिलें गेलें व त्याच्यामार्फत जीं पुस्तकें लिहिलीं गेलीं तीं सर्व पुस्तकें शास्त्रीलोकांकडून लिहिलीं गेलीं व त्यामुळें त्यांच्या संस्कृतप्रचुर भाषेचा मराठीवर परिणाम झाला. जांभेकर, तळेकर, चिपळोणकर वगैरे कर्ती मंडळी शास्त्री होती आणि त्यांनी लिहिलेल्या अनेक प्राथमिक पुस्तकांत उर्दु शब्दांस थारा मिळाला नाहीं. मराठी जुन्या पद्यांत उर्दु शब्द कमीच होते व त्याच भाषापद्धतीचा त्यांनी स्वीकार केला, यामुळे इंग्रेजी सत्तेचें धोरण निवळ-

लेली मराठी लिहिण्याकडे गेलें. आंग्लाईतील मराठी भाषेच्या स्वरूपांत देखील दोन प्रकार दृष्टोत्पत्तीस येतात. मराठीचें चिपळोणकरांच्या पूर्वीचें एक स्वरूप व नंतरचें दुसरें स्वरूप. पहिल्या स्वरूपांत दुसऱ्यापेक्षा जुन्या नव्याची सरमेसळ झाल्याचें दिसून येतें. ह्या दोन्ही प्रकारांत भेद मात्र अत्यंत सूक्ष्म आहेत. ह्या दोन्ही प्रकारांनाच कांही विद्वान कोंकणी वळण व देशी वळण असें म्हणतात. सध्या प्रचलित असलेल्या मराठी भाषेच्या स्वरूपाहून ह्या अव्वल इंग्रजींतील मराठीचें स्वरूप विशेष भिन्न नसल्यामुळे त्या संबंधाचा विचार येथे केला नाही. आधुनिक शिष्ट मराठी भाषेचें उच्चारण व व्याकरण ह्यांसंबंधी जें विवेचन पुढे विस्ताराने स्वतंत्र प्रकरणांत केलें आहे तेंच अव्वल इंग्रजींतील मराठीला तंतोतंत लागू होईल. तसेंच वर्तमानकालीन मराठीचें स्वरूप सर्वांच्या रोजच्या परिचयाचें असल्यामुळे त्याचें उतारेहि घेतले नाहीत.

१२५ अव्वल इंग्रजींतील मराठी भाषेच्या कांही थोडयाशा ठळक अशा खुणा आहेत. अव्वल इंग्रजींत कांही वर्णांचे उच्चार, विभक्तींचे कांही प्रत्यय, नामाचें विशिष्ट सामान्यरूप, कांही विशिष्ट शब्दप्रयोग व वाक्यप्रयोग ह्यांबाबत कांही गोष्टी वर्तमानकालीन मराठीहून भिन्न वाटतात. जेथे आपण सध्या 'अशी, अशा' म्हणूं तेथे त्या काळीं 'असी, अस्या' असें म्हणत. द्वितीयेच्या अनेकवचनाचा 'न्ला' व 'ते' तृतीयेचे 'नें' व 'हीं' हे प्रत्यय जास्त वापरांत होते. 'माझे लाडक्या, माझे मनास, कोणाचे आज्ञेन, त्याचे मागे', अशीं 'ए' कारान्त सामान्यरूपें पुष्कळ आढळतात, 'म्हणत्ये, वाटत्ये, बोलत्ये, होत्ये, येत्ये,' इत्यादि वर्तमानकाळाच्या स्त्रीलिंगाचीं रूपें पर्वापर्वापर्यंत क्वचित् वापरांत होतीं. 'जंवपर्यंत, तंवपर्यंत, मातक्यान् तन्ही, नामेंकरून, भापणेंकरून, मधलेकडे, इत्यादि अव्ययें उपयोगांत होतीं. करितोस, वाढितो, ऐकिलेस, वारिले, सोडितां, झोकिली, इत्यादि क्रियापदांच्या रूपांत 'इ' कार वापरण्याची संवय तत्कालीन लोकांत होती. 'निघास, चिरगुट, भुई, पुसायास, आडोशी, नौका, संवरणे, आदरणे, मस्तक, अवघाक, कुळवाडी, सुधारणूक, भरभर, अर्जी, सही' वगैरे शब्द अव्वल इंग्रजींत बऱ्याच वेळां वापरलेल आढळतात. 'फिर्याद होणें, बंदीस घालणें, अर्थ पहाणें, लोकवृत्त समजणें, बळवंत पदार्थ, प्रसिद्धींत आहे, तर्क

वाटणें, लोखंड मोडावयास फार मेहनत घेतें, वळवावयाचें अगत्य नाहीं, सही घातली, असे सध्या वापरांत असलेल्या प्रयोगांपेक्षा किंचित् चमत्कारिक प्रयोग अव्वल इंग्रजींत वापरीत होते असें तत्कालीन वाङ्मयावरून दिसतें.

१२६ आङ्ग्लकालीन म्हणून जो मराठी भाषेचा कालखंड आपण मानिला त्याची पूर्वमर्यादाच फक्त आपणांस ठरवितां आली. तोच कालखंड सध्या चालू असल्यामुळे आपणास त्याची उत्तरमर्यादा ठरवितां येणें अशक्य आहे. कालखंडांत वर्तमानकालीन मराठीचा अंतर्भाव साहजिकच होतो. आंग्लकालीन मराठी भाषेंत जे नामांकित ग्रंथकार होऊन गेले त्यांच्या दृष्टीने दोन तीन खंड पडतात. एक इ. स. १८१० पासून ते इ. स. १८३६ पर्यंत. ह्याच काळांत विद्यानाथ ह्या देशी पंडिताच्या साहाय्याने इंग्रजी पंडितांनी कोश छापला. तेव्हाच सदाशिव काशीनाथ ऊर्फ बापू छत्रे ह्यांनी जर्व्हिसच्या मदतीने कथा, गोष्टी, कोश, व्याकरणें इत्यादि नवीन पुस्तकें मराठींत लिहिलीं. कंपनी सरकारने ह्याच काळांत विद्वान लोकांच्या सल्ल्याने साध्या ग्रंथास ४०० पर्यंत व प्रौढ ग्रंथास ५००० पर्यंत बक्षिसें देऊं करून मराठींत वाङ्मयनिष्पत्तीस फार मदत केली. हरि केशवजी, दादोबा पांडुरंग वगैरे ह्या मंडळींत होते. ह्याच्यापुढे म्हणजे आपण १८५७ पर्यंत येतों. ह्या काळांत हरि शंकर, बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर, मोरोबा कान्होबा, जनार्दन आप्पाजी गाडगीळ हे होऊन गेले. भाऊ महाजनाचा 'प्रभाकर' ह्याच काळांत निघाला. तिसरा भाग १८७४ पर्यंत येतो. ह्याच काळांत परशरामपंत तात्यांचीं व कृष्णशास्त्री राजवाडे ह्यांचीं संस्कृत नाटकांचीं भाषांतरें झालीं. तशींच विनायकराव कीर्तने ह्यांचीं थोरले माधवराव पेशवे व जयपाळ हीं स्वतंत्र नाटकेंहि निघालीं. यशोदा-पांडुरंगी, केकादर्श ह्याच काळांत लिहिलीं गेलीं. सध्या जसा मराठीविरुद्ध संस्कृत हा वाद दिसून येतो तद्वत् त्या काळीं मराठी विरुद्ध इंग्लिश हा वाद चालू होता. ह्या काळांत भाषासुधारणेचे किंवा वाङ्मयवृद्धीचे लहानसहान प्रयत्न झाले त्याची दिशा वरीलप्रमाणे होती. क्रांतिकारक, विचारप्रवर्तक असा एकादाहि ग्रंथ किंवा ग्रंथकार किंवा कविहि त्या काळांत झाला नाही.

परकी संस्कृतीचा परिणाम प्रथमप्रथमच्या दिवसांत जो झाला

त्याला धक्का दिला विष्णुशास्त्री चिपळोणकरांनी. सर्व इंग्रजी अमदानींत ह्या एकट्याच लेखकाने विचारास चालना दिली व आलेल्या झापडींतून सर्वांना हादरून सोडिलें. मराठी भाषेवर संस्कृतचा जो एक ठसा उठला तो ह्याच लेखकाच्या लेखनाने विशेष उठला. इतर सर्व लहानमोठे ग्रंथकार ह्याच परंपरेंत वाढले होते. पूर्वीची पेशवाईतील फारशीमिश्र जी मराठी भाषा होती ती १८५८ पर्यंत कोठे कोठे धुगधुगी धरून होती. शाहीरांच्या पोवाड्यांत अथवा कलगीतुऱ्याच्या लावण्यांत ती कधी कधी डोकें वर काढीत असे. परंतु इंग्रजी अमदानींत जो संस्कृतचा पगडा तिच्यावर बसला तो अद्याप कायम आहे. लोकहितवादी, चिपळोणकर, आगरकर, टिळक हे त्याच कालांतील उत्तरकालीन लेखक म्हणावयास हरकत नाही. ह्यांच्याच लेखनामुळे मराठीला सध्याचें स्वरूप प्राप्त झालें आहे. शिष्ट अभिजात मराठी तयार करण्याचें श्रेय ह्यांनाच आहे.

वर्तमानकालीन मराठीचें उच्चारण व व्याकरण हीं पुढे स्वतंत्र प्रकरणांत दिलीं आहेत.

---

प्रकरण ६ वें

# मराठीचे प्रांतिक भेद

१२७ भाषेमधील वर्ण, प्रत्यय, प्रयोग व शब्दार्थ इत्यादि बाबींमध्ये जी प्रक्रिया किंवा उलटापालट होते तिजमुळे भाषेमध्ये कसकसे भेद पडतात हें पहिल्या प्रकरणांत सांगितलें आहे. बोलणाऱ्या लोकांच्या काल, प्रांत, जाति, संस्कृति इत्यादि भेदांमुळेहि भाषेमध्ये निरनिराळे प्रकार पडतात. मराठी भाषेमध्ये असे भेद आहेत. ह्यांपैकी मराठीच्या गेल्या जवळ जवळ दीड हजार वर्षांच्या हयातींत जे कांही कालाच्या दृष्टीने मुख्य भेद पडले ते मागील प्रकरणांत विवेचिले. ह्या प्रकरणांत मराठीचे प्रांतिक भेदांचें स्वरूप काय आहे तें पाहूं.

मराठी ज्या प्रदेशांत बोलली जाते त्या प्रदेशाचा क्षेत्रविस्तार १०००० चौरस मैल आहे. एवढ्या मोठ्या क्षेत्रांत एकच स्वरूपाची भाषा असणें हें अशक्य आहे. भाषाशास्त्राच्या खोल दृष्टीने पाहिलें तर जितक्या बोलणाऱ्या व्यक्ति तितक्या भाषा असें ठरतें. इतकी नितांत शास्त्रीय दृष्टि जरी लाविली नाही तरी वरवर पाहणारासहि दर बारा बारा कोसांवर कांही भाषाभेद—मग ते सूक्ष्म का असेनात—आढळून येतात. ह्या दृष्टीनेच दर बारा कोसांवर भाषा बदलते अशी एक म्हण लोकांत रूढ झाली आहे. शब्दवैचित्र्यावरून, स्वरभेदावरून, जातिपरत्वेंहि निरनिराळे भाषाभेद आपल्या ऐकण्यांत आहेत. मराठीच्या विस्तीर्ण क्षेत्रांत निसर्गनिर्मित असे विभाग पडले आहेत. सह्याद्रीमुळे कोंकण हें महाराष्ट्रापासून अलग झाल्यानेच तेथे मध्यवर्ती मराठीपेक्षा निराळाच असा भाषाभेद रूढ झालेला आहे. तीच स्थिति वऱ्हाड प्रांताची. तेथेहि मध्यवर्ती मराठीपेक्षा आणखी एक निराळा भाषाभेद चालू आहे. मराठीचे कोंकणी व वऱ्हाडी हे दोन मुख्य प्रांतिक भेद आहेत. शिष्ट मध्यवर्ती म्हणून पुणें वगैरे प्रांतांत चालू असलेली मराठी मुख्य भाषा असून कोंकणी व वऱ्हाडी ह्या तिच्या उपभाषा होत. ह्या तिहींमध्ये आणखी

पुष्कळ भेद आहेत. एकट्या कोंकणांतच मराठी भाषेचे चार पांच प्रकार आढळतात. दमणपासून मुंबईपर्यंत एक प्रकार. यांत कांही गुजराती शब्दांची भेसळ आहे. मुंबईच्या दक्षिणेस अष्टागर प्रांतांतील भाषेचा प्रकार निराळा[1]. पुढे रत्नागिरी प्रांताची शुद्ध कोंकणी भाषा ह्यापेक्षा निराळी. ह्या-पुढे गोमंतकी भाषा. ही भाषा तर मध्यवर्ती मराठी भाषेपासून इतकी निराळी आहे की हिला स्वतंत्रच भाषा कांही विद्वान लोक समजतात. देशावरील भाषेंतहि असेच भेद आहेत. ज्या ज्या देशांच्या सीमांवर महाराष्ट्र देशाची सीमा मिळाली आहे त्या त्या प्रांतीं त्या त्या भाषेचे शब्द किंवा प्रयोग मराठींत मिसळून भाषाभेद उत्पन्न झाले आहेत. कानडीलगतच्या कोल्हापूर, सोलापूर वगैरे ठिकाणीं मध्यवर्ती मराठीपासून निराळे असे भाषाभेद आहेतच. वऱ्हाड प्रांताच्या थेट देशस्थी भाषेचा प्रकार निराळा. बऱ्हाण-पुरापासून नंदुरबारपर्यंत खानदेशच्या भाषेचा प्रकार मध्यवर्ती भाषे-पासून फार निराळा आहे. डॉ. ग्रियर्सन ह्या भाषापण्डिताने अहिराणी भाषेला मराठीचा प्रांतिक भेद न समजतां गुजराती भाषेचा प्रांतिक भेद समजलां आहे[2]. मराठीचे प्रांतिक भेदांचें स्वरूप पुढे क्रमाने विशद केलें आहे.

मराठीच्या उपभाषांपैकी कोंकणी ही एक प्रमुख उपभाषा आहे. कोंकणीमध्ये उत्तर कोंकणी आणि दक्षिण कोंकणी असे दोन प्रकार आहेत, व ह्यांपैकी दक्षिण कोंकणी हाच प्रकार कोंकणी ह्या नांवाने विशेष रीतीने संबोधिला जातो. उत्तर कोंकणी आणि मध्यवर्ती पुण्याची मराठी ह्या दोहोंमध्ये विशेष अलग करण्यासारखे फरक नाहीत. भेद आहेत ते किर-कोळ स्वरूपाचे आहेत. दक्षिणी कोंकणीचें मात्र तसें नाही. मध्यवर्ती मराठीपासून ही भाषा अलग तर दिसतेच परंतु तिच्या आसन्नवर्ती ज्या कोंकणांतील इतर बोली आहेत त्यांच्यापासूनहि ती अलग दिसते. पोर्चुगीज लोकांचा व तेथील लोकांचा संबंध १५ व्या शतकापासून आला असल्या-मुळे व तो संबध केवळ राजकीय स्वरूपाचा नसून धार्मिक स्वरूपाचाहि अस-ल्यामुळे त्यांचा परिणाम केवळ दक्षिण कोंकणांतील लोकांच्या घरांतच

१ दादोबा, म. भा. व्या. पृ. १२.

२ Dr. Grierson, L. S. I. Vol. 9-2.

केवळ नव्हे तर देवघरांत शिरला व अशा रीतीने तेथील लोकांची भाषाहि पोर्तुगीज भाषेकडून कांही बाबतींत अभिभूत झाली. मध्यवर्ती भाषा किंवा साहित्यिक भाषा ह्यांपासून उपभाषेस अलग करणारे जे इतर भेद कारणीभूत होतात त्यांमध्ये परकी म्लेच्छ भाषेच्या परिणामाची आणखी जास्त भर पडली.

१२८ दक्षिण कोंकणी भाषेचा स्वतंत्र विचार करण्याच्या पूर्वी उत्तर कोंकणीचा विचार करूं. उत्तर कोंकणीमध्ये पुन्हा प्रांताप्रमाणे, बोलणाऱ्या लोकांच्या जातीप्रमाणे किंवा एकंदर संस्कृतीप्रमाणे व त्यांच्या धंद्याप्रमाणे आणखी कांही पोटभेद असल्याचे दिसून येतात. 'बाणकोटी, दमणी घाटी, मावळी, संगमेश्वरी हे पोटभेद त्या त्या स्थानावरून पडले आहेत. आगरी, भंडारी, धनगरी, कऱ्हाडी, किरिस्ताँव, कोळी, कुणबी, परभी, ठाकरी इत्यादि पोटभेद जातींवरून किंवा धंद्यांवरून पडलेले आहेत'[1], सामान्य दृष्टीने पाहिलें असतां ह्या प्रांतिक व जातिक दोन्ही प्रकारच्या पोटभेदांत उच्चारण व व्याकरण सारखेंच आहे. कोठे क्वचित् फरक दृष्टीस पडतात इतकेंच.

१ बाणकोटी—ही भाषा बाणकोटच्या आसपासच्या प्रांतात चालू आहे. ह्या प्रांतावर जंजिऱ्याच्या सिद्दीचा ताबा आहे. ह्या प्रांतांत मुसलमानी लोकांची वस्ती पुष्कळ असल्यामुळे येथील भाषेंत उर्दु भाषेची छटा उमटली आहे. हाच ह्या भाषेचा विशेष. अस्मान, बैठ, बच्चा, मिळकत वगैरे शब्द ह्या भाषेंत मिसळलेले पुष्कळ सापडतात.

२ मावळी—ही भाषा मावळखोऱ्यांत चालू आहे. नाणें मावळ व पवन मावळ असे मावळाचे दोन भेद आहेत.

३ घाटी—कोंकणालगतच्या सह्याद्रीच्या घाटावर कुलाबा आणि भोर संस्थान ह्या दरम्यानच्या टापूंत ही पोटभाषा बोलली जाते.

४ संगमेश्वरी—ह्या चारीपांची पोटभाषांत संगमेश्वरी ही जरा महत्त्वाची आहे. कोंकणी भाषा दमणपासून जसजशी खाली जाते तसतशी तिला गोव्यांतील कोंकणी भाषेचें वळण मिळूं लागतें. तेव्हा संगमेश्वरी व बाणकोटी ह्या दोन्ही पोटभाषा उत्तर कोंकणीपैकी शेवटच्या

1 Dr. Grierson L. S. I. 7.

मर्यादेवरील भाषा होत. ह्यांच्या व दक्षिण कोंकणीच्या मध्ये एकच कुडाळी म्हणून पोटभाषा आहे. परंतु तिला दक्षिण कोंकणी-चीच पोटभेद समजतात. रत्नागिरी जिल्ह्याच्या देवरुख तालुक्यांतील लोकांची संगमेश्वरी ही बोली आहे. ह्या लोकांच्या बोलण्यांत ए आणि ओ हे स्वर ह्रस्व आणि दीर्घ अशा दोन्ही रीतींने उच्चारिले जातात. उदा०— 'देखिल व दिखिल' असे दोन्ही उच्चार आहेत. त्याचप्रमाणे 'हुतॉ व होतों' हेहि दोन उच्चार रूढ आहेत. दर्शक सर्वनाम व संबंधी सर्वनाम ह्यांचें पुंल्लिंगी एकवचनहि ह्या भाषेंत जरा चमत्कारिक रीतींने होतें. उदा०— 'हा, ता, जा.' 'असणें' ह्या धातूचीं रूपें पुढीलप्रमाणे होतात. प्र. पु. हाँय, हॉव. द्वि. पु. हाँयस, होत. तृ. पु. हाय, हाय. तसेंच 'मारणे' ह्या धातूचीं रूपें पुढीलप्रमाणे होतात. प्र. पु. मी मारताय, मारतॉव. द्वि. पु. मार-तायस, मारतॉव. तृ. पु.–मारतॉय, मारतायत, मारतात. "पाणी शिरलॉं" असा प्रयोग ह्या भाषेंत होतो.

१२९ जाती किंवा धंदा ह्यांवर आधारलेले कोंकणी भाषेचे पोटभेदहि अशाच स्वरूपाचे आहेत. ह्यांमध्ये भेद असेच किरकोळ स्वरूपाचे आहेत.

१ कोळी—समुद्राच्या सान्निध्यामुळे खालच्या दर्जाच्या लोकांचा मुख्य धंदा म्हटला म्हणजे कोळ्याचा होय. कोळ्यांची लोकसंख्याहि पुष्कळ आहे. त्यांच्या भाषेंत त्यांच्या धंद्यामुळे शब्दाच्या विशेष लकबा तर आहेतच, परंतु इतरहि कांही लकबा आहेत. नाकांतील उच्चार तर सर्व कोंकणास सर्वसाधारण आहेच. परंतु ह्या लोकांमध्ये हा उच्चार कधी नासिक्य तर कधी निर्नासिक्य होतो, तोँ व तो; तेँ व ते, असे दोन्ही प्रकारचे उच्चार आढळून येतात. ओ आणि ओँ ह्यांबद्दल ह्रस्व स्वर उच्चारांत येतो. 'हों, तों' बद्दल 'हुँ, तूँ' असा उच्चार ऐकण्यांत येतो. व्यंजनोच्चारांमध्ये अशीच अदलाबदल होते. ल बद्दल न, न बद्दल र असे विपर्यय होतात. राग बद्दल नाग म्हणतात. श, ष, स ह्या तिन्ही उच्चारांबद्दल एक 'स' च उच्चार वापरतात. देस (देश), जासी (जाशी) असे उच्चार होतात. स्त्रीलिंगी 'मी' ची तृतीया मे आणि मीँ अशीं दोन्हीं रूपें होतात.

२ किरिस्ताँव—ह्या कोळयांच्यापैकीच जे लोक पूर्वी पोर्तुगीज लोकांच्या प्रयत्नाने बाटले व खिश्चन झाले त्यांची एक किरिस्ताँव म्हणून निराळीच छोटीशी भाषा बनली आहे. निराळी म्हणण्याचें कारण इतकेंच की ह्यांच्यांत पोर्चुगीज शब्दांचा भरणा थोडासा दिसतो. पाय (बाप), माय (आई), मिरूस (मनुष्य), इगार (उपदेशक), पाद्री, मार्द्रा, इस्टेट वगैरे शब्द नित्यशः ह्या भाषेत वापरांत असतात. ह्या लोकांच्या उच्चारांत 'ण' अधिक येतो.

३ 'वाडवल' ह्या नांवाच्या कोंकणी भाषेचा प्रकार पांचकलशी जातीमध्ये रूढ आहे. त्याचेहि कांही विशेष आहेत की ज्यांमुळे तिला एक स्वतंत्र उपभेद म्हणतां येईल. 'च' व्यंजनाचा उच्चार वाडवल भाषेत 'स' किंवा 'श' होतो. उदा०—साकर < चाकर, संद < चंद्र, शार < चार. 'स' आणि 'श' ह्यांच्याबद्दल ह येतो. उदा०—होन < सोन, बाह < बस, हांगितला < सांगितला, हेत < शेत, हेंभर < शंभर. 'ह' चा कधी कधी लोप हि होतो. उदा०—आत < हात, आत < आहे.

४ ठाणे जिल्ह्याच्या उत्तरेस कांही सामवेदी ब्राह्मणांची वसति आहे. ते सर्व शेतकीचा किंवा गवळ्याचा धंदा करितात. त्यांच्या भाषेमध्येहि वाडवल भाषेप्रमाणे 'च' बद्दल 'स' किंवा 'ह' येतो. मराठीच्या प्रांतांतून जसजसे आपण खानदेशी किंवा गुजरातीच्या प्रांताकडे जातों तसतसे 'च' 'स' बद्दल वापरण्याची प्रवृत्ति आढळून येते. ह्या भाषेंत भूतकाल खानदेशीप्रमाणेच होतो. उदा०—अस—प्र. पु. हात, हातॉव. द्वि. पु. हातस, हाता. तृ. पु. हात, हातात, हुतात. 'हा' च्या ऐवजी 'ही' हें अंग घेऊनहि भूतकाळाचीं दुसरीं रूपें होतात. उदा०—हिना, हिनात.

५ कातकरी लोकांसारखेच वारली म्हणून एक रानटी लोकांची जात ठाणे जिल्ह्यांत डहाणूजवळ रहाते. त्यांची भाषा आणि कातकऱ्यांची भाषा ह्या दोहोंमध्यें थोडासा फरक आहे. ह्यांच्या बोलण्यांत दीर्घ स्वर ह्रस्व उच्चारण्याची लकब फार आहे. 'कोठे जातोस' ह्याच्या ऐवजी 'कोठ जास' असें ह्रस्व उच्चारांचें वाक्य ते उच्चारतात. 'तेथे' बद्दल 'तथ', 'दिलें' बद्दल 'दिल्ह', 'आपाला' बद्दल 'बासला', 'भाऊ' बद्दल 'भास', सामान्यरूप एकारान्त होणे हे वारली भाषेचे विशेष आहेत. वारली भाषेवर

गुजरातीचा परिणाम झाला आहे. बीज = दुसरा, पोते = स्वतां, त्याने = षष्ठी विभक्ति इत्यादि गुजरातीशीं साम्यें आहेत. कदाचित् गुजरातेंतून हे लोक कोंकणांत उतरले असावेत.

६ काथोडी अथवा कातकरी—हा आणखी एक कोंकणी भाषेचा प्रकार आहे. ही भाषा बोलणारे लोक कातकरी ह्या नांवाने ओळखिले जातात. हे लोक मूळचे आर्य आहेत कीं काय ह्याबद्दल मतभेद आहे. सह्याद्रीच्या खबदाडींत हे फार काळापासून वसती करून राहिले असावेत. आर्यांच्या झुंडीच्या झुंडी ज्या वेळीं वरून आर्यावर्तांतून खाली दक्षिणापथांत उतरल्या त्या वेळीं त्यांच्या उच्च संस्कृतीपुढे ज्यांचा टिकाव लागूं शकला नाही व म्हणूनच ज्यांना डोंगरकठडींचा आश्रय करून आपलें संरक्षण करून घ्यावें लागलें ते हे लोक होत. सातपुड्यांतील गोंड, कोण्ड, भिल्ल वगैरे लोकांची जी स्थिति झाली तीच ह्यांची झाली. हे लोक अनार्य परंतु पुढे पुढे आर्यांच्या संस्कृतीशीं मनस्वी संबंध आल्यामुळे ह्यांनी आर्यांच्या पुष्कळ गोष्टी उचलल्या. धर्म, चालीरीति, समजुती वगैरे मूळच्या अनार्य जातींतील लोकांच्या सारख्याच ह्यांच्या आहेत. कातकरी किंवा काथोडी ही भाषा बोलणारे लोक ७५७०० आहेत व हे कोंकणच्या मर्यादेवरील डोंगरकटडींवर पसरले आहेत. कातकरी भाषेंत गुजराती किंवा खानदेशी भाषेसारखा षष्ठीचा प्रत्यय ' ना ' आहे. उदा०—बाहासना = बापाचा. बाहास = बापास. माना = माझ्या. तुना = तुझ्या. क्रियापद सामान्य कोंकणी भाषेप्रमाणें चालतें. वर्तमानकाळ अस—प्र. पु. आहा, आहाँव. द्वि. पु. आहास, आहाँ. तृ. पु. आहाँ, आहात.

१३० मराठीच्या उपभाषा ज्या कोंकणी व वऱ्हाडी ह्या भाषांचे जे स्वभावविशेष पुढे दिले आहेत त्यांवरून दिसून येईल कीं ह्या दोन्ही उपभाषांत मराठीचे फार पुराणकालचे अवशेष आहेत. सध्या मध्यवर्ती शिष्ट जी मराठी भाषा आहे तिच्या ह्या दोन्ही उपभाषा ज्येष्ठ बहिणी ठरतात. संस्कृतप्राकृत ह्यांमधून जे विशेष मराठींत उतरले आहेत त्यांच्या अपभ्रंशाची अथवा परिणतीची आद्य अवस्था कोंकणी व वऱ्हाडी भाषांत आढळून येते. कोंकणी व वऱ्हाडी भाषांत सध्या प्रचलित असलेले बरेच शब्द ज्ञानेश्वरींत वापरलेले आढळतात. हे शब्द ज्ञानेश्वरीच्या काळांत

कोंकण व देश ह्या दोन्ही प्रांतांत सारखेच सुरू असावेत व पुढे कालांतराने देशावरच्या भाषांत त्यांच्यापैकी कांहीचा लोप झाला व कोंकणी भाषेंत अद्यापपर्यंत ते तसेच चालू राहिले. पुढे दिलेले कोंकणी शब्द ज्ञानेश्वरीमध्ये आढळतात. दुर्गम शब्दांचा अर्थ पुढे कंसांत दिला आहे.

आसकड ( अडचण ); आविस आमिष, रंगळ, कांबरणें ( पांगुरणें ); कहिं, कुवाडें ( आश्चर्य ), खाडी ( दाढी ); खातवड (उकिरडा ); खोंप, गर्चा ( मात ); गोमटे, गोरू ( गुरु ); चांग, जायांचे ( उसने आणलेले ); तांडी ( समुदाय ); तुष ( कोंडा ); ठाड ( तळ ); थारणें ( स्थिर होणें ); दादुला ( नवरा ); धगी, निदसुरे ( झोपेंतले ); पटा ( अधिकार ); पसारा ( दुकान ); पापरा ( लाथ ); पालव ( पदर ); पालवणें ( मालवणें, खूण करणें ); पावो ( पाय ); पेणें ( मुक्काम ); फाळणें ( चिरणें ); भांगार, भाट ( जमीन ); भाते ( पोटगी ); भीतर, मुडा, मुदल ( मूळ ); मुदी ( आंगठा ); मेर ( सीमा ); रेंव ( वाळू ); रुख ( वृक्ष ); लागी ( जवळ ); लासें ( चिन्ह ); लांव ( जखिण ); लोंव ( लोंकर ); वाचणें ( जाणें )· वरेत ( नवरा ); वेला ( किनारा ); वोहरा [ वधूवरें ]; सपूर [ बारीक ]; सांत [ बाजार ]; साद [ शब्द ]; सुगुरवा [ महत्त्व ]; सुणें [ कुत्रें ]; होडा [ पेज ][1].

## चित्पावनी[2]

१३१ चित्पावनी भाषा कोंकणांत रत्नागिरी तालुक्याच्या उत्तर सीमेपासून म्हणजे जयगड खाडीच्या दक्षिण तीरापासून दक्षिणेकडे समुद्रालगतच्या चिंचोळ्या प्रदेशांत तहत वेंगुर्ले, सावंतवाडी, गोमंतक आणि कदाचित् ह्याच्याहि पलीकडे फार लांबपर्यंत चित्पावन ब्राह्मणांची खास भाषा म्हणजे आपसांत बोलण्याची भाषा आहे. ही भाषा बोलणाऱ्यांच्या संख्येच्या दृष्टीने घटत चालली आहे, ह्याचें कारण बरेच चित्पावनी ब्राह्मण व्यवसायानिमित्त कोंकण सोडून देशाकडे येऊं लागल्यामुळे व देशावर त्यांच्या सानुनासिक भाषेची चेष्टा होऊं लागल्यामुळे त्यांनी ती चित्पावनी

---

१ प्रियोळकर, वि. वि. १९२९.

२ साठे, म. सा. प. व. ३

भाषा सोडून देसूर भाषा स्वीकारिली आहे. देशावरच पुष्कळ पिढ्या स्थायी होऊन बसल्यामुळे आपल्या मूळ चित्पावनी भाषेचा त्यांचा ओढा कमी झाला आहे. चित्पावनी लोक कोठील व ते केव्हां व कसे कोंकणात येऊन स्थायी झाले व चित्पावन शब्दाचा नक्की अर्थ काय ह्या संबंधी विद्वानांमध्ये जो मतभेद आहे त्याचा उल्लेख इतरत्र केलाच आहे. येथे फक्त त्यांची भाषा देतों. ह्या भाषेची तुलनात्मक छाननी जर झाली तर चित्पावन ब्राह्मणांचे मूळ वसतिस्थान, वसाहत, आक्रमणमार्ग वगैरे बाबींबद्दल उलगडा होण्यास खात्रीने मदत होईल. चित्पावनी भाषा ही एक जातिभाषा म्हणता येईल. ह्या पोटभाषेंत म्हणण्यासारखें उच्च दर्जाचें वाङ्मय नाही. ग्रामिक गाणीं व लोककथा कांही प्रचलित आहेत.

## उच्चारप्रक्रिया

१ स्वरांपैकी 'ए' ह्याचा उच्चार कांहीसा आडवा म्हणजे अ आणि ए या दोहोंमधील (= ऍ) आणि 'ओ' चा उच्चार 'अ आणि ओ' ह्या दोहोंमधील (= ऑ) असा होतो. ह्या उच्चाराला अर्ध एकार व अर्ध ओकार असें म्हणता येईल. असाच अर्धा उच्चार सामवेदापैकी राणायनीय शाखेचे लोक सामगायन करतांना करतात. दक्षिणेकडील द्राविडी भाषांतहि असले अर्ध ओकार व अर्ध एकार हे उच्चार आहेत.

२ 'व' च्या ठिकाणीं 'य' धातूंच्या रूपांत आलेला दिसतो. उदा०—करय, फिरयलो, सापयचे, चालयली, घेवयला, जेय, ठेय. (आज्ञार्थ, प्रयोजक रूपें).

## प्रत्ययप्रक्रिया

१ शब्दाचें मूळरूप– आकारान्त शब्द ओकारान्त असतात. उदा०–नामें–घोडो, भोपळो, चौथरो, पायल्यो, पोथ्यो, लाटको, शाहणो, सर्वनामें–त्यो, ह्यो, ज्यो, हो. क्रियापदें–आयलो, बोलल्यो, हवो, ठेयलो.

२ एकारान्त शब्द आकारान्त होतात. उदा०-नामें–केळां, सोनां, भांडां, फुलां, गवतां, पांढरां, तांबडा, बकरां. सर्वनामें–तां जां. क्रियापदें–गेल्यां, म्हटलां, हवां, बोलल्या, आकरलां.

२. सामान्यरूपाचे प्रकारः—एकवचनी रूपें खाली दिलीं आहेत. अनेकवचनांत तींच रूपें सानुस्वार असतात.

१ अकारान्त ( पुं. न. ) देव–देवा, माणूस–माणसा, पाट–पाटा.

२ अ व ईकारान्त ( स्त्री. ) जीभ–जिभा, चिंच–चिंचा, वाट–वाटा, भिंत–भिंती, चेड–चेडी, थाळ–थाळी.

३ आकारान्त ( न. ) तळा–तळें, केळा–केळें, लोणचा–लोणचें.

४ ईकारान्त ( स्त्री न. ) भिमी–भिम्या, घोडी–घोड्या, पाणी–पाण्या, लोण्या.

५ ऊकारान्त ( न ) लिंबू–लिंबा, वासरूं–वासरा, तारूं–तारवा.

६ ओकारान्त ( पु. ) घोडो–घोडे, पाळणो–पाळणे, आंबो–आंबे.

७ आकारान्त ( स्त्री. ) बायको–बायका.

३. विभक्तीचे प्रत्यय—प्रथमा–० आ, इ, ई, ए, [ ए. व. ]. ओ, यो, यां. [ अ. व. ]. द्वितीया–ला [ ए. व. ]. ला, ना. [ अ. व. ]. तृतीया–न, णीन [ ए. व. ]. य, ञ्. [ अ. व. ]. पंचमी–पाष्टी, पक्षा, हारठी [ ए. व. ]. पाष्टी, पक्षा, हारठी. [ अ. व. ]. षष्ठी–चो [ ए. व. ]. चो [ अ. व. ]. सप्तमी–त [ ए. व. ]. त. [ अ. व. ].

खाली एक नाम व एक सर्वनाम चालवून दाखवितों.

| | देव | | | मी | |
|---|---|---|---|---|---|
| प्र. | देव | देव | प्र. तृ. | मे | आम्ही |
| द्वि. च. | देवाला | देवांना | द्वि. च. | माला | आमला |
| तृ. | देवान | देवाञ्-यू | | | |
| पं. | देवापाष्टी | देवांपाष्टी | पं. | माझे पाष्टी | आमचे पाष्टी |
| | देवापक्षा | देवांपक्षा | | ,, पक्षा | ,, पक्षा |
| | देवा हारठी | देवां हारठी | | ,, हारठी | ,, हारठी |
| ष. | देवाचो | देवांचो | ष. | माझो | आमचो |
| स. | देवांत | देवांत | स. | माझेंत | आमचेंत |

## क्रियापदाचे प्रत्यय

कर्तरि | कर्मणि

**वर्तमान**

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र. पु. | आ | ओ |
| द्वि. पु. | श | आ |
| तृ. पु. | ए | त |

**भूतकाळ**

| | कर्तरि ए. व. | कर्तरि अ. व. | कर्मणि ए. व. | कर्मणि अ. व. |
|---|---|---|---|---|
| प्र. पु. | लों | लों | लों | लें |
| | ल्यां | ल्यां | लीं | ल्यों |
| | लों | लों | लां | लीं |
| द्वि. पु. | लोश | लेत | लोत | लोश |
| | लोश | ल्योत | लीत | लोश |
| | लांश | लीत | लांत | लाश |
| तृ. पु. | लो | ले | लोन, लेन | ली |
| | ली | ल्यो | लीन | ली |
| | ला | ली | लान | लीन ली |

| | भविष्य | आज्ञार्थ | | विध्यर्थ | | |
|---|---|---|---|---|---|---|
| प्र. पु. | ईन, एन | ऊं | उं, ओ | ऊं | वां | वां. |
| द्वि. पु. | शील | आल | | आ | वाश | वांत. |
| तृ. पु. | ईल एल | तील, उंदे, ओनदे, उंदत, ओनदत, वां एवां वीं. | | | | |

खाली ' ये ' धातु तीन्ही काळांत चालवून दाखवितों.

**वर्तमान**

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र. पु. | येचां | येचों |
| द्वि. पु. | येचश | येचा |
| तृ. पु. | येचे | येचत |

**भविष्य.**

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र. पु. | येन | ऐऊं |
| द्वि. पु. | येशील | याल |
| तृ. पु. | येल | येतील |

**भूतकाळ**

| | | ए. व. | अ. व. |
|---|---|---|---|
| प्र. पु. | पु. | आयलों | आयलों |
| | स्त्री. | आयल्यां | आयलों |
| | न. | आयलों | आयलों |
| द्वि. पु. | पु. | आयलोश | आयलेत |
| | स्त्री. | आयलीश | आयल्योत |
| | न. | आयलीश | आयलीत |
| तृ. पु. | पु. | आयलो | आयलो |
| | स्त्री. | आयली | आयल्यो |
| | न. | आयलां | आयलीं |

| | आज्ञार्थ | | विध्यर्थ | |
|---|---|---|---|---|
| प्र. पु. | येऊं | येऊं | येवां | येवा |
| द्वि. पु. | ये | या | येवांश | येवांत |
| तृ. पु. | येऊं दे | येऊं देत | येवां | येवीं |

कृदन्तें:—१ वर्तमानकालवाचक—शिष्ट मराठीप्रमाणे रूपें होतात.

२ पूर्वकालवाचक—प्रत्यय 'नी' उदा:- जावनी, येवनी, खावनी, करनी, जेयनी, टेयनी.

३ निमित्तवाचक—येऊं, जाऊं, करूं, शिरूं, शिकों.

## शब्दसमूह

नात्याचे शब्द शकारान्त असतात; व त्यांना पुढे प्रत्यय लागतात. उदा:—आईश, बापूश, भाऊश, बेहणीश, चुलतूश, नंदश, सुन्हश, जाऊश, इत्यादि. अहूर [ पूर ], आंदुळा [ झोपाळा ], चटोर [चावट], बळकट [ पुष्कळ ], इतलां [ इतकें ], चेट [ मुलगी ], बोड्यो [मुलगा], एठाठीं [ येथून ], जोवणां [ वीज ], बाएल [ बायको ], कय [ कधीं ], ज्याहां [ जेथे ], मागतेन [ पुनः ], कडगुला [ बांगडी ], ठवणस [ करार ], माथ्यो [ रवी ], खळ [ आंगण ], डवरो [ खळगा ], मिरसांग [ मिरची ], गांता [ बाज ], थाळ [ मोठी चूल ], मोरळी [विळी], घडशी [ विटाळशी ], नय [ नदी ], रांधप [ स्वयंपाक ], घोऊश [ नवरा ], चखोट [ चांगलें ], पिठला [ झुणका ], हाड [ आण ], वाढवण [ केरसुणी ], वांगड [ सोबती ], विरड [ वेळ ], शेरणी [ खिरापत ].

## चित्पावनी भाषेचा नमुना

१ माणसान घे म्हटलें आपलेपण सोडूं नये. दुसरेचां चखोट सेलतां घेवां. पण उठले सुटले दुसरेच्या सगळयोच तऱ्हा घेणां अगदी वाईट. आतांशा पुरुष बायको घाकटी बघेवी ती अगदीच आपली शिळपत दिसचत. दिवसान दिवस सगळयाच गोष्टींत् भिकारपण नि दुबळेपण वाढत चाललां.

२ वेणू वाजयचे । देहुडा वेणू वाजयचे ।
देवभावना सर्वांभूतीं । तेला हो कळचे ।
भाविक भोळे दृढविश्वासी । तेंना हो फळचे ।
योगतपांहीं नच उमगे जो । तो भजनान मिळचे ।
आत्मारामा देत विसावो । यम दुर्धर पळचे ।

## कुडाळी[1]

१३२ मराठीच्या उपभाषांपैकीं कोंकणी म्हणून जर एक मुख्य उपभाषा अशी मानली तर त्या कोंकणी उपभाषेची 'कुडाळी' ही एक पोटभाषा म्हणतां येईल. कोंकणपट्टीवर ज्या कांही पोटभाषा चालू आहेत त्यांमध्ये उत्तर कोंकण व दक्षिण कोंकण किंवा गोमंतक असे दोन मुख्य स्थूळ भाषाभेद आहेत. ह्या दोन मुख्य भाषाभेदांच्या संधीवर कुडाळी भाषा येते. कुडाळी भाषेचा प्रांतहि उत्तर कोंकण व दक्षिण कोंकण ह्यांच्या मध्यावरच आहे. ह्या प्रांताची जुनी मर्यादा उत्तरेस दाभोळपर्यंत आणि दक्षिणेस गोव्यापर्यंत नेली आहे. पंधराव्या व सोळाव्या शतकांत तर कुडाळ देशाची दक्षिण यर्यादा गोव्याच्याहि दक्षिणेस कारवार, अंकोला, निर्जन पर्यंत होती असें शिलालेखावरून निश्चित होतें. 'कुडाळ देश' म्हणून संबोधिल्या जाणाऱ्या प्रदेशांत रत्नागिरी जिल्हा, करवीर संस्थानांतील पश्चिमेकडील भाग, सावंतवाडी संस्थान, गोवा प्रांत आणि बेळगांव जिल्हा ह्यांतील कांही प्रदेश इतक्या प्रदेशाचा अंतर्भाव केला जात असे. त्यांतील मुख्य शहर कुडाळ ( कुडुलपत्तन ) हें आहे. कुडाळ देशांत ३६० गांवाचा समावेश होत असे व त्यांना "कदीम कुडाळी विलातीचे गाऊ" असें म्हणत असल्याचें जुन्या कागदपत्रांवरून सिद्ध होतें. सध्या कुडाळ देशांत देवगडपासून दक्षिणेस गोवें प्रांतांतील पंचमहाल व पूर्वेस सह्याद्रीवरील दक्षिणोत्तर पट्टी इतका प्रदेश येतो.

कुडाळी भाषा वर दिलेल्या प्रांतात बोलली जाते. तेथील सुशिक्षित व अशिक्षित अशा सर्व जातींची ही बोली आहे. सुशिक्षितांच्या बोलींवर शिष्ट मराठीचा थोडाबहुत परिणाम झाल्याचा दिसतो. हे लोक बोलतांना

१ वा. अ. बावडेंकर, म. सा. प. व ४

शुद्ध मराठी शब्द जास्त वापरून त्याला कुडाळीचे विशिष्ट विभक्तिप्रत्यय व क्रियापदांचीं रूपें वापरतात व कुडाळीच्या उच्चारांतील विशिष्ट हेलांमध्ये त्यांचा उच्चार करतात. कुडाळी भाषेंत वाङ्मय जानपदस्वरूपाचें आहे. स्त्रिया व लहान मुलें ह्यांच्या खेळांतील गाणीं, फुगड्या, झोंपाळ्यावरचीं गाणीं, दळण कांडण किंवा इतर कामें करतांना श्रमविनोदनार्थ असलेलीं गाणीं हेंच काय तें कुडाळींतील मुख्य वाङ्मय. इतर प्रसिद्ध, मुद्रित, असें वाङ्मय नाहीं. कुडाळी भाषेचे विशेष पुढीलप्रमाणे आहेत.

(१) मराठी शब्दाच्या शेवटीं इ अक्षर असल्यास कुडाळींत त्याचें 'य' रूप होतें. उदा०—समय (समई), घाय (घाई), चतुराय (चतुराई).

(२) मध्यें 'इ' असेल तर तीबद्दल 'य' किंवा 'व' अशीं रूपांतरें होतात. उदा०—बायल (बाईल), काविल (काईल), नायक (नाईक), सुवीण (सुईण).

(३) आकारान्त नामें ओकारान्त उच्चारिलीं जातात. उदा०—आंबो, मुळो, गरो, कृष्णो, करष्णो.

(४) एकारान्त नामें आकारान्त उच्चारिलीं जातात. उदा०—कोळम्यां (कोळंमें), अळम्यां (अळमें), नाणां (नाणें), पानां (पानें), जातां (जातें), व्हायां (हवे).

(५) कांही कांही ठिकाणीं महाप्राण मिसळतात. उदा०—हडे, हकडे (इकडे), फाटी (पाठी), फुडे (पुढें) इ.

(६) वर्णवियोग—पिर्थम, पिर्थुम (पृथ्वी), करपा (कृपा), परांत (प्रांत), पराकरम.

कुडाळीचे विभक्तिप्रत्यय खाली दिल्याप्रमाणे आहेत.

द्वितीया प्रत्यय नामास 'क' सर्वनामास 'का' उदा:–रामाक. माकां, तुकां, त्याकां. तृतीया–नामाचे प्रत्यय न, शीं उ०–रामान, रामाशी. सर्वनामाचे प्रत्यय–णां शीं. उ–तिणा, त्याणां, त्येशीं. मिया, तुयां. पंचमी प्रत्यय–हून, सून. पक्षी उः–ह्ये, हून, सुमयसून, ह्यापक्षी. षष्ठी प्रत्यय–चो, ची, चां.

उ. कुडाळचो, कुडाळची कुडाळचां. सप्तमी–प्रत्यय—त. भितर (भितुर), भतुर. उदा०–डोळ्यांत डोळयांभितर–भीतूर.

## कांही क्रियापदांचीं रूपें

प्रथम पु. मी जात हँय; तो चालत जात आसात (जात असेल).
द्वितीय पु. तूं जात इस; तो वाचीत बसलो आसात (बसला असेल).
तृतीय पु. तो वाता हा; तोका मांका मय घालता (घालतो).

## कांही कुडाळी शब्द

आवस, आब्स (आई), अज्जुन (बिनचुक), अपितार (चमत्कारिक), अव्हेचो (नवीन), आयादाण (भांडें), उबलां (पेरलें धान्य), असकाट (माजलेलें रान), ओस्णेवता (बरळतो), आंत्रणो, विंझणो (पंखा), उपराळो (प्राप्ति), किर्म्यां (पडसें), अंवसर (अंगावर पिशाच्य), गजाल (गोष्ट), घोव–गोहो (नवरा), चेडूं (मुलगी), जायो (उसनें), जेफा (जास्ती), झील (मुलगा), दुराय (शपथ), धापुं झाला (फुकट गेलें), निराकार (विचित्र), न्हय किंवा नै (नदी), गिंबार (ऊन), पांढरो (सर्प), फाल्या (उद्यां), फट (गप्प), बिरमत (लचांड, आण), बचेरी (थट्टा), बक्रा (अमळ), मानाय (चाकर), मागारीण (स्वतांची बायको), यद्वां (एव्हां), लखणी (झोप), वाढवण (केरसुणी), वाभोठा (कौतुक), होकाल (नवरी), हींपळी (कोंवळें उन्ह).

## कुडाळी भाषेचा नमुना

नवशीं वर्सांच्या सुमारास देवसर्मो नावाचो आदगौड बामण भागीरथीच्या वडीवरसुन दक्शिन कोंकनांत इलो, आणी हिंदळयाजवळच कुणकेसर म्हादेवाचां सेम थळ आसा, तेची शेवा चाकरी तेना केली. तेच्या करपेन त्या बिरामनाचो येलइस्तार बरोच वाडलो. तेंच्या वँसांत माइन्देव हुवून एक मोट्टो पराक्रमीं पुरुस जालो. माइन्च्यावान् जादव राजांचा मांडलिकपाण झुगारून, कुडाळदेस आनिं आयलो पैलो बरोच मुलुक हेचो तो सवता म्हाराजो बनलो.

## दक्षिण कोंकणी

१३३ मराठीच्या उपभाषांपैकीं ही एक अत्यंत महत्त्वाची अशी आहे. पुण्याची जी नमुनेदार मध्यवर्ती मराठी भाषा आहे तिच्याहून ही दक्षिण कोंकणी फार भिन्न आहे. भिन्नता कांही बाबतींत इतक्या थरास गेली आहे की ह्या दक्षिण कोंकणी भाषेला मराठीची उपभाषा म्हणून गौणत्व देण्यास कांही विद्वान तयार नाहींत. ती एक स्वतंत्रच भाषा आहे, खुद्द मध्यवर्ती मराठी ह्या कोंकणीपासून उद्भवली, ग्रांथिक भाषा म्हणून त्या कोंकणी भाषेचा दर्जा मध्यवर्ती भाषेपासून अगदी कमी नाही व त्या भाषेंत अभिजात वाङ्मय उत्पन्न करून तिला मध्यवर्ती मराठीच्या जोडीला आणून बस-विणें शक्य आहे अशी कांही विद्वानांची ह्या दक्षिण कोंकणी भाषेसंबंधी विचारसरणी आहे.

ह्या भाषेचें क्षेत्रहि मोठें आहे. राजापूरच्या दक्षिणेपासून कोंकणी भाषेचें क्षेत्र सुरू होतें तें दक्षिणेस गोवें ओलांडून खाली कारवारची परम सीमा गांठतें. कोंकणी भाषा बोलणाऱ्यांची लोकसंख्या १५,६५,३९१ इतकी आहे. व तसा अनुकूल राजाश्रय असता तर ह्यापेक्षाहि जास्त झाली असती. परंतु त्याच्या अभावीं मात्र ही संख्या घटत चालली आहे. शिवाय परराज्यांत अस्सल कोंकणी भाषेंत जन्मलेल्या कांही लोकांनी आपली भाषा 'पोर्चुगीज' म्हणून सांगितली असण्याचा संभव आहे. उत्तरेस मालवण व दक्षिणेस कारवार, पूर्वेस सह्याद्रीच्या रांगा व पश्चिमेस समुद्रकिनारा अशा ह्या भाषेच्या स्थूल मर्यादा होत. अस्सल, उत्तम कोंकणी भाषा साष्टी प्रांतांत तिश्वडच्या आसपास बोलली जाते. सर्वसामान्य असें जर निरीक्षण केलें तर सर्व कोंकणांत एकसारखी, एकजिनसी अशी कोंकणी बोलली जात नाही. प्रत्येक भागांत कांही थोडेसे फरक आढळून येतात. प्रांत, धंदा, संस्कृति वगैरे बाबींमुळे भाषेमध्ये आणखी कांही पोटभेद दिसून येतात. व ह्या दृष्टीने कोंकणी भाषेंत पुन्हा तीन उपभेद पडले आहेत. १ बारदेस-करी, २ कुडाळी आणि ३ माळवणी. हे जे मुख्य तीन भेद झाले आहेत ते प्रांतपरत्वेंच झाले आहेत. किंवा गोवें वगैरे मध्यभागांत एक भेद, सावंतवाडी, पेडणें, डिचाली वगैरे ठिकाणीं दुसरा भेद व गोव्यांतील कोणकोण

व कारवार ह्या प्रांतांत तिसरा भेद असे तीन भेद असल्याचेंहि सांगतात. मुख्य गोव्याच्या कोंकणी भाषेंत $\frac{1}{10}$ शब्द पोर्तुगीज आहेत. कुडाळी भाषेचें स्वरूप वर सांगितलेंच आहे. आता मुख्य दक्षिण कोंकणी भाषेचें स्वरूप सांगतों.

१ ह्या भाषेचें उच्चारण बरेंचसें नासिक्य आहे. त्याची परमावधि कारवाराकडील सारस्वत ब्राह्मणांच्या भाषेंत दिसून येते.

२ व्यञ्जनान्त असा शब्द ह्या भाषेंत सापडणें कठीण. प्रत्येक शब्दाच्या शेवटीं 'अ' सारखा ह्रस्व स्वर जोडण्याची चाल ह्या भाषेंत आहे. उदाः— पूत, केस, जण.

३ श्वासयुक्त व्यञ्जनांतील श्वासाचा उच्चार नाहीसा करण्याकडे प्रवृत्ति ह्या भाषेंत आहे. उदा० — बोइन ( भइण ), बाव ( भाऊ ), गेर ( घेर ),

४ आरंभींचा 'व' नाहीसा होतो व त्यांतील स्वर तेवढा कायम राहतो. 'इ' युक्त जर 'व' असेल तर 'व' चा लोपच होतो. उदा०— इस्कळ ( विस्कळ ).

५ आरंभीचा ए आणि ओ ह्यांचा उच्चार ये आणि वो असा होतो. ऐ आणि औ ह्यांचे उच्चार व लेखन आय आणि आव असें होतें.

## विभक्तिप्रत्यय

| | एक-वचन | अनेक-वचन |
|---|---|---|
| प्रथमा. | ( मूळ रूप ) | ( विकार ) |
| द्वितीया. | क, का. | क, कां. |
| तृतीया. | न, ए, शीं. | नीं, ईं, शीं. |
| चतुर्थी. | क, का. | क, कां. |
| पंचमी. | ऊन, थान, च्यान, ज्येन, आकू, थावन. | ऊन, थान, च्यान, आक. |
| षष्ठी. | चो, ची, चें; च्यो, चीं. जो, जी, जें; जे, ज्यो, जीं. | चो, ची, चें; च्ये, च्यो, चीं. |
| सप्तमी. | आ, ई, न्त, र, चेर, ग्वेर. | आ, ई, न्त, निं, र, चेर, ग्वेर. |
| संबोधन. | (सामान्यरूप) | ना, नू. |

## क्रियापदांचीं रूपें

खाली निद् ( अकर्मक ) व मार *( सकर्मक ) ह्या दोन धातूंचीं रूपें दिलीं आहेत.

| | अकर्मक | सकर्मक |
|---|---|---|
| वर्तमानकालवाचक | निदत | मारीत |
| भूतकालवाचक | निदललो | मारललो |
| भविष्यकालवाचक | निदतलो | मारतलो |
| | निदणार | मारणार |
| पूर्वकालवाचक | निदोन | मारून |
| ल्यबन्त | | |
| नाकारान्त | निदतो | मारतो |
| | निदतांना | मारतांना |
| सामान्यकालवाचक | निदोंक | मारूंक |
| धातुसाधित नाम | निदचें | मारचें |
| | निदच्येक | मारच्येक[१] |

कोंकणी – विशेषतः कारवारच्या बाजूच्या – भाषेंत दोन नामें चालवून दाखवितों.

अकारान्त पुंलिंगी शब्द १ मनुष्य २ राय

| | एकवचन | अनेकवचन | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|---|---|
| प्रथमा | मनुष्यु | मनुष्य | रायुं | राय |
| द्वितीया | मनुष्याक | मनुष्यांक | रायाक | रायांक |
| तृतीया | मनुष्यानें | मनुष्यांनीं | रायानें | रायांनीं |
| चतुर्थी | मनुष्याक | मनुष्यांक | रायाक | रायांक |
| पंचमी | मनुष्याथावनु | मनुष्यांथावनु | रायाथावनु | रायांथावनु |
| षष्ठी | मनुष्यागेले | मनुष्यांगेले | रायागेले | रायांगेले |
| सप्तमी | मनुष्यांतु | मनुष्यांतु | रायांतु | रायांतु |

---

१ वि. रा. शिंदे, वि. विस्तार, जुलै १९२६.

## सर्वनामविभक्ति

| | प्र. पु. हांव | | द्वितीय पुं. तूं | |
|---|---|---|---|---|
| प्रथमा | हांव | आह्मी | तूं | तुह्मी |
| द्वितीया | माका | आमका | तुका | तुमका |
| तृतीया | हांवें | आह्मीं | तुवें | तुह्मी |
| चतुर्थी | माका | आमका | तुका | तुमका |
| पंचमी | मजलागीथावनु | आमकुथावुनु | तुजलागीथावुनु | तुमलागीथावुनु |
| षष्ठी | मगेले | आमगेले | तुगेले | तुंगेले |
| सप्तमी | मज्जांतु | आमच्यांतु | तुज्यांतु | तुमच्यांतु |

तृतीयपुरुषवाचक

| | | | |
|---|---|---|---|
| प्रथमा | तो | ते | स्त्रीलिंगी 'ती' आणि |
| द्वितीया | ताका | तांका | नपुंसकलिंगी 'तें' 'तो' |
| तृतीया | तान्नें | तान्नीं | प्रमाणेच चालतात. |
| चतुर्थी | ताका | तांका | |
| पंचमी | त्याजलागीथावनु<br>ताकाथावनु | तांतलागीथावनु | |
| षष्ठी | तागेले | ताङ्गेले | |
| सप्तमी | ताज्जान्तु | ताच्चांतु | |

## आख्यातविभक्ति

१ वर्तमानकाळांत सर्व पुरुषांत रूपें सारखींच राहतात. वच = जाणें. वर्तमानकाळ एकवचन–वत्ता. अनेकवचन–वत्तानी.

२ भूतकाळांत मध्यवर्ती मराठीप्रमाणे 'ल'कार येतो व कर्मांप्रमाणे क्रियापदाचीं लिंग, वचन, पुरुष हीं बदलतात. उदा०—हासलों (पुं. प्र. ए.), हासली (स्त्री. तृ. ए.), हासलें (न. तृ. ए.), वचु गेला, वचु गेली, वचु गेलें.

३ भविष्यकाळ—वतूलों (पु. प्र. ए.), वतूली (स्त्री. तृ. ए.), वतूलें (न. तृ. ए.)

४ धातुसाधित नाम—वचुनूं, बुल्लोनुं, खावुनुं, खेळणुं, धावनु, वोणुं, नेमनुं.

५ भूतभूत—धातुसाधित विशेषण, निष्ठारूप—गेल्लेले, खाल्लेले, खेल्लेले, धाविल्ले, पळलेले इत्यादि.

६ तुमन्त—वचुक, खानचाक, खळचाक, धावचाक, पड-चाक, जेमचाक.

७ आज्ञार्थाचीं रूपें—द्वि. पु. ए. वच, वल्लइ, खा, खेळ, धाव. द्वि. पु. अ. उल्लगे, खानो, धानो, पोडो, जेवो.

## गोमंतकी कोंकणी भाषेचा नमुना

आमच्या गांवचे काय खेळगडी सगळ्या जात्रांच्यो वारी करतात. जशे पळै पंढरेचे वारकारी नेमान जात्रेच्या दिसांत पंढरेत वतात तशेच हे लोक चुकनास्तना गोंयच्यो सोगळ्यो जात्रा काले शिगमे करतात. तो दीस १९२० ल्लो. सांगावेल्या काल्याक तांचे बरोबर हांवय गेलों. थैय २०-२५ रुपया म्हाका मेल्ले. अशे २-३ आकृतांक पैशे मेळटकीच म्होणूं लागले. 'खेळान हाका वेंग मारली' 'खेळ हाजेकडेन उल्लोंक लागलो मरे' हें आयकून म्हाका मुठभर मांस चढलें.

## वऱ्हाडी भाषा 1951

१३४ मराठीच्या प्रांतिक भेदांपैकीं पश्चिम किनाऱ्याकिनाऱ्यानें दमणपासून दक्षिणेस थेट कारवारपर्यंत चालू असलेल्या उत्तर कोंकणी व दक्षिण कोंकणी ह्या दोन स्वरूपाचें स्पष्टीकरण येथवर केलें. गोमंतकी किंवा कारवारी कोंकणी ही जशी मराठीच्या दक्षिणेकडील परम सीमेवरील भाषा तशी तिच्या उत्तरे-कडील परम सीमेवरील जी वऱ्हाडी भाषा तिचें स्वरूप खाली विशद केलें आहे. मध्यवर्ती मराठी भाषेच्या क्षेत्रापासून अत्यंत दूर वावरणाऱ्या ह्या दोन — कोंकणी आणि वऱ्हाडी — भाषांचें स्वरूप जवळजवळ ठेवून तुलनात्मक दृष्टीने जर त्यांची तपासणी केली तर मराठी भाषेचा मूळचा स्वभाव व तिच्यावर अवांतर कारणांनी झालेले परिणाम हे अजमावितां येतील. वऱ्हाडी भाषेचें क्षेत्र बरेंच विस्तीर्ण आहे. बुलढाण्याचा पूर्वभाग, एलिचपूर, बैतूल, सिवनी व बालाघाट ह्या प्रदेशाचा दक्षिण भाग, भंडारा, चांदा, वणी व वाशीम इतक्या प्रदेशावर ही भाषा चालते. ही बोलणाऱ्यांची संख्या ७६,७७,४३२ (वऱ्हाडी व नागपुरी मिळून) इतकी आहे. कोंकणी

भाषेचे ज्याप्रमाणे प्रांतांवरून, जातींवरून व धंद्यांवरून निरनिराळे उपभेद पडलेले आपण पाहिले तसेच वऱ्हाडी भाषेचेहि असे बोलणाऱ्यांच्या प्रांत, जाती व धंदा ह्यांवरून उपभेद पडले आहेत. घाटावरची वऱ्हाडी, घाटाखालची वऱ्हाडी हे तिचे दोन स्थूल भेद आहेत. नागपुरी, बालाघाटी, चांदा वगैरे आणखीहि देशनिष्ठ उपभेद वऱ्हाडीचेच होत. झारपी, धनगरी, कतिया, कुणबी, कुंभारी, महारी, गोवरी हे वऱ्हाडीचे जातींवरून पडलेले उपभेद होत. केवटी हा एक तिचाच पोटभेद बघेली भाषेशीं मिसळून झाला आहे. हळबी म्हणून आणखी एक पोटभेद वऱ्हाडीच्या शेवटच्या परिसरावर वापरला जातो. मध्यप्रांतांत नागपुरच्या आसपास नागपुरी भाषा चालते. ह्या प्रत्येकींत मध्यवर्ती वऱ्हाडीपासून थोडे निराळे असे सूक्ष्म भेद आहेत. वऱ्हाडी भाषेचें मूळ स्वरूप पुढीलप्रमाणे आहे.[1]

## वर्णप्रक्रिया—स्वर

१ दीर्घस्वर—विशेषतः अन्त्य दीर्घ स्वर ह्रस्व उच्चारिले जातात. उदा०— मी अथवा मि. माही अथवा माहि. माहा अथवा महा. (षष्ठीचीं रूपें).

२ नागर पुणेरी भाषेंत जेथे जेथे ‘ए’ अन्त्य स्वर येतो तेथे वऱ्हाडी भाषेंत ‘अ’ घालतात. उदा०—सांगितल (– लें), त्यान (– ने), भुकेन (– नें), असल (– सेल).

३ ‘ए’ किंवा ‘य’ बद्दल वऱ्हाडी भाषेंत ‘इ’ स्वर येतो. उदा०—दिल, देहल, द्यहल. इळ, येळ, वेळ. राह्यला (अकोला) त्यव्हा (अकोला).

४ आद्य ‘ए’ चा उच्चार ये असा उच्चारतात. कोंकणी भाषेंत असाच फरक होतो. उदा०— ‘ए’ बद्दल ‘ये’ किंवा ‘ओ’ बद्दल ‘वो’ येणें हा प्रकार कानडी भाषेच्या संसर्गाने मराठींत शिरला असण्याचा संभव आहे. उदा०—येक, वोंगळ.

५ ‘अव’ आणि ‘अवि’ ह्या दोहोंबद्दल ‘ओ’ हा स्वर उच्चारतात. उदा०–जवळ–जोळ. उडविला–उडोला.

---

१ Dr. Grierson L. S. I. 7.

## व्यञ्जनें

१ अनुनासिकांचा उच्चार पुणेरी नागर मराठींत जसा करतात तसा वऱ्हाडी भाषेंत करीत नाहीत. अनुनासिकांचा अर्धवट उच्चार वऱ्हाडींत होतच नाही. जो करतात तो अगदी स्पष्ट करतात. उदा०—[ पुणेरी ] त्या कारणानें, [ वऱ्हाडी ] त्या कारणाने. करूँ, करूं. किंवा स्पष्ट उच्चार करतात. उदा०—तूँ > तून्. देवाशीं > देवाशीन्.

२ 'ड्' च्या उच्चारासंबंधी बरीच भानगड वऱ्हाडी भाषेंत आहे. एखाद्या स्वराच्या नंतर 'ड' आला तर त्या 'ड' चा उच्चार 'र्' होतो. 'र्' आणि 'ळ्' ह्या दोहोंच्या उच्चारामध्ये फार साम्य असल्यामुळे हा घोटाळा होतो. 'ळ्' चा उच्चार 'र्' किंवा 'ऋ' च्या जवळ जवळ होतो. कधीं कधीं 'य्' च्या सारखाहि होतो. बुलढाणा, मलकापूर कडील भाषेंत त्याचा नियमानेच 'य' होतो. उदा०—डोळा—डोया. जवळ—जोय, जवय. 'माळी' ह्या शब्दाचे मारी, मायी, माइ इतके भिन्न उच्चार होतात.

३ असाच घोटाळा 'न्' आणि 'ण्' ह्या दोन व्यंजनांच्या उच्चाराच्या बाबतींत आहे. वऱ्हाडी भाषेंत 'न्' बद्दल 'ण्' घालतात तर नागपूरच्या भाषेंत ह्याच्या उलट 'ण्' बद्दल 'न' घालण्याची प्रवृत्ति आहे. उदा०—कोण, [ वऱ्हाडी ] कोन; पाणी, पानी.

४ 'ल' आणि 'न' हे दोन्ही वर्ण परस्परांसाठी भविष्यकाळांत येतात. उदा०—मी मारीन—मी मारील. तो मारन—तो मारल.

५ इ, ई व ए ह्या स्वरांच्या पूर्वीचा 'व्' अस्पष्ट उच्चारिला जातो. कधीं कधीं त्याचा लोपहि होतो. उदा०— विस्तू—इस्तु. वीस—ईस. वेळ—येळ.

६ 'व्ह' चा उच्चार 'भ' असा कधीं कधीं करतात. उदा०—नव्हते—नभते.

## प्रत्ययप्रक्रिया

अन्त्य दीर्घ स्वर असेल तर त्याला ह्रस्व करण्याची लकब वऱ्हाडी भाषेंत असल्याचें वर सांगितलेंच आहे. ह्या लकबीचा परिणाम असा झाला आहे की, नपुंसकलिंगी एकवचनी जें 'एँ'कारान्त रूप असतें तें बऱ्याच ठिकाणीं

'अ'कारान्त होतें. उदा०—'पोरगें' ह्याचें रूप 'पोरग' असें होतें. 'माणसें' ह्याचें रूप वऱ्हाडी भाषेंत 'माणस' असें होतें. आणि असें 'अ'कारान्त रूप झालें म्हणजे साहजिकच त्याला विशेषण लागलें म्हणजे तें विशेषण मात्र नपुंसकलिंगी अनेकवचनांत न राहतां पुंल्लिंगी अनेक वचनांत राहतें. उदा० 'चांगलीं माणसें' (पुणेरी) 'चांगले माणसे' (वऱ्हाडी). अशा प्रकारचा लिंगासंबंधी घोटाळा चान्दा, अकोला येथील कुणबी, चान्दा, भण्डारा येथील गोवार ह्या लोकांच्या भाषेंत व त्याचप्रमाणे बालाघाट येथे वापरांत असलेल्या मऱ्हेटी भाषेंत व रायपूरच्या मऱ्हाटी भाषांत फार आढळून येतो. पुंलिंग आणि नपुंसकलिंग असा फरक मराठी आणि गुजराती ह्या दोन भाषांमध्येंच प्रामुख्यानें दिसतो. हिंदीमध्ये फारसा नाही. तेव्हा ह्या दोहोंमधील दुवा वऱ्हाडी भाषा सांधते. एकारान्त नपुंसकलिंगी नामांमधील 'ए' चा 'अ' करण्याची लकब पुणेंसाताऱ्याकडील ग्रामिक भाषांमध्येंहि-विशेषतः मराठ्यांच्या बोलीमध्यें—आढळून येते.

विभक्तिप्रत्ययः—नागर मध्यवर्ती भाषेंतच जे विभक्तीचे प्रत्यय आहेत तेच वऱ्हाडी भाषेंत आहेत. ध्यानांत ठेवण्यासारखे फरक पुढीलप्रमाणे आहेत. व्याकरण—चतुर्थीचा जो 'ला' प्रत्यय पुण्याकडील भाषेंत सररहा वापरण्यांत येतो तसा वऱ्हाडी भाषेंत दिसत नाही. त्याच्याऐवजी 'ले' हा प्रत्यय वापरण्यांत येतो. उदा०--'बापाला' असें रूप न करतां 'बापा-ले' असें रूप वऱ्हाडी भाषेंत सर्वमान्य झालेंच आहे.

अनेकवचनाच्या प्रत्ययांपूर्वी 'ही' किंवा 'ई' हा एक आगम येत असतो. उदा.--बापांस (पुणेरी), बापाईस किंवा बापाहीस (वऱ्हाडी). माणसांना (पुणेरी), माणसाइले (वऱ्हाडी).

## सर्वनामें

सर्वनामांच्या कांही विभक्तींचीं रूपें चमत्कारिक होतात. पुरुषवाचक—द्वितीया—मज, मजले, मले. ('ले' प्रत्यय 'ला' बद्दल वापरतात). तृतीया—तुवा, त्वा, त्या. षष्ठी—माह्या (माझा), तुह्या (तुझा). पुणेरी भाषेंतील माझा, तुझा हीं रूपें वापरलीं जातात.

दर्शक सर्वनामः--पुणेरी भाषेंत 'जो, तो' यांचीं जीं रूपें होतात

तींच वऱ्हाडी भाषेंत होतात. स्त्रीलिंगी एकवचन मात्र 'हे, ते, जे' अशीं रूपें होतात. काव्यामध्यें, जुन्या भाषेमध्यें, जुन्या पत्रव्यवहारांत स्त्रीलिंगी एकवचनी रूप 'ए'कारान्तच आढळून येतें. उदा.--कळावें हे विनंती ह्या पत्रव्यवहाराच्या मायन्यांत मात्र थोडासा ह्याचा अवशेष राहिला आहे.

प्रश्नार्थक सर्वनाम:--' काय ' ह्याचीं पंचमीचीं रूपें--काव्हून, काहून, काम्हून ( का म्हणून >काम्हून>काव्हून>काहून ) अशीं होतात.

## क्रियापदांचे प्रत्यय

पुणेरी भाषेंतील क्रियापदांचीं सामान्य रूपें शिष्टांच्या वापरांत आहेतच. त्यांशिवाय जीं रूपें वापरांत प्रामुख्याने नेहमी आहेत तीं हीं. उदा.--मी मारतों; मी मरतों; मी म्हणीन; मी असल; मी करीन; मी असीन; द्वितीय पुरुष आणि तृतीय पुरुष ह्यांचीं एकवचनांत रूपें सारखींच होतात. उदा० — तूं आहे, तूं गेला; तो आहे, तो गेला.

त्याचप्रमाणे भूतकाळांतीलहि द्वितीय पुरुष आणि तृतीयपुरुष अनेकवचनाचीं रूपें सारखींच होतात. खानदेशी व नगरी भाषेंत असाच प्रयोग होतो. उदा०— तुम्ही गेले; ते गेले.

वर्तमानकाळ ०— हो धातूचीं प्रथमपुरुष एकवचनाचीं रूपें— मी आहें, - आहे, - व्हय. अशीं होतात.

कर धातूचीं--१ मी करतों, तूं करतो - स, तो करतो, ते करतात.

धातूरूपाची एक चमत्कारिक गोष्ट नमूद करण्यासारखी आहे. द्वितीय व तृतीय पुरूषांचीं एकवचनाचीं रूपें आणि तृतीयपुरुषी अनेकवचनाचीं रूपें सारखींच होतात व त्यांच्यामध्ये लिंगभेद नसतो. दोन्ही लिंगीं रूपें सारखींच असतात. उदा०-- तू राहतेस ; तो येते ; तो करत्ये. ते करतेत; ते जातेत.

वऱ्हाडी भाषेंत प्रथमपुरुषी क्रियापदाच्या लिङ्गाबद्दल जरासा चमत्कारिक प्रयोग आहे. उदा ०—' मी जातो ' असा पुंल्लिंगी प्रयोग स्त्रियांच्या तोंडीं सहज येतो. पुण्याकडील भाषेत हाच स्त्रीलिंगी प्रयोग "मी जातें--त्यें " असा होईल. संस्कृतमध्ये ज्याप्रमाणे ' अहम् गच्छामि ' हा प्रयोग तिन्ही लिंगीं सारखाच राहील. यांत कांही फरक होणार नाही.

परंतु मराठीमध्ये ' जात ' हें (धातूसाधित) कृदन्त विशेषण असल्यामुळे तें विशेष्याप्रमाणे बदललें पाहिजे. परंतु वऱ्हाडी मराठींत तें बदलत नाही. ह्या चमत्कारिक प्रयोगाला संस्कृतचा अवशेष असें म्हणतां यावयाचें नाही. असलेच प्रयोग मिरज, कोल्हापूर, इसलामपूर इकडे जैन स्त्रियांच्या बोलण्यांत येतात. वऱ्हाडचा टापू तेलगूच्या जवळ व कोल्हापूरचा टापू कानडीच्या जवळ असल्यामुळे हा प्रयोग तेलगू व कानडी ह्या द्राविडी भाषांच्या संपर्काचा परिणाम असला पाहिजे हें उघड आहे. द्राविडी भाषेत क्रिया-पदाचें रूप कर्त्याप्रमाणे प्रथम पुरुषांत बदलत नाही. उदा०-मी जातें = नेनु वेळ्ळु पोता (तेलगु); नानु होगुत्तेने (कानडी).

द्राविडी भाषांचा संसर्ग आणखी इतर प्रयोगांतहि दृग्गोचर होतो. " मी गृहधंदा विसरली " असा प्रयोग होतो. तसेच ' तो काम केला ' असाहि एक कर्मणि प्रयोग होतो. हे द्राविडी भाषेचे परिणाम होत.

आज्ञार्थ :— द्वितीय पुरुषीं एकवचनांत रूपें ' य ' कारान्त होतात. उदा ०– जाय, खाय, पाह्य, (देशस्थ ब्राह्मणांच्या बोलण्यांत एका-क्षरी धातूच्या बाबतींत आज्ञार्थ द्वितीय पुरुषी अनेकवचनीं रूपें– जावा, खावा, अशीं होतात).

भूतकाळ :— रीतिवर्तमानकाळाचा उपयोग भूतकाळाप्रमाणे होतो. उदा० — मी म्हणे. ज्ञानेश्वरींतील रूपांसारखीं 'ओ' कारान्त रूपेंहि क्वचित् प्रसंगीं आढळून येतात. उदा ० — मी निजों (मी निजत असे). अक-रणरूपांत पुणेरी भाषेंत जी ' इ ' येते, तिच्या ऐवजी वऱ्हाडी भाषेंत ' ए ' येतो. उदा ० — तो जायेना < जाईना (पुणेरी). तो देयेना < देइना.

साधा भूतकाळ पुणेरी भाषेंतील भूतकाळाप्रमाणेच सिद्ध होतो. "म्यां मारलें " ह्याच्या धर्तीवर द्वितीय पुरुषीं " त्या मारले " (तूं मारलेंस) असा प्रयोग होतो. कोंकणी भाषेंत ज्याप्रमाणे 'म्यां सांगितलेन किंवा सांगितलेनि, केलेनी, वाचलेनि', अशीं 'न'कारान्त किंवा 'नि'कारान्त रूपें होतात. त्या-प्रमाणे वऱ्हाडी भाषेंतहि ' नि ' कारान्त व बाहुल्यानें ' न ' कारान्त रूपें आढळतात. उदा० — धाडलन, सांगितलन, (भूतकाळ).

धातूच्या रूपाच्या शेवटीं जो ' न ' किंवा ' नि ' येतो त्याची

उपपत्ति तीन निरनिराळ्या मार्गांने लावतात. १ रूपाच्या शेवटीं जो अनुनासिक आहे त्यापासूनच 'न' किंवा 'नि' आला असण्याचा संभव आहे. २ किंवा ती सता तृतीया असण्याचा संभव आहे. उदा०- तेन कृतेन > त्यानें केलेनि; तेन संख्यातेन > त्यानें सांगितलन-नि. ३ किंवा वऱ्हाडी भाषेच्या बाबतींत पूर्व हिंदीच्या संसर्गानें आला असण्याचा संभव आहे.

ह्या तिन्हींपैकी दुसरी राजवाड्यांनी दिलेली उपपत्ति विशेष ग्राह्य दिसते, कारण ती वऱ्हाडी व कोंकणी ह्या दोन्ही भाषांत रूढ आहे.

प्रयोगांच्या बाबतींत वऱ्हाडी भाषेंत आणि पुणेरी भाषेंत फारसा फरक नाही. कर्तरि, कर्मणि, भावे हे तिन्ही प्रयोग पुणेरी भाषेप्रमाणेच वापरतात. छिन्दवाडा, भण्डारा, बालाघाट ह्या बाजूकडील ग्रामिक भाषेंत कर्मणि आणि कर्तरि ह्यांचा घोटाळा झालेला दिसतो. उदा० —'मी पाप केलों, तो काम केला, मी नाहीं मारलों, तीच मारलीं' असे चमत्कारिक प्रयोग कर्मणि आणि कर्तरि ह्या दोहोंमध्ये होणाऱ्या संभ्रमामुळ झालेले आढळून येतात. कर्मणि प्रयोगाप्रमाणे तृतीयान्त कर्ता असून क्रियापदाचें रूप कर्माप्रमाणे बदलावयास पाहिजे, परतु तें तसें बदलत नाहीं.

कर्मणि व कर्तरि प्रयोगांतील हा घोटाळा उडण्याचें कारण म्हटलें म्हणजे बोलणाऱ्यांचा संबंध 'तेलगू' भाषा बोलणाऱ्या लोकांशीं येतो हें होय. कारण हाच संभ्रम कोल्हापूर, मिरज, इसलामपूर इकडील प्रांतांतील लोकांच्या बोलण्यांत कानडीच्या सहवासानें येतो. डॉ. ग्रियर्सन् म्हणतो त्याप्रमाणे हा परिणाम पूर्वी [ हिंदी ] भाषेच्या सान्निध्याचा नव्हे. तसें असतें तर महाराष्ट्राच्या दक्षिणेस कानडीच्या परिसरावर तोच घोटाळा दिसता ना.

भविष्यकाळ—ह्या काळाचीं कांही रूपें उल्लेखनीय आहेत. पुणेरी भाषेंतील सामान्य भविष्याचीं रूपें ह्या भाषेंत सापडतात. १ मी मारल; २ आम्ही मारूं; ३ तू मारसीन; ४ तुम्ही मारसान [ कुणबी ]; ५ तो मारील; ६ ते मारतीन. पहिलें, तिसरें, चौथें व सहावें हीं रूपें ध्यानांत ठेवण्यासारखीं आहेत.

कृदन्तें मध्यवर्ती भाषेप्रमाणेच होतात. उदा०—चारणें; चारावें.

राखणें; राखावें. द्वितीया--चारण्यास, चारायास. राखण्यास, राखायास.

ह्याच कृदन्तांना दुसरे प्रत्यय ज्या वेळेस लागतात त्या वेळेस त्यांचें 'अंग' या--आ--अय--कारान्तच तयार होतें. उदा० —चाराय—ले [ चारायला ]; राखावा—ले [ राखावयाला ]; करा—ले [ करावयास ].

पुणेंसाताऱ्याकडील कुणबाऊ भाषेंत जसा 'शानि' हा शब्द ल्यबन्ताच्या पुढे वापरला जातो तसाच वऱ्हाडी भाषेंतहि तो वापरला जातो. उदा०—करूनशान, धावूनशान, म्हणूनशान इत्यादि. 'ऊन' प्रत्ययाच्या ऐवजी 'ओन' वर्ध्याच्या बाजूस वापरतात. उदा०—म्हणोन, करोन, जाओन इत्यादि. अशींच रूपें कोंकणी भाषेंत व जुन्या मराठींत आढळून येतात.

## हळबी

१३५ वऱ्हाडीचे जे प्रांतिक भेद वर सांगितले आहेत त्यांमध्ये हळबी भाषेचा उल्लेख प्रामुख्याने केला पाहिजे. ही भाषा बोलणारे जे हळब लोक आहेत त्यांची संख्या एक लक्षावर कांही हजार असून ते मध्यप्रांतांतील बस्तर आणि कणकेर ह्या संस्थानांत व चांदा, रायपूर, भण्डारा ह्या बाजूच्या आसपास पसरले आहेत. मध्यप्रांताच्या बाहेरहि कांही ठिकाणीं हळबी लोकांच्या तुरळक वसाहती आहेत. मद्रास व रायपूर येथील हळब लोक गोण्डांपैकीच आपणा स्वतास समजतात तर भण्डारा येथील हळब आपला आणि गोण्डांचा कांही संबंध नाही असें तितक्याच जोराने सांगतात. ओढया प्रांतांतील राजांच्या तैनातींत हळब लोक सेवाचाकरी करून राहत. मानववंशशास्त्राच्या दृष्टीने हळब लोकांबद्दल बरेंच मतवैचित्र्य दिसून आलें तरी भाषाशास्त्राच्या दृष्टीने ते मूळचे अनार्य एतद्देशीय असून त्यांनी आर्यभाषा स्वीकारिल्या आणि भाषेबरोबर आर्यांचा धर्महि स्वीकारला. हळबी लोकांच्या भाषेंत मराठी, ओरिया आणि छत्तिसगढी या तीन भाषांचें मिश्रण आढळून येतें. शब्द हिंदुस्तानी आणि त्याला प्रत्यय मात्र मराठी लावण्याची पद्धत हळबी भाषेंत आहे. "मी देखलों नाही" अशा प्रकारचे अर्धे मराठी आणि अर्धे हिंदी असे घेडगुजरी प्रयोग वापरतात. "मी नाहीं" हे मराठी शब्द, 'देख' हा हिंदी शब्द आणि त्याला 'लो' हा भूतकाळचा मराठी प्रत्यय. शब्दाचा भरणा हिंदी असला तरी त्यांना ज्या अर्थी

प्रत्यय मराठी भाषेतील आहेत त्या अर्थी हळबी भाषा ही हिंदीची उपभाषा न समजतां मराठीची उपभाषा समजणें हें जास्त सशास्त्र आहे.

स्वरांच्या उच्चाराच्या बाबतींतहि हिंदी आणि मराठी ह्या भाषांतील उच्चारांची सरमेसळ हळबी भाषेत झाली आहे. मराठीपेक्षा छत्तीसगढीकडे ओढा फार आहे. अ आणि ओ व ऐ आणि उइ हे एकमेकाबद्दल येतात. उदा:— बलो, बोलो; मइ, मुइ.

तालव्य व्यंजनांचा उच्चार हिंदी तालव्यांप्रमाणे होतो. मराठी तालव्यांप्रमाणें होत नाही. 'ण'चा उच्चार मध्यप्रांतांतील उच्चाराप्रमाणे 'न' होतो. 'व'चा उच्चार 'ब' होतो. वेळ > येळ > बेर.

नामाची लिंगें दोनः— पुंल्लिग आणि स्त्रीलिंग. वचनें दोनः— पैकीं अनेकवचन 'मन' हा शब्द एकवचनाच्या रूपांपुढे ठेऊन तयार होतें. उदा०— बाबामन, टूनमन. विभक्तिः— नामाचें सामान्यरूप होत नाही नामाच्या साध्या अंगाला विभक्तिप्रत्यय लावतात. मुख्य विभक्तिप्रत्यय पुढीलप्रमाणे आहेत. चतुर्थी—के. पंचमी—ले, लगे—ले. षष्ठी—चो, के सप्तमी—में, ने.

ह्या भाषेतील सर्वनामांचीं रूपें ध्यानांत ठेवण्यासारखीं आहेत.

| | | |
|---|---|---|
| प्रथम पु. | मुइ, मुइँ, मई, मइ, में | आमी, हममन |
| द्वितीय | तुइ, तुइँ, तू | तुम, तुमी |
| द्वितीया | मोके, मके | तुके |
| षष्ठी | मोचो, माचो, अमचो, आमर | तुचो, तोर, तुमचो, तुमर |

इतर सर्वनामें:— तो, ये, जे, जो, जउन, कोन, (काचो—षष्ठी), काय.

क्रियापदें:— क्रियापदांचीं रूपें लिंगाप्रमाणें बदलत नाहीत. 'ना' हें अव्यय पादपूरणार्थ लावतात. उदा०:— तूचो नाव काय आये ना ! जाव ना. जाँव ना. मुई हिण्डले ना. मारण्डे ना.

वर्तमानकाळाचीं रूपें:— उदा—आसे—आसू, आसीस—आसस, आसे—आसत.

भूतकाळांत 'ल' प्रत्यय लागतो. उदा:— मुइ गेलों—गेला, तुई गेला—गेलीस, मुइ होले, तुई होला—होलीस, इ.

भूतकाळ साधण्याचा आणखी एक प्रकार आहे. 'ब' प्रत्यय लागून भूतकाळ सिद्ध होतो. उदा:- मइँ करबेसे; मोके मारबा आसत.

भविष्यकाळ:- ह्या काळांत 'दे' किंवा कधी कधी 'ते' प्रत्यय लागतो. उदा:- मइँ, मारेन्दे, मारून्दे, बोलेन्दे, देदे.

आज्ञार्थ:- प्रत्यय नाही. उदा:- बस, जा, आस, दियस, देस, मारस, आनास.

ह्या वरील विवेचनावरून हें कळून येईल की, हळबी भाषेमध्ये कांही नाही तरी तीन चार भाषांचें मिश्रण दिसतें. 'आमर तुमर' ह्या रूपांत बंगालीचा अवशेष दिसतो. षष्ठीचा 'च' प्रत्यय व भूतकाळाचा 'ल' प्रत्यय ह्या दोहोंत मराठी भाषेचा अवशेष दिसतो. शब्दांचे उच्चार, नामाच्या विभक्तींचीं रूपें ह्यांमध्ये छत्तीसगढी भाषेचा ठसा दिसतो. उरिया भाषेचाहि कांही संपर्क भूतकाळाच्या रूपांत दिसतोच. ह्याशिवाय द्राविडी भाषांचे अवशेष दिसून येतात ते निराळेच. ह्यावरूनच ह्या भाषेला मराठीची पोटभाषा म्हणावी किंवा नाही ह्याविषयीं विद्वानांना शंका आहे[1].

वऱ्हाडी भाषेतील शब्दविशेष खाली दिले आहेत.

अवंदा ( यंदा ); अढाऊ ( लुच्चा ); आहना ( उखाणा ); इंधन ( सर्पण ); उळा ( हरभरा ओला व भाजलेला ); कल्हा ( गलबला ); कीर ( रेघ ); कुंड ( कामटीचें तयार केलेलें व रोगण लावलेलें बुरडी भांडें ); खावरी (दुधादह्यासाठी मातीचें मडकें ); चबरा ( बडबड्या ); घड्याळ ( देवळांतील चिपट वाटोळी घंटा ); टिकसा ( उटणें ); टेर ( तुकडा ); डोलची ( बादली ); डिंगर ( लुच्चा ); तासकी ( लहान ताट ); थायली ( लहान थाळी ); डांग ( झाडाची फांदी ); धकणें ( चालू होणें- गाडी धकली ); तिरपी ( लहानशी खिडकी ); थरी ( दुधावरची साय ); दिवलाणी ( पणती ); धुरकरी ( गाडीवान ); निऱ्हा ( अगदी ); पोहोटा ( गोळा, पुंज-शेणाचा ); बोनें (पक्वान्न); बहिणाई (बहिणीचा नवरा. बहिण + नाहो ); भदे ( मडकें ); पंचाई [ली] ( लोहार ); भान ( जेवण्याचें पान ); वरंडी ( ओळ ); वरपणें ( भुरके मारणें ); वाढई

१ Dr. Grierson L. S. I. 7.

( वर्धकि < सुतार ); सय, साडे, सुडा ( अडकित्ता ); हाड्या ( कावळा ); हातोळी ( लग्न, विवाह— पाणिपीडनम्[१] ).

वऱ्हाडी भाषेतील कांही प्रयोगविशेष नमुन्यादाखल खाली देतों.

अजित होणें (दुसऱ्याकडून पराभव झाल्याचें कबूल करणें). सनकेंत येणें ( एकदम संतापून जाणें). खटाई काढणें ( खरडपट्टी काढणें ). धौशा असणे ( स्त्री मर्दानी व खड्या आवाजाची असली म्हणजे तिजबद्दल वापरतात ). गौर पुजणें ( अनुरूप पत्नी मिळविण्याची खटपट ). पंचांग घालणें ( कांचा मारणें ).मागून पुढून लेक नवरा, बाप बोहरा[२].

## वऱ्हाडी भाषेचे नमुने

१ कोन काई म्हनल तरी मानसान आपलपन सोडु नय. दुसऱ्याच चांगल चोखट असल त घ्याव. पर उठल्या सुटल्या दुसऱ्याच साऱ्या साऱ्च घेन म्हनजे बिलकुल खराब. आता आता पाहाव त मानुस बायको कोनी पाहा ल्हान पाहा मोठी पाहा सगळेच्या सगळेच आपले बहेताउ. दिसंदिस साऱ्याच गोष्टींत भिकारीपन अन् दुबळपन वाढत चालल आहे.

२ जाय उडून रे हाड्या ।
नको करू काव काव
निजते ही पांघरुनी ।
लुगड्याचा माझा शेव.
पाय वजे वजे टाका
गोड गोड ओव्या म्हणा

काय झाल सोनुलीला
रडू कशाच डोळ्यांत
तान्हाग वासरावानी
कशापायीं हा आकांत

३ कोन्या एका मानसाले दोन पोर व्हते. त्यामंधला एक लाह्यना आपले म्हने, बावा, जे जिनगीचा हिसा मले येईल तो दे. मग त्यान त्याले पैसा वाटून देला. मग थोड्या दिसान लाह्यना पोर झाडून पैसा जमा करून लाम मुलकान गेला, अन तथीं उधयेपनान राहून आपला पैसा

१ वि. भि. कोलते, वि. विस्तार ५९; ३, ८.

२ वा. ना देशपांडे, वि. विस्तार ५८-३.

गमावून देला. मग त्यान अवघ खरचल्यावर त्या मुलकात काय पडला. त्यामुये तो खायाले मोताद झाला.

## नागपुरी भाषा.

चिंधु दिवसभर खळयावर होता जेवायास घरि गेला नाहि. संध्याकाळी त्याचि सासु बलाउ आलि पर गेला नाहि. भुक नाहि म्हुन सांगितले. त्या रात्री खळयावर निजला. त्याच्या अंगावर सोन्याच कड, चांदिच कड, सोन्याच्या ४ चंद्रकड्या करदोडा आनि सोन्याचा छल्ला इतक होत.

## रायपुरी भाषा.

काचो मानुषके दू–झन पुतार रहिलो. हुंचो छोटे बाबू बाबासे बोलले, ऐ बाबा धनसे जो माचो बांटा आछे सो मा–चुक देहां तपहर बापुसने हुनाके अपलो धन बाटून दिलो जूगा दिन नो होईला छोटे बाबू बाँटा नीला अरु बडे. घूर गाँव बसूं गेला. हुँथा खराब संगमे दिन काठले आपलो धन उडालो. जब हुन जमा उडावून चुकलो तहपर उन देसे बडो दुकाल पडलो. और हुनहारा कंगाल हुईलों.

## खानदेशी–अहिराणी भाषा

१३३ मराठीच्या पोटभाषांपैकी खानदेशी भाषा ही एक महत्त्वाची पोटभाषा आहे. पुणें, नाशिक जवळील शिष्ट अभिजात मध्यवर्ती मराठीच्या जवळचाच ह्या भाषेचा प्रांत असल्यामुळे तर हिच्या अभ्यासास विशेष महत्त्व येतें. उत्तरेकडे गुजराती भाषेचा आणि हिचा निकट संबंध आल्यामुळे पदोपदीं गुजरातीचा ठसा ह्या भाषेवर उठलेला दिसतो. व ह्यामुळेच ही खानदेशी भाषा मराठी भाषेचा पोटभेद आहे कीं गुजराती भाषेचा पोटभेद आहे ह्यासंबंधी प्रत्यक्ष भाषाकोविदानाहि संशय पडतो. डॉ. ग्रियर्सन यांच्या संपादकत्वाने निघालेल्या भाषाविषयक पाहाणीच्या ग्रंथमालेंतील मराठीसंबंधीच्या भागांत ही खानदेशी भाषा गुजरातीची पोटभाषा म्हणून गणली आहे. ह्या संबंधाचीहि सविस्तर खालील विवेचना-

१ Dr. Grierson L. S. I. 7

वरून होईलच. ह्या भाषेला प्रांतावरून खानदेशी असें नांव पडलें आहे. साधारणपणें ह्या भाषेचें क्षेत्र पूर्व व पश्चिम खानदेश हे दोन जिल्हे, दक्षिणेकडे नाशिक जिल्ह्याच्या उत्तर हद्दीपर्यंत व उत्तरेकडे बऱ्हाणपूरपर्यंत आहे. अशा ह्या विस्तृत क्षेत्रांत हिचा वावर असल्यामुळे व तो सर्व विस्तृत प्रदेश लहान मोठ्या डोंगर पर्वतासारख्या निसर्गनिर्मित अडथळ्यांनी पूर्ण असल्यामुळे ह्या खानदेशी भाषेत ठिकठिकाणीं थोडे फार भाषाभेद आढळून येतात. मराठीच्या ह्या पोटभाषेचे आणखी अनेक पोटभेद झालेले आढळतात. शिवाय, भाषेस स्थैर्य आणण्यासाठी तिच्यांत शिष्टपणा किंवा अभिजातपणा किंवा लेखनिविष्टत्व वगैरे जे गुण असावे लागतात ते ह्या भाषेंत नसल्यामुळे व केवळ बोलीचेंच स्वरूप तिला असल्याने वीस वीस कोसांवर ही भाषा बदलली तर त्यांत नवल नाहीं.

खानदेशचा उत्तर भाग तापी, नर्मदा ह्या नद्या व सातपुडा पर्वताच्या रांगा ह्यांनी व्यापिला आहे. हा प्रदेश म्हणजे भिल्ल, ठाकुर, कोंड, कातकरी, वारली इत्यादि लोकांच्या वस्तीचा प्रदेश. लोकसंख्येंत विशेष भरणा भिल्ल व ठाकुर ह्या जातींचा. ह्यांशिवाय रानटी लोकांत आणखी कोणकोणत्या जाती येऊन मिसळल्या हें सांगणें कठीण आहे. उत्तरेकडील पुष्कळ फिरत्या टोळ्या ह्या लोकांत येऊन मिसळल्या असण्याचा फार संभव आहे. पंजाब, सिंध, मध्यदेशांतील मथुरा प्रांत वगैरे प्रांतांतून आभीर नांवाचे पुष्कळ लोक खाली येऊन ह्या प्रांतांत स्थायी झाले. आभीर ह्या लोकांच्या वसाहतीबद्दल इतरत्र विवेचन जें केलें आहे त्यावरून ह्या पशुचारणजीवी फिरत्या लोकांनी महाराष्ट्राच्या वसाहतींत, भाषेंत, धर्मसमजुतींत, चालीरीतींत किती परिणाम केला हें कळून येईल. खानदेशी भाषेला ती ज्या लोकांकडून बोलली जाते त्या लोकांच्या नांवावरून अहिराणी म्हणजे अहिरांची-आभीरांची भाषा असें नांव पडलें आहे. आभीर किंवा अहीर लोक हे खानदेशांतील वस्तीमध्येच बद्धमूल झाले येवढे नव्हे तर नाशीक, नेमाड, बुलढाणापर्यंत त्यांच्या शाखा पसरल्या. ह्या त्यांच्या विस्तारामुळे अहिराणी भाषेचें क्षेत्र व बोलणाऱ्यांची संख्या पुष्कळ वाढली. खुद्द खानदेशांत अहिराणी भाषा बोलणारे लोक एकंदर लोकसंख्येच्या निम्म्यापेक्षा जास्त आहेत. लोकसंख्या साडेसहा लाखांवर आहे. ह्यांतच

पुन्हा नेमाड, नाशीक, बऱ्हाणपूर वगैरेकडील अहिराणी बोलणाऱ्या लोकांची संख्या मिळविली तर एकंदर आकडा बारा लाखांवर येतो. ग्रियर्सनने हा आकडा खुद्द खानदेशापुरताच जो १२,५३,०६६ दिला आहे त्यांत अर्थात् चूक आहे.

नाशीकच्यावर थोडासा प्रवास केला की, लगेच शिष्ट लोकांच्या भाषेंत देखील पांच दहा शब्दागणीक 'भाऊ' 'बारे' हे शब्द आल्याखेरीज राहत नाहीत. साताऱ्याकडील मराठयांसंबंधी ज्याप्रमाणे सामान्य रीतीने 'कायरे पावण्या' असा शब्दप्रयोग करतात त्याप्रमाणे खानदेशांतील माणसास 'खानदेशी भाऊ' असा शब्दप्रयोग हमखास करतात. त्याचप्रमाणे दुसरी ढोबळ खूण म्हटली म्हणजे 'ळ' काराबद्दल 'य'कार येतो ही होय. उदा०—डोया<डोळा. कावीय<कावीळ. तशीच प्रयोगामधीलहि एक विशिष्ट खूण आहे. चालू वर्तमानकाळ खानदेशी भाषेंत एका साहाय्य क्रियापदाच्या मार्फत साधतात. 'मी करून राहिलों आहे. येऊन राह्यलों, वाचून राह्यलों,' इत्यादि प्रयोग चालू वर्तमान काळाचे वापरतात. तसेच बोलण्यामध्ये आंडोर, डिक्री, कुदीखाणे, अत्राप बश, अखोर, कठे, तठे, खेसर. जोयजे वगैरे प्रांतिक शब्दविशेषहि येतात. खानदेशी किंवा अहिराणी भाषेच्या अशा ह्या ढोबळ खुणा आहेत. सूक्ष्म विवेचन पुढे दिलें आहे.[1]

## स्वरप्रक्रिया

१ 'स' बद्दल 'छ'. उदा.—सोड>छोड; सावली>छावली

२ 'ल' किंवा 'ळ' बद्दल य. मात्र हा लकार किंवा ळकार चवर्गातील व्यंजनाच्या पुढे आला पाहिजे. उदा.—चळचळाट>चयचयाट, जळगांव>जयगांव, झाले>झाय. सर्व ठिकाणीं 'ळ' बद्दल 'य' येतोच. उदा.—नारळ>नारय, केळी>केयी, काळा>काया, पिवळा>पिवया, विळा>विया.

३ 'ण' बद्दल 'न' नेहेमी येतो. उदा.—पानी, वानी, पन.

---

१. पां. मा. चांदोरकर अ. भाषा. भा. इ. स. त्रै. व. ७ पृ. १३७

४ 'र' काराच्या पुढे 'ड' कार आल्यास 'र' बद्दल 'ल' येतो. उदा.–रड्डं>लड्डं, कुतरडे>कुतलडें, परडे>पल्डे, ओरडणें>वलडणें.

५ 'त' बद्दल 'ट' माती<माटी ह्या शब्दांतच फक्त येतो.

६ तालव्य वर्ण मृदु उच्चारिला जातो.

७ आद्य 'वि' बद्दल 'इ' घालतात. उदा.–विचार>इचार, विकत>इकत.

८ महाप्राणयुक्त वर्णांतील महाप्राण गाळतात. उदा.–थी (पंचमी प्रत्यय)>ती, भी>बी.

९ क्वचित् अनुनासिक वापरतात, क्वचित् वापरीत नाहीत. उदा.–भिंत–भीत, चिंच–चीच, उंट–ऊट – हूट.

## प्रत्ययप्रक्रिया

अहिराणींत मध्यवर्ती मराठीप्रमाणे तिन्ही लिंगाचे शब्द आहेत. वचनें दोन आहेत. विभक्तीचे प्रत्यय पुढीलप्रमाणे आहेत.

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा | – | – |
| द्वितीया | ले | सले, हले |
| तृतीया | न्ही, नी, कडतीन, कड, नाकन, वरी | सन्ही–सनी, सकडतीन, सकड सनाकन, सवरी |
| चतुर्थी | ले, से | सले, |
| पंचमी | तिन, थिन; पान | सतिन, सथिन, सपान |
| षष्ठी | न्ह, न्हा, न, नी | सन्ह, सन्ही, सन, सनी |
| सप्तमी | म, मा, मझार | सम, समा, समझार |
| संबोधन | ओ | ओ |

ह्या प्रत्ययांवरून दिसेल की एकवचनाचे प्रत्ययांस 'स' हा 'आगम' लावून अनेक वचनाचे प्रत्यय तयार होतात. हा 'स' संस्कृत सर्व>सव्व>स ह्याचा अपभ्रंश असेल काय? वर दिलेले प्रत्यय लावून 'घर' हा शब्द खाली चालविला आहे.

| | | |
|---|---|---|
| प्रथमा | घर | घर, घरे |
| द्वितीया | घरले | घरसले |
| तृतीया | घरन्हीं॰ वरीनी | घरसन्ही-॰नी-॰वरी |
| चतुर्थी | घरले से | घरसले. |
| पंचमी | घरतीन-थिन-पान-कन | घरसतीन-॰थीन-पान-कन |
| षष्ठी | घरन्ह न्ही न, कन | घरसन्ह-नदा |
| सप्तमी | घरम, घरमा, घरमझार | घरसम-मा |

ह्या रूपांवरून सामान्यरूपासंबंधी एक महत्त्वाची बाब उघड होते. अहिराणी भाषेंत विभक्तिप्रत्यय लावण्यापूर्वी नामाचें सामान्यरूप होत नाही. उदा.—घरले, रामले, रामना, जयगांवमा इत्यादि.

## सर्वनामें

| | प्रथम पुरुष | | द्वितीय पुरुष | |
|---|---|---|---|---|
| प्रथमा | मी | आम्हू | तू, | तुम्हू |
| द्वितीया-चतुर्थी | मले, माले | आम्हले | तुले | तुम्हले |
| तृतीया | मावरी आम्ही, | आम्हनावरी | तु,तवरी,तुनी | तुम्हू,तुम्हनी,तुम्ही |
| पंचमी | मनपान,मानाथीन | आम्हनपान-थीन | तुनपान | तुमपान |
| | मनाथी(ती)न | | तुतुथीन | तुमुनाथीन |
| षष्ठी | मन्ह-ना, नी. | आम्हना-नी | | |
| सप्तमी | मनमा, मनामा | आम्हनामा | तुमा | तुमनामा |

तृतीय पुरुषी तो, ती, तें ह्यांना हे वरचेच प्रत्यय लागतात.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| प्रथमा | तो | त्या | ती | त्या |
| द्वितीया | त्याले | त्यासले | तिले | तिसले |
| तृतीया | त्यान्ही | त्यासनी | तिन्ही | तिसन्हीनी |
| | त्यावरी | त्यासवरी | इ. | इ. |

ह्याचप्रमाणे हा,ही,हें; जो,जी,जें; कोन, इत्यादि सर्वनामें चालवात.

## क्रियापदाचे प्रत्यय

| कर धातूचीं वर्तमानकाळाचीं रूपें | | भूतकाळ | |
|---|---|---|---|
| मी करस | आम्हू करतस | मी के | आम्हू के |
| तूं करस | तुम्हू करतस | तूं के | तुम्हू के |
| तो करस | त्या करतस | त्यानी-तिनी के | त्यासनी के |

एकच रूप तिन्ही पुरुषांत चालतें. त्याचप्रमाणें तिन्ही लिङ्गांत रूपें सारखींच राहतात; लिङ्गाप्रमाणे बदलत नाहीत.

तिन्ही लिङ्गी, तिन्ही पुरुषी व दोन्ही वचनीं एकच रूप आणि तेंहि क्रियापदाचें मूळ रूप वापरल्यानेच भूतकाळ दाखविला जातो. उदा.–मी फेक, तूं टाक, त्यानी टाक इत्यादि.

शेवटच्या अक्षरावर फक्त जोर देतात आणि आज्ञार्थाच्या रूपांपासून त्याला निराळा दाखवितात.

कांहीं धातूच्या बाबतींत मात्र भूतकाळाचीं रूपें थोडींशीं निराळीं होतात. धातु–बोल, जेव, उठ, चाल, पळ, धाव, चढ इ-अकर्मक धातु-उदा.–मी बोल्नु, आम्ही बोल्नुत. तू बोल्ना, तुम्हू बोल्नात. तो बोल्ना, त्या बोल्नात.

अहिराणींत ज्याप्रमाणे भूतकाळांत वरील रूपांत 'न' हा प्रत्यय येतो तसाच मराठीच्या आणखी कांही पोटभाषांतहि-उदा०–कातकऱ्यांच्या भाषेंत, तसेंच रत्नागिरीच्या चित्पावनी भाषेंत, कारवाराकडील भाषेंत, हळबी भाषेंतहि 'न' काराचे 'न, नू, नूत, ना, नी, नात' इत्यादि प्रकार भूतकाळ दर्शक चिन्हें म्हणून येतात.

ह्या 'न' ची उत्पत्ति काय? ह्या 'न' ला मराठीच्या भूतकाळच्या 'ल' पासून निराळा समजून हा द्राविडी भाषांपैकी तेलगू भाषेंतून गुजराती, भिली, खानदेशी वगैरे भाषांत उतरला असावा असें डॉ. ग्रियर्सन यांचें म्हणणें आहे. परंतु हा द्राविडी नसून आर्य असावा असें आम्हांस वाटतें. जुन्या मराठींत दिन्न, दिन्हला, दिन्हली, दिन्हले अशीं रूपें सापडतात. हीं रूपें प्राकृत दिन्न व प्राकृत प्रत्यय 'ल' मिळून झालीं आहेत. 'दान देन्ल' असा प्रयोग सन १४७८ मध्ये लिहिलेल्या ओढियाचा राजा जो पुरो-

रामदेव ह्याने दिलेल्या ताम्रपटांत आहे. तेव्हां हा वरील 'न' प्राकृतोद्भव आहे; द्राविडोद्भव नाही.

## भविष्यकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| मी | करसु | आम्हू | करसूत |
| तू | करशी | तुम्हू | करशात-शाल |
| तो-ती-ते | करी | त्या | करतीन-तील. |

ह्या रूपांच्या बाबतींत मात्र एकवचनांत व अनेकवचनांत पुष्कळ फरक झाला आहे.

संस्कृतमधील भविष्याचा 'स्य' प्रत्यय अहिराणींत आला आहे.

चालू वर्तमान 'करी राह्यना, करीत आहे' हा प्रयोग लक्षणीय व महत्त्वाचा आहे. त्यानी करेलसे (त्याने केलें आहे), तो करस (तो करीत असतो), तो करनारसे (तो करणार आहे).

विशेषणें—नामाप्रमाणेंच त्या त्या पुरुषांचीं व लिंगाचीं असतात.

अव्ययें—अठे, तठे, कठे, जव्हय, जधी, तव्हय, तधी, कव्हय. आन (आणि), न.

शब्दसिद्धि बऱ्याच अंशीं मराठीप्रमाणें आहे.

अहिराणी भाषेचें स्वरूप पुढील त्या भाषेतील गोष्टीवरून कळून येईल.

## श्री रामचंदरनी गोठ

उत्तर हिंदुस्थानमा अयोध्या नावन यक सहेर शे. तठे येक राजा होइ ग्या. त्यान्हं नाव दसरथ व्हत. तो थल्डा होइ ग्या, पन त्याले पोरसोर झाय नी. तव्हय त्यानी काय के, की त्यान्हा जो बाह्मन गुरु व्हता त्याले बलाइसन आन अन "डिकरानी कांही तजवीज आमले दखाडा" अशा त्याना रावन्या किध्यात. बामननी येक उपाय दखाडा. रुसिसरिंग नावना येग रुसी व्हता; त्याले गावमझार लइ येवान ठयरन. तो उना अन त्यानी बराबर मुक्का रुसी बी पन उनात. मंगन सऊ मिइसन सरयु नदीपान यदन क्या. तव्हय काय गंमत झाई की हरीले करन ! कुंडमाथीन काया-काया रंगना अगीन देव निघना. निघीसन, त्यानी दसरथ राजाले परसाद दिधा. राजानी त्याना तिन्ही बायकासले बलाई धाड त्या उन्यात मंग परत्ये-

कले परसादना वाला वाला वाटा पाडिसन दिधा. त्यासनी तो परसाद खादा मंग भाउले सांगु ! तिन्हीसले बी दिन राह्यनात. दिन भरी जावा वर त्यासले चार डिकरा झायात. त्या पोरानी नाव राम, लक्सुमन, भरत आन सतरुघन असा ठवात.

## मराठीचे इतर भेद (मध्यवर्ती मराठी)

१३७ मराठीचे मुख्य प्रांतिक भेद त्यांचे उपभेद येथवर सांगितले. व त्याबरोबर त्यांनी व्यापिलेल्या प्रदेशाचीहि कल्पना दिली. कोंकणपट्टी, वऱ्हाड, नागपूर प्रांत व खानदेश इतका प्रदेश सोडून महाराष्ट्राचा बाकीचा सर्व प्रदेश मध्यवर्ती मराठीने व्यापला आहे. पुणें, नगर, नाशीक, सातारा व सोलापूर हे ब्रिटिश जिल्हे. भोर, अक्कलकोट, फलटण, औंध, कोल्हापूर, सांगली, मिरज, कुरुंदवाड हीं संस्थानें ह्यांनी जें क्षेत्र व्यापिलें आहे त्यांत मध्यवर्ती मराठी बोलली जाते. मध्यवर्ती मराठी किंवा दक्षिणी मराठी ह्या भाषेंत प्रांतपरत्वें उपभेद फारसे पडत नाहीत. कांहीं थोडेसे अत्यंत सूक्ष्म भेद आहेत. नाशीकची मराठी भाषा थोडीशी खान-देशी भाषेच्या वळणावर जाते. तर मुंबईतील मराठी कोंकणी भाषेच्या वळणावर जाते. सोलापूर व कोल्हापूर ह्या प्रांतांतील भाषेंतील शब्द व प्रयोग ह्यांत थोडेसें कानडीचें वळण दिसतें. सातारा, नगर ह्या प्रांतांत देशस्थी मराठी भाषा प्रामुख्याने वावरते. देशस्थी भाषेंत आरंभींच्या ‘अ’ चा उच्चार पसरट करतात. स्वरांच्या उच्चारांत बऱ्याच वेळां महाप्राण ‘ह’ चा उच्चार मिसळतात. व्यंजनांत सुद्धां अल्पप्राण व्यंजनें, महाप्राण व्यंजनाप्रमाणे उच्चारिलीं जातात. आज्ञार्थी द्वि. पु. अनेकवच-नाचीं रूपें ‘जा, खा, गा’ च्या ऐवजी ‘जावा, खावा, गावा’ अशीं होतात. तसेंच ‘आम्हाला, त्यांना’ ह्यांच्या ऐवजी ‘आमास्नी, त्यास्नी’ अशीं रूपें होतात. ‘आहे, होय’ ह्या रूपांचे उच्चार देशस्थांमध्ये ‘हाय्, व्हय’ असे करतात. जातोय, करतोय, बसतोय अशीं प्रथम व तृतीय पुरुषांचीं रूपें होतात. देशस्थ लोक एकंदरींत स्वरांचे व व्यंजनांचे उच्चार विवृत किंवा पसरट करतात. उच्चाराच्या मार्दवाकडे त्यांचें विशेष लक्ष नसतें. प्रांतपरत्वें किंवा जातिपरत्वें असे थोडेसे सूक्ष्म भेद असले तरी मध्यवर्ती मराठी वर दिलेल्या सर्व क्षेत्रांत जवळ जवळ एकाच स्वरूपाची आहे

असें म्हणावयास हरकत नाही. ह्या वरील क्षेत्राशिवाय मध्यवर्ती मराठी कोंकण, मुंबई, वऱ्हाड व नागपूर ह्या प्रांतांत शिष्ट भाषा म्हणून समाजांतील शिष्ट लोक वापरतातच. ग्रंथाची, वाङ्मयाची, अभिजात लेखनाची शिष्ट भाषा म्हणून हीच मध्यवर्ती भाषा वापरतात.

## स्त्रियांची भाषा

१३८ वर जे भाषेमधील प्रांतिक भेद सांगितले त्यांशिवाय आणखी कांही भेद भाषेमध्ये पडतात व तसे ते मराठींत पडलेहि आहेत. ह्यांपैकी एक लैङ्गिक भेद असा आहे. समाजांत भाषा बोलणारे जसे पुरुष असतात तशा स्त्रियाहि असतात व मुलेंहि पण असतात. तेव्हा ह्या तीन घटकांप्रमाणे भाषेंत पुरुषांची भाषा आणि स्त्रियांची भाषा असे दोन प्रकार स्वाभाविकच पडतात. मुलांचीहि भाषा एक निराळीच असते; परंतु तिचा विचार आपण पुढे करूं. प्रत्येक समाजांत स्त्रियांची भाषा ही पुरुषाच्या भाषेहून निराळी असते. निराळी म्हणजे अगदी भिन्न—कांहीहि दोन्हींमध्ये संबंध नसलेला असा प्रकार नसून भाषेचें सामान्य बाह्य स्वरूप एकच परंतु आंतमध्ये सूक्ष्म परंतु पुरुषाच्या भाषेपासून अलग करण्याइतके स्पष्ट असे फरक स्त्रियांच्या भाषेंत असतात.

स्त्रियांची भाषा निराळी असे ह्याला जुन्या काळांतील सुद्धा दाखला मिळतो. आर्यांचा समाज ज्यावेळीं हिंदुस्थानांत स्थायी झाला त्यावेळीं त्यांना स्त्रिया दुसऱ्या समाजांतून घ्याव्या लागल्या. तेव्हा ह्या उपऱ्या आलेल्या स्त्रियांची भाषा अर्थात् निराळी पडली. पूर्वीच्या संस्कृत नाटकांतील पात्रांपैकी पुरुष संस्कृत भाषा बोलत; परंतु त्यांच्या स्त्रिया मात्र प्राकृत शौरसेनी वगैरे भाषा बोलत. आणि ही गोष्ट चांगल्या राजांच्या पत्नींची, अप्सरांची म्हणजे सुसंस्कृत घराण्यांतील स्त्रियांची. समाजात जें कांही प्रत्यक्ष आढळलें असेल तेंच नाटकांत गोवलें असलें पाहिजे. सध्या सुद्धा आपण तीच स्थिति पाहतों.

स्त्रियांची भाषा अशी निराळी होण्यास कारणेंहि पण तशींच आहेत. एक तर वर्णोच्चारांत जी एक स्वाभाविक सफाई पुरुषांत दिसून येते तशी सफाई समान परिस्थितींतील स्त्रियांत नसते. त्यांचा सर्व दैनिक व्यवहार

घरांतच पडल्यामुळे बाहेर उघड्या हवेच्या परिणामामुळे पुरुषाच्या आवा-जाला जो एक मर्दानीपणा आला आहे तो स्त्रियांना कसा येणार ? त्यांचा आवाज जात्याच कोमल व त्यांत ह्या दिवाणखानी संवयीमुळे कोमलत्व जास्तच येतें. वर्णांच्या उच्चारांबाबत स्त्रीपुरुष ह्यांमध्ये पुष्कळ फरक पडतो. स्त्रियांमध्ये दीर्घ उच्चार फार येतात. त्याचप्रमाणे मृदु व्यंजनाचे उच्चार फार, अनुनासिकें फार, द्वित्त व्यंजनें तोडल्याचीं उदाहरणें फार असे कांहीं फरक दिसतात. ' दुष्ट ' साधाच शब्द परंतु ब्राह्मणांच्या शेंकडा ९९ स्त्रिया ' द्रुष्ट ' असा उच्चारतात. तसा बृहस्पतिवार हा शब्द बेस्तरवार, ब्रेष्पतवार, ब्रस्पतीवार असा उच्चारतात.

कांहीं वेळेस त्यांच्या कांही संवयीमुळेहि वर्णोच्चारांत फरक पडतो. त्यांच्या दागिन्यामुळेहि वर्णोच्चार बदलतो. ब्राह्मण स्त्रिया नथ जी वापर-तात त्यामुळे वर्णोच्चार बदलला आहे हे सांगितलेलें पुष्कळांना पटणार नाहीं. महमदी स्त्रिया असाच एक दागिना घालतात. त्याचाहि परिणाम त्यांच्या वर्णोच्चारांवर झाला असला पाहिजे. कांहीं रानटी लोकांत तर स्त्रियांच्या तोंडांत एक लाकडाचा तुकडा घालतात. आता हा लाकडाचा तुकडा त्यांच्या वर्णोच्चारांवर फरक केल्याशिवाय कसा राहणार ?

स्त्रियांची भाषा पुरुषांच्या भाषेहून भिन्न होण्यास त्यांच्या वाटणीस जे सामाजिक निर्बंध आले आहेत तेहि कारणीभूत आहेत. स्त्रियांनी नव-ऱ्याचें, सासऱ्याचें, सासूचें किंवा जीं कोणी वडील माणसें अस-तील त्यांचीं नांवें घ्यावयाचीं नाहीत असा आपल्या समाजाचा निर्बंध आहे. आपल्या हिंदु ब्राह्मण स्त्रीला जर नवऱ्यासंबंधी निर्देश करावयाचा असेल तर 'तिकडे, घरीं, येणें झालें, स्वारी, मालक, सावकार, घनी, यज-मान' इतक्या निरनिराळ्या मार्गानें ती तो निर्देश करील. इतर समाजांत हीच चाल आहे. नवऱ्याचें नांव घेण्याने त्याचें आयुष्य कमी होतें अशी कांहींशी समजूत आहे.

त्याचप्रमाणे स्त्रियांना औचित्यहि राखावें लागतें. कांही विषया-संबंधी पुरुष जितका स्वैर वृत्तीचा उपभोग समाजाच्या दृष्टीने घेतो तितका स्त्रीला घेतां येत नाहीं. हें औचित्य राखण्याकरता कांही शब्द त्या वापरू

शकत नाहीत. शरीराचे अवयवांसंबंधी व शरीरक्रियांसंबंधी कांही शब्द त्यांना उघड उघड वापरतां येत नाही. तसेंच शिव्यागाळीचे नाना प्रकार मोठ्या दिमाखाने मनमुराद वापरण्याचा जसा हक्क पुरुषांचा आहे, तसा हक्क स्त्रियांना नाही. ह्या व इतर अशाच निषेधामुळे स्त्रियांची भाषा एक निराळीच, मृदु, कोमल, सभ्य, उच्चाराच्या दृष्टीने अपभ्रष्ट पण अर्थाच्या दृष्टीने शिष्ट अशी बनलेली असते.

हे जे कांही निर्बंध समाजांत स्त्रियांवर घातले जातात त्यांचा एक फायदाहि आहे. उच्चाराच्या दृष्टीने स्त्रियांची भाषा पुरुषाच्या भाषेपेक्षा ज्यास्त अपभ्रष्ट असूं शकेल. परंतु अर्थाच्या दृष्टीने मात्र स्थिति उलट आहे. पुरुष जी भाषा मनमुराद रीतीने वापरतो तिला निरोध करण्याचें काम स्त्रिया करतात. नवीन प्रकार जो भाषेत रूढ होतो तो पुरुषामुळे, स्त्रियांमुळे नाही. परदेशांत वसाहतीस लोक गेले तर स्त्रिया आपली मातृभाषाच घरीं बोलतील. बाहेरच्या जगाशीं त्यांचा संबंध न आल्यामुळे त्यांच्याजवळचा शब्दसमूहहि बेताचाच असतो. लिङ्गाच्या दृष्टीने तर त्यांची भाषा ‘ जाते, करते, बोलते ’ अशा स्वरूपांत निराळी दिसतेच. स्त्रियांच्या भाषेत सर्वनामें जास्त येतात. ‘तो, मी, ती, ते, आम्ही , ह्यांचाच भरणा फार असतो. स्त्रिया भावनावश तेव्हाच होतात त्यामुळे त्यांच्या वाक्यरचनेवर त्याचा परिणाम फार होतो. लांब, दीर्घ संयुक्त वाक्य, पुष्कळ जें, तें असलेलें वाक्य स्त्रियांच्या बोलण्यांत फारसें येत नाही. त्यांचीं वाक्यें जोडलेलीं असतात पण तीं व्याकरणाच्या दृष्टीने नसून, ती भावनेच्या विकाराच्या जोरावर जोडलेलीं असतात. भावनेचा किंवा विकाराचा जोर जास्त झाला की त्यांचें वाक्य अर्धे सोडलें जातें. त्यांच्या बोलण्यांत अर्धीं वाक्यें अशींच जास्त असतात. एकंदरींत मात्र स्त्रिया पुरुषांपेक्षा जास्त बडबड्या असतात. अगदी उत्तम अप्रतिम पहिल्या वर्गाच्या जरी त्या वक्त्या नसल्या तरी कांही पुरुषांप्रमाणे अगदी ठोंब्याहि त्या नसतात. कांही फारच जलद बोलणाऱ्या असतात. खाली स्त्रियांच्या भाषेतील कांही ठळक शब्द व वाक्प्रचार देतों.

हात्तेच्या, डोंबल, खेटर, बाई, इश्श, जळ्ळं, मेलं, गडे, ग,

अगबाई, इकडे, तिकडे, स्वारी, स्वतः, किनई, कोणीतरी, घरीं (पती-दर्शक), चांडाळ, चावट, बाहेरची, धिंडका, जोगवा, मेला, मांग, मुदलीच, उजवणें, बोलभांड, जम्मत, पुनव, अवस, उट्टे, उणेंपाणें, कांकणभर, कुवारीण, घोडनवरी, चुडेदान, म्हटले, लगीन, सवाष्ण, पोटचा गोळा, जलमभर, दुष्ट, ब्रेष्पतवार, आखाड, पइलटकरीण, पांढरा-पिट्टुक, मामंजी, मागन, भावोजी, वइन्स, न्हातीधुती, पण, मुरवण, विरजण, खिमटा, सुग्रण.

प्रयोगविशेष:—स्त्रियांमध्ये विशेष प्रचारांत असलेले प्रयोग पुढे दिले आहेत. अंगावर विटाळ जाणें, कसेंसेंच वाटणें. कावळा अगर कुत्रें शिवणें, घर पाहणें, जीव तिळ तिळ तुटणें, जिवंत धस्स होणें, बाहेरची बसणें, विटाळ करून घेणें, ओटींत घालणें, ओटींत घेणें, ओटी भरणें, घरीं येणें, दहीभात लिंपणें, देवाला जाणें, लगीन काढणें, सोंवळें घेणें, बोहलें सारवणें, मुखावर वरवंटा फिरणें, मारग मळणें, जीभ रेटेना, मांडीवर घेणें-देणें, नशीबाला आग लावणें, नांव घेणें, पदरांत घेणें, माणसाने काय बोलायचें! कुंकू वाढविणें, थोर करणें, ओटी भरणें, ओवळणी काढणें, काळ्या दगडावरील रेघ इत्यादि.

## मुलांची भाषा

१३९ लिंगभेदांमुळे भाषेंत पडलेले फरक व त्यांमुळे भाषा एक प्रकारची निराळी होते हें वर सांगितलें. ह्या भेदांप्रमाणे वयाचा भेदसुद्धा भाषेमध्ये फरक पाडण्यास कारणीभूत होतो व त्यामुळे मुलांची भाषा व थोरांची भाषा असे फरक पडतात. बालभाषा तर सर्वांच्या परिचयाची असते. नागर भाषे पासूनहि बालांची भाषा निराळी असते. भाषेच्या परिणतींत अथवा अपभ्रंशांत मुलांची कामगिरी विशेष असते. स्त्रिया, खालच्या दर्जाचे असंस्कृत लोक व मुलें हे तीन घटक भाषेंत फरक घडवून आणतात. शब्दाच्या ठरीव उच्चारांपेक्षा कांहीं निराळे उच्चार ह्या तीन घटकांकडून केले जातात. भाषा 'अपभ्रष्ट' ह्या तीन घटकांमार्फतच जास्त होते. संस्कृत भाषा अपभ्रष्ट होऊन ज्या पाली-प्राकृतादि प्रांतपरत्वें भाषा झाल्या त्यांना ह्याच कारणांमुळे "बालभाषा" असें विशिष्ट नांव दिलें गेलें. परंतु कोणतीहि भाषा घेतली तरी तिच्यांत एक बालभाषा—मुलांची भाषा म्हणून भेद असतोच. मुलांच्या भाषेचा

अर्थ लावणें तर पुष्कळ वेळां मुलांच्या प्रेमामुळे, ममतेमुळे मोठ्या कौतुकाचा व करमणुकीचा विषय होतो. मुलें आपला भाव दाखविण्यासाठी कांही उच्चार करतात व नंतर त्याचा अर्थ थोर माणसांना करावा लागतो. व तेच मुलाचे उच्चार व शब्द त्या कुटुंबांत रूढ होतात. थोरली माणसेंहि लडिवाळपणानें आपली शिष्ट भाषा सोडून त्या मुलाच्या भाषेंतच मुलांशीं बोलतात. व अशा रीतीने बालभाषा किंवा पाळण्यांतील भाषा तयार होते[१]. मराठीच्या बाबतींत हा भेद कितपत दिसतो हें पाहूं.

वर्णांच्या उच्चारास लागणाऱ्या इंद्रियांची वाढ जरूर तितकी न झाल्यामुळे म्हणा किंवा वर्णोच्चारांच्या स्थानांची हालचाल तितक्या सफाईदार रीतीने न करतां आल्यामुळे म्हणा, किंवा वर्णोच्चाराचें कौशल्य तितकेसें आत्मसात् न झाल्यामुळे म्हणा, मुलांचे उच्चार थोरांच्या उच्चारांपेक्षा पुष्कळ निराळे असतात. 'क'च्या ठिकाणीं 'ट', 'स', 'च' ह्यांबद्दल 'त'; कठोर व्यञ्जनांबद्दल मृदु व्यंजनें, वर्णाचा लोप, 'ल'च्या ऐवजी 'द' असे वर्ण मुलें घालतात. उदा०- काया < काका < खावयास, मांगु < पांघरूण, तोत < कोट, टाटा < काका; तमता < चमचा, तात < सात, दादु < लाडु, बू < दूध, माई > पाणी.

कांही तरी उच्चार ऐकावयाचे आणि त्याप्रमाणे केव्हा तरी उच्चार करण्याचा प्रयत्न करावयाचा हा खेळ तर मुलांचा सारखा चाललेला असतो. मुलांना प्, ब्, म्, दन्त्य व्यंजनें व आद्य स्वर हे वर्ण लवकर उच्चारितां येतात. सर्व भाषांतील जर मुलांचे शब्द पाहिले तर असें दिसून येईल कीं पितृवाचक शब्द 'प' ने व 'ब' आरंभ होणारे आहेत. उदा०- पितृ, Pater (La) father, Pappa (Eng), व्हाटर Vater, (Ger) बाबा, बाव, (Goth) बाबू (Ital) इत्यादि. मातृवाचक शब्द 'म' ने आरंभ होणारे आहेत. उदा०—मातृ, matr, mātū, (Lati) mutter, (Ger) Amma ante नना, नानी. खाण्यासंबंधीचे सर्व शब्द 'म' नें आरंभ होणारेच असतात. उदा—मम, अम्म, mum, men Monsh. Muning (G) मांस, Mus (Ger) न्यम्म (मराठी) Nyam (Scotch). मुलें आपआपल्या परीने कांही नवीन शब्द फार चमत्कारिक रीतीने करीत

१ Jespersen, Language ch X.

करित असतात. साम्यसंभ्रम ( False Analogy ) हें तत्त्व तर मुलांच्या भाषेंत पदोपदीं आढळून येतें. मुलाला सर्व पुरुष घरांतील वडील माणसेंच वाटतात व त्यांना काका, बाबा असें तें संबोधितें. तसेंच मोठ्या स्त्रिया–चित्रांतील देखील–मुलाला आपल्या आयाबहिणीच वाटतात. म्यंव म्हणजे सव मांजरें, भू भू म्हणजे सर्व कुत्रीं, हम्मा म्हणजे सर्व गायी अशी त्यांची कल्पना असते; मुलांना प्रथम पुरुष सर्वनामाची कल्पना कधी कधी उशिरां येते. आपल्या स्वताच्या नांवानेच तें प्रथम पुरुषाची कल्पना दाखवितें. 'धरलें' हें जसें रूप होतें त्याच धर्तीवर साम्यसंभ्रमाने करले, मरले अशीं रूपें मुलें तयार करतात. व्याकरणाची सर्व कल्पना त्याला दुसऱ्याची भाषा ऐकून त्यावरूनच करावी लागते. नकारार्थी प्रयोग मुलांना लवकर येतात. 'नाही' किंवा 'नको' हे दोन्ही शब्द होकारार्थी प्रश्नाला उत्तरें म्हणून देतांना कांही मुलें आढळतात. 'नको पाहिजे' किंवा 'नाही पाहिजे' असा दुहेरी प्रयोगहि कधी कधी आढळतो. 'प्रश्नार्थक' वाक्येंहि मुलांना लवकर येतात. शब्दयोगी अव्ययांचा उपयोग मुलें फार पुढे करूं शकतात. 'काल, उद्या' किंवा 'वर, खाली' ह्यामधील फरक मुलांना पुष्कळ दिवस कळत नाही. संख्येसंबंधीहि त्यांची कल्पना ठाम नसते. "एक, दोन, तीन, आठ, दहा, बारा, अठरा, वीस" ह्या क्रमाने मोजतांना पुष्कळ मुलें आढळतात

वर मुलांचे भाषेतील कांही शब्द दिले आहेत. ते आणखी पुष्कळ देतां येतील. ह्यांवरून नियम बसविणे तितकेसें बरोबर होणार नाही. शब्दांच्या प्रमाणे त्यांचे प्रयोगहि कांही चमत्कारिक रीतीने बनतात. कांही प्रयोग तर एकाद्या कुटुंबापुरतेंच असतात. मम्म करणें, अंगाई करणें, न्हाई करणें, म्होरी करणें, शीं करणें, गयगय करणें, भूर जाणें, बुडुश करणें इत्यादि. हे प्रयोग सर्वांच्या परिचयाचेच असतील. कोणत्या प्रयोगाला काय अर्थ होईल हें सांगतां येणें मुष्कील आहे.

## मुलांच्या भाषेचे नमुने

१ देंद्या पेंद्या तदा दंदाधदी बाददाया धादा तुदुम् थुदुम् । निघती आवाद धुदुम् थद्दा दोतुद नादावुन देदा । दित्ते तित्ते दिवे दादे नवे नवे तहुंदते घातमात तेदा. [ मायदेव ]

२ गोपशिशु म्हणती—पलिसा ललता हालेनेंचि झालिला पाय। गाला उळोनि पलला सत्व खले नवल कलितसा काय ॥ [मोरो. कृ. वि.]

३ माल्ं नतोग मी तेदे काय तदीद। [यशवन्त]

## गणभाषा

१५० मराठी भाषेंतील जे इतर भेद वर सांगितले त्यांच्या शिवाय 'गणभेद' म्हणून एक आणखी एक भेद आहे. समाजामध्ये निरनिराळे व्यवसाय करणारे जे लोक असतात त्यांच्या व्यवसायांप्रमाणे त्यांच्या भाषेंत शब्दाचे किंवा प्रयोगाचे सूक्ष्म भेद असतात. भाषा मराठीच परंतु निरनिराळे शब्द आले म्हणजे भाषेचें स्वरूप थोडेसें विकृत होतें. ब्राह्मण, मराठे, कुणबी, सोनार, लोहार, सुतार, तेली, न्हावी, बुरूड, चांभार, महार इत्यादि गणांचे त्यांच्या व्यवसायाप्रमाणे शब्द व प्रयोग असतात व ते त्यांचाच प्राचुर्यानें उपयोग करतात. ब्राह्मण म्हटला म्हणजे घृतकुल्या मधुकुल्या, भूयसी, दक्षिणा, चकारी, पकारी, दर्भ, तर्पण, पितृपंधरवडा, आवर्तन, एकादशी–णी, अंगठा देणे असे प्रयोग त्याच्या वापरांत येतात. कुणब्याचे नाडा, सेंदूर, मोट, लावणी, संचणी, मळणें, पाणी पाजणें, बांध घरणें, जमीन धुपणें, मोहोरणें, कीड पडणें वगैरे प्रयोग वापरण्यांत येतात. हरण, सोनसरी, वतनी, गावा, सवाणा, जंतरपट्टी, शेनी, उजळा, ओपसळई, कुंनी, वटंग, उडीद, चकला, गोलपोघर, विंचा, रवाले हे शब्द सोनारांच्या भाषेंत हमखास यावयाचेच. तेल्यांच्या भाषेंत घाणा, चौकट, लाट, ढोक, जांगी, मुडो, नाडवळ, कुपरी, गरबखिळी, हत्ता, शेलु, टोप हे शब्द येतात. न्हावी म्हटला म्हणजे तो 'कारागीर' असून घोकटी, निष्णा, नव्हाणी, नाचकाण, वस्तारा, मिसन हे वापरून पाणी लावून, शिवटून, पाहणारच. सोंच, नेहरा वगैरे करणारच. खुंट, चाई, टक्कल, नरम, राठ ह्याच्याशीं त्यांचा संबंध यावयाचाच. बुरुडाच्या भाषेंत पिटें, कोयता, किंकरें, तट्या, चटई, खुराडी, पाळणा, बेळसा, अढण, झाप, नळा हे शब्द येतात. चेवली, मेस, तारापुरी, उढा, गळू हे कळकाचे प्रकार बुरुडच जाणूं शकतो. चांभारच तेरढा चामड्याचे २८ प्रकार, चपलाचे २४ प्रकार व जोड्याचे ११ प्रकार जाणूं शकेल. फर

घेणें; टीप घालणें; टाच शिवणें; मोठ पाडणें; रेशीम भरणें; गळा घालणें; चक्कर पाडणें; पोताडी बसविणें; धुना घेणें हे प्रयोग चांभाराच्याच भाषेंत येणार. असे सूक्ष्म भेद प्रत्येक गण भाषेंत येऊन थोडासा भाषाभेद उत्पन्न होतो. गणभाषा म्हणजे मूळ मराठीहून अजिबात भिन्न भाषा असा मात्र अर्थ नाही.

## शिष्ट भाषा

१४१ प्रांतिक व कालिक भेदांशिवाय इतर जे किरकोळ भेद भाषेमध्ये दिसतात त्यांचीहि थोडीशी चर्चा केली. ह्या सर्वांमध्ये भाषामंदाकिनीच्या तात्विक स्वरूपाविषयी मात्र कधीहि संभ्रम होण्याचें कारण नव्हतें. प्रत्येक कालामध्ये मुख्य भाषेच्या उपभाषा जरी पुष्कळ असल्या, प्रत्येक प्रांतागणिक जरी निराळी भाषा रूढ असली तरी सर्वसामान्य म्हणून एक भाषा असते. व ती कांही कारणांनी ठरत असते. अशी जी नमुनेदार भाषा म्हणून ठरते ती सर्व उपभाषीयांना समजते. कधी कधी मध्यवर्तीनी जी भाषा तीच ही शिष्ट भाषा ठरते. उदा०— सध्यांची पुण्याची मराठी. कधी कधी एकादी उपभाषा आपल्या गुणामुळे नमुनेदार अशी शिष्ट भाषा बनते. उदा०—यादवकाली विदर्भातील भाषा. कधी कधी समाजांतील एकादा घटक जर संस्कृतीमध्ये इतर घटकापेक्षा जास्त संपन्न झाला तर त्या घटकाचीच भाषा शिष्ट भाषा म्हणून ठरते. उदा०— महाराष्ट्रातील ब्राह्मणांची भाषा जी शिष्ट बनली ती केवळ ब्राह्मणांच्या संस्कृतीमुळेच. एवढी गोष्ट मात्र खरी कीं अशी जी शिष्टभाषा बनते ती तिच्यांत केवळ ओजस्वी अशी ग्रंथनिष्पत्ति होते म्हणूनच बनते. कोणत्याहि भाषेचा, शिष्टत्व, सर्वमान्यत्व येण्यास ती भाषा ग्रांथिक किंवा साहित्यिक बनावी लागते. ‘ शब्दसृष्टीचे ईश्वर’ च आपल्या मातृभाषेला सर्वमान्य अशा पदवीस चढवूं शकतात.

ह्या वरील विवेचनावरून हें दिसून येईल कीं कोणतीहि भाषा शिष्ट भाषा बनणें किंवा बनविणें हें कृत्रिम कार्य आहे. एकाद्या पोटभाषेचा जसा तिच्या निरनिराळ्या क्षेत्रांत सहज विकास होतो तसा ह्या शिष्ट भाषेचा प्रकार नाही. ‘शिष्टभाषा’ जी ठरते ती ग्रंथनिष्पत्ति, राजमान्यता,

संस्कृति इत्यादि बाह्य व कृत्रिम कारणांनी ठरते. तेव्हा भाषेच्या विकासांत किंवा परिणतींत जीं सहजात कारणें असतात तशीं ह्या शिष्टभाषेत आढळून येत नाहीत; म्हणून शिष्टभाषेत फरक फारसे होत नाहीत. ग्रंथाच्या किंवा लेखाच्या ठशांत ही सारखी बसविली असल्यामुळे हिच्या वाढीस अवसर मिळत नाही. उपभाषेत किंवा गणभाषेत जसे फरक होत राहतात तसे शिष्टभाषेत होत नाहीत. परंतु जे कांहीं नवे प्रकार शिष्ट, नागर भाषेत रूढ होतात ते उपभाषांतून किंवा गणभाषांतूनच येतात. शिष्ट किंवा नागर भाषेला पोसण्याची किंवा बाळसें देण्याची जबाबदारी उपभाषांवर किंवा गणभाषांवर पडते.

नागरभाषा किंवा शिष्ट भाषा आणि ग्रांथिक किंवा साहित्यिक भाषा ह्या दोहोंमध्ये थोडासा सूक्ष्म फरक आहे. ग्रांथिक भाषा अधिक ठसावलेली, जखडलेली असते तितकी नागरभाषा--उच्च दर्जाच्या लोकांची का होईना पण बोली असल्यामुळे जखडलेली नसते. ती विकारक्षम असते.

मराठी भाषेच्या बाबतींत नागर मराठीचें क्षेत्र निरनिराळ्या काळांत बदललें दिसतें. यादवकाळांत नागर मराठी सध्या ज्याला आपण मराठवाडा म्हणूं तेथे वावरत होती. यादवाच्या दरबारीं नेवाश्याच्या आसपास तिने आपला वाग्विलास दाखविला. पुढे तेथून थोडें पूर्वेकडे केंद्र झुकलें. पैठणच्या आसपास तिचें विहाराचें क्षेत्र झालें. शिवकालांत महाराष्ट्रांत चहूंकडेच खळबळ झाल्यामुळे पंढरपूरपासून साताऱ्यापर्यंतच्या टापूंमध्ये नागर मराठी वावरूं लागली. पुढे पेशवेकालापासून मात्र पूर्वेकडील नागर मराठीचे विहारक्षेत्र पश्चिमेकडे ओढलें. देवगिरी, बीड, पैठण, पंढरपूर इकडे नागर मराठीचें क्षेत्र होतें तें पेशवेकालांत जें पुण्यास आणिलें तें अद्यापपर्यंत तेथेच आहे. नागर मराठी ही ओजस्वी वाङ्मयाची भोक्त्री आहे. तें जेथे सापडते तेथे तिला वावरण्यास सुख वाटतें. ह्या मध्यवर्ती मराठीची वर्णप्रक्रिया व तिचें व्याकरण ह्या बाबी पुढील प्रकरणांत विवेचिल्या आहेत.



# परिशिष्ट

| मध्यवर्ती | कोकणी | कारवारी | चित्पावनी | वऱ्हाडी | नागपुरी | खानदेशी (अहिराणी) |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | संख्या वि. | | | |
| एक | येक | एक | एक् | येक | एक | एक |
| दोन | दोन | दोनी | दोन | दोन | दोन | दोन |
| तीन | तीन | तीनी | तीन | तीन | तीन | तीन |
| पांच | पांच | पांच | पांच | पांच | पांच | पाच |
| दहा | धा | धा | दाहा | दहा, धा | दाहा | दस |
| वीस | वीस | विस | वीस | ईस, वीस | ईस, बीस | बीस |
| शंभर | शेंबोर | शंभरी | शंभर | शंभर, शंबर | शंभर | सो, शंभर |
| | | | सर्वनामें | | | |
| मी | हांव | हॅांव | मे | मी | मी | मी |
| आम्ही | आमी | आम्मी | आम्ही | आमि | आम्ह | आम, आपन |
| माझे | मोजें | मगेले | माझों, माझीं, माझें | माहा | माहा, माझा | मन |
| आमचे | आमचें | आमगेले | आमचा | आमचा | आमचा | आमून |
| कोण | कोण | कोणु | कोण | कोन | कोन | कोन |
| | | | नात्याचे शब्द | | | |
| बाप | बापुइ | बापूसु | बापूस | बाप | बाप | बाप |
| आई | आवइ | आवसु | आईस | माय, मा | माय | मा, आई, माय |

| मनुष्य बायको | मुनिस बाइल | मनुष्यु बाइल | माणूस बायको | मानुस बायको | मानुस बायको | मानुस, मणीस बाई, बायको, नवरी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ तुझें नांव काय ? | १ तुजें नांव किर्तें ? | १ तुगेल नांवँ इत्ते ँ ? | १ तुझाँ नावँ किताँ ? | १ तुह नॉव काय हाय ? | १ तुझा नाव का आहे ? | १तुन्हा नाव काय आहस ? |
| २ त्याचा भाऊ त्याच्या बहिणीपेक्षां उंच आहे. | २ ताचो भाव ताच्या बइणीवोर्ने उबार आसा. | २ तागेलो भावु तागेल्या बहिणीपेक्षां लांब आरस. | २तेचो भाऊस तेच्या बेहणीपेक्षां उंच से. | २ त्याचा भाऊ त्याच्या बाहिणीहून उचा आहे. | २ त्याचा भाऊ त्याच्या बहिणीहून उंच आहे. | २ तेना भाई तेने बहीनस ऊच स. |
| ३ त्याची किंमत अडीच रुपये आहे. | ३ ताचें मोल अडीच रुपोइ आसा. | ३ ताझे मोल अडेच रुपये. | ३ तेची किंमत अडीच रुपये से. | ३ त्याच मोल अडीच रुपये आहे. | ३ त्याची किंमत अडीच रुपये आहे. | ३ तेने किमत अडीच रुपया स. |
| ४ माझा बाप त्या लहान घरांत राहतो. | ४ माझो बापुइ त्या धाकट्या घरां आसा. | ४ मागेलो बापुसु त्या सानाँ घरांतु राबता. | ४माझो बापुस ते धाकटे घरांत रेह्चे. | ४ माह्य बाप त्या लहान्या घरांत राहते. | ४ माझा बाप त्या लहानग्या घरांत राहते. | ४ मना बाप धाकले घरमे रहना. |
| ५ माझ्या पुढे चाल. | ५ मोज्या मुकार चाल. | ५ मजेइदूर चंक. | ५ माझें पुढाँ चाल. | ५ माह्या सामने चाल. | ५ माझ्या सामने चाल. | ५ मन मोरे चाल. |

१ Dr. Grierson L. S. I, 7.

## प्रकरण ७ वें

# मराठीची वर्णप्रक्रिया

१४२ महाराष्ट्रीय लोक— विशेषतः समाजांतील वरच्या थरांवरील— हे उच्चारशुद्धीबद्दल प्रसिद्ध आहेत. प्राचीन काळच्या आर्यांचे उच्चार जर यथायोग्य कोठे उमटविले जात असतील तर ते दक्षिणेंत. उत्तर हिंदुस्थानांतील सध्या जे लोक प्राचीन आर्यांचे वंशज म्हणून आपणांस म्हणवितात त्यांच्यामध्य अगदी वरच्या थरांवरील सुसंस्कृत असे ब्राह्मण जातींतील जरी लोक घेतले तरी त्यांच्या उच्चारांत महाराष्ट्रीयांच्या उच्चारांइतकें शुद्धत्व असलेलें आढळून येत नाही. ह्याचीं कारणें कांहीहि असोत. आर्यभाषांच्या वर्णोच्चारांत परकीय भाषेतील वर्णांच्या उच्चारांची जी सरभेसळ गुजरात, पंजाब, बंगाल, संयुक्त प्रांत वगैरे ठिकाणच्या भाषांत झाली तितकी सरभेसळ मराठी बोलणाऱ्यांच्या भाषेंत झाली नाही. वैदिक उच्चार हे जसेच्या तसे मुळाबरहुकुम महाराष्ट्रांतच ऐकण्यास सापडतात. वेदांतील एकच ऋचा निरनिराळ्या प्रांतांतील विद्वानांना म्हणावयास सांगावी म्हणजे त्यांच्या उच्चारांत किती फरक पडतो हें दिसून येईल. बंगाली एका तऱ्हेने म्हणेल तर गुजराती पंडित दुसऱ्या तऱ्हेने तर महाराष्ट्रीय त्या दोहोंपेक्षा निराळ्या तऱ्हेनेच म्हणेल व त्यावरून महाराष्ट्रीयांची उच्चारशुद्धि पारखतां येईल.

महाराष्ट्रीयांची उच्चारशुद्धि किंवा शुद्ध उच्चार करण्याची शक्ति पारखण्यास आणखीहि एक गमक आहे. कोणतीहि परकी भाषा आत्मसात् करून तिच्या वर्णोच्चाराच्या बाबतींत तद्भाषीयांच्या मूळ उच्चारांबरहुकुम उच्चार उमटविण्यांत महाराष्ट्रीयांचा हातखंडा आहे. जुन्या काळांत महाराष्ट्रीय पारसनिवीसांनी खुद्द महमदीय फारशी पंडितांना लाजविलें. त्याचप्रमाणे वर्तमानकाळीं इंग्रजी शुद्ध वर्णोच्चार करण्यांत दुसरा कोणताहि परप्रांतीय मनुष्य महाराष्ट्रीयांशीं बरोबरी करूं शकत नाही. अस्खलित वक्तृत्वांत महाराष्ट्रीय मागे पडतो हें खरें आहे. गुजराती, हिंदी, बंगाली वगैरे

भाषा बोलण्यांत खुद्द त्या त्या प्रांतांतील लोकांपेक्षा बरचढ जरी नाही तरी त्यांच्या बरोबरीने महाराष्ट्रीय मंडळी राहतील, हें बोलणें जरी अभिमानाचें दिसलें तरी अतिशयोक्तीचें नाही हें खास. संस्कृत, प्राकृत व मिश्र अपभ्रंश ह्या अवस्थांमधून मराठीपर्यंत जे उच्चार आले व ते येतांना कोणकोणकोणत्या तत्त्वानुसार आले हें खाली मराठीच्या वर्णप्रक्रियेंत विशद केलें आहे.

१४३ मराठीमध्ये वर्णांची संख्या ४९ मानिली आहे. त्यांमध्ये स्वर आणि व्यंजनें ह्यांचा अन्तर्भाव होतो. स्वर व व्यंजनें ह्यांच्या उच्चारभेदांप्रमाणे त्यांचे वर्ग केले आहेत.

उच्चार करतांना तोंड, फुप्फुसें आणि घशाजवळ असलेली आवाजाची नळी ह्या तिघांचा संबंध येतो, फुप्फुसांतून श्वास किंवा हवा नळीच्या वाटें तोंडांतून बाहेर पडते आणि निरनिराळे आवाज उत्पन्न होतात. हवा बाहेर पडतांना आवाजाची नळी कधी अकुंचित होते तर कधी प्रसरण पावते व त्याप्रमाणे उच्चार सूक्ष्म किंवा मोठे होतात. ह्यांना संवार व विवार असें म्हणतात. अ, इ, उ हे संवृत उच्चार आणि आ, ई, ऊ, ए, ओ हे विवृत किंवा पसरट उच्चार होत.

उच्चारांचे दोन वर्ग पडतात. १ साधे उच्चार व २ जोड अथवा संयुक्त उच्चार. साधे उच्चारहि शुद्ध साधे व मिश्र असे दोन प्रकारचे असू शकतात. स्वरांपैकी अ, इ, उ हे शुद्ध साधे उच्चार व ए, ओ, ऐ, औ हे मिश्र साधे उच्चार होत. त्याचप्रमाणे आ, ई, ऊ हे दीर्घ उच्चारहि मिश्र साधे उच्चारच होत. व्यंजनांच्या बाबतींतहि क्, ग्, च्, ज्, त्, द्, ट्, प्, वगैरे हे शुद्ध साधे उच्चार होत तर ख्, घ्, छ्, झ्, थ्, ध्, ठ्, ढ्, फ्, भ् हे उच्चार त्याच्यांत महाप्राण मिसळला असल्यामुळे मिश्र साधे उच्चार होत. त्या उच्चारांना कांही मराठी वैयाकरण संयुक्त उच्चार मानतात[1]. परंतु तें पाणिनीच्या मांडणीविरुद्ध असल्यामुळे त्याचा विचार येथे कर्तव्य नाही. संयुक्त उच्चार आपल्या पूर्वीच्या स्वराला द्विमात्रक करतो तसे हे महाप्राण उच्चार करूं शकत नाहीत त्याअर्थी ते साधे उच्चार आहेत हे उघड आहे[1].

---

१ जोशी म. व्याकरण पृ. १४

व्यंजनें उच्चारतांना तोंडांतून बाहेर पडणाऱ्या श्वासास कंठ, तालु, मुर्धन्, दात, ओठ ह्यांपैकी कोणाकडून तरी अडथळा होता. स्वरासारखा अप्रतिहत असा उच्चार बाहेर येत नाही. व्यंजनें उच्चारितांना असा अडथळा येतो म्हणून किंवा बाहेर पडणाऱ्या हवेचा स्पर्श कंठ, तालु, मुर्धन, दांत, ओठ इत्यादिकांना होतो म्हणून व्यंजनांना स्पर्श असें म्हणतात. ह्याप्रमाणे सर्व व्यंजनें स्पर्श आहेत. त्यांचे उच्चारस्थानाप्रमाणे कंठय, तालव्य, मूर्धन्य, दन्त्य, ओष्ठ्य, हे पांच मुख्य प्रकार आहेत. स्पर्शांमध्ये किंवा व्यंजनांमध्ये कांहीच्या बाबतींत अडथळा थोडा होतो, पूर्ण होत नाही. अशा व्यंजनांना ईषत्स्पृष्ट व्यंजनें म्हणतात. उदा०–य् र् ल् व् अन्तस्थ हे, व श् ष् स् ह् हे ऊष्मे. कंठांतून ज्यांचा उच्चार निघतो त्यास कंठ्य उच्चार म्हणतात. उदा०–अ, आ, क्, ख्, ग्, घ्, ङ्, ह्. ज्या वर्णांचा उच्चार होतांना जीभ दाताच्या लगत तालूला स्पर्श करते त्या वर्णांस तालव्य म्हणतात. उदा०– इ, ई, च्, छ्, ज्, झ्, ञ्, य्, श्. ज्या वर्णांचा उच्चार होताना जिभेचा स्पर्श तालूच्या मध्यभागीं वर होतो त्यांस मूर्धन्य म्हणतात. उदा०– ऋ, ॠ, ट्, ठ्, ड्, ढ्, ण्, र्, ष्. ज्या वर्णांचा उच्चार होतांना जीभेचा स्पर्श दातांना होतो त्या वर्णांस दन्त्य वर्ण म्हणतात. उदा०–त्, थ्, द्, ध्, न्, स्. ज्या वर्णांचा उच्चार होतांना दोन्ही ओठांचा परस्परास स्पर्श होतो त्या वर्णास ओष्ठय वर्ण म्हणतात. उदा०–उ, ऊ, प्, फ्, ब्, भ्, म्. कांही वर्ण असे आहेत की त्यांचा उच्चार होतांना वरील पैकी दोन अवयवांचा स्पर्श होतो. उदा०–कंठतालव्यः—ए, ऐ. कंठौष्ठय-ओ, औ. दन्तौष्ठ्य-व.

व्यंजनांच्या पांची वर्गांपैकी प्रत्येक वर्गांतील पहिलीं दोन कठोर व शेवटचीं तीन मृदु व्यंजनें आहेत. त्याचप्रमाणे पहिलें आणि तिसरें व्यंजन ह्यांस अल्पप्राण व दुसरें व चौथें व्यंजन ह्यांस महाप्राण ('ह' मिश्रित) व शेवटच्या व्यंजनास अनुनासिक म्हणतात. उदाः—

अल्पप्राण व्यंजनें— क् ग् च् ज् ट् ड् त् द् प् ब्
महाप्राण व्यंजनें— ख् घ् छ् झ् ठ् ढ् थ् ध् फ् भ्

---

१ कृष्णशास्त्री गोडबोले म. व्या. पृ. १५

अनुनासिकें— ङ् ञ् ण् न् म्
अर्धस्वर— य् र ल् व्       महाप्राण–ह्
ऊष्म—       श् ष् स् ळ्

एकंदर वर्णांपैकी अस्सल मराठींत ऋ, ऌ, ॠ, ञ्, ङ् हे वर्ण फारसे वापरांत नाहीत. 'क्लृप्ति' ह्या शब्दांतच फक्त 'ऌ' चा संबंध येतो. तत्सम शब्दांतच हे वर्ण आढळतात. तेव्हा हे मराठींत न मानले तरी शब्दघटनेंत विशेष आपत्ति यावयाची नाही.

१४४ मराठीच्या मूळ स्वभावांत असे कांही उच्चार आहेत की ते संस्कृत वार्णीत नव्हते. ज्यांत पूर्ववर्ण अनुनासिक आहे व उत्तर वर्ण 'ह'कार आहे असे संयोग संस्कृतवार्णीत नाहीत. परंतु असे वर्ण मराठी वार्णीत पुष्कळ आहेत. उलट मराठींत 'ह'काराचा पूर्वावयव म्हणून अनुनासिकांशीं किंवा अर्धस्वरांशीं संयोग होत नाही. उदा०–प्राह्ण, चिह्न, ब्रह्म, बह्वर्थ, ह्रास, बिह्लण. हे संस्कृत शब्द मराठींत पुढीलप्रमाणे उच्चारतात. प्राण्ह, चिन्ह ब्रम्ह, बव्ह्रर्थ, ऱ्हास, बिल्हण.

संस्कृतांत अनुनासिक व अर्धवर्ण यांचे महाप्राण वर्ण नाहीत. ते मराठींत आहेत. उदा०– कण्हेर, पन्हे, म्हाळसा, नव्हे, तऱ्हा, वल्हे. ह्याला अपवाद फक्त 'य' काराचा. 'य' चा महाप्राण मराठींत आढळत नाही. व त्याचा पूर्व वर्ण या नात्याने 'ह' काराशीं संयोगहि होत नाही.[1]

'य' कारयुक्त पण साधे उच्चार मराठींत पुष्कळ आहेत. हे उच्चार स्पष्टपणे ध्यानांत येण्यासहि अडचण असते. पद्य पुण्य, अच्युत शल्य ह्या संस्कृत शब्दांतील 'य' मिश्र उचार तेव्हाच स्पष्टपणें ध्यानांत येतो. परंतु 'अग्या वेताळ', 'चामड्याच्या वाद्या', 'पुण्याच्या हवेल्या', 'सख्या सख्याच्या फुगड्या' इत्यादि प्रयोगांतील 'य' कार युक्त उच्चार साधेच आहेत, पण तितके स्पष्ट रीतीने ध्यानांत येत नाहीत. केवळ वर दिलेल्या बाबतींत 'य' मिश्रत्व प्रतीत होतें असें नाही तर मराठींत बरेच वर्ण 'य' मिश्रित उच्चारण्याची लकब आहे. दन्त्यतालव्य वर्ण तर जुन्या लिखाणांत 'य' मिश्र लिहिलेले आढळतात ( उदा:–विच्यार, च्यार छ्याया, प्रपंच्यांत राजियास, झ्याप वगैरे ). 'य'कार मिश्रत्व ऊष्म्यां

१ भिडे म. भा. इ.

मध्ये सुद्धा प्रतीत होतें. ऊष्म्यांच्या उच्चारांत तालव्यत्व येतें. 'स' चा उच्चार 'श' असा होतो. उदा०-ठसा-ठशास, मासा-माशास. अशा, कशास, इत्यादि.

मूर्धन्य उच्चारांपैकी 'ट' च्या उच्चाराच्या बाबतींतहि मराठीची विशेष लकब दृष्टोत्पत्तीस येते. 'ट' चा उच्चार कांही वेळां नरम तर कांही वेळा कडक असा मराठींत केला जातो. हे वर्ण शब्दाच्या आरंभीं किंवा अन्तीं येऊन द्वित्त झाले किंवा त्यांच्या मागे अनुनासिक असला तर त्यांचा उच्चार कडक व ठसठशीत होतो, पण ते जर इतरत्र आले तर त्यांचा उच्चार नरम व ओझरता होतो. उदा०-टपका-अटप. टाईप-पटाईत, डकणें-अडकणें, ढका-चढण, खड्डा-खडा, खोण्ड-खोड, कण्ठ-कठडा. अशा तऱ्हेच्या शब्दयुग्मांच्या उच्चारांची चांगली पारख व तुलना केली असतां वर निर्दिष्ट केलेला भेद लक्ष्यांत आल्यावाचून राहणार नाही. 'ड' हा वर्ण शब्दाच्या आरंभीं असता याचा उच्चार शुद्ध 'ड' सारखा होतो. परंतु शब्दाच्या मध्ये अथवा शेवटीं असला तर शुद्ध 'ड' उच्चारतेवेळेस जितकी जीभ टाळयावर दाबावी लागत्ये तितकी न दाबता मध्येंच किंचित पसरावी लागते, उदा०-डाग आणि बडबड ह्या दोहोंत उच्चार सारखा नाही.[1] साधे मृदुवर्ण मूर्धन्यासारखे कठोर उच्चारण्याकडे मराठी बोलणाऱ्यांची प्रवृत्ति आहे. उदा०—

दागदोजी > डागडोजी, तङ्कचाई > टण्चाई, दानादान > दाणादाण, पानीयम् > पाणी, तनाव > तणाव, दाघ > डाग, तप्पा > टप्पा, टर्बूज > तबुंझ, दफ > डफ, दौल > डौल, देहलीज > ढेलज, दुहुल > डोल, त्वंच > टंक, टच; स्तिव् > टिव, टिक; स्तन् > ठण, तनतनित > टणटणित, ताल > टाळी, तालु > टाळू, स्थान > ठाण, तस्कर > ठाकूर, दंश > डंख, दुल > डोल.

मराठी कोशांतील मूधर्न्य व्यंजनाने आरंभ होणारे शब्द तपासले तर त्यांपैकी बरेच शब्द द्राविडी भाषांतूनच मराठी भाषेंत आले आहेत. त्यांमध्ये संस्कृतोद्भव असे शब्द फार कमी आहेत असें आढळून येईल.

---

१ दादोबा-मराठी भाषेचें व्याकरण पृ. ८

# मराठीची वर्णप्रक्रिया

१४५ उदाहरणें अनुक्रमें आद्य, मध्य, अन्त्य अशा दिलीं आहेत.

## (१) स्वर

### ह्रस्व स्वर

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| मराठी | अ, | संस्कृत | अ | पासून. | अटकळ-अन्तर्कल्प, अधास-अध्याश उजव-उपयम, उपट-उत्पथ, ओंगण-अंजन, हिलग-अभिलग. |
| ” | अ | ” | आ | ” | गढणें-गाह, हसड-आसाद, ओढ-उपधा |
| ” | अ | ” | इ | ” | चादि-चाति-चाड. |
| ” | अ | ” | उ, ऊ | ” | आकळ—आकुल, आघळ—आघूर्ण, अधण-अध्यूष्ण. |
| ” | अ | ” | ऋ | ” | कस-कृष, आकडि-आकृष्टि. |
| ” | अ | ” | ओ | ” | कावळा-काकोल, काजवा-खद्योत. |
| ” | इ | ” | इ | ” | चिंब-स्तिमित, हिसपिस. |
| ” | इ | ” | उ | ” | उकिडवा-उत्कुटुक. |
| ” | इ | ” | ऋ | ” | किरमिजी-कृमिज, किणव-कृपा. चिरड—चृत. |
| ” | इ | ” | ए | ” | शिरक-स्रेक, इलेपिले-इलप्रेल. |
| ” | इ | ” | यि, वि | ” | आवाई-आव्हायिका, इवळणें--इलव, विलप. |
| ” | उ | ” | उ | ” | उडणें-उदन, उचक-उत्स्कु, उलथा-उदस्त. |
| ” | उ | ” | अ | ” | उमाळा-ल्हाल-म्हल, चुकार-चाक्मर्य, हुळहुळ-व्हलव्हल. |
| ” | उ | ” | ऋ | ” | उजु-ऋजु, कुरतुड-कृततुद्. |
| ” | उ | ” | ओ | ” | हुक-होक-ओख. |
| ” | उ | ” | अव | ” | उखाड-अवस्खद, उगम-अवगम. |

## दीर्घ स्वर

मराठी आ संस्कृत अ पासून. आखणें-अक्ष, आडमुठ-अर्धमुग्ध.
उतावळा-उत्तापिल.
" आ " अं " आकांत-आक्रंद, इंबारा-अमरव,
आतबट्टा-अंतर्भ्रष्ट.
" आ " आ " आत्या–आत्तिका, हासड–आसादय,
उजवा-ऋजियाना.
" आ " ऋ " माख-मृप, आहार-आहृर.
मराठी ई संस्कृत ए पासून. अवीट अवेष.
" ई " य " आडनीड-अधन्यर्ध.

## संयुक्तस्वर

" ए " अ " अखेरी-अक्षर.
" ए " इ " घेणें-घिण, जेरी-जिरि, मेंदा-मिंद.
" ए " ऋ " केविल–कृपिल–कृपण.
" ओ " अ " नोख-अन्वक्ष, ओंगण-अंजन,
मोसड-मत्स्य.
" ओ " उ " ओढव-उपघाव, ओकारी-उद्गारिका,
ओसंग-उत्संग.
" ओ " ओ " ओकें-ओख्य, पोंच-प्रोच्छ.
" ओ " औ " सोट-शौट, जोड-यौट.
" ओ " अव " ओणव-अवनम, ओघळ-अवघर,
आरोळी-आरावली.

## ( २ ) व्यंजनें

### अल्पप्राण कठोर

मराठी क संस्कृत क पासून कच्चर-कत्र, काल-कल्य,
" क " ख पासून काजवा-खद्योत, ओकें-ओख्य, हुक-
ओखहोक.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मराठी | क | संस्कृत | ग | पासून | ओकारी-उद्गारिका, ऐक-अइकअ-अतिगमय, ठक-स्थग, सरक-श्रग. |
| ,, | क | ,, | घ | ,, | शिंक-शिंघा, |
| ,, | क | ,, | च | ,, | सडक-सध्र्यंच, चुक-युच्छ. |
| ,, | क | ,, | प | ,, | भेकड-भ्रेषट, झाक-झप, चक—चष. |
| ,, | क | ,, | क्ष | ,, | किस-क्षिप, सडकणें-सटकणें-संतक्ष. |
| ,, | क | ,, | ह | ,, | डुक—द्रुह. |
| मराठी | च | संस्कृत | च | पासून | चपाटी-चप्ति, चिरड—चृत, आचव-अच्यव, उडच-उदंच. |
| ,, | च | ,, | छ | ,, | चुरा-छुरः, चढणें-छर्दन, पिच-पिच्छ, चेचणें-छेदन. |
| ,, | च | ,, | ज | ,, | चोंळ-जोलय, चोज-जोष, टोंच-तर्ज, खच—क्षज. |
| ,, | च | ,, | त | ,, | च-त्यत्, तेथचा-तत्रत्यः, उचकट-उत्कट |
| ,, | च | ,, | त्स | ,, | अंगचोर-अंगत्सर, उचक-उत्स्कु. उचंबळ-उत्संप्लव. |
| ,, | च | ,, | स्त | ,, | चिंब-स्तिमित. |
| ,, | च | ,, | य | ,, | चुक-युच्छ, डच-दय्य. तेच-व्यय. |
| ,, | च | ,, | श | ,, | चिंब—श्विद्, चापच—स्पश्. |
| ,, | च | ,, | ष | ,, | पचपचित—पृषत्पृषत, बोच-व्युष. |
| ,, | च | ,, | स | ,, | चिड-सिट, चापस-स्पश, चमक-मचक-मस्क, चिव-स्यम. |
| मराठी | ट | संस्कृत | ट | पासून | टाऊक-टौक, अवटळ-अवट्वल, उष्टें-जुष्ट, काट-कंट. |
| ,, | ट | ,, | ष्ट | ,, | उमट-उन्मृष्ट, आतबट्टा-अन्तर्भ्रष्ट, ओंटा-उपष्टंभ. |
| ,, | ट | ,, | त | ,, | टांग-तंग, टकटक-तकतक, टोच-तर्ज. टांच-तंचा, सटक-स्तक. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मराठी | ट | संस्कृत | थ | पासून | उपट-उत्पथ, कट-क्कथ, सनाटा-सनाथ, मेट-मेथ. |
| ” | ट | ” | द | ” | टक-दुक, कडवट-कद्वद. |
| ” | ट | ” | त्य | ” | टाक—त्यज. |
| ” | ट | ” | र | ” | उस्कट—उस्कर—उपस्किर. |
| ” | ट | ” | ष | ” | अवीट-अवेष, चाट-चर्ष, वीट—इष. |
| मराठी | त | संस्कृत | त | पासून | तोफ-तुफा, तोड-तुद, तांबडा-ताम्र, उसंत-उपशांति. |
| ” | त | ” | द | ” | आकांत-आक्रन्द. |
| मराठी | प | संस्कृत | प | पासून | इलेपिले-इलप्रेल,उपडा-उत्पाद, कप्पा-कल्प, आटोप-आतुप. |
| ” | प | ” | फ | ” | आटोप-आतुफ. |
| ” | प | ” | भ | ” | ओरप-वरप-वल्भ, थोप-स्तोभ, चेप-सिभ. |

महाप्राण कठोर

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मराठी | ख | संस्कृत | क | पासून. | आंखणें—अंक, खरड कृष्ट, खिळणें—कील, खुर्दा-कुर्द. |
| ” | ख | ” | घ | ” | खुष-घृष, जखड-जघट. |
| ” | ख | ” | क्ष | ” | खप-क्षप, क्ष्वेल, खवडा,निरख-निरीक्ष नोख-अन्वेख. |
| ” | ख | ” | ष | ” | वखवख-वृषवृष, जोख-जोष, पुरुखा-पुरूष, माख-मृष. |
| ” | ख | ” | स्क | ” | खप-कंभ, खुड-स्कुद, उखाड-उत्स्कद |
| मराठी | छ | संस्कृत | छ | पासून. | छड-छृद, छुप्यो ( पाणी )—छुप. |
| ” | छ | ” | च | ” | छाछु-चहु-चह. |
| ” | छ | ” | श्र | ” | छानणें-श्राण. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मराठी | ठ | संस्कृत | ट | पासून. | ताटळ–ताटल्य, दिठ-दृष्टि. |
| " | ठ | " | ठ | " | वठ–उठ, कुठ-कुंठ. |
| " | ठ | " | ढ | " | आडमूढ-अर्धमूढ. |
| " | ठ | " | त | " | ठोक-त्रोक, ठोक–तुघ–तुद, ओठंब–उस्तंभ. |
| ,, | ठ | ,, | थ | ,, | आठव-अर्थय, पाठव–पृथ, पथ, पाठव–पंथय. |
| मराठी | ठ | संस्कृत | स्थ | पासून. | ठकव-स्थगय, ठर-स्थिर उठल-उपस्थित, उठाव-उत्थाप. |
| मराठी | थ | संस्कृत | त | पासून. | थयथय–तयतय, चोथा-चोत, थारा–त्राय, सुथार-सुत्राण. |
| ,, | थ | ,, | स्त | ,, | अवथणें-अपस्तन, ओथंब-उस्तंब, थोप-स्तोभ. |
| ,, | थ | ,, | थ | ,, | कुथ-कुथ-कुंथ-कुंथ. |
| मराठी | फ | संस्कृत | प | ,, | फोफस-पोस्फूर्च्छ, फेंक-प्रेंख, फरड–पर्यटि, फोंक-प्रोक्ष. |
| ,, | फ | ,, | फ | ,, | फोड-स्फुटिका, फोडणी-स्फोटनी, फडकाव-काम्य-स्फाल. |
| ,, | फ | ,, | द | ,, | च्फिब-श्विंद. |

**अल्पप्राण मृदु**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मराठी | ग | संस्कृत | क | पासून. | गांगर-गागर-रुकाय-काक, आगाशी–आकाशिका, तग-तक; हिंडगा-हिंडक |
| " | ग | " | ग | " | गुदर-गुर्द, गुडघि-गुडघि, उगारणें–अवगूर्य, उगा-उंगा, हिलग-अभिलग |
| " | ग | " | ङ | " | गोंगाळ-ङोंङूर्य, |
| " | ग | " | घ | " | सांगड-संघात, महाग-महग-मंघ. |
| " | ग | " | ज | " | ओंगण-अंजन, भंग-मञ्ज, भाग-भाज |
| " | ग | " | ह | " | जोगवा-जोहुया, ढीग-दिह. |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| मराठी | ज | संस्कृत | ज | पासून. | जाळ-ज्वालय, जेवण-जेमनी, झोड–जोंहुंड्य, रुज-ऋज. |
| " | ज | " | त | " | अलगज-अलगत. |
| " | ज | " | थ्य | " | कुज–कुथ्य. |
| " | ज | " | ध | " | गांज-गांझ-गंध. |
| " | ज | " | द्य | " | जोत–द्योति, माज–माद्य, काजवा–खद्योत. |
| " | ज | " | य | " | जोड–यौट, उजव–उपयम, वाजव–वायव. |
| " | ज | " | ज्ञ | " | जप-ज्ञप, जाण–ज्ञा. |
| " | ज | " | ष | ,, | भिजव-अभिषव. |
| मराठी | ड | संस्कृत | ट | पासून | उनाड-उन्नाट, अवघड-अवघट, हिरमोड-हृदय-मोट. |
| " | ड | " | ड | " | डुरक-डुरकण, उडाऊ–उड्डायक. |
| " | ड | " | त | " | कुरड-कृत, चिरड-चृत, सांगड-संघात |
| " | ड | " | द | " | उडणें-उदन, उडव-उद्वह, डवच-द्रवस हासड-आसाद. |
| ,, | ड | ,, | ल | ,, | उडाव-उल्लापय, पोपाडा-पल्पूल, उसकड-उच्छकल, उफाड-उत्फाल. |
| ,, | ड | ,, | र | ,, | उडव-ऊर्व, तुडव-तुर्व, खोड-खोर. |
| मराठी | द | संस्कृत | त | पासून | आपद–आपत्ति. |
| ,, | द | ,, | ड | ,, | भेदर-भेड. |
| ,, | द | ,, | थ | ,, | नाद-नाथ. |
| ,, | द | ,, | द | ,, | दल-दल, दबकाव-दर्पकाम्य. |
| ,, | द | ,, | ध | ,, | दणदण-ध्वनध्वन, सरदी-शर्धि. |
| मराठी | ब | संस्कृत | प | पासून | बोल-पोल, कुचंब-कुचम-कुजाव-कृछाप, जाब–जल्प. |
| ,, | ब | ,, | ब | ,, | बध-बध, बोचा-बोस, उबार-उदुबई. |

,, ब ,, म ,, इंबारा-अंमरव, झळंब-संरंभ, कोंब-स्कोंभ, दब-दभ.
,, ब ,, म ,, बोचक-मुंचक, तांबर-ताम्र,आंब-आम
,, ब ,, व ,, बचाव-अवच्याव, बजाव-अवज्याव, बताव-वर्तय.

## महाप्राण मृदु

मराठी घ संस्कृत घ पासून. घोगाव-घोघूय, घड-घट, अवघड-अवघट, ओघळ-अवघर.
,, घ ,, ग ,, घालून-गल्हित्वा, घसर-ग्रस, घडघड-
,, घ ,, ख्य ,, सांघणें-संख्यान, बघणें-बख-बछक.

मराठी झ संस्कृत च पासून. रिझ- ऋच.
,, झ ,, छ् ,, झाड-छष्ट.
,, झ ,, ज ,, झोंक-जुप, झोंब-जंभ.
,, झ ,, झ ,, झाक-झष, झाळ-झलाय.
,, झ ,, ध ,, झोका-धोका-धक्क, झुगार-अयुद्दार.
,, झ ,, स ,, झाड–सारय, झडप-संभ, सुक-सुक-झुळुक-झुरका, झगा-झग.
,, झ व सं ,, झळभ-संरभ, झळक-संलक्ष्य. झपाटा-संपात.

मराठी ढ संस्कृत ठ पासून. काढ-काठ.
,, ढ ,, थ ,, काढानिकाढा-काथानिकाथ.
,, ढ ,, द ,, ढिग-दिह, ढेकर-द्रेक, ढकल-दक्ष.
,, ढ ,, ध ध्व ,, ढापण–अध्यर्पण, ढालक–ध्वालक, ओढव-उपधाप.
,, ढ ,, ह ,, गढ-गाढ-गाह.
,, ढ ,, र ,, गुढि-गुडि-गुरिका.

| | | |
|---|---|---|
| मराठी ध संस्कृत द पासून. | | धक-दघ, धडक-दधृष, धाडस-दार्धष्य, उधान-उद्धन. |
| ,, ध ,, ध ,, | | अंधी-अधिका, धुगी-धुक्षिका, धुडव-धुर्व. |
| मराठी भ संस्कृत ब पासून | | भांबाव-बाभ्राम्य, भुस्सा-बूस, भरार-बई, उभा—उद्वा. |
| ,, भ ,, भ ,, | | भुकाव-बुभुक्षाय, भंग-भंज्ज, भेकड-भ्रेषट. |
| ,, भ ,, म ,, | | भेदर-भ्रेट, भेद-मेट, मरड-म्रद, भिड-मिथ. |
| ,, भ ,, व ,, | | भिस्त-बिसद्धि-विश्रद्धि, भसक-वस्क, निभाव-निर्वाह. |

## अनुनासिक

| | |
|---|---|
| मराठी ण संस्कृत न पासून | ओणव-अवनम, गाहण-अवगाहन इ. |
| मराठी न संस्कृत न पासून | नाद-नाथ, णक्षा-नक्षा-नक्ष, नवस—नमस्य, उनाड-उन्नाड. |
| ,, न ,, न्य ,, | अनमान-अन्यमनाय. |
| मराठी म संस्कृत म पासून | मेज-मेय, मार-मर्व, माळ-मल माज-माद्य. |

## अर्धस्वर

मराठी य आ नंतरच्या ‘ अ ’ पासून—आयना, कायदा, कायम, फायदा, लायक, नायब, सामायन, करतोय जातोय, पडतोय.

| | |
|---|---|
| मराठी र संस्कृत र पासून | रोख-रोधय, उगार-ओगर-अवगर, घोर-घुर, ओरफड-ओरफ. |
| ,, र ,, ल ,, | वरप-वल्भ, फेर-फेल. |
| ,, र ,, ऋ ,, | रागाव ऋघाय, रूज-ऋज. |

मराठी ल संस्कृत द पासून उलथा-उडत्थो-उदस्त.
,, ल ,, न ,, ओलें-उन्न, केविल-कृपण.
,, ल ,, र ,, लोढ-रोध, हूल-हूलि-हूरि-ह्वरि.
,, ल ,, ल ,, लोट-लुट, लचका-लुञ्चिका, उकल-उत्किल.

मराठी व संस्कृत स्वर इ उ पासून विजा-इजा, वेडाव-एलाय, वठ-उठ, वळंघ-उल्लंघ.
,, व ,, क ,, कावळा-काओळा-काकोळ, उकिडवा-उत्कुटक.
,, व ,, त ,, काजवा-खद्योत.
,, व ,, प ,, आस्थावाइक-आस्थापातिक, उतावळा, आवा-आतापक, इवळ-विलप.
,, व ,, व ,, नवस-नमस्य, जेमिनी, आचव-आचम-जेवणी.
,, व ,, व, व्य ,, आवनि-अवनि. वापर-व्यापृ.
,, व ,, व ,, चवा-चर्ब.

मराठी व संस्कृत ह पासून इवा-उहा, निभाव-निर्वाह, आवाई-आह्वायिका.

## ऊष्मे

मराठी श संस्कृत च पासून शेळपट-चिल्लपट.
,, श ,, श ,, शेफार-शिभ, शिक-शिघा, आशाव-आशाय.
,, श ,, ष ,, हिश्श-घिप.
,, श ,, स ,, शिरक-स्रेक.

इकारयुक्त स-काशीद, शिक्का, शिपाई, शिलेदार, खलाशी, वशिला नशीब, मशीद.

मराठी स संस्कृत च पासून सर्पण-चर्पण, सेल-चिल्ल, सोस-च्योस, आक्र-आकुच.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ,, | स | ,, | छ | ,, | सोड-छोर, उपुस-उत्पुच्छ. |
| ,, | स | ,, | ज | ,, | तासड-तजर. |
| ,, | स | ,, | क्ष | ,, | सुरा-क्षुरा, सर-क्षर. |
| ,, | स | ,, | श | ,, | सोनें-शोभन, सराई-श्रयी, सरदी-शार्धि, इव्यास-भव्याशय. |
| ,, | स | ,, | ष | ,, | उसास-उषिष, किसणी-कृषणी, किस-क्षिप. |
| ,, | स | ,, | स | ,, | सोस-च्यूस, सुघड-सुघट, संथ-संस्त, ओसाड-उत्सृष्ट. |
| ,, | स | ,, | सं | ,, | सपक-संपक्क, सतत-संतत, सांघर्णे-संख्यान. |

## महाप्राण

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मराठी | ह | संस्कृत | स्वरा | पासून | हग-अघ, हट्ट-अट्ट, हूक-ओख, हासड-आसाद. |
| ,, | ह | ,, | घ | ,, | हिसपिस-घिषपिस. |
| ,, | ह | ,, | घ | ,, | आहाट-आघाट, ओहळ-अववह. |
| ,, | ह | ,, | भ, व | ,, | कोल्हेहूक-क्रोष्टुबुकन, न्याहाळ-निभालय. |
| ,, | ह | ,, | ह | ,, | हावरा-व्हर, हसें-हसित, हासरा-हस्र, |
| मराठी | ळ | संस्कृत | क | ,, | उतावळा-उत्तापक. |
| ,, | ळ | ,, | थ | ,, | उकळीव-उत्क्थिम, उकळ-उत्क्थ. |
| मराठी | ळ | संस्कृत | ध | पासून. | आबाळ-आबाधा, बरळ-बरड-वृध. |
| ,, | ळ | ,, | ल्भ | ,, | आघळपघळ-आगल्भप्रगल्भ. |
| ,, | ळ | ,, | र्ण | ,, | आघळ-आघूर्ण. |
| ,, | ळ | ,, | र | ,, | झळंभ-संरंभ, गळठ-ग्रंथ. |
| ,, | ळ | ,, | ल | ,, | गुळचट-ग्लुचट, उन्मूळ-उन्मूल; उजळ-अवक्षल; आरोळी-आरावली. |

१४६ मराठीच्या उच्चारांसंबंधी कांही बाबींचा निर्देश ठिकठिकाणीं केलाच आहे. वर्तमान मराठींत संस्कृतप्राकृतद्वारा आर्यभाषेंतील जे उच्चार आले व ते येतांना त्यांचीं जीं अवस्थांतरें झालीं त्यांचीहि कल्पना वर दिलेल्या वर्णनिष्पत्तीच्या तक्त्यांवरून पूर्णपणें येईल, ह्या तक्त्यांवरून स्पष्ट होणाऱ्या मराठीच्या वर्णप्रक्रियेमधील कांही मुख्य बाबींचा निर्देश करतों.

१ मराठींतील पुष्कळ शब्दांतील आंतर व अन्त्य 'अ' पूर्ण उच्चारिला जात नाही. 'अ'च्या ह्या तोकड्या किंवा निभृत उच्चाराचा उल्लेख इतरत्र केलाच आहे. 'अडचण, पितळ, जिवंत, गवत, सरकार' इत्यादि शब्द 'अड्चण्, पितळ्, जिवंत्, गवत्, सरकार्' असे तोकड्या रीतीने उच्चारिले जातात. ह्या 'अ' च्या उच्चारासंबंधी निरनिराळीं मतें आहेत. कोणी म्हणतात ह्या 'अ' चा उच्चार नाहीसा झाला आहे[१]. कोणी म्हणतात हा 'अ' निराघात असल्याने तो द्रुत उच्चारिला जातो[२]. कोणी म्हणतात अन्त्य 'अ' फक्त द्रुत उच्चारिला जातो. इतर ठिकाणीं तो मध्यलय–धड दीर्घहि नाही व ह्रस्वहि नाही– असा उच्चारिला जातो[३]. ह्या तिन्ही मतांत उच्चारविशेष फक्त नमूद केला आहे. परंतु त्याचें कारण तिघांहि विद्वानांनी सांगितलें नाही. आमच्या मतें ह्याची उपपत्ति दोन प्रकारांनी देतां येण्यासारखी आहे. एक तर हा तोकडा उच्चार फारशी भाषेंतील उच्चाराचा मराठीवर झालेला परिणाम असावा किंवा जुन्या आर्यभाषांत स्वराचा खंडित उच्चार करण्याची जी लकब होती तीच मराठींत उतरली असावी.

## व्यंजनें

२ व्यंजनांच्या तक्त्यांवरून असें दिसेल की आद्य व्यंजनांच्या बाबतींत कांही फरक होत नाही.एका अवस्थेंतून दुसऱ्या अवस्थेंत जातांना आद्य व्यंजनें कायम रहातात. कांही शब्दांच्या बाबतींत आद्य व्यंजनांत 'ह' कार येतो किंवा मूळचा असलेला 'ह' कार नाहीसा होतो.

---

१ Bhandarkar, W. P. L. P. 154.

२ Divatia, W. P. L. (Gujrati) ch IV.

३ के ह. ध्रुव–वाग्व्यापार.

३ मध्यवर्ती, आंतर व्यंजनांच्या बाबतींत जे फरक होतात त्यांचे स्थूल स्वरूप पुढीलप्रमाणे आहे.

१ क्, ग्, त्, द्, प्, ब्, य्, व् इत्यादि व्यंजनांचा लोप होतो.

२ ट्, ड्, ह्यांचा 'र्' होतो.

३ ख्, घ्, थ्, ध्, फ्, भ् ह्यांच्याबद्दल 'ह्' येतो.

४ म्, न् ह्यांचा अनुस्वार किंवा अनुनासिक होतो.

५ 'न्, ण्', व 'ल्, न्' ह्यांची आलटापालट होते.

६ श्, ष्, स्, ह्यांची अदलाबदल होते. त्यांचा 'स' होतो.

७ मृदु व कठोर ह्या व्यंजनांचीहि अदलाबदल होते. तरी पण कठोर व्यंजनांना मृदुत्व आणण्याची जी प्राकृत भाषांची लकब तीच मराठीने उचलली आहे.

८ कवर्ग व चवर्ग, तवर्ग व टवर्ग, 'ल्' व 'न्' 'म' व 'वँ', श् आणि च्, छ्, ह्यांच्यामध्ये आलटापालट होते,

९ फ् आणि भ् शिवाय इतर आद्य महाप्राण व्यंजनें तशींच कायम राहातात.

१० अन्त्य व आंतर व्यंजनांच्या पूर्वीचा महाप्राणोच्चार नाहीसा होतो.

११ अल्पप्राण व्यंजनांपासून (पहिलें आणि तिसरें) महाप्राण व्यंजनें (दुसरें व चौथें) तयार होतात. ~~खुशाल~~ < कुशल, खुजा < कुब्ज, घर < गृह, थवा < स्तबक.

१२ मराठीमध्ये दोन 'ल' उच्चार आहेत. एक दन्त्य 'ल' आणि दुसरा मूर्धन्य 'ळ'. प्राकृत व्याकरणांत ह्या 'ल' ची उपपत्ति नीटशी दिली नाही. बरीचशीं उदाहरणें पाहून पुढीलप्रमाणे उपपत्ति ठरते. "प्राकृत-मधील शब्दांमध्ये दोन स्वरांच्यामध्ये 'ल' असेल तर त्याचा मराठींत 'ळ' होतो आणि 'ल्ल' असेल तर त्याचा 'ल' होतो." (हा नियम तत्सम शब्दांना अर्थातच लागू नाही).

१ उदा०—ओळखणें < ओलक्खइ, काळ < काल, काळा < कालअ, गळा < गलअ, गळणें < गलइ, गोळा < गोलअ, डोळा < डोलअ, पळणें < पलइ, फळ < फल, मिळणें < मिलइ, विटाळ < विट्टल.

२ उदा०—अण्डिल < अण्डिल्ल, आंतील < अंतिल्ल, ओला < ओल्लअ, काल < कल्लअँ, घालणें < घल्लइ, चलणें < चल्लइ, चिखल< चिखल्ल, तेल < तेल्ल, फूल < फुल्ल, बोलणें < बोल्लइ, बैल < बइल्ल, भुलणें < भल्लइ, वडील < वडिल्ल.

ज्याअर्थी 'ल' चा 'ळ' पैशाची आणि चूलिका पैशाची ह्या भाषांतहि होतो, त्याअर्थी हा उत्सर्ग फार जुनाच असला पाहिजे. वैदिक काळांत हे उच्चार होते. ह्याच नियमाप्रमाणे इतर आधुनिक बोलींतहि ल चा ळ होतो.[1]

मराठीच्या पहिल्या लेखांत 'ल' च अधिक वापरलेला आहे. पेशवेकालापर्यंत 'ल' च वापरांत असे. नंतर 'ळ' वापरांत येऊं लागला, व 'ल' असें त्याचें चिन्ह वापरूं लागले. ज्याअर्थी 'ळ' पुढे वापरांत आला त्याअर्थी तो तेलगु भाषेंतून आला असावा असें म्हणतात.

१३ 'न्' आणि 'ण्' ह्याना हाच 'ल्, ळ्' चा नियम लागू आहे.

आद्य किंवा आंतर ण् (मूर्धन्य) आणि तद्भव शब्दांतील आन्तर द्वित्त ण्ण ह्यांचा आधुनिक बोलींत 'न' (दन्त्य) होतो. ही प्रक्रिया (हेमचंद्र ८–४–३०६) “णोनः” ह्या नियमाप्रमाणे होते.

उदा०—पर्णक > पण्णऊ > पान, कर्ण>कण्णु>कान, श्लक्ष्ण> लण्ह > लहान, अरण्ण > रण्ण > रान, विज्ञप्ति > विण्णति > विनंती.

'ल' व 'ळ' किंवा 'न' व 'ण' ह्यांमध्ये उच्चारांची अदलाबदल कां व्हावी ? उच्चाराची अदलाबदल होण्याचें कारण हेंच की, दोन्ही उच्चारांचें स्थान व प्रयत्न हे जवळ जवळ एकसारखेच आहेत. 'ळ' व 'ण' हे थोडेसे नरमावून उच्चारिले की 'ल' व 'न' असे उच्चार होतात. मूर्धन्याचें स्थान थोडेसें पुढे दांताकडे ढकललें जातें.

पूर्वीच्या प्राकृतसारख्या बालभाषांत व सध्याच्या ग्रामिक भाषांत 'न', 'ण' व 'ल', 'ळ' ह्या वर्णांचा व्युत्क्रम झालेला पदोपदीं आढळतो. कोंकणांतील ग्रामिक भाषेंत 'ळ' उच्चार बहुधा आढळून येत नाहीं. घाटावरील ग्रामिक भाषेंत यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मणाच्या उच्चारांत 'न' बद्दल 'ण' व कुणबाऊ भाषेंत 'ण' बद्दल 'न' असे फरक झालेले आढळून येतात.

---

1 S. Konow, J. R. A. 1902

'अरे थोरला न म्हन" हें चेष्टेनें वाक्य नेहमी कुणबाऊ भाषेसंबंधी म्हटलें जातें तें त्या उच्चाराचें निदर्शकच आहे.

कारणें कांही का असोत; ह्या दोन्ही जोडींतील वर्णांचा परस्पर व्युत्क्रम होतो हें खास. उच्चारस्थान व उच्चारप्रयत्न ह्यांसंबंधी संभ्रम होणें हेंच त्याचें मुख्य कारण होय असें मानावें लागतें. प्राकृत भाषांपैकी पैशाची भाषेंत व सध्याच्या कुणबाऊ भाषेंत ज्याअर्थी हा उच्चाराचा घोटाळा जास्त आढळून येतो त्याअर्थी अनार्य किंवा द्राविडी उच्चारांचा परिणाम तर हा नसेलना अशी शंका येते.

१४ उच्चारस्थानाच्या दृष्टीनें 'ह' चा उच्चार दोन प्रकारचा आहे. १ कण्ठ्य–उदा :—वहन, दहन, हर्ष. २ औरस्य–उदा०—हूं, हो, हवे, वाहवा. ह्या दोन्ही प्रकारचे उच्चार मराठींत आहेत. संस्कृत शब्दाचे अपभ्रंश होतांना शब्दांतील 'ह'कार शब्दाच्या शेवटाकडे ढकलण्याची प्रवृत्ति प्राकृत व अपभ्रंश भाषांत होती. तीच प्रवृत्ति त्या भाषांवरून मराठी भाषेनें उचलली. उदा०:— स्नान > ण्हाण > नहाण, कृष्ण > कण्हो > कान्हा, श्लक्ष्ण > लण्हं > लहान, अस्मद् > अम्हे > आम्ही, युष्मद् > तुम्हे > तुम्ही.

'ब्राह्मण, ब्रह्म' वगैरे संस्कृत शब्द मराठींत उच्चारतांना 'ब्राम्हण ब्रम्ह' असे 'म्' अगोदर आणि 'ह' नंतर असे उच्चारतात. कांही वेळेस तद्भव शब्दांत हा 'ह' उच्चार मराठीमध्ये गळतो. उदा :— आमचा, तुमचा. ह्या 'ह' च्या उच्चाराच्या बाबतींत हिंदी व गुजराती मराठीपासून भिन्न प्रवृत्तीच्या आहेत. त्या भाषांत 'ह' कार मागे खेंचला जातो. उदा :— ब्हेन, व्हेम, प्हेल इत्यादि[१].

## अनुस्वार

१४७ संस्कृतांत ङ्, ञ्, ण्, न्, म् हीं अनुस्वाराचीं प्रतीकें आहेत; म्हणून बहुतेक नासिक्य उच्चार ह्या पंचम वर्णानें लिहिले जातात. ह्यालाच परसवर्ण म्हणतात. परसवर्ण हा पांच वर्गांतील वर्णांसंबंधानेंच होऊं शकतो.

---

१ Divatia W. P. L. (Gujarati) ch. IV.

य्, र्, ल्, व्, श्, ष्, स्, ह्, ह्या वर्णांसंबंधाने परसवर्ण होत नाही. त्यांतहि श्, ष्, स्, ह्, ह्या वर्णांपूर्वींच्या अनुनासिकांस अनुस्वार म्हणतात. ङ्, ञ्, ण्, न्, म्, ह्या पांची अनुनासिकांपैकी मराठींत पहिले दोन ङ् आणि ञ् हे उपयोगांत येत नाहीत. बाकीच्या तिहींपैकी न् आणि म् हे फार येतात. ण् इतकासा वापरांत नसतो.

आद्य अनुनासिक कायम राहतें. उदा०—नागडा < नग्न; नातु < नप्त्वा, मनुष्य < मनुष्य, मार्ग < मार्ग. प्राकृत 'ण' चा मराठींत 'ण' च होतो. उदा–जण < जन, नेणें < नय्, आणणें < आनयनम्.

आन्तर 'म्',- म् > ँ > ०—ह्या अवस्थांमधून जाऊन शेवटीं अनुच्चारित बनतो. उदा०— नामन् > नाँव > नाव. इ. घरांत, तेथें, सँवय, साँवळा इत्यादि शब्दांतील नासिक्य उच्चार संस्कृतांतील नासिक्य उच्चाराहून निराळा आहे. मराठींतील उच्चार सानुनासिक स्वराच्या स्वरूपाचा आहे, म्हणजे ह्या उच्चाराचा आश्रय संस्कृतांतील उच्चाराप्रमाणे जरी स्वर असला तरी 'व' वर्णयुक्त उच्चार मराठी नासिक्याचा होत नाही. संस्कृत शब्दांतील वर्तमानकालीन नासिक्य उच्चार पाठीमागील व पुढील वर्णांशीं संबद्ध असा असतो, तसा हा मराठींतील नासिक्य उच्चार नाही. तो केवळ पूर्वस्वराश्रित आहे. ह्या त्याच्या स्वभावामुळेच तो उच्चारांतून कधी कधी गळतो. 'साँवळा' हा शब्द 'साँवळा' असा सानुनासिक न उच्चारितां 'साबळा' असा निरनुनासिक उच्चार मुखावाटे निघणें स्वाभाविक आहे. संस्कृतोद्भव शब्दांतील अनुस्वारांचा लोप करण्याकडे सध्या मराठींत प्रवृत्ति होत चालली आहे.उदा.–चंपक>चाँफा >चाफा; गोधूम>गहूँ >गहू; कांस्यकार>काँसार>कासार; जामात> जांवई>जावई; आम>आँव>आव, अमावास्या>आँवस>आवस, इत्यादि.

अशा प्रकारचे अनुच्चारित अनुस्वार मराठीत पदोपदीं आढळतात. नपुंसकलिंगी नामें, विभक्तींचे व क्रियापदांचे प्रत्यय, क्रियाविशेषण अव्ययें वगैरे पुष्कळ शब्दांवर अनुस्वार असतात; परंतु ते कधीहि स्पष्ट उच्चारिले जात नाहीत. उदा.–केलेँ, जाणेँ, मातेँ; नेँ. एँ, शीँ, तँ; तोँ, ऊँ, तां; तेथेँ, जेथँ, आताँ; सध्याँ, एकदाँ.

हे अनुस्वार उच्चारित नसले तरी त्यांना त्यांच्या पाठीमागे शास्त्र, परंपरा, इतिहास व रूढि आहेत. संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश मधील अनुनासिकांची परिणति मराठी अनुनासिकांत झाली आहे. नपुंसकलिंगी नामांवर व विभक्तिप्रत्ययांवर वगैरे येणारे अनुस्वार संस्कृत, प्राकृत, व अपभ्रंश भाषांतील अनुनासिकांपासून आले आहेत. ह्यांची परिणति त्या त्या प्रकरणांत दिली आहे.

मराठी भाषेमध्ये जें सानुनासिकत्व दिसतें तें कोंकणस्थांमुळे आलें आहे असें जें कांही लोक म्हणतात त्याला शास्त्राचा आधार नाही. मराठींतील अनुच्चारित अनुस्वार इकडील चांगल्या देशस्थ कवींनी वापरलेले आहेत. श्रवणबेळगोळच्या शिलालेखापासून ते थेट मोरोपंतापर्यंतच्या काळांतील कोणताहि लेख अस्सल प्रतिमेवरून जर तपासला तर अनुस्वार अनुच्चारित असूनदेखील लिहिले गेल्याचें दिसून येईल. मोरोपंत, श्रीधरस्वामी, तुकाराम, दासोपंत, ज्ञानेश्वर ह्यांच्या तत्कालीन लेखांत अनुच्चारित अनुस्वार लिहिलेले आहेत. तसेंच पंढरपूर, पाटण, दौंड-पळसदेव व श्रवणबेळगोळ ह्या ठिकाणच्या शिलालेखांत अनुच्चारित अनुस्वार वापरलेले आहेत. मराठीच्या जन्मापासून हे अनुस्वार लिहिले जात असत हे जुन्या लेखांवरून सिद्ध आहे. अपभ्रंश भाषेंत हउं, हुं, हांव, ताएं, दोसइं, नराहुं, काइं, जिवँ, तिवँ, तहिं, कहीँ, आएँ इत्यादि शब्दांतील अनुस्वार अनुच्चारित असूनहि लिहिले जात असत. प्राकृत भाषांतीलहि जोईगण, एहीं, वणाइं, ज्जाइं, कुलाइं, वसाहिं वगैरे उदाहरणें ह्याच प्रकारचीं होत. वैदिक भाषेमध्येहि अनुच्चारित वर्ण लिहिले गेल्याचीं उदाहरणें आहेत. मराठीसारख्या ज्या इतर बोली आहेत त्यांच्यामध्येहि अनुच्चारित अनुस्वारांचा प्रकार आहे. उदा.—व्रज—कूं, कौं, कें, कें, ( द्वि. च. ) ने, नें ( तृ. ) मारा कारि हौं, मारि हौं; नैं मैं लौं, सूं. आवढी—कां, कां, सें, कर, में मायाँ. गुजराती—मोढूं, पेहरवुं, हूं, हूंथी, मारमां, तूं, तूंथी, तारांमा. मैथिली-कें, सौं, कर, मां. सिंधी—आं, ओ, आउँ, आं, असीं, तूं, तव्हां. हिंदी—हूं, हूंथी मारमां, अमरामां, तूं, तूंथी, तुजमां, तारमां, तममां, तमारांमा. मैथिली—मैं, तोंह. ओरिया—मुं, तुं.

अशा तऱ्हेने ह्या अनुच्चारित अनुस्वारांना शास्त्र, व्युत्पत्ति, इति-

ह्रास, परंपरा व इतर भाषांचें साधर्म्य ह्या बाबी समर्थनपर आहे. इंग्लिश, फ्रेंच, ग्रीक, लॅटिन ह्या भाषांतहि पुष्कळवर्ण—क्षीणवर्ण किंवा स्त्रीवर्ण अस्फुट असून देखील लिहिण्यांत दाखविले जातात.

अशी वस्तुस्थिति असूनदेखील पुष्कळ वेळां अनुस्वार विनाकारण मध्ये येतात. उदा.-उंट-उष्ट्र, उंच-उच्च, पिंपळ-पिप्पल इ. होत. असल्या उपटसुंभी अनुस्वारांची उपपत्ति वैय्याकरण पुढील सूत्रांनी करतात. 'अनुस्वारो बहुलम्' (प्रा. ल. २–१५) ह्या सूत्राने वंभणो ( ब्राह्मण ), मंजरो ( वंजरो ) विंचुओ, चुंनी, काणं, काहं, नहहिं, संगो भंगो, ह्या अनुस्वारांची उपपत्ति लावतात. " क्वचिद् र्धानुस्वारोऽपि भवति, आणि ' म्हो म्भावः ' ( म = ब + ं = व्ह = भ ) हीं सूत्रेंहि त्या अनुस्वारांना पोपकच आहेत. मराठी भाषेंत ज्यांच्याबद्दल समाधानकारक उपपत्ति देतां येत नाही अशाप्रकारचे अनुस्वार बरेच आहेत. हांस, केंस, धांव कांकडी, जुंवल, जों, तों, असूं, ऊं, घांस, घोंस, चांचर, कांसव, आंच, जेथें, तेथें, एकदां, आतां इत्यादि शब्दांवरील अनुस्वारांची समाधानकारक उपपत्ति लागत नाही, व असें असुन देखील ते लेखनांत वापरले जातात. हे असले अनुस्वार गाळण्यास शास्त्र, इतिहास, रूढि ह्यांपैकी कशाचीहि आडकाठी यावयाची नाही. महाराष्ट्र साहित्य परिषदेने जें शुद्धलेखन मंडळ १९२९ सालीं नेमलें त्याने जे अनुस्वारासंबंधी नियम केले आहेत ते ह्याच दृष्टीने केले आहेत. ह्या मंडळाच्या ठरावांची दिशा थोडक्यांत पुढीलप्रमाणे आहे.

१ व्युत्पत्तीने सिद्ध न होणारे अनुस्वार गाळावे. मी, आम्ही, तुम्ही ह्यांच्या प्रथमेवर अनुस्वार देऊं नये. नें, नीं ( तृतीया ) ह्या प्रत्ययांवरील अनुस्वार गाळावे. 'कांहीं नाहीं' ह्यांतील 'हीं' वरील अनुस्वार गाळावा. सर्व अव्ययांवरील अनुस्वार गाळावे. धातूच्या भविष्यकाळीं उभयवचनी प्रथमपुरुषी रूपांच्या अन्तावरील अनुस्वार गाळावे'.

## आघात

१४८ मराठी भाषेंत शब्दोच्चाराच्या बाबतींत आघात (accent) आहे की नाही ह्याबद्दल व्याकरणकारांत मतैक्य नाही. कांही व्याकरणकारांच्या

शु. ले. मं. निर्णय. पृ. ४

मतें मराठीमध्ये शब्दांवर आघात आहेत तर कांहीच्या मतें ते नाहीत. ह्याबाबत तीन मतें मुख्य आहेत.

१ वैदिक भाषेंत उदात्त, अनुदात्त आणि स्वरित असे शब्दाचे तीन स्वर मान्य केले आहेत. ह्या स्वराचा किंवा आघाताचा परिणाम शब्दाच्या उच्चारावर होऊन त्यामुळे प्राकृतमध्ये कांही शब्दांमधील वर्णांचा लोप झाला आहे. व आघाताच्या परिणामामुळे होणाऱ्या वर्णत्यागाची हीच प्रवृत्ति आधुनिक बोलींमध्ये सुरू झाली[१]. त्यावरून आधुनिक बोलींमध्ये आघात आला असला पाहिजे. हें एक मत.

२ दुसऱ्या कांही विद्वानांना प्राकृतमधील वर्णलोपाचें वर दिलेलें कारण मान्य नाही. त्यांच्या मतें प्राकृतमधील आघात हा stress मुळे आहे[२]. वदिक स्वरामुळे नाही. उपान्त्य अक्षराच्या ह्रस्वत्वदीर्घत्वावर हा अवलंबून आहे.

३ तिसऱ्या मताला तर वरील दोन्ही—वैदिक स्वर व प्राकृत आघात—मान्य नाहीत. प्राचीन भाषांत ह्या दोन्हींच्या अस्तित्वाबद्दल शंकाच आहे. आधुनिक बोलींमध्ये 'आघात' हें तत्त्वच नाही. मराठीची स्वरप्रक्रिया जास्त विशद करण्याकरतां 'आघाता'चें तत्त्व मानण्याची जरूरी नाही[३].

आधुनिक बोलींचा पुरावा पाहिला तर गंगा-यमुना नदींच्या खोऱ्यांत वापरांत असणाऱ्या भाषांत आघात आहे. गुजराती व मराठी ह्या भाषांत आघात असल्याबद्दलचा निर्वाळा डॉ. भांडारकर देतात[४]. व त्याच्याच मताचा पुनरुच्चार जोशी हेहि आपल्या व्याकरणांत करतात[५].

आर्य किंवा आर्योद्भव इतर भाषा ह्यांमध्ये 'आघात' हा मागे कोठवर आढळून येतो हें पाहूं. वैदिक भाषेंत किंवा पूर्ववैदिक भाषांत शब्द साघात उच्चारिले जात असत. वैदिक भाषेंत ज्याप्रमाणे आघात

---

१ Pischel, Pr. Gr. §46.

२ Jacobi, ZDMG XIVII P. 594.

३ J. Bloch, ZDMG XLIX P. 393.

४ Bhandarkar, W. P. L. P.166.

५ जोशी, म. व्या. § १७६.

आहेत त्याप्रमाणे ग्रीक, स्लाव्ह व पुराण जर्मन ह्या जुन्या आर्योद्भव भाषांतहि आहेत. प्रातिशाख्यें, शिक्षाग्रंथ व पाणिनी ह्यांच्या कालापर्यंत आघात उच्चारिला जात असे ह्याबद्दल त्यांनी विवेचिलेल्या स्वरप्रक्रियेवरून पुरावा मिळतो. वर्णाच्या उच्चारांतील तीन सूक्ष्म प्रकार सांगून ते किती प्रमाणाने उच्चारावे हें पाणिनीने सांगितलें आहे. त्याचप्रमाणे प्रत्येक शब्दांत एक स्वर उदात्त किंवा स्वरित असलाच पाहिजे. उदात्त हा सर्वांत उच्च स्वर होय. असे कांही नियमहि स्वरप्रक्रिया प्रकरणांत पाणिनीने दिले आहेत. वैदिक मंत्र नेहमी पठनांत असल्यामुळे स्वरांचे आरोह अवरोह साहजीकच होत. वैदिक भाषेंत आघातासंबंधी नियम पुढीलप्रमाणे आहेत :—

१ वैदिक भाषेंत साध्या क्रियापदांवर आघात असे. उदा०—आप्नोंतीमम लोकम्. तरणैरिज्जयति क्षेति पुष्यति. सइयंन्ये अस्ति तेन. २ संयुक्त क्रियापदांच्या उपसर्गांवर आघात असे. ३ वर्तमानकालाच्या रूपांत मूळ धातूवर, ३ भविष्यकाळांत 'स्य' ह्या प्रत्ययावर, ५ भूतकाळांत 'अ' ह्या आगमावर, ६ तुमन्तांत धातूवर किंवा उपसर्गांवर, ७ भूतधातुसाधितांत प्रत्ययावर किंवा संयुक्तधातु असेल तर उपसर्गावर, ८ ल्यबन्तांत, 'य'वर 'तव्य' कृदन्तावर, व ९ कृदन्त नामाच्या शेवटच्या अवयवावर आघात असे.

प्राकृत भाषांत वर्णाघात मान्य होता व त्याप्रमाणे आघातामुळे उच्चारांत फरक पडे. वर्णाघातामुळे झालेले फरक खाली देतों.

१ एवम्, अहम्, सयम् इत्यादि शब्दांत 'अम्' हा वर्ण साघात असल्यामुळे त्याचा लोप झाला नाही.

२ आघाताच्या पूर्वीचे दीर्घ स्वर ह्रस्व होत. उदाः— आचार्यं > आचारिअ > आयरिअ, कुमारं > कुमर, प्रवाहं > पवहं, गभीर > गहिरं, नीत > णिअं.

३ आघातांच्या पूर्वीच्या दीर्घ स्वरापुढे जर एक साधें व्यंजन आलें तर दीर्घस्वर ह्रस्व होऊन व्यंजन द्वित्त होत असे. उदाः— एवंम् > एव्वम्, काचं > कच्च, तैलं > तेल्लं, स्थूलं > थुल्ल, स्तोक > थोक्कं.

४ आघाताच्या नंतरच्या 'आ' चा 'इ' होत असे. उदाः— तषाम्

>तेसिम्, तासाम्>तासिम्, जल्पनामः>जंपिमां, नमामः > नमिमां, भणामः > भणिमां, लभामः > लहिमु.

५ आघाताच्या पूर्वीच्या ‘अ’चा ‘इ’ किंवा ‘उ’ होई. उदाः– असनं > असीन, उत्तम > उतिम, कतम > कइम, अर्पयति > उप्पइ.

प्राकृतमधील आघातासंबंधी मुख्य नियम हे अशा स्वरूपाचे आहेत. ह्या सर्व विवेचनावरून आघाताला पूर्वपरंपरा आहे हें सिद्ध होतें. वैदिक, संस्कृत, प्राकृत वगैरे जुन्या भाषांत आघात आहेत. ह्यापासून उत्पन्न झालेल्या मराठी व तिच्या इतर बहिणी ज्या आधुनिक बोली आहेत त्यांत आघात असल्याचें तज्ज्ञ सांगतात. तेव्हा मराठींत ‘आघात’ असले पाहिजेत असें म्हणावें लागतें.

मराठीच्या प्रांतिक भाषांत व कांही गणभाषांत शब्दावर निश्चित स्थानाचा असा आघात असल्याचें प्रत्ययास येतें. खानदेशी, बागलाणी ह्या प्रांतांतील कुणबाऊ भाषेंत ‘कुठल्ल, इथल्ल, कारितो, मारितो’ इत्यादि शब्द विशिष्ट जोर देऊन उच्चारिलेले नेहमी ऐकण्यांत येतात. त्याचप्रमाणे ताऱ्याकडील कुणबाऊ भाषेंत ‘हकड, तकड, गंध, लिंवलास, आमास्नी, शतामंदी, देवाळ, मसाण इत्यादि शब्द आघातयुक्त उच्चारिले जातात. कानडी व तेलगु प्रांतांच्या आसपासच्या प्रदेशांतील लोकांच्या मराठी बोलण्यांत जे हेल ऐकू येतात त्यांचा विचार येथे कर्तव्य नाही.

आघातामुळे होणारे वर्णांच्या प्रक्रियेचे फरक मराठींत होतात. उदाहरणार्थ, ह्रस्वदीर्घत्वाची अदलाबदल, वर्णाचा लोप, वर्णाचे द्वित्त्व, उच्चारित अनुस्वार अनुच्चारित होणें वगैरे आघाताचे परिणाम आहेत. शिवाय शब्दांवर योग्य आघात न दिला तर व त्याप्रमाणे शब्दांचे योग्य अवयव न तोडले तर त्या शब्दांच्या अर्थांत बदल होतो. घोडास बरं आहे व घोडीं सबर आहे ह्या वाक्यांतील बर ह्या शब्दावरील आघातांत बदल झाला तर व अवयव विचित्रपणानें तोडले तर अर्थाचा अनर्थ होतो. असाच प्रकार चार किंवा पांच वर्णांच्या शब्दांसंबंधी होतो. खाली असे शब्द कांही दिले आहेत की त्यांचा आघात जर बदलला तर त्यांच्या अवयवाची विसंगति होते व अर्थहि कधी कधी बदलतो; शब्दाचा उच्चार कानाला विचित्र लागतो.

| | | | |
|---|---|---|---|
| करभार | करभार | कोचमनवर | कोचमनवर |
| दरमजलः | दरमजल | पाठविली | पाठविली |
| जयनगर | जयनगर | मातबर | मातबर |
| मोडक | मोडका | मडकसिरा | मडकसिरा |
| काटकसर | काटकसर | सुभेदार | सुभेदार |
| सङ्गमर्मर | सङ्गमूरवर | ज्ञानप्रकाश | ज्ञानप्रकाश |

संस्कृतमधून जे तत्सम व तद्भव शब्द मराठींत आले आहेत त्यांचे मूळचे संस्कृतमधील आघात किंवा त्या आघातांचे परिणाम मराठींत राहिले आहेत. उदाहरणार्थ–

( १ ) कृदन्ताच्या पहिल्या अवयवावरील मूळचा संस्कृत आघात मराठींत राहिला आहे. उदा०–मनन. कृति, मति, कर्ता.

( २ ) इ, उ ह्रस्व व दीर्घ ह्यांवर आघात असेल तर ते स्वर तसेच मराठींत राहतात. आणि आघात नसेल तर त्यांचा ' अ ' होतो[1]. इ, उ स्वर कायम राहिल्याचीं उदाहरणें:--हस्तिनी > हत्तीण, भगिनी > बहीण; प्रावृष>पाऊस, गोधूम>गहूं, खर्जूर>खजूर.

शब्दाच्या साघात अवयबामधील स्वर तसाच कायम राहतो. उदा. घर<गृहम्, गाव<ग्राम, गोळ<गिल. खीर<क्षीर, देव<देव, घोडा< घोटक.

शब्दामध्ये जो फरक होतो तो आघात नसलेल्या अवयवामध्ये होतो. सर्व अवयवांत कमजोर व फरक जास्त होणारा अवयव म्हणजे आघातानंतरचा अवयव हा होय.त्याच्याहिपेक्षा कमजोर वर्ण त्याच्या मागचा. अहीर<आभीर, सोहाग<सौभाग्य, भिंजणें<अभ्यंजन, भीक<भिकारी; लाख<लखपति; हरीण<हरण. आघात नसल्यामुळें ' इ,उ ' बद्दल ' अ ' झाल्याचीं उदाहरणें. मानुष > माणस शिथिल > सढळ, हरिणी > हरण उन्मिल > उमळ.

(३) मराठी मधील क्रियापदांचा पहिला अवयव कायम राहून दुसरा अवयव ह्रस्व होतो. ज्याच्यावर आघात आहे तो तसाच राहतो.

---

1 Dr. Grierson. Ind. Ant. IX 138.

ज्याच्यावर आघात नाही तो ह्रस्व होतो. उदा.- आस्फालयति > आंफळणें. उद्घाटयति > उंघडणें. उत्थापयति > उंठणें. उंत्तारति > उतरणें. प्रस्थापति > पांठवणे. निपातयति > निंवडणे. उंन्मूल > उमळणें.

(४) आघातामुळे वर्णास द्वित्तत्व येतें. उदा० अक्कल, गज्जल, कत्तल, अस्सल, बेहेत्तर, रक्कम, मुक्काम.

अशा रीतीने मराठींतील शब्दावरील आघातास संस्कृतप्राकृत ह्या भाषांतील आघातांची परंपरा आहे. दुसरी गोष्ट त्याला मराठीच्या कांही प्रांतिक बोलींतील आघाताचा आधार आहे; आणि तिसरी गोष्ट म्हणजे ज्याअर्थी त्याचे परिणाम मराठीच्या स्वरप्रक्रियेंत दिसून येतात त्याअर्थी मराठींत आघात असला पाहिजे[1]. ह्या तीन गोष्टींच्या आधारावर मराठींतील आघाताचें अस्तित्व सिद्ध होतें.

ह्या सिद्धांतास जो थोडासा कमीपणा येतो तोहि येथे सांगणें अवश्य आहे. ग्रांथिक किंवा शिष्ट मध्यवर्ती मराठी भाषा पाहिली तर तिच्यांत शब्द उच्चारतांना आघात असल्याची स्पष्ट जाणीव होत नाही. शब्दावर जोर येतो परंतु तो शब्दाच्या अमुक एका विशिष्ट ठराविक अवयवावर सर्व परिस्थितींत कायम असा येत नाही. तो जोर बोलणाऱ्याच्या विशिष्ट रोखाप्रमाणें आपलें स्थान बदलतो. एका वाक्यांत एकाद्या शब्दाच्या अमुक एका अवयवावर जर जोर आला तर दुसऱ्या वाक्यांत त्याच शब्दाच्या त्याच अवयवावर जोर येईल असें सांगतां येत नाही. इतर भाषांतील आघाताची स्थिति तशी नाही. तो आपलें स्थान कधीहि बदलत नाही. मराठींतील आघात ज्याअर्थी आपलें स्थान बदलतो त्याअर्थी तो इतर भाषांतील आघातापेक्षा निराळ्या स्वरूपाचा असावा. तो निश्चित स्थानाचा नसून विकारी आहे. मराठींतील ह्या निराळ्या आघाताला Stress accent असे नांव डॉ. ग्रियर्सन ह्यांनी दिलें आहे.

इंग्रजी वगैरे भाषांतील आघातासारखा स्पष्ट आघात मराठींत नाही हें जरी खरें असलें तरी अजीबात तसला आघात मराठींत नाही हा सिद्धांत मान्य होण्यासारखा नाही. ग्रांथिक व शिष्ट मराठींत सर्व शब्द कांही एका

---

1 Turner. J. R. A. S. 1916. P. 231.

विशिष्ट आघातासह उच्चारतात असें जरी नसलें तरी प्रत्येक शब्दाला त्याचा स्वताचा असा एक नाद आहे. शब्द उच्चारतांना त्याच्या नादाप्रमाणे जर तो उच्चारिला नाही तर ऐकतांना कांही चमत्कारिक लागतें. मिशनरी वगैरे परकी लोकांनी बोललेली मराठीभाषा कानाला किती तरी चमत्कारिक लागते. पुण्यास व पुण्यास, लावण्यास व लावण्यास, दिव्यास दाव्यास इत्यादि जोडींतील शब्दांच्या उच्चारांत आघात आहे व त्या आघातामुळे त्याच्या अर्थांत फरक पडला आहे ही गोष्ट उघड आहे.

मराठीमध्ये आघातासंबंधी नियम खाली दिल्याप्रमाणे आहेत.

१ शब्दांतील उपान्त्य अक्षर जर दीर्घ असेल तर त्यावर आघात असतो. उदा०—कीर्ति, कांणा.

२ उपान्त्य अक्षर जर ह्रस्व असेल तर त्याच्या पूर्वीच्या अक्षरावर आघात असतो. उदा०—कीर्तन, वंळण, कांपड, बंधन.

३ ज्या शब्दांत अन्तीं अपूर्णोच्चारित 'अ' येतो त्या शब्दांत 'अ' च्या अक्षरावर आघात पडतो. उदा०—घंर, झांड, सडंक.

४ हा अपूर्णोच्चारित 'अ' शब्दांच्यामध्ये आला तर त्याच्या पूर्वीच्या अक्षरावर तो आघात पडतो. उदा०—वंसकन, झटकर.

५ संयुक्त व्यंजनाच्या पूर्ववर्ती अक्षरावर जोर येतो. उदा०—हल्ला, आज्ञा, चित्र.

६ विसर्ग व अनुस्वार ह्यांनी युक्त असलेल्या अक्षरावर जोर येतो. उदा०—दुंःख, अन्तंःकरण, अंक अंश.

७ यौगिक शब्दाच्या मूळ अवयवांमधील ज्या अक्षरावर जोर असेल त्याच अक्षरावर मराठींत जोर येतो. उदा०— गुणंवान, जलंमय, प्रेमसांगर.

८ भिन्न अर्थांचे दोन सारख्या स्वरुपाचे शब्द उच्चारितांना दोहोंपैकी एक आघातासह उच्चारिला जातो.

## संयुक्त व्यंजनें

**१४९** संयुक्त व्यंजनांच्या परिणतीचे पुढीलप्रमाणे नियम ठरतील.

१ मराठीचा कल उच्चार साफ व अघळपघळ करण्याकडे असल्यामुळे संयुक्त व्यंजनें विभक्त केलीं जातात; व मूळ उच्चारांतील मात्रा

कायम ठेवण्याकरितां संयुक्त व्यंजनाच्या मागील स्वर दीर्घ होतो. संयोग-लोप व पूर्वस्वरदीर्घत्व ह्या दोन्ही क्रिया पाणिनीच्या कालांतहि होत असाव्या. 'ढोढे लोप' ( ८-३-१३ ) आणि 'रो रि' (८-३-१४) ह्या दोन सूत्रांच्या मुळाशीं हीच प्रवृत्ति आहे. उदा०— पर्ण — पान, कर्ण — कान, सप्त — सात, अष्ट — आठ, हस्त — हात. इ.

२ कांही संयुक्त व्यंजनांच्या बाबतींत पहिल्या अक्षराचा लोप (ऊर्ध्व लोप) झाला तरी पूर्वीचा स्वर दीर्घ होत नाही. उदा० — गुर्जर — गुज्जरु — गुजर, प्रतिच्छाया—पडिच्छाया—पडछाया, सूत्रधार—सुत्तहारु—सुतार, भद्रक—भल्लउं—भलें.

३ कधी निर्बलसंयोगाचा सबलसंयोग होतो, म्हणजे साध्या एकेरी व्यंजनाचें संयुक्त व्यंजन होतें. 'आघात' हें त्याचें कारण होय. उदा०— अगति— अगत्य, अत्रवार—आत्ता, ललाट—लल्लाट, खप्पी, टप्पोर, अक्कल, अस्सल, रत्तल, भिन्न, मुक्काम, किल्ला सल्ला, हल्ली हुन्नर.

४ कधी कधी संयुक्त व्यंजनें अविभक्त राहतात. सप्तदश-सतरा, अपत्यक > अवच्चऊं > बच्चा, वृद्धक > बुड्ढ. प्रस्तर > पत्थर.

## वर्णागम

१५० कधी कधी उच्चारांत अधिक वर्ण येऊन घुसतो. उदा—तांबडा <तम्बीर<ताम्र, मांजर<मार्जार, वंक<वक्र, आम्बील<आम्ल, मुंडस< मूर्धन्, लिंब<निम, साळुंखी<शारिका, लवांकुश, वान्दर, कुंटण, घंटी घोरंदर, चांमार, कोंबडें, झुंज, उंच, नंग, नंक, पुंजा, भद्रंकाळी, भिन्त संमदे ( समस्त ) जीन्द, बुन्ध, फन्द.

शब्दांत 'म' च्या नंतर जर 'र' आला तर मध्ये 'ब' घुसतो. उदा.—अम्बारी, अम्बीर, उम्बर, कम्बर, जाम्ब.

कधी कधी उच्चार सोपा होण्यासाठी मध्येच एक स्वर येतो त्या वेळेस स्वरागम असें म्हणतात. विशेषतः र् आणि ल्, न् आणि म् व दुसरें व्यंजन अथवा ऊष्मा आणि दुसरे कोणतेंहि व्यंजन ह्या तीन जोड्यांच्या मध्येच एकादा स्वर येतो. उ.—जन्म<जनम्, जलम, त्रास<तरास, पुतर, सिनेह, किळस, किलेस, सिनान, नहाण, वरीस, अगुन—अगीन ( अग्नि ) बिरामण, आरसा, करम, किसन, चंदर.

यश्रुति व वश्रुतिः—उच्चाराच्या सोयीकरतां किंवा उच्चार सोपा व्हावा म्हणून शब्दांमध्ये य् किंवा व् हा वर्ण येतो. ह्या प्रकारास संस्कृतमध्ये यश्रुति व वश्रुति असें म्हणतात. य् किंवा व् मध्येच येण्याचें कारण काय? शब्दाच्या मध्ये असलेलें व्यंजन जितकें जोरानें उच्चारावयास हवें तितकें जोरानें तें उच्चारिलें जात नाही. दोन स्वरांमध्ये असलेलें व्यंजन थोडेसें अर्धस्त्र मिश्रित असें उच्चारिलें जातें. ह्या त्याच्या उच्चाराच्या प्रकारामुळे पुढे किंवा व् येतो. उदा.—सूकर<सूगर<सुअर<सूवर, सागर<साअर<सायर.

वश्रति—उदा.—मातुलानि—मावळण, राजपुत्र—राऊत, देवळ—देवकुल, रावळ—राजकुल.

१५१ **वर्णलोप**—कधी कधी वर्णाचा लोप होतो. आद्यवर्ण लोप—उदा—पैठ < उपविष्ट, नन्तर < अनन्तर, हि < अपि, रान < रण्ण < अरण्य हेट < अधस्तात, भिजणें < अभ्यंजन सुटा < उत्सृष्ट. यत्ता < ईयत्ता; बैस < उइस < उपविश, वक्षे, ओझा झया < उवज्झा < उपाध्याय वरी, वर < उवरी < उपरी; वहाणा < उवाणह < उपानह.

अन्त्यवर्णलोप उदा०—जोडा(व), कित्ता(व), कलाबतु(न्), कानू(न), फर्जा(न), अलिजा(ह), पागा(ह), अकवा, खामखा, जागा, दर्गा, वाहवा, छवी, तम्बी, सही, जिरे, मसाले (अन्त्य 'ह'चा लोप)

१५२ **वर्णव्यत्यास** उ० — हलु — लघु; बहिण — भगिनी, मराठा— मरहट्ट — महाराष्ट्र मात्स्थान — माकस्थान. निडाळ (ललाट, पाली-नलाट, प्रा—निडाल ). वहाण — उवानह — उपानह, जाणपछाण — ज्ञानप्रत्यभिज्ञान, कुराड — कुठार. कवडसा — कडवसा, सून — न्हुसा — सुन्हा — स्नुषा पैरण — परिहण — परिधान. बनारस — वाराणसी. केकत — केतक, म्हातारा — म्हेतर — महत्तर, अजून — हनुस, अनामत — अमानत, कुलुप — कुल्फ, कसोशी — कोशीश, गन्ज — झङ्ग, जनावर — जान्वर, तर्तीब — तदबीर, नक्की — यकीन, पलिता — फतिला, बुद्रुक — बुझुर्ग, मनुका — मनुक्का, महसुर — मश्हूर.

१५३ **समानोच्चारितवर्णलोप** उ--आवकर्णे, आविकर्णे — अवाक्कर्णे एकामी — एक + कामी, कुम्फळ — कुभ + फळ, केताड — केकत + ताड,

गुराख्या – गुरें + राख्या, जानिवसा – जन्य + निवास, दिवाळी – दिवा + आवली, धुवण – धुव + पाणी, नवरा – नव + वर, नकटा – नाक + काट, नाते – ज्ञाति + त्व, रिकामा – रिक + काम, ( रिक्त + काम ).

## परकी भाषांतील उच्चाराचा परिणाम

१५४ मराठीचा आणि कानडी, फारशी, पोर्तुगीज आणि इंग्रजी ह्या भाषांचा संबंध विशेष आला. कानडी, तेलगु ह्या द्राविडी भाषांचा संबंध तर मराठीच्या जन्मापासून किंवा जन्माच्याहि पूर्वीपासून आला व अद्यापपर्यंत चालू आहे. फारशीचा संबंध बहामनी कालांत सुरू होऊन अव्वल इंग्रजी-अमदानी पर्यंत प्रामुख्याने चालू होता. पोर्तुगीजांचा संबंध मध्ये कांही वर्षे आला. इंग्रजांचा संबंध गेल्या शंभर वर्षांतील आहे. ह्या अवधींत ह्या परकी भाषांचा परिणाम मराठी उच्चारावर कसा झाला हें पाहूं.

कानडी व तेलगु ह्यांमधून मराठींत किंवा एकंदर आर्योद्भव बोलींत कोणते उच्चार आले हे त्या त्या प्रकरणांत सांगितलेंच आहे. मूर्धन्यें द्राविडी भाषांतून आर्य भाषांत शिरलीं. मूळ आर्य भाषेंत मूर्धन्य उच्चार होते परंतु त्यांचा उच्चार सध्याच्या त्यांच्या उच्चारांहून थोडासा निराळा असावा. मूर्धन्य उच्चारांत परकीयत्व आहे ह्यांत शंका नाही. उच्चारस्थानांचा क्रम जर आपण पाहिला तर कंठ, तालू, मूर्धन्, दन्त, ओष्ठ असा त्यांचा क्रम आढळतो, परंतु मुखांतील स्थानें प्रत्यक्ष पाहिलीं तर त्यांच्या क्रमानें मूर्धन् हें स्थान तालूच्या अगोदर आलें पाहिजे. कंठ, मूर्धन्, तालू, दन्त, ओष्ठ असा क्रम योग्य होईल. मूर्धन्य उच्चार हे परकी असल्यामुळें मागाहून ते घुसडले गेले व त्यामुळेच स्थानाच्या क्रमांत भेद उत्पन्न झाला.

उच्चाराच्या बाबतींत आणखी एक वळण द्राविडी भाषांपासून मराठीला मिळालें आहे आणि तें म्हणजे ऋ, ॠ, ऌ आणि ऊष्मे ह्यांचा उच्चारासंबंधी होय. हे उच्चार द्राविडी भाषांत नाहीत व असले तर फार क्वचितच त्यांचा उपयोग करतात. वैदिक, संस्कृत, प्राकृत ह्या भाषांत आहेत; व त्यांच्याच द्वारा ते मराठींत आले. परंतु द्राविडी भाषांत ते नसल्यामुळे मराठींतील त्यांचें प्राचुर्य फार कमी झालें आहे. वर दिलेले सर्व उच्चार मराठींत नरमावले जातात. ‘ श्, ष्, स् ’ ह्या तिन्हींपैकी

'ष्' तर कधीच वापरांत येत नाही. बाकीच्या दोन्हींपैकी एक 'श्' किंवा 'स्' वापरून मराठींत काम भागवितात.

आणखी एक बाब आरंभींच्या 'ए,ऐ,ओ,औ' ह्यांसंबंधी आहे. सर्व द्राविडी भाषांत ह्यांचे उच्चार अनुक्रमें 'ये, यै, वो, वौ' असे होतात व तसे लिहिलेहि जातात. जुन्या ऐतिहासिक पत्रव्यवहारांत 'यैसीजे, यैवज, वोक, वोसंग, वौषध' अशीं शब्दांचीं रूपें सापडतात.

संयुक्त व्यंजनाच्या उच्चारांत विश्लेष किंवा स्वरभक्ति होणें किंवा मध्येच नासिक्य उच्चार येणें वगैरे गोष्टी ह्या कोणत्याहि भाषेच्या उच्चार-प्रक्रियेंत आढळतात. व तशा त्या कानडी वगैरे भाषांतहि आहेत. तेव्हा त्या कानडींतून मराठींत आल्या असें म्हणण्यांत कांही स्वारस्य नाही. दाक्षिणात्यांच्या उच्चारांत गडबड होऊन त्यांचें बोलणें अस्पष्ट होतें म्हणून शूद्रक कवीचा चंदनक म्हणतो[१] तें कानडीच्या ह्या उच्चाराच्या परिणामामुळेच होय.

१५५ मराठी भाषेंत तालव्य उच्चारांत जो फरक पडला आहे तो मात्र मराठींत मूळ आर्यभाषेच्या स्वभावाची खूण म्हणून उतरला नसून परकीय आहे. तालव्य हे मूळचे आर्यभाषेंतील परंतु दन्त्यतालव्य हे मात्र परकीय उच्चार होत.

तालव्य वर्गांत स्वरांपैकी इ, ई आणि व्यंजनांपैकी च्, छ, ज्, झ्, ञ्, य्, श्, इतके वर्ण येतात. ह्यांच्या उच्चाराचें स्थान तालु—म्हणजे जिभेच्या वरील जें छोटेंसें छपर आहे तें व जिव्हा ह्यांचा संयोग—आहे म्हणून ह्यांना तालव्य म्हणतात. ह्या वर्णांचा प्रत्यक्ष उच्चार च्य, छ्य, ज्य, झ्य असा 'य'मिश्रित होतो. मराठींतहि ह्यांचा उच्चार असाच 'य'मिश्रित करण्याचा प्रघात आहे. जुन्या मराठी वाङ्मयांतून 'विच्यार, यज्यमान' असे शब्द लिहिलेले आढळतात. वैदिक व पुढील पाणिनीय संस्कृतच्या काळापर्यंत ह्या वर्णांचा उच्चार असा शुद्ध तालव्यच केला जात असला पाहिजे. पुढे प्राकृतच्या काळांत—विशेषतः माहाराष्ट्री व अप-

---

१ वयं दाक्षिणात्याः अव्यक्तभाषिणः—मृच्छ. अं. ६.

भ्रंश ह्या भाषांच्या काळांत-ह्यांच्या उच्चारांत फरक झाला असावा. उच्चारांचें स्थान जें तालु होतें तें थोडें पुढे दांताच्या बाजूला सरकलें. शुद्ध तालव्य उच्चारांत थोडासा दन्त्य उच्चार मिसळला गेला व दन्त्यतालव्य असा एक स्वतंत्र उच्चार उत्पन्न झाला. च्य, छ्य, ज्य, झ्य ह्या उच्चारांच्या बरोबरीने च् (त्स्), छ् (त्स्ह्), ज् (द्ज़्), झ् (द्झ़्) असे उच्चार माहाराष्ट्री, अपभ्रंश व तद्द्वारा गुजराती व मराठी ह्या भाषांत रूढ झाले. शुद्ध तालव्यांत 'य' चा उच्चार प्रामुख्याने असतो व दन्त्यतालव्यांत 'स' चा उच्चार प्रामुख्याने असतो. शुद्ध तालव्य वर्ण लिहिण्याचा प्रकार जो मार्कण्डेय ह्याने आपल्या प्राकृतसर्वस्व ह्या व्याकरणांत 'चययोरुपरि यः स्यात्' (१२-२१) ह्या नियमांत सांगितला आहे तो चिन्तनीय आहे. य्च्, य्ज्, य्झ् अशीं प्रतीकें त्याने सुचविलीं आहेत.

सर्व तत्सम शब्दांत ह्या वर्णांचा शुद्ध तालव्य उच्चार होतो. उदाहरणार्थ— उच्चार, विचार, वांछा, छत्र, जन, झंझावात. परंतु तद्भव व देश्य शब्दांच्या बाबतींत मात्र 'च' वर्गाचा उच्चार शुद्ध तालव्य न होतां दन्त्यतालव्य होतो. उदा.-चारा, चादर, चोर, जाण, जड, जाणें, जवळ, झट, झगडा, झाड, झोका. तद्भव शब्दांत ज्या वेळीं ते वर्ण 'इ, ए, ऐ, य' ह्यांपैकी एका वर्णाशीं संयुक्त असतात त्या वेळीं त्यांचा उच्चार शुद्ध तालव्य होतो. उदा:-चिमट, चिवट, चेटूक, चेतविणें, चिता, जिनगर, झिपरी इत्यादि. किंवा तद्भव शब्दांतील ज्, झ्, हे वर्ण ज्या वेळीं संस्कृत 'य्' ह्या वर्णापासून उत्पन्न झालेले असतात त्या वेळींहि त्यांचा उच्चार शुद्ध तालव्य होतो.

तालव्य वर्णांचा हा जो उच्चारभेद आढळून येतो त्याला आर्यभाषांमध्ये फार प्राचीन परंपरा नाही. प्राकृत भाषांच्या अमदानींत व त्यांतल्या त्यांत माहाराष्ट्री व अपभ्रंश ह्या दोन भाषांत हा उच्चारभेद सुरू झाला. मागधी व शौरसेनी ह्या भाषांत दन्त्यतालव्य हा उच्चारभेद नाही. प्राकृत भाषांच्या काळांत ज्याअर्थी हा भेद सुरु झाला त्याअर्थी आर्य लोक हिंदुस्थानांत स्थायी झाल्यानंतर बऱ्याच दिवसांनी कांही तरी स्थानिक कारणामुळे तो सुरू झाला असावा हें खास. ह्या उच्चाराचा

निर्देश मार्कंडेय आपल्या प्राकृतसर्वस्वांत करतो. ग्रीक लोक ह्या उच्चा-रानें गोंधळून जातात. त्यांच्या लेखांत दन्त्यतालव्य उच्चार 'स'मिश्रित असे दिलेले आढळतात.उदा–चन्द्रगुप्त-Sandracottos.पञ्चाल-Paggalon, चन्दन–Tzandon, चष्टन--Tiastanes, उज्जयिनी--Ozene. उच्चारांत हा जो बदल झाला तो द्राविडी भाषांपैकी तेलगु व कानडी ह्या भाषांच्या संस-र्गानें सुरू झाला असावा[1].

मराठीमध्ये जसा हा फरक आहे तसा गुजराती भाषेमध्येहि आहे. तालव्य वर्णांच्या उच्चारांत जो फरक झाला तो मोंगली भाषेचा परिणाम असावा असेंहि एक मत प्रचलित आहे[2]. मध्य आशियांतून हूण व खजर जातींचे जे लोक आले व उत्तर हिंदुस्थानांत राज्य आक्रमण करून स्थायी झाले त्यांच्या भाषेंतील उच्चाराचा परिणाम झाला असावा. परंतु ह्या मताच्या विरुद्ध पुरावा पुष्कळ आहे. एक तर मोंगली भाषेच्या संसर्गाने हा दन्त्य-तालव्याचा उच्चार आला असें म्हणावें तर उत्तरेकडील मागधी व पैशाची ह्या व तदुत्पन्न ज्या इतर आधुनिक हिंदी,बंगाली,पुश्तु वगैरे भाषा त्यांत तो उच्चार का उतरला नाही हा एक प्रश्न राहतो. शिवाय दुसरी गोष्ट–सिंहल द्वीपाच्या भाषेंतहि हा जो उच्चार आढळून येतो त्याचीहि उपपत्ति मोंगली भाषेच्या परिणामावरून लागत नाही. तेव्हा द्राविडी भाषांचाच हा परिणाम असावा असेंच शेवटीं मानावें लागतें.

१५६ फारशी भाषेंतील उच्चाराचा परिणामहि मराठीवर झाला आहे. बहामनीकाल, शिवकाल व पेशवेकाल ह्या तिन्ही कालांत मराठी भाषेचा फारशी भाषेशीं जो संबंध आला व त्या संबंधानें मराठीवर जे परिणाम झाले ते त्या त्या प्रकरणांत दिले आहेत. फारशी भाषेंतून आलेल्या उच्चा-राच्या लकबा मागे त्या त्या वर्णाखाली दिल्या आहेत. त्याशिवाय खालील लकबा उल्लेखनीय आहेत. १ आ > आय– उदा.–बागाईत, विलायत, वायदा, मायना, जकायत. २ आ>ए– उदा.–किवेत, खेरीज, तेजी, तेरीख, देखील, सेकीन. ३ आ > अ–उदा.–आशक, काफर, कायम, खायर,जाबता,

---

1 J. Bloch, L. F. M. § 24 P. 33.

2 N. B Divatia, W. P. L. Gujrati 4

नाजर. ४ इया > आ-उदा.-अख्त्यार, प्याला, म्यान, कज्जा, गाशा, जास्त, दानत. ५ इह > ए-उदा.--एहसान, बेहेत्तर, मेहनत, मेहरप. ६ जोडाक्षराचें पृथक्करण—उदा.--कदर, कसब, जरब, बरफ, तकट, नगद, फजर. ७ जोडाक्षराचें रक्षण-उदा—गस्त, तस्त, फक्त, तक्त, वक्त, सक्त, मर्द, सर्द. ८ अक्षराच्या द्वित्वाचा त्याग-उदा—बजाज, फरास, बकाल, सराफ, हमाम. ९ मागे ह्रस्व 'इ' आल्यास मध्ये दीर्घ 'ई' येते व 'उ' आल्यास दीर्घ 'ऊ' येतो. उदा.--इर्बान, जिकीर, फिकीर, शिलीक; उरूस, कुलूप, बुरूज, जुलूम, बुरूज[1].

स्वरांच्या ह्या उच्चारांखेरीज व्यंजनांच्या बाबतींतहि फारशीच्या लकबा 'क़्', 'ख़्', 'ज़्', 'झ़्', 'फ़्', 'श़्', 'स़्', 'ह़्' ह्या व्यंजनांच्या उच्चारांत आल्या आहेत. काझी, तनखा, खामखा, तोशीस, मशीद, फर्जी, अफवा, जिल्हा, बुद्रुक, मश्हूर इत्यादि उदाहरणांत त्या प्रतिबिंबित झाल्या आहेत. अन्त्य 'ह' च्या लोपाची तशीच गोष्ट आहे. आघातामुळे साधे वर्ण द्वित्त झाल्याचीं अस्सल, नक्कल, अत्तर, हुन्नर, जिन्नस, रक्कम हीं उदाहरणें होत.

१५७ इंग्रज लोकांच्या गेल्या १५०--२०० वर्षांच्या सहवासानें इंग्रजी भाषेंतील उच्चारांचा परिणामहि मराठी भाषेच्या उच्चारावर झाला आहे. ह्रस्व 'ओ' म्हणजे 'ॲ, ऑ' हे दोन उच्चार तर मराठींत आले आहेतच. परंतु प्रत्येक स्वराचा ह्रस्व किंवा द्रुततर उच्चार मराठींत इंग्रजांच्या सहवासानेच आला आहे. Ch, F, J, Q, V, X, Z. ह्या व्यंजनांचे कांहीसे चमत्कारिक उच्चार मराठीमध्ये रूढ होऊं पहात आहेत. पेशवे काळांत तर विशेष नामांचे कसे चमत्कारीक उच्चार होत हें पुढील उदाहरणांवरून कळून येईल. फोट (Ford), इष्टिन (Hasting), कवलबुरग (Colebrooke), मेकफास ( Macpherson ), कमदूर ( Commodore ), तामगिरास ( Thomas Graham ), घमंडी ( Cavendish ), इन्द्रसेन (Anderson) रुद्रक ( Roderick ), कर्मखल ( Carmaichel ), रासलंपट ( Ross Lambert ), मंडूक ( Maddock )[2].

---

१ मा. त्रि. पटवर्धन, फार्शी मराठी कोश-प्रस्तावना. २ म. रि. ५

ह्याशिवाय पुढील शब्दांच्या उच्चारांतहि मराठी व इंग्रजी ह्या दोन्ही आपांतील उच्चारांमध्ये चाललेलें युद्ध दिसून येईल. अजिंटग, शेकंड, परतकेस, पुर्तुकाल (Portuguese), वलंदेज ( Hollanders ), गोवंदोर (Governor), विजुरे ( Viceroy ), मनवर ( Man-of-war ), गुराब, बतेला, बतेरी, आनराबल, टिकेराय, सकरतार ( Secretary ); बुक, टेबल, वाच, इंजिन, शीट, मोटर, राकेल, कव्हर, ब्रश, कप, बशी, किटली, स्लेट हे उच्चार तर नेहमीच्या परिचयाचे आहेत.

१५८ खिस्तिशकाच्या १५ व्या शतकाच्या आरंभीं हिंदुस्थानांतील सुवर्णभूमीच्या लौकिकासंबंधीच्या गोष्टी ऐकून तो देश शोधून काढण्याचे ज्यांनी जारीने प्रयत्न केले त्यांच्यांत पोर्च्युगीज लोक अग्रेसर होत. त्यांचें प्रथमचें व्यापाराचें ढोंग सरल्यानंतर धर्मप्रसाराचें वेड त्यांच्या अंगांत शिरलें व तदनंतर त्या वेडानें सर्व पश्चिम किनाऱ्यावर थयथयाट घातला. लोक काय बाटविलें, देवळें काय फोडलीं, धर्मग्रंथ काय जाळले, न्यायासनापुढे चौकशा काय केल्या व लोकांचा अनन्वीत छळ काय केला. ह्या त्यांच्या धर्मछळानेच त्यांची राजकीय सत्ता उखडली गेली. परंतु त्या पाद्री भटांनी कोंकणची ओसरीच व्यापली एवढें नाही तर हळूहळू महाराष्ट्रांतील अहमदनगर पर्यंत त्यांनी आपले पाय पसरले व त्यामुळे त्यांचे उच्चारहि मराठींत फार आले. त्यांचीं चिन्हें खालील पोर्च्युगीज भाषेंतून मराठींत आलेल्या शब्दांत आहेत.

काजू, कंपू, काडतूस, काजे, चेपे, कुरनी खुतनो, फालतु, फीत, घमेलें, लवाद, नाताळ, पगार, पाव, पलार, पिकाव, टिकाव, परात, पुरावा, रिफाड, रवण, रौंड, सोडत, तुरंज, तुरुंग, वार, बिजागरी, अननस, अलमारा, रतल, बशी, बटाटा, बिस्कूट, बंब, बुराख, चावी, कोबी, खमीस, इस्त्रि, कर्नल, जुगार, लिलाव, मेज, मेस्त्री, पाद्री, पोपयी, पेरु, पिंप, साबण, तंबाखु, वरांडा, भोपळा, आचार, लोणचें, आफूस, अया, बादली, बारडी, बालडी, बांक, बकेटा, बर्किन्, बटेला, बटवा, बूज.

---

## प्रकरण ७ वें

# मराठीचें व्याकरण

१५९ मराठीच्या वर्णप्रक्रियेचें विवेचन मागील प्रकरणांत झालें. वर्णप्रक्रियेनंतर प्रत्ययप्रक्रियेचा विचार ओघानेच येतो. मराठी भाषेच्या पूर्वीच्या ज्या भाषा संस्कृत, प्राकृत वगैरे होत्या त्यांच्या प्रत्ययाचें जें विवेचन मागे केलें त्यावरून एक गोष्ट स्पष्ट होते. वैदिक संस्कृतसारख्या भाषांमध्ये नामें व क्रियापदें ह्यांची मोठी रूपसमृद्धि होती. ह्या त्यांच्या रूपसंपन्नतेबद्दल कौतुक वाटतें. ग्रीक, लॅटिन, लिथ्यूनियन ह्या पाश्चात्य भाषांनहि अशीच रूपसमृद्धि होती. परंतु ही रूपसमृद्धि उत्तरोत्तर कमी कमी होत गेली. नामांच्या व सर्वनामांच्या विभक्तींचीं निरनिराळीं रूपें, क्रियापदाचे गण, पदें, आठ प्रकारचे लकार, त्यांत पुन्हा तीन प्रकारचे भूतकाळ, त्यांतहि पुन्हा एका भूतकाळाचे सात निरनिराळे प्रकार, चार अर्थ, दोन भविष्यकाळ इत्यादि निरनिराळे प्रकार उत्तरकालीन भाषांत कमी कमी झाले. भूतकाळ एकच राहिला. गणभेद, अर्थभेद, रूपभेद नाहीसे झाले. प्रयोजकाच्या 'अय व पय' ह्या दोन्ही प्रत्ययांबद्दल एकच अय येऊन बसला. भाषेतील विविधत्व कमी करून त्याऐवजी एकरूपत्व व एकविधत्व आणून भाषेत सोपेपणा आणण्याची प्रवृत्तिच ह्याच्या मुळाशीं आहे. आर्यभाषांतील ही रूपसमृद्धि मराठीमध्ये कमी होऊन व मूळ रूपांचे कोणकोणते अवशेष राहिले हें पुढील विवेचनावरून स्पष्ट होईल. ह्यांत नामविभक्ति, आख्यातविभक्ति, शब्दसिद्धि ह्या बाबींचा विचार अनुक्रमें केला आहे.

१६० व्याकरणाच्या दृष्टीने मराठींत शब्दांचे दोन मुख्य प्रकार आहेत. एक व्ययी शब्द व दुसरा अव्ययी शब्द. पहिल्या व्ययी प्रकारांत नाम, सर्वनाम, विशेषण व क्रियापद व दुसऱ्या अव्ययांच्या प्रकारांत क्रियाविशेषण, शब्दयोगी, उभयान्वयी व उद्गारवाचक हे विभाग पडतात. संस्कृतमधील नाम, आख्यात, उपसर्ग व निपात ह्या शब्दांच्या चार प्रकारांपैकी उपसर्ग हे धातूंतच

सामावून गेल्यामुळे मराठींत शब्दाचे प्रकार फक्त तीनच राहतात व ह्या तीन्हीं-मध्ये वर दिलेले आणखी उपभेद पडले आहेत. मानसशास्त्रदृष्टया पाहिलें तर वाक्यांतील खरे जिवंत शब्द म्हटले म्हणजे नाम आणि क्रियापद हे दोनच ठरतात. सर्वनाम हा जरी भाषेंतील आद्य शब्द असला तरी ज्याअर्थी नामासाठी त्यांचा उपयोग होतो त्याअर्थी तो एक निराळा प्रकार मानण्याची जरूरी नाही. नाम आणि विशेषण हे दोन्ही शब्द एकमेकासाठी वाक्यांत वापरले जातात. क्रियाविशेषण, शब्दयोगी व उभयान्वयी वगैरे अव्ययें हीं वाक्यरचनेचीं किंवा वाक्यरचनेंत शब्द जोडण्याचीं निरनिराळीं साधनें आहेत[1]. उद्गारवाचक अव्ययें तर निराळा प्रकार मानण्याची जरूरीच नाही. भावनेचा आवेग दाखविणारीं हीं वाक्येंच आहेत. हीं वाक्यें पूर्ण नाहीत एवढेंच; परंतु ही मानसशास्त्राची दृष्टि झाली. तर्कशास्त्राच्या कसोटीने पाहिलें तर शब्दाचा निराळा धर्म दिसला की त्याला निराळें नांव पाहिजे. ह्या दृष्टीने उद्गारवाचक अव्ययेंच फक्त वगळलीं जाऊन शब्दांचे सात प्रकार ठरतील.

मराठींमध्ये नामांचीं वचनें दोन--एकवचन व अनेकवचन. लिंगें पुंलिंग, स्त्रीलिंग व नपुंसकलिंग हीं आहेत. लिंगाच्या बाबतींत मराठींत विशेष वैचित्र्य असून तें अन्यभाषीयांच्या दृष्टीने थोडेंसें चमत्कारिक दिसतें. मराठींत शब्दांचें लिङ्ग दोन प्रकारांनी ठरतें. पदार्थाच्या स्वाभाविक जातीप्रमाणे तद्दर्शक शब्दांचे लिंग ठरविण्याचा एक प्रकार असून व्याकरणदृष्ट्या शब्दाचें लिंग ठरविण्याचा दुसरा प्रकार आहे. मराठीमध्ये सर्व शब्द स्वरान्त आहेत. व्यंजनान्त शब्द नाहीत. व्यंजनान्त तत्सम शब्दाचीं प्रातिपदिकें मात्र व्यंजनान्तच राहतात व प्रत्यय घेतांना मात्र ते स्वरान्त होतात. नामाच्या विभक्ति संबोधनासह आठ आहेत. विभक्तींच्या प्रत्ययांची विचिकित्सा पुढे केली आहे.

## विभक्तिप्रत्यय

१६१ संस्कृतमध्ये एकंदर सात विभक्ति आहेत. मधल्या प्राकृत भाषेंत चतुर्थी विभक्तीचा लोप झाला आहे. मराठींत विभक्ति संस्कृतप्रमाणे सात आहेत

1 Vendrye's, Language Ch III.

असें मानितात. द्वितीया आणि चतुर्थी ह्या दोन्ही विभक्तींचे प्रत्यय सारखेच जरी असले तर त्यांचें 'कारकार्थ'--विभक्त शब्दाचा क्रियापदाशीं संबंध–निराळे आहेत. मराठींतील साती विभक्तींच्या प्रत्ययांची उत्पत्ति खालील-प्रमाणे आहे.

## प्रथमा

१६२ मराठींत प्रथमा विभक्तीचे प्रत्यय नाहीत. नामाचें मूळरूप तेंच प्रथमेच्या एकवचनीं येतें. त्या मूळरूपाचें जें एकवचन तेंच प्रथमेचें एकवचन आणि त्याचें जें अनेकवचन तेंच प्रथमेचें अनेकवचन. निरनिराळ्या नामांच्या अनेकवचनाचें रूप निरनिराळ्या रीतीने पालटतें व ह्या निरनिराळ्या रूपांच्या बाबतींत एकच प्रत्यय देतां येत नाही म्हणून प्रथमेच्या अनेकवचनासहि प्रत्यय नाही असें म्हणतात. मराठींत शब्दाचें जें प्रातिपादिक रूप घेतलें जातें तें संस्कृतमधील प्रातिपदिकावरूनच घेतलें जातें. स्वरान्त नामेंच तेवढीं प्रातिपदिकापासून आणि व्यंजनान्त नामें प्रथमेच्या रूपापासून मराठींत घेतलीं जातात असा कांही प्रकार नाही. मराठी प्रातिपदिक काय किंवा संस्कृत प्रातिपदिक काय दोन्हीं एकच. संस्कृतमधील व्यंजनान्त प्रातिपदिक हें मराठींत मात्र स्वरान्त होतें एवढाच फरक होतो.

मराठींतील आकारान्त प्रातिपदिकांतील अन्त्य आ संस्कृतमधील 'क' पासून आला आहे. उदा.--घोटक – घोडओ – घोडउं – घोडा. अपभ्रंश भाषेंत 'घोडउं' ह्या रूपाबरोबर 'घोडआ' हेंहि रूप प्रचारांत होतें. त्या प्रत्ययापासूनच मराठी 'आ' उत्पन्न झाला. नपुंसकलिंगी 'एँ' हा प्रत्ययहि वरील 'आ' प्रत्ययाप्रमाणे संस्कृत 'क' ह्या प्रत्ययापासूनच निघाला आहे. उदा.—कदलकम् – कयलय–कइलयं–केलयं – केलइं–केळें.

मराठींतील आ व एँ ह्या प्रत्ययाच्या उपपत्तीसंबंधी बरींच मतें पुढे आलीं आहेत. कांही प्रातिपदिकें 'आकारान्त' असतात तर कांही 'अकारान्त' असतात. प्रातिपदिक आकारान्त किंवा अकारान्त होणें हें त्या शब्दाच्या आघातावर अवलंबून आहे. ज्या वेळेस आघात अन्त्यावर असेल त्या वेळेस आकारान्त व ज्या वेळेस आघात उपान्त्यावर असेल, त्या वेळेस अकारान्त प्रातिपदिक होतें[१]. बीम्सने दिलेल्या ह्या मतांत 'क' ह्या संस्कृत

१ Beams, Com Gr. A. Vol. II, p. 515.

प्रत्ययाचा कांही संबंध त्यानें आणला नाही. बीम्सचा सर्व भर आघाता-( accent )वर आहे. होर्न्लेने[1] ह्याच्या उलट असें प्रतिपादिलें आहे की 'आ' किंवा 'अ' होणें हें संस्कृत 'क' प्रत्ययावर अवलंबून आहे.

जुन्या मराठींत प्रथमेचा एकवचनी 'उ' प्रत्यय सस्कृतमधील प्रथमेचा प्रत्यय जो 'विसर्ग' त्यापासून निघाला आहे. प्रचलित भाषेंत सलगीच्या भाषेंत हा 'उ' प्रत्यय वापरतात. त्याचीं रूपांतरें पुढीलप्रमाणे आहेत.

| वै. सं. | सं. | प्रा. | अप. | जु. मराठी |
| --- | --- | --- | --- | --- |
| स् | > ः | > ओ | > उ | > उ |

ह्या 'उ' प्रत्ययासंबंधी आणखी एक उपपत्ति देण्यांत येते. आन्ध्र भाषेंत प्रथमेच्या एकवचनाचा 'ओ' प्रत्यय आहे. ह्या 'ओ' प्रत्ययापासूनच मराठीचा 'उ' प्रत्यय आला असावा. कारण मराठीच्या आरंभाच्या काळीं मराठीचा आणि आंध्रभाषीयांचा (तेलगूचा) संबंध आल्यामुळे एकीचा परिणाम दुसरीवर झाला असण्याचा संभव आहे[2]. परंतु वर दिलेल्या ऐतिहासिक उपपत्तीपुढे हें मत टिकत नाही. प्रथमेच्या एकवचनापुरताच हा 'उ' प्रत्यय प्रचलित मराठीमध्ये वापरतात असें नाही तर शब्द त्या प्रत्ययासह प्रातिपदिक बनतो आणि मग त्याला इतर विभक्तींचे प्रत्यय लावतात. उदा०—रामूने, रामूस, रामूचा, रामूंत. गणूने, गणूस, गणूचा, गणूंत इत्यादि.

कदाचित् हा 'उ' प्रत्यय प्रथमेच्या 'उ' प्रत्ययाहून भिन्न असण्याचा संभव आहे. ममत्वदर्शक किंवा स्वार्थे असा हा उ प्रत्यय असावा.

प्रथमेच्या विसर्गापासून 'आ' हा आणखी एक मराठींत प्रथमेचा प्रत्यय आला आहे. उदा.—रामा, बाळा, हऱ्या, सोन्या इत्यादि. रामः—रामा, बालः—बाळा अशी उपपत्ति लावतां येणें शक्य आहे.

वर्तमान मराठींत प्रथमेस एकवचनी व अनेकवचनी प्रत्यय नाहीत असें वर सांगितलें आहे. व प्रत्यय नसल्यामुळे शब्दाचें प्रथमेचें रूप आणि त्याच शब्दाचें प्रातिपदिक ( विभक्तिप्रत्यय लागण्याच्या पूर्वीचें

---

१ Hörnle—J. B. R. A. S. Bengal XII, 154.

२ चिं. वि. वैद्य. शारदा. संमेलन ३, अध्यक्षीय भाषण.

रूप ) सारखेंच दिसतें. परंतु शास्त्रीय दृष्टया हें विधान टिकणारें नाही. संस्कृतमधील प्रथमेच्या 'स्' प्रत्ययाचा प्रथम 'ओ' होऊन नंतर त्या 'ओ' चें ह्रस्व स्वरूप 'उ' झालें. पुढे कालान्तराने भाषेच्या पुढील स्थितींत ह्या 'उ' चेंहि ह्रस्वीकरण होऊन त्याचा 'अ' बनला व तोच पुढे प्रथमेचा प्रत्यय होऊन बसला किंवा शब्दाच्या प्रातिपदिकाच्या अन्तांत सामावून गेला. अशी ही मराठींतील प्रथमेच्या प्रत्ययांची उपपत्ति आहे.

## द्वितीया

१६३ मराठी भाषेंत प्रथमा आणि द्वितीया ह्या दोन विभक्तींच्या रूपांमध्ये बराच घोटाळा उडाला आहे. ह्या दोन्ही विभक्तींत नामांचीं रूपें सारखींच होतात. त्यांच्या समान रूपांमुळेच द्वितीया विभक्तिच कांही व्याकरणकार मानीत नाहींत तर कांही व्याकरणकार द्वितीयेंत सप्रत्यय द्वितीया आणि अप्रत्यय द्वितीया असे दोन प्रकार करतात. 'कर्म' हा कारकसंबंध एकाद्या शब्दाचा त्याच वाक्यांतील क्रियेशीं आहे असें म्हणावयाचें आणि त्या शब्दाची विभक्ति मात्र प्रथमा मानावयाची हें असंगत व अशास्त्रीय नाही का? वाक्यांत एकाद्या शब्दाचा क्रियापदाशीं 'कर्म' कारकाचा संबंध असला की तो शब्द द्वितीया विभक्तींतच असला पाहिजे, मग त्याला प्रत्यय लागो किंवा न लागो. प्रत्यय लागला तर सप्रत्यय व न लागला तर अप्रत्यय द्वितीया होईल; हाच पक्ष आम्हांस संमत आहे. प्रथमेचा कारकसंबंध व द्वितीयेचा कारकसंबंध हे दोन पृथक् आहेत व म्हणून ह्या दोन्ही विभक्ति निराळ्या स्वतंत्र समजल्या पाहिजेत. वाक्यांत एकादा शब्द काम काय करतो, त्याचा कारकसंबंध काय आहे हें पाहूनच त्याची विभक्ति ठरवावी लागते. प्रथमा आणि द्वितीया ह्या दोन्ही विभक्तींची जरूरी वाक्यांत लागते.

## तृतीया

१६४ मराठींमध्ये तृतीया विभक्ति हीहि स्वतंत्र विभक्ति राहिली आहे. 'करणी' तृतीया म्हणून तिचा संबंध वाक्यांत येतोच व तशी तिची जरूरी आहे. परंतु ह्याहिपेक्षा तिची जरूरी कर्मणि प्रयोगांत जास्त आहे.

कर्मणि प्रयोगांत तर ती कर्तृपदाची विभक्ति असते. आणि उत्तरोत्तर कर्मणि प्रयोग भाषेमध्ये जास्त जास्त वापरांत आल्यामुळे ही विभक्ति प्रथमेपेक्षा सुद्धा जास्त महत्त्वाची व उपयोगी अशी होऊन बसली आहे.

मराठींत तृतीयेचे प्रत्यय पुढीलप्रमाणे आहेत. एकवचन-नें, एँ, ईं, शीं. अनेकवचन-नीं, हीं, ईं, शीं. एकवचनाचे तीन आणि अनेकवचनाचे चार असे एकंदर सात प्रत्यय आहेत.

प्रत्ययांची उपपत्ति--संस्कृतमध्ये तृतीया "आ, भ्याम्, भिस्" ह्या प्रत्ययांनी साधीत असत. अकारान्त नामांची तृतीया "एन, भ्याम्, ऐस्" ह्या प्रत्ययांनी साधीत असत. प्राकृतमध्ये 'एण, हिं' हे प्रत्यय तृतीयेचे होते. अपभ्रंशामध्ये त्याचें 'इण' असें रूप झालें.

१ मराठींतील 'नें' प्रत्यय (१) संस्कृत 'एन'>प्राकृत 'एण'>अपभ्रंश 'इण' ह्या प्रत्ययांपासून आला आहे. किंवा (२) लग् ह्या धातूपासून ज्याप्रमाणे द्वितीयेचा 'ला' प्रत्यय आला त्याचप्रमाणे 'ले' प्रत्ययहि आला. आणि त्या 'ले' पासून 'ने' हा प्रत्यय तयार झाला. 'नें' ह्या प्रत्ययांत जुन्या तृतीयेचा प्रत्यय दुबार आला आहे असें वाटतें.

२ एँ--हाहि प्रत्यय संस्कृत, प्राकृत, अपभ्रंशमधील जो 'एन' प्रत्यय (एन>एण>इण>एँ) सांगितला त्यापासूनच आला आहे. उदा०--संस्कृत मधील 'पुत्रेण' ह्या शब्दाचीं माहाराष्ट्रींत 'पुत्तेण' व अपभ्रंशांत 'पुत्तेण' व पुत्तेँ अशीं रूपें बनलीं. अपभ्रंशांत 'एण' ह्या प्रत्ययाचेंच 'एँ' असें सानुनासिक स्वरान्त तृतीयेचें रूप बनलें. मराठींतील 'एँ' प्रत्ययाच्या मुळाशीं तोच प्रत्यय आहे. अपभ्रंश भाषा बोलणारे लोक कांही काल 'पुत्तेण' असा उच्चार करीत असले पाहिजेत. त्याशिवाय अशीं दोन वैकल्पिक रूपें होतीं ना. पुढे तोच ण् जाऊन त्याबद्दल अन्त्य स्वर सानुनासिक बनला. ह्या दोन रूपांवरून मराठींत 'ण' चा 'न' होऊन पूतेन व पूतें अशीं दोन रूपें बनलीं. ज्ञानेश्वरींत हीं दोन्हीं रूपें सापडतात. उदा०--१ मेघेँ, ईश्वरेँ, पंडितें, नायकें (पंढरपूर). २ जाणतेन, पढियंतेन, गद्रेन, राणेन, सेतुगुडेन (पंढरपूर). जुन्या शिलालेखांत 'एँ' हा प्रत्यय सापडतो. उदा०--चाउण्डरायें (श्रवणबेलगोळ), गाढवें (परेळ),

नायकें; सेनावइएँ; देवें; रायें (पंढरपूर), मापें (पाटण). मराठी काव्यांत व पेशवेकालापर्यंतच्या गद्यांतहि तृतीयेचा हा प्रत्यय वापरला जात असे. उदा०--उपजलो भावो। तुझे कृपें सिद्धि जावो, (तुकाराम). महाराजें सांगितलें. सुयोधनें हरिलें इत्यादि.

वर्तमानकालीन मराठींत हा 'एँ' प्रत्यय सररहा वापरीत नाहीत. कांही शब्दांत विशेषतः विभक्तिप्रतिरूपक अव्ययांत 'एँ' प्रत्यय आढळतो. उदा०--प्रमाणें; मुळें, संगें, सवें.

"आपल्या कृपेंकरून, तेणेंकरून." वगैरे प्रयोगांत हाच प्रत्यय आहे असें नवलकर म्हणतात.

३ ईं—तृतीयेच्या ह्या एकवचनी व अनेकवचनी प्रत्ययाची उपपत्ति पुढीलप्रमाणें आहे. (अ) एभिः (संस्कृत) > एहिं (प्राकृत) > ईं (जुनी मराठी)—ईं अशी उपपत्ति देतात. परंतु ह्या मार्गानें अनेकवचनांतील 'ई' प्रत्ययाची उपपत्ति लागते. अनेकवचनापासून एकवचनाचा प्रत्यय झाला कीं काय व तसें असेल तर अनेकवचनाच्या ठिकाणीं एकवचनाचा अर्थ कसा प्राप्त झाला ह्याविषयी उलगडा होत नाही. (आ) आमच्या मतें तृतीयेचा हा एकवचनी 'ईं' प्रत्यय वर सांगितलेल्या 'एँ' ह्या एकवचनी प्रत्ययाचा ह्रस्वोच्चार आहे. 'एँ' चें ह्रस्वीकरण म्हणजे 'ईं'. ह्या उपपत्तीनें अनेकवचनापासून एकवचनाचा अर्थ कसा आला हें कोडें राहत नाहीं. ह्या प्रत्ययामुळे तृतीया आणि सप्तमी ह्या दोन विभक्तींच्या बाबत घोटाळा उत्पन्न होतो.

४ शीं—ह्या प्रत्ययाची उपपत्ति. १ समम् > सविँ > सवें > शीं (राजवाडे). २ सहितम् > सइअँ > सीँ > शीं. ३ सह > सिँ > शीं. ह्या तीन्हींपैकी पहिल्या दोन सयुक्तिक वाटतात. 'सह' पासून 'सिँ' प्रत्यय निघालेला नाही. कारण माहाराष्ट्रींत व अपभ्रंशांत 'सह' मधील 'ह' कायम राहतो. 'समम्' मधील 'म्' चा अपभ्रंशांत 'वँ' होतो. 'सहितम्' ह्यापासूनहि 'सइअँ' असा शब्द होणें शक्य आहे. 'इंद्रियेसिँ' ह्या रूपांत सप्तमीच्या 'सिँ' ह्या रूपाशीं 'इंद्रियेँ' ह्या तृतीयेच्या रूपाचा संयोग होऊन हा तृतीयासप्तमी योग झाला आहे. 'समम्' शब्द तृतीया घेतो.

५ अनेकवचनाचे प्रत्यय— नीं. हा प्रत्यय एकवचनाचा ' नें ' हा जो प्रत्यय मागे दिला आहे त्या प्रत्ययाचेंच अनेकवचन आहे.

६ हीं—हा प्रत्यय संस्कृत– 'एभिः'>प्राकृत--' एहिं ' ह्या प्रत्ययापासून आला आहे. वर्तमान मराठीत ह्या प्रत्ययाचा उपयोग फारसा आढळून येत नाही. पेशवेकालीन व पुढे अव्वल इंग्रजींतील मराठींत हा प्रत्यय पुष्कळ उपयोगांत होता. उदा०--महाराजाहीं, त्याहीं, सैनिकाहीं इत्यादि.

७, ८ ईं. शीं— ह्या प्रत्ययांसंबंधी विवेचन वर आलेंच आहे.

९ आ—हा प्रत्यय स्त्रीलिंगी नामांना एकवचनांत लागतो. उदा० आत्मसुखेच्चिया, गोडिया (ज्ञानेश्वर). वोजा. सुखेच्चिया देवीआ (पंढरपूर). ह्या प्रत्ययाचें मूळ संस्कृतमधील तृतीयेच्या ' आ ' प्रत्ययांत आहे. प्राकृत मध्ये ' अए, आअ ' असे दोन प्रत्यय तृतीया, षष्ठी व सप्तमी ह्या विभक्तींचे आढळून येतात.

वर जो तृतीयेचा ' एँ ' प्रत्यय सांगितला त्याचें जुन्या मराठींत व कांही प्रांतिक भाषांत ' न ' असें रूप होतें आणि तें ' अ ' कारान्त नाम आणि विशेषण ह्यांना लागतें. उदा०--मढिचेन मार्पे (पाटण). वारेन (वार्या +नें)—(ज्ञाने.) खरें पाहिलें असतां हा प्रत्यय 'न' नसून 'नि' असा आहे. 'नि' प्रत्ययाचें ऱ्हस्व स्वरूप 'न' हें आहे. 'नि' प्रत्यय पुष्कळ वेळां वापरांत आहे. उदा०--१ ऐसे माल्हाथिले मोहे । माजिरेनि ( ज्ञा. १४।२५१ ) २ अविवेकाचेनि माजें, ३ तैसेंनि ज्ञानें ४ मेघाचेनि मुखें, ५ पिंडाचेनि मिसें ( ज्ञा. १४।२४६ ). कोंकणी व खानदेशी भाषात हा प्रत्यय क्रियापदांपुढे लावतात. उदा०—त्यानें काम केलेनि, मी सांगितलेनि इत्यादि. ह्या ' नि ' प्रत्ययाची उपपत्ति राजवाडे ह्यांनी 'त्यानें काम केलेनि--तेन कर्म कृतेन; मी सांगितलेंनि--मया संख्यातेन' अशी ' सता तृतीया ' चीं उदाहरणें म्हणून लावली आहे.

हा नि प्रत्यय दुसऱ्या एका ' नि ' प्रत्ययापासून निराळा केला पाहिजे. ' करूनि, म्हणौनि, घेऊनि ' वगैरे धातु-साधित अव्ययांच्या पुढे 'नि' प्रत्यय येतो. 'नि' प्रत्यय पादपूरक अव्यय आहे असें राजवाडे म्ह-

जतात, व त्याबद्दलचा जुना दाखला माहाराष्ट्री आणि अपभ्रंश भाषांत असल्याचें सांगतात.[१]

## चतुर्थी

१६५ संस्कृतमध्ये चतुर्थी विभक्ति असून तिचा अर्थ संप्रदान आहे. प्राकृतमध्ये 'पुत्ताअ, इत्थिताए, देवताए' अशी चतुर्थीचीं एकवचनाचीं रूपें सापडतात[२]. तरी पण त्या भाषांत चतुर्थीचा सररहा उपयोग होत नाही. प्राकृतमध्ये चतुर्थीचा लोप झाला, आणि चतुर्थीचा अर्थ द्वितीया आणि षष्ठीच्या साहाय्याने दाखविला गेला. मराठीमध्ये चतुर्थी विभक्ति आहे व तिचा अर्थ संप्रदान आहे. मराठींतील चतुर्थीचे विभक्तीचे प्रत्यय पुढील प्रमाणे आहेत.

१ स.—जुन्या मराठी लिखाणांत 'सिं, सीं, शीं' अशीं त्याचीं रूपें सापडतात. उदा.—वडिलाचे सेवेसी—°शीं; त्यासी; अर्जुनासी सांघे देओ. 'सी' ह्या प्रत्ययाचें ऱ्हस्व स्वरूप 'स' हा प्रत्यय आहे. ह्याची उपपत्तिः— १ संस्कृत 'स्य' व प्राकृत 'स्स' ह्यापासून मराठी 'स' प्रत्यय आला आहे. ह्या उपपत्तींत चतुर्थी आणि षष्ठी ह्या दोन विभक्तींच्या अर्थाचा मेळ बसत नाही ही मोठी अडचण आहे. परंतु ह्याचा निर्वाह "शेषे षष्ठी" ह्या सूत्राने लावतात. संस्कृतमध्ये ज्याप्रमाणे षष्ठी विभक्ति इतर कोणत्याहि विभक्तीसाठी वापरतात त्याप्रमाणे मराठीत चतुर्थी विभक्ति इतर कोणत्याहि विभक्तीसाठी वापरतात.

२ चतुर्थीचा 'स' प्रत्यय 'आस (पास)' ह्या मराठी शब्दाच्या सप्तमीच्या एकवचनापासून—'आसि' ह्या रूपापासून निघाला आहे[३].

३ सहितम् -- सइअँ – सीं -- स. किंवा समम् -- सवँ -- सीं -- स. ह्या मार्गानेहि चतुर्थीचा 'स' प्रत्यय येणें शक्य आहे. तृतीयेच्या एकवचनाच्या सी -- शीं ह्या प्रत्ययाप्रमाणें चतुर्थीच्या एकवचनाचा सी -- शीं असा

---

१ राजवाडे, सुबन्तविचार, पृ. ८

२ Pischel P. G. P. ३. राजवाडे. ३ ज्ञानेश्वरी, व्या. पृ. ११.

एक प्रत्यय आहे. हे दोन्ही प्रत्यय सारखेच आहेत. फक्त दोन्ही विभक्तींच्या अर्थांत ( कारकांत ) फरक पडला आहे.

२ लाः—( १ ) हा प्रत्यय संस्कृत लग् ह्या धातुपासून झालेल्या 'लागीं' ह्या अव्ययापासून निघाला आहे. 'लागीं' हा प्रत्यय जुन्या लिखाणांत व काव्यांत आढळतो.

( २ ) हा प्रत्यय ज्याअर्थी शिवकालांतील व त्या पूर्वींच्या वाङ्मयांत आढळत नाही त्याअर्थी हा प्रत्यय संस्कृत किंवा प्राकृत ठशाचा नसून फारशी भाषेतून आला असावा असा राजवाड्यांचा तर्क आहे[1].

३ तेः—१ हा प्रत्यय 'अर्थे' (सं) -- अत्थे (माहाराष्ट्री) -- अथ्थे (अपभ्रंश) -- थे, थें -- तें ह्या मार्गाने आला आहे. हा प्रत्यय जुन्या मराठींत फार येतो. आधुनिक मराठींत वापरला जात नाही. गुरूथें, घराथें, [ गुरुचरित्र ], श्रीविठ्ठलरावाथें [ पंढरपूर शि. ]. अशीं जुनीं रूपें 'थे' प्रत्ययान्त सापडतात.

४ अनेकवचनांत हेच 'स, ते' प्रत्यय वापरले जातात व त्यांशिवाय आणखी एक 'ना' प्रत्ययहि आहे. हा प्रत्यय 'ला' प्रत्यय व त्याच्यापूर्वींचा अनेकवचनदर्शक अनुनासिक ह्या दोहोंचा मिळून झाला आहे. उदा. —ँला – न्ला – ना. ( त्यान्ला, माणसान्ला, मुलान्ला अशीं रूपें वापरलेलीं आढळतात ).

## पंचमी

१६६ पंचमीचे प्रत्यय दोन्ही वचनी ऊन, हून, सून (कधी कधी) हे आहेत. (१) हे प्रत्यय प्राकृतमधील 'हिन्तो, सुन्तो' ह्या पंचमीच्या प्रत्ययांपासून आले आहेत असें एक मत आहे.

(२) माहाराष्ट्री प्राकृतमध्ये 'पुत्त' ह्या शब्दाचें 'पुत्तातोँ' असें पंचमीचें रूप होतें. त्यांतील अनुनासिकाचा उच्चार स्पष्ट होऊन त्याचा 'न' झाला. उदा.—पुत्तातोँ –पुत्तातोन असें रूप झालें. ह्याचींच 'पुत्तातोन पुत्तातोनि, पुत्तातुनी' अशीं रूपें झालीं व त्यापासूनच 'पुत्ताहूनी, पुतातून, पुताहून' अशीं रूपें झालीं.

---

१ राजवाडे. म. इ. साधनें, खंड ८ प्रस्तावना.

(३) ' होऊन ' ह्या ' ऊन ' प्रत्ययान्त धातुसाधितापासून 'हून' हा प्रत्यय निघाला आहे[1]. हेंच मत वरील दोन्हीपेक्षा विशेष ग्राह्य आहे. नामाची द्वितीया करून पुढे ' होऊन ' हें धातुसाधित ठेविलें म्हणजे नामाचें पंचमीचें रूप सिद्ध होतें. उदा.— गावा-होऊन = गावाहून. गावास-होऊन = गावासून. ह्या रीतीनें ' हून व सून ' ह्या दोन्हीं प्रत्ययांची उपपत्ति लागते. ' हून ' हा द्वयक्षरी आहे म्हणून व तो नामास लागतांना मध्ये ' हि ' सारखे अव्यय कधी कधी येतें म्हणून त्याला प्रत्यय न मानतां शब्दयोगी अव्यय मानण्याकडे प्रवृत्ति होते.[2]

## षष्ठी

१६७ षष्ठी विभक्ति ही स्वतंत्र विभक्ति मानावी किंवा नाही ह्यासंबंधी मतभेद आहे. इतर विभक्तींच्या बाबतींत ज्याप्रमाणे कारकसंबंध सांगतां येतो तसा षष्ठी विभक्तींच्या बाबतींत सांगतां येत नाही म्हणून तिला विभक्ति मानू नये. षष्ठीचा जो अर्थ 'संबंध' तो वाक्यांतील एका नामाचा दुसऱ्या नामाशींच येतो, क्रियापदाशीं येत नाही. म्हणून इतर विभक्तीं-प्रमाणे षष्ठी विभक्ति नाही. शिवाय षष्ठीच्या ' च ' ह्या प्रत्ययापुढे इतर विभक्तींचे प्रत्यय लागतात व ते पुढील विशेष्याप्रमाणे लिंग व वचन ह्यांचे बोधक असतात. उदा०—त्याच्याने, माझ्याच्याने, त्याच्याच्याने इत्यादि. षष्ठी ही विशेषणस्वरूपी विभक्ति आहे.

परंतु इतकें जरी असलें तरी षष्ठीस विभक्ति मानण्यास ह्यापेक्षा बलवत्तर कारणें पुढीलप्रमाणे आहेत.

१ षष्ठीचा ' च ' हा प्रत्यय लावण्यापूर्वी शब्दाचें सामान्यरूप होतें. मनुष्य – मनुष्याचा.

२ ' च ' प्रत्ययान्त नामाच्या विशेषणाचेंसुद्धा सामान्यरूप होतें. इतर तद्धित प्रत्यय किंवा विशेषणप्रत्यय ह्यांच्या बाबतींत असें सामान्यरूप होत नाही. उदा.—चांगल्या मनुष्याचा. लाल पुणेरी जोडा.

३ समासांत षष्ठीच्या ' च ' प्रत्ययाचा लोप होतो. उदा०— देवघर, राजपुरुष.

---

१ राजवाडे ज्ञाने. व्याकरण पृ. १२. २ गो. कृ. मोडक म. अ. द. पृ. १९७.

४ 'च' प्रत्ययान्त शब्द नेहमी विशेषणच असतो असेंहि नाहीं. उदा०--तो दिवसाचा निजतो, रात्रीचा जागतो.

ह्या कारणांवरून षष्ठी ही विभक्ति मानिल्याशिवाय गत्यंतर नाही[१].

षष्ठीचे प्रत्यय १ चः—षष्ठी विभक्ति विशेषणस्वरूप असल्यामुळे विशेष्याच्या लिंगवचनाप्रमाणे हा 'च' प्रत्यय बदलतो. उदा० —चा, ची, चें. (एकव.) चे, च्या चीं (अनेकव.) हे प्रत्यय नामास लागतात.

झः—कांही सर्वनामांना झा, झी, झें हे प्रत्यय लागतात, उदाः— माझा-झी-झें, तुझा-झी-झें.

लः--'आपण' ह्या सर्वनामाला षष्ठीचे 'ला-ली-लें' हे प्रत्यय लागतात.

कः —कोंकणी मराठींत 'का' हा प्रत्यय षष्ठयर्थी लागतो.उदा— माका, तुका, [ मामक, तावक--संस्कृत ]

१६८ उपपत्तिः–१ 'स्य' ह्या संस्कृतमधील षष्ठीच्या प्रत्ययापासून. परंतु ह्यामध्ये एक अडचण येते. अपभ्रंशांत किंवा माहाराष्ट्रींत व संस्कृतांत 'स्य' प्रत्यय पुढील विशेष्याच्या लिंगाप्रमाणे बदलत नाही.

२ 'त्य' ह्या संस्कृत प्रत्ययापासून [भाण्डारकर व राजवाडे]. उदा— अत्रत्यः -- अत्थच्च -- एत्थच्च -- येथचा; ग्रामत्यः -- गाँवच्च -- गांवचा; गृहेत्यः -- घरचा. अरण्यतः -- रण्णच्च -- रानचा इत्यादि.

३ 'सत्क' ह्या प्रत्ययापासून. जुन्या संस्कृत शिलालेखांत 'सत्क' हा षष्ठीचा प्रत्यय वापरला आहे. ह्या प्रत्ययापासून मराठी षष्ठीचा 'च' व हिंदी षष्ठीचा 'क' हे दोन्ही प्रत्यय आले आहेत [ वैद्य ].

४ 'ईय' ह्या संस्कृतमधील तद्धित प्रत्ययापासून हा प्रत्यय आला आहे असें आमचें मत आहे. हीच उपपत्ति जास्त सयुक्तिक आहे. ईय > इज्ज > इज्ज > च ह्या मार्गानें 'च' प्रत्यय येणें शक्य आहे. कारण—

१ हा 'ईय' प्रत्यय विशेष्याच्या लिंगवचनाप्रमाणे बदलण्यास प्रत्यवाय नाही.

२ सर्वनामांतील 'झा' प्रत्यय ह्या 'ईय' प्रत्ययापासूनच आला आहे. उदा०:–मदीय > माझा, त्वदीय > तुझा, अस्मदीय > आमचा.

---

१ गोडबोले—मराठी मध्यम व्याकरण पृ. ६

३ सिंधी भाषेंत षष्ठीचा ‘ जो ’ हा प्रत्यय आहे तो ह्याच ‘ ईय ’ प्रत्ययापासून आला आहे. त्याअर्थी मराठीचा ‘ च ’ प्रत्ययहि ह्याच ‘ ईय ’ प्रत्ययापासून आला असावा.

## सप्तमी

| प्रत्ययः— | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| | —ँत, ईं, आं | —ँत, ईं, आं |

१६९ उपपत्तिः—१ ँत—हा प्रत्यय संस्कृत ‘अन्तर्’ ह्या अव्ययापासून आला आहे. हा प्रत्यय मराठीमध्ये येतांना त्यांतील पहिल्या ‘ अ ’ चा व शेवटच्या ‘ र् ’ चा लोप झाला. त्यांतील अनुनासिक मागील अवयवावर गेलें. अन्तर् -- ँत,— हें त्याचें रूप झालें. कांहीं उदाहरणांत ‘ त ’ हा नाहीसा होऊन तो प्रत्यय ‘ आँ ’ असा बनतो. ‘ ँत ’ आणि ‘ आँ ’ हे दोन्ही मराठी सप्तमीचे प्रत्यय संस्कृत ‘अन्तर्’ ह्या अव्ययापासून आले.

२ ईं—‘ ईं ’ ह्या प्रत्ययाची उपपत्ति वैदिक भाषेपर्यंत मागे जाते. ‘ स्मिन् ’ हा वेदामध्ये सप्तमीचा प्रत्यय आहे. पुढे संस्कृतमध्ये स्वरान्त नामाच्या बाबतींत ‘ इ ’ हा प्रत्यय तयार झाला. स्मिन् ह्या प्रत्ययाचीं रूपें प्राकृतभाषांत ‘म्मि, म्ही’ अशीं झालीं, व त्यांपासून स्मिन् -- म्मि (प्राकृत) --म्हि (पाली) -- हिं (अपभ्रंश) -- इं—ह्या मार्गानें ‘ ईं ’ हा मराठी प्रत्यय तयार झाला.

## उपपदविभक्ति

१७० वाक्यामध्ये नामाचा नामाशीं जो संबंध असतो तो दाखविणाऱ्या विभक्तीस उपपदविभक्ति म्हणतात. प्रत्येक विभक्तीचे उपपदार्थ उदाहरणांसह खाली दिले आहेत.

प्रथमाः—१ उद्देश—रामा व कृष्णा हे आले. २ विधान—उदा०—तो मनुष्य ब्राह्मण आहे. ३ परिमाण, अवधि—उदा०—चार पायली तांदूळ घेतले; तो दोन दिवस राहिला.

तृतीयाः—१ हेतु—तो गर्वानें फुगलेला आहे. २ सामीप्य—तो दाराशीं बसला आहे. ३ सहार्थ—योद्धा घोड्यानिशीं गेला. ४ मूल्य—चार पायलीनें धान्य विकलें. ५ तुलना—हें कापड त्या कापडाशीं लागत नाहीं.

चतुर्थीः--१ प्रयोजन–तो कीर्तीला झटतो. २ मूल्य–पैशाला दोन केळीं मिळतात. ३ जन्यजनक भाव--दशरथाला चार पुत्र होते. ४ अवयवावयवी–हाताला पांच बोटें असतात. ५ वियोग–तो चाकरीला मुकला. ६ मर्यादा, प्रमाण–दहाला दहा मिनिटें आहेत.

पंचमीः—१ तारतम्य–भीम अर्जुनाहून वडील होता. २ भेद–नकुलाहून सहदेव निराळा.

षष्ठीः—१ प्रयोजन–स्नानाची जागा. २ परिणाम–लोखंडाचें सोनें. ३ मूल्य–रुपयाचें कापड. ४ जन्यजनक–पांडवांचे मुलगे. ५ स्वस्वामिभाव--राजाचा वाडा. ६ अंगांगिभाव--खुर्चीचा पाय. ७ अनेक, सर्व ह्या अर्थी--थवेचे थवे. ८ आधाराधेय--तळयाचें पाणी इत्यादि.

सप्तमीः–हेतु--या कामीं माझें नुकसान झालें. पृथक्करण--सर्वां भूतीं श्रेष्ठ.

प्रत्येक विभक्तीचा कारक, अर्थ व संबंध दाखविणारे जसे प्रत्यय आहेत तसेच प्रत्येक विभक्तीचीं शब्दयोगी अव्ययें आहेत. हीं शब्दयोगी अव्ययें नामास लावतांना नामाचें सामान्यरूप होतें; म्हणूनच ह्यांना विभक्तिप्रतिरूपक अव्ययें म्हणण्याची पद्धत आहे. प्रथमा, द्वितीया व संबोधन ह्या तीन विभक्तींशिवाय करून बाकीच्या पांच विभक्तींचीं अव्ययें आहेत. तीं खालीलप्रमाणे आहेत.

१ तृतीयार्थकः—कडून (–कड), करून (--कृ), द्वारा, द्वारें, पार्यी, पाशीं (--पार्श्व), मुळें, वतीनें, सकट, संगतीं (संगम), संगें (--संग), सन्निध (--धा), समवेत (--इ), सरसे, सरशी, सरसा (--सदृश्) नजीक, बरहुकूम, बरोबर.

२ चतुर्थ्यर्थकः—अर्थ, अर्थी, साठीं (--स्वार्थे), स्तव, कारणें, निमित्तें, लागीं (लग्), प्रत, प्रीत्यर्थ, करिता (–कृ), बदला, मोबदला, खातर.

३ पंचम्यर्थकः—आंतून, उप्रांत (--उपरान्त) पासून पासाव, पासोनिया, पासोनि (--पार्श्व), पेक्षां, पर्यंत, पावेतों (पावे तों), वांचून (--वंच्), विणें, वीण, शिवाय, खेरीज.

४ षष्ठ्यर्थकः—संबंधी, विषयी, विशीं.

५ सप्तम्यर्थक:—आंत, अंती, ठायीं (–स्थान) विषयीं, भोंवतीं भीतरीं (अभ्यंतर), माझी, माझारी (मध्ये), वरी, वेन्ही (ज्ञाने०) मध्ये, मागे, वर, येथे, तेथे. इत्यादि.

## सामान्यरूप

१७१ विभक्तिप्रत्यय अथवा शब्दयोगी अव्यय लावण्यापूर्वी शब्दाचें जें रूप होतें त्यास 'सामान्यरूप' म्हणतात.

शब्दाचें सामान्यरूप करण्याची पद्धत फार जुनी आहे. मराठी भाषा सुरू होण्याच्या पूर्वी अपभ्रंश, प्राकृत ह्या भाषांत शब्दांचें सामान्यरूप करीत असत. संस्कृतमध्येहि शब्दांचें सामान्यरूप केलेलें आढळतें. त्याचें स्पष्टीकरण विभक्तींच्या प्रत्ययामध्ये फरक दाखवून करीत असत. मराठी-प्रमाणे बिहारी, गुजराती, सिंधी, पंजाबी ह्या वर्तमानकालीन बोलींमध्येहि सामान्यरूप केलें जातें. फक्त बंगाली व आवधी ह्या दोन भाषांतच तें केलें जात नाही. प्राकृतमध्ये 'ममाइ' (तृतीया); ममादो, ममाहि (पंचमी); ममम्मि (सप्तमी) अशीं रूपें सापडतात. ह्या रूपांवरून असें दिसतें कीं 'मम' ह्या षष्ठीच्या रूपाला निरनिराळ्या विभक्तीचे प्रत्यय लाविले जात. अपभ्रंश प्राकृतांत हाच प्रकार आढळतो. उदा०–"हऊं झिज्जउ, तउ केहिं पिअ तुहूं पुण अन्नह रेसि मी" ह्या वाक्यांतील 'केहिं' आणि 'रेसि' हीं दोन अव्ययें 'तउ' आणि 'अन्नह' ह्या दोन षष्ठीच्या रूपांना लाविलीं आहेत

मराठींत सामान्यरूप साधण्याचे पांच प्रकार आहेत. एकवचन:– १ आ, २ इ, ३ ई, ४ ऊ, ५ ए. अनेकवचन:–१ आ, २ ई, ३ आ, ४ ऊ, ५ आ.

ह्यांपैकी पहिला प्रकार घेणारीं नामें:—पुं. व न. अकारान्त उदा:- हाता-स हातां स, फळा-स फळांस. पुं. आकारान्त—आंब्या-चा आंब्यां-चा. न. एकारान्त—केळ्या-स केळ्यां-ना. न. ईकारान्त मोत्या-वर मोत्यां-वर. पुं. ऊकारान्त कांही नामें-वाटसरा-नें, वाटसरांनी. न. ऊकारान्त-कोंकरा-चा, कोंकरां चा.

दुसरा प्रकार घेणारीं नामें:—इकारान्त तत्सम शब्द-कवी-स, कवीं-स. पुं. ईकारान्त कांही शब्द—हत्ती-वर, हत्तींवर. स्त्री. अकारान्त—केळीस, केळीं-स.

तिसरा प्रकार घेणारीं नामें:—स्त्री. कांहीं नामें घोडी-स घोड्यांस.

चौथा प्रकार घेणारीं नामें:—पुं. स्त्री. कांहीं नामें खाऊ-स, खाऊं-स; बाजू-चा बाजूं-चा.

पांचवा प्रकार घेणारीं नामें:— स्त्री. आकारान्त-जिभे-स, जिभां-स. ऊकारान्त-जळू-स जळवां-स, जळवे-स.

१७२ मराठींतील नामाच्या सामान्यरूपाच्या उत्पत्तीविषयी बराच मतभेद आहे. विभक्तिप्रत्यय लावण्यापूर्वी प्रतिपादिकाचें जें रूप किंवा अंग होतें त्यांस सामान्यरूप म्हणतात. प्रत्यय लावल्यानंतर प्रातिपदिक आणि प्रत्यय हे दोन्ही सहज उच्चारतां यावें म्हणूनहि पहिल्या प्रातिपदिकाच्या रूपांत फरक पडत असावा. केवळ उच्चारसौकर्यासाठीच प्रातिपदिक हें प्रत्ययापूर्वी एक विशिष्ट रूप धारण करीत असलें पाहिजे. उच्चारसौकर्य हें एक शब्दाच्या सामान्यरूपाचें कारण असावें हें एक मत आहे.

सामान्यरूपाच्या मुळाशीं उच्चारसौकर्य हेंच एक कारण समजून चालत नाहीं; कारण शब्दाचें सामान्यरूप होण्यांत सुद्धा एक प्रकारचा नियम आहे.वाटेल त्या शब्दाचें वाटेल तसें उच्चाराला सुगम असें सामान्यरूप होत नाहीं. सामान्यरूपाचे नियम वर जे त्याचे पांच प्रकार दिले आहेत त्यावरून बांधतां येतील.

मराठींतील सामान्यरूप हें षष्ठी विभक्तीच्या रूपांपासून साधलें आहे असें दुसरें मत आहे (बीम्स, भाण्डारकर). उदा०--१ हातास-हस्तस्य-हत्थह-हातह-हातअ-हाता + स. २ हातांना, हस्तानाम्-हत्थणं-हातणं-हातअं-हातॉं + ना. ३ जिभेस, जिव्हायाः-जिब्भाए > जिभे-स. ४ जिभांना जिव्हानाम् - जिब्भाणं - जिब्भाअँ-जिभाँ + ना, अशा प्रकाराने वर दिलेल्या पांची प्रकारांतील उदाहरणें सोपपत्तिक मांडतां येतील.

ह्या सामान्यरूपांना म्हणजे षष्ठी विभक्तीच्या अपभ्रष्ट रूपांना पुनः मराठीचे विभक्तीचे प्रत्यय लागतात.

सामान्यरूप हें चतुर्थीच्या रूपापासून साधलें आहे असें तिसरेंहि एक मत प्रचलित आहे[१]. उदा० 'मह्यम्' ह्यापासून प्राकृतमध्ये 'मज्झम्'

१ J. Bloch L. F. M. §183

असें रूप होतें. व त्यापासून 'माझा' हें रूप सिद्ध झालें. 'माझा' पासून 'मज' हें रूप सिद्ध होतें व 'मज' ह्या सामान्यरूपाला इतर विभक्तींचे प्रत्यय किंवा शब्दयोगी अव्ययें लागतात. तीच गोष्ट 'तुज' 'त्याज' इत्यादि शब्दांची. जी गोष्ट सर्वनामांच्या बाबतींत दिसून येते तीच नामांच्याहि बाबतींत खरी ठरण्यासारखी आहे. चतुर्थीच्या प्रत्ययाचें रूपांतर पुढीलप्रमाणे नामाच्या बाबतींत होतें.

| चतुर्थी एकवचन संस्कृत | पाली | प्राकृत | अपभ्रंश |
|---|---|---|---|
| आय | आअ | आ | आहे, आह |

ह्या वरील जोडयांवरून असें दिसून येईल की अपभ्रंशाच्या रूपांत 'ह' येतो. हा 'ह' कांही 'य' पासून किंवा 'अ' पासून येणें शक्य नाही. उच्चार सोपा करण्यासाठी हा 'ह' येतो[१] असें म्हणून चालावयाचे नाही. कारण उच्चार सोपा करण्यासाठी 'ह' कधी येत नाही, तर य् किंवा व् येतो. अनेकवचनाच्या प्रत्ययाच्या बाबतींत हीच अडचण उभी राहते. शिवाय चतुर्थीच्या कारक अर्थाची–संप्रदानाची–अडचण राहते ती निराळीच. सामान्यरूप हें प्रथमेपासून सर्व विभक्तींच्या बाबतींत होतें. तर मग मूळचा संप्रदानाचा अर्थ कसा नाहीसा झाला ह्याची उपपत्ति नीट लागत नाही. षष्ठीच्या बाबतींत एक तरी समाधान आहे, की ती कारकविभक्ति नाही.

सामान्यरूपाची उपपत्ति षष्ठी किंवा चतुर्थी ह्या दोहोंपैकी कोणत्याहि विभक्तीपासून नीट समाधान करण्याजोगी लागत नाही.

विभक्तीचे प्रत्यय हे सार्वनामिक बीजांपासून उत्पन्न झाले आहेत हें वर सांगितलेंच आहे. मराठींतील विभक्तिप्रत्यय लागलेलीं जुनीं रूपें पाहिलीं तर त्यांतहि सर्वनामाचीं रूपें लागून शब्दांचीं सामान्यरूपें झाल्याचें दिसून येईल. "घराचेया, देवाचिया, देवाचेआ, देवाचेया, देविआ, भक्तिआ, नाणेचिआ, पुणियास, पुणियाचे," ह्या सर्व रूपांत एआ, एया, इआ, इया, या, आ वगैरे जीं रूपें दिसतात तीं सर्व 'हें' (इ < इदम्) ह्या सर्वनामापासून निघालीं असून तींच मराठींतील सामान्यरूपाच्या मुळाशीं आहेत. मराठींतील सामान्यरूप ह्यापासून निष्पन्न झालें असें आम्हांस वाटतें.

---

१ J. Bloch L. F. M. § 183.

## सर्वनामविभक्ति

१७३ भाषेमध्ये आद्य शब्द दोन प्रकारचे असतात, एक प्रकार सार्वनामिक आणि दुसरा प्रकार क्रियावाचक. सार्वनामिक बीजांपासून प्रत्यय तयार होतात आणि क्रियावाचक बीजांपासून इतर शब्द तयार होतात. ह्या शब्दांना 'प्रकृति' म्हणतात. भाषेचा सर्व पसारा ह्या प्रकृति आणि प्रत्यय यांच्या जुळणीवर अवलंबून असतो. भाषेत क्रियावाचक बीजांपेक्षाहि अगोदर हीं सार्वनामिक बीजें तयार होतात. सर्वनामें —त्यांतहि पुन्हा पुरुषवाचक सर्वनामें—अगोदरचीं आहेत. 'अहम्' शब्द इतका जुना आहे की, जुनी जुनी म्हणून समजली गेलेली वैदिक भाषा ही सुद्धा त्याच्या मानाने कालपरवाची भाषा ठरेल. प्रत्ययप्रक्रियेचें विवरण करतांना जरी नामानंतर सर्वनामांचा उल्लेख येतो तरी शब्दांच्या उत्पत्तीचा विचार करतांना अगोदर सर्वनामें व नंतर नामें, विशेषणें इत्यादि असाच त्यांच्या उत्पत्तीचा क्रम लागेल. ह्या शब्दांना 'सर्वनाम' हें नांव संस्कृत व्याकरणांत पाणिनींने जी परिभाषा वापरली त्यामुळे पडलें. "सर्वादिनि सर्वनामानि" असा उल्लेख पाणिनि ह्या शब्दांसंबंधी करतो. ह्या शब्दांचें परिगणन करितांना 'सर्व' हा शब्द सर्वांच्या अगोदर आला म्हणून त्यानंतर आलेल्या शब्दांना 'सर्वनाम' (सर्वशब्दः आदौ येषाम्) अशी संज्ञा पडली.

१७४ सर्वनामांचे प्रकार :—१ पुरुषवाचक २ दर्शक ३ संबंधी ४ प्रश्नार्थक. ह्या चारींशिवाय अनिश्चित आणि आत्मवाचक असेहि दोन भेद मानतात.

१ पुरुषवाचक–१ प्रथमपुरुषवाचक, २ द्वितीयपुरुष०, ३ तृतीयपुरुष०, ४ सामान्यपुरुष० सर्वनाम हे चार पुरुषवाचकांचे प्रकार आहेत.

१ प्रथमपुरुषवाचक मी, आम्ही. मीः—संस्कृतमध्ये प्रथमपुरुषाचें सर्वनाम 'अहम्' आहे. प्राकृतमध्ये ह्याचींच अहकम्, अहके, हके, हगे, हग्गे अशीं रूपें झालीं व हीं रूपें अर्धमागधी, जैन मागधी, भास व अश्वघोष ह्यांचीं नाटकें ह्यांत वापरलेलीं आढळतात. गुजराती, हिंदी वगैरे भाषांतील 'हुं, अहुं, हांऊ' वगैरे प्रथमपुरुषवाचक सर्वनामें वर

दिलेल्या उपपत्तीवरूनच आलीं आहेत. परंतु मराठी भाषेंतील ' मी ' हें सर्वनाम मात्र ह्या सर्वांहून भिन्न आहे. 'मी' ची उपपत्ति खाली दिलेल्या तीन प्रकारांनी लावतां येईल.

१ माहाराष्ट्री ' म्मि ' पासून.

२ वैदिक भाषेमध्यें ' अस्मे ' हें सर्वनाम ' वयम् ' ह्या अर्थी प्रथमपुरुषी अनेकवचनी आहे. त्यापासून आम्ही आणि मी हीं दोन्ही एकवचनी आणि अनेकवचनी रूपें निघालीं असावींत. अस्मे> आम्हे>आम्ही;>आमि>मी. बहुमानार्थी अनेकवचनाचा उपयोग एकवचनांत नेहमीच करतात. असाच प्रकार कायम रूढ होऊन बसला असावा आणि अनेकवचनी रूप एकवचनाच्या अर्थाने रूढ झालें असावें.

३ किंवा मराठींतील ' मी ' हें सर्वनाम ' अहम् ' ह्या सर्वनामाच्या तृतीयेच्या रूपापासून आलें असावें. मया (सं.)>मए, मइ ( प्राकृत )> मइँ (अपभ्रंश) > मी ( मराठी ).

ह्याप्रमाणे प्राकृत व अपभ्रंश भाषांमध्ये रूपें सापडतात व ह्याच रूपांपासून हिंदी-मइँ, गुजराती-में, सिंधी-मुँ व मराठी-म्यां अथवा मीं अशीं रूपें वापरलीं जातात. ज्याअर्थी ह्या सर्व भाषांतील रूपें सानुनासिक आहेत त्याअर्थी तो तृतीयेच्या ' एन ' ह्या प्रत्ययाचा अवशेष असला पाहिजे. (एन>एँ, म्याँ>मयाँ>मयेन). कर्मणि प्रयोगांत ह्या तृतीयान्त रूपाचा उपयोग नेहमीच केला जातो. परंतु पुढे जसजसा कर्मणि प्रयोग आणि कर्तरि प्रयोग ह्या दोहो प्रयोगांचा संकर झाला व जसजसा कर्मणि प्रयोगाचा उपयोग कमी कमी होऊं लागला तसा तसा प्रथमा आणि तृतीया ह्या दोन्ही विभक्तींच्या रूपांतहि संकर झाला असावा.

| | | | |
|---|---|---|---|
| इतर विभक्तींचीं रूपें-- | द्वितीया च० | माते, मज, मला | आम्हांला |
| | तृतीया | म्याँ, मीं | आम्हीं |
| | पंचमी | मजहून-हुनि | आम्हांहून |
| | षष्ठी | मज, माझा | आमचा |
| | सप्तमी | मज, मी | आमच्यांत |

ह्या सर्व रूपांत विशेष ध्यानांत ठेवण्यासारखें रूप म्हणजे ' मज ' हें होय; कारण इतर विभक्तींचे प्रत्यय लागतांना ' मी ' चें ' मज ' हेंच

रूप होतें. मज=मह्यम् > मज्झम् किंवा मज्झु (प्राकृत) > मज — ही उपपत्ति आमच्या मतें योग्य नाही; कारण ह्यांत पुन्हा चतुर्थी आणि षष्ठी ह्या दोन विभक्तींचा संकर मानावा लागतो. 'मज' हें रूप जर 'मह्यम्' पासून तर 'माझा' हें रूपहि त्यापासून मानावें लागेल. आमच्य मतें मज किंवा माझा हीं दोन्ही रूपें 'मदीयम्' ह्या रूपापासून निघालीं आहेत. ईय>ईज्ज>ज अथवा 'झ' ही उपपत्ति जास्त सयुक्तिक आहे. हीमध्ये दोन विभक्तींचा संकर होत नाही. किंवा द्वितीया व चतुर्थी ह्या विभक्तींतील 'मज' हें रूप 'मह्यम्' पासून आणि षष्ठीचें 'माझ' हें रूप 'मदीयम्' पासून निष्पादावें. जी गोष्ट मज, माझा ह्यासंबंधी तीच गोष्ट तुज व तुझा ह्यासंबंधी समजावी. ( तुभ्यम् >तुज्झम्>तुज्झु>तुज; किंवा त्वदीयम् पासून ).

तूं:— ह्या सर्वनामाची उत्पत्ति उघड असल्यामुळे नुसतीं रूपेंच फक्त खाली दिलीं आहेत.

| संस्कृत | माहा. | अप | मराठी |
|---|---|---|---|
| त्वम् | तुम् | तुहुं | तूं |
| तुभ्यम् | तुज्झुम् | तुज्झु | तुज |
| त्वया | तुमाइँ | तइँ | तुवाँ, वाँ, तूं |
| त्वदीय | | | तुझें |
| | तुम्हेच्चअ | | तुमचें |

तो, ती, तें:— संस्कृतमध्ये तृतीय पुं. सार्वनामिक बीज 'तत्' हेंच आहे. ह्या 'तत्' पासून पुंलिंगी 'सः' व स्त्रीलिंगी 'सा' अशीं रूपें होतात. प्राकृत व अपभ्रंश भाषांतहि 'सो आणि सा' अशीं रूपें होतात. इतर विभक्तींच्या रूपांत 'त'चा अवशेष राहतो. हें 'तत्' सर्वनाम वैदिक भाषेंत 'त्यत्' ह्या स्वरूपांत सापडतें. ग्रामिक 'त्यो' मध्ये त्याचा अवशेष राहिला आहे. 'तो, ती, तें' ह्या तिन्ही लिंगी सर्वनामांना नामाच्या विभक्तींचे प्रत्यय लागतात. तो, त्यास, त्याला, त्यातें, त्यांना; त्यानें, त्यांनी, त्यांहीं; त्यास-त्याला-त्यांना; त्याहून, त्यांहून—त्याचा, त्यांचा, त्यांत, त्यांत इत्यादि रूपें होतात.

१ Chatterji, O. D. B. II 813.

'ती, तें'—ह्यांचीं लिंगभेदाप्रमाणे रूपें तयार होतात.

स्वतः०— हें सामान्य पुरुषवाचक सर्वनाम आहे. ह्या सर्वनामांत एक प्रकारचें 'व्यावर्तकत्व' आहे. बोलणारा किंवा क्रिया करणारा आपल्यासंबंधी 'स्वतः' हें सर्वनाम वापरतो. ह्यास सर्वनाम म्हणण्यापेक्षा सार्वनामिक विशेषण म्हणावें. स्व+तस् ( पंचम्यर्थ अव्यय– पञ्चम्यास्त-सिल् ) ह्याचें अपभ्रष्ट रूप 'स्वतां' असेंहि कधी कधी करतात.

आपणः— हें एक सामान्य पुरुषवाचक सर्वनाम आहे. ह्या सर्व-नामांतहि 'स्वतः'च्यासारखें व्यावर्तकत्व आहे– म्हणजे क्रिया करणाऱ्याचा आपल्या स्वतःसंबंधी उल्लेख ह्यांत असतो. आपण हा शब्द संस्कृत आत्मन् ह्यापासून आला आहे. ह्याचा उपयोग आत्मवाचक, बहुमानार्थी पुष्कळ प्रकाराने होतो. 'आत्मन्' ह्या संस्कृत शब्दाचें प्राकृत रूप 'अत्त' असें होतें. ह्याच 'अत्त' रूपाबद्दल अर्धमागधी आणि शौरसेनींत 'अप्प' असेंहि रूप विकल्पाने येतें. ह्या दोन्हीच्या मिश्रणाचेच अत्प असें रूप अशोकाच्या शिलालेखांत वापरलें आहे. उत्तरकालीन प्राकृतभाषांमध्ये ह्या सर्वनामाचीं रूपें पुढीलप्रमाणे आहेत. प्र.—अप्पा, तृ.—अप्पणा, ष.—अप्पणो--अप्पणा [ बहुवचन ]. ह्या रूपापैकी वर्तमानकालीन बोलींत अप्पा ( प्रातिपदिक ) व 'आपण' हीं दोन्हीं रूपें सापडतात. 'आपण' मधील अनुनासिक 'ण' हा वर दाखविल्याप्रमाणे विभक्तिप्रत्ययांचा अवशेष आहे हें स्पष्ट आहे. 'अप्पा' पुरुषनाम म्हणून उपयोगांत आहे. परंतु 'आत्मवाचक' सर्वनाम म्हणून त्याचा उपयोग 'आपोआप, आपसुख, आपला' इत्यादि शब्दांत दिसतो. 'आपण' ह्याचा उपयोग प्रथमपुरुषी, व द्वितीयपुरुषी स्वतंत्र रीतीने होतो. परंतु आत्मवाचक म्हणून कोणत्याहि पुरुषांत व वचनांत उपयोग करतां येतो.

१७५ दर्शक सर्वनामें:—हा-ही-हें, तो-ती-तें. ह्यांपैकी तो-ती-तें ह्यांविषयी विचार वर तृ. पु. स. पहावा. पहिला 'हा' ह्यांत 'ह' हें सार्वनामिक बीज आहे. ह्याचीं ग्रामिक रूपें 'ह्यो' त्यो' अशीं होतात.

१ 'ह' हें बीज एतद् ह्या सर्वनामाचें 'एषः' ह्या रूपापासून आलें आहे.

| संस्कृत | माहाराष्ट्री | अपभ्रंश | मराठी |
| --- | --- | --- | --- |
| एषः | एसो | एहो, एह | हा |
| एतम्-नम् | एअम् | एहु | हा |
| एतेन | एअेण | एएण | ह्याने इत्यादि. |

२ 'इदम्' ह्या सर्वनामापासून 'अ' आणि 'इ' कारान्त अशीं रूपें तयार होतात व ह्या अंगांपासून तयार झालेलीं रूपें जुन्या नव्या मराठींत आढळतात. ए, ए, या, इया, यासी, इयासी, यांचे, इयांचे--पुंल्लिंगी व इया, या, इहिं-सी, इये-इया, इयांचे--स्त्रीलिंगी अशीं रूपें मराठींत आहेत. ह्या रूपांवरून मराठींतील दर्शक सर्वनाम 'हा' ह्या सर्वनामांचीं रूपें येणें शक्य आहे. मराठींतील 'हा' हें दर्शक सर्वनाम थोडेंसें चमत्कारिक आहे. 'एह' हें रूप माहाराष्ट्रीमध्ये होतें. 'आअ किंवा आय' हीं रूपें अपभ्रंशांतील आहेत. ह्या दोन्ही रूपांचीं भेसळ होऊन मराठी 'हा' हें दर्शक सर्वनाम उत्पन्न झालें असावें[१].

| संबंधी सर्वनामें | अनुबंधी |
| --- | --- |
| जो, जी, जें. | तो, ती, तें. |

ह्यांपैकीं अनुबंधी 'तो' ह्याचा विचार वर तृ. पु. 'तो'वर केला आहे तो पहावा. 'जो' हें सर्वनाम 'यत्'च्या पुल्लिंगी 'यः' ह्या सर्वनामापासून आलें आहे. आद्य 'य्' असेल तर त्याचा 'ज्' होतो. जो-जे, ज्यास-ज्याला, ज्यांस-ज्यांना, ज्याने-ज्यांनी, ज्याहून, ज्याचा, ज्यांचा, इत्यादि त्याच्या विभक्तींचीं रूपें होतात.

**१७६ प्रश्नार्थक सवनामः**— कोण ह्या सर्वनामांत "सार्वनामिक बीज" 'क' हें आहे. ह्या 'क'पासून 'कांही, काय, केव्हा, कैसी, कैचा, कसा,' इत्यादि रूपें तयार होतात. संस्कृतमध्ये प्रश्नार्थक सर्वनामाचें अंग 'क' आहे, म्हणूनच मराठी 'कोण' ह्या सर्वनामांतील 'ण' ह्याची उपपत्ति नुसत्या 'क' ह्या अंगावरून लागत नाही.

१ 'कोण' ह्याचें एक जुनें रूप 'कवणु' असें आहे. तें अपभ्रंश

१ J. Bloch—162-208. Chatterji O. D. B. p. 833.

भाषेंतील 'केवडुं' ह्या सर्वनामापासून आलें असावें[1].

२ किंवा कु-पथ, कवोष्ण--इत्यादि शब्दांतील 'कु' किंवा 'कव' ह्या कुत्सितार्थ, अल्पार्थ प्रत्ययावरून आलें असावें[2].

३ हीं वरील दोन्हीं रूपें 'कोण' ह्याच्या मुळाशीं नाहीत हें उघड उघड दिसतें. 'केवडु' (अपभ्रंश) पासून मराठी 'केवढा' हें सार्वनामिक विशेषण येऊं शकेल परंतु 'कोण' हें कसें येईल? दुसऱ्या उपपत्तींत तर पुष्कळ अर्थभेद मानावा लागतो. ह्या दोन्हीपेक्षा 'कःपुनः > कउण > कोण' ही उपपत्ति जास्त सयुक्तिक ठरते.

४ "कःचन > कअन > कअण > कोण किंवा कोनु > कोणु–कोण" ह्या मार्गानें 'कोण' हें प्रश्नार्थक सर्वनाम आलें आहे असें आम्हांस वाटतें. 'कोण' ह्या सर्वनामाची जुन्या मराठी भाषेंत 'कवण, कव्हण, कोण, कोण्ह, कोण्ही' इत्यादि रूपें सापडतात. 'कांही' हें प्रश्नार्थक विशेषण आहे. हें तिन्ही लिंगी दोन्ही वचनी सर्व विभक्तींत लागतें. हें अव्यय नसून विशेषण आहे, कारण, तें इतर विशेषणांप्रमाणे नामांना लागतें. ह्याची उपपत्ति-- कांही < काइ (अपभ्रंश) < किंहि (सं.). 'काय' हा शब्दहि अपभ्रंश 'काइ' किंवा 'कइ' व संस्कृत 'कति' ह्यापासून आला आहे. (काय < काइ, कइ < कति). ह्यांशिवाय एक, एकेक, अनेक, एरु (< इतर), आणिक, आन (अन्य), अमुक, बहुतेक, सर्व, सकल इत्यादि सर्वनामें आहेत. हीं सर्व 'अनिश्चित सर्वनामें' ह्या प्रकारांत येतात.

**१७१ सार्वनामिकविशेषणें**: ऐस, अस (एतादृश); एवढ, एआदिस > एआइस > ऐस; एतुल, एतुक, एत्तिआ (प्रा.), इतुक, तितका < तेत्तिआ; जैसा, जसा—यादृश > जादिस्स > जाइस्स > जैस. तैस, कैस. जेवढा—यावत् (मतुप्) > जेवड, (एतावत् > एआवड > एवढें; तेवढ, इवढ). जेतुला (ज्ञाने.) यत् + यन्त, जियन्त, जेत्तिआ; जित + ल (स्वार्थे), जेतुका, जितका; यत् + यन्त. जियन्त, जेत्तिआ, जित + क (स्वार्थे). अपभ्रंश

---

१ Hoernle, G. Gr. p. 219.

२ Pischel Pr. Gr. § 428.

भाषेंत एत्तक, कित्तक इत्यादि रूपें सापडतात. अनारिस < अण्णारिस < अन्यादृश. सरिस < सरिस < सदृश् . सारिख < सरिख < सदृक्ष. ह्याशिवाय जेउण, केउण, जेउत, केउंतें, ऐसेस, कैसेस वगैरे रूपें जुन्या लिखाणांत आढळतात.

## संख्यावाचक विशेषणें

१७८ भाषांनें परस्पर नातें जोडण्यास पुरुषवाचक सर्वनामें, लहान लहान अव्ययें वगैरे शब्दांचा जसा उपयोग होतो तसाच उपयोग संख्यावाचक विशेषणांचा होतो. हिंदुस्थानांतील वर्तमानकालीन भारतीय आर्य बोलींच्या बाबतींत तर हीं संख्यावाचक विशेषणें मोठे महत्त्वाचे आणि चमत्कारिक असे शब्द आहेत. वर्तमानकालीन बोलींतील व्याकरणाच्या बाबी ज्याप्रमाणे प्राकृतअपभ्रंश ह्यांच्या द्वारा थेट वैदिक संस्कृत भाषेपर्यंत नेतां येतात त्याप्रमाणे हीं संख्यावाचक विशेषणें प्राकृतद्वारा वैदिक संस्कृतपर्यंत नेतां येत नाहीत. प्राकृत भाषांच्या मध्ययुगीन कालांत संख्यावाचक शब्दांचीं रूपें एका मध्यवर्ती भाषेंत जीं झालीं तींच रूपें निरनिराळया ठिकाणच्या वर्तमानकालीन बोलींत सुरू झालीं आणि त्या त्या प्रांतांतील प्राकृतपासून उत्पन्न झालेल्या भाषेंत मूळचीं रूपें नाहीशीं होऊन त्यांच्या ऐवजी वरील रूपें आलीं. उदा०— पाली भाषेंत १२ ह्या अर्थी शब्द ‘ बारस ’ असा आहे. संस्कृत ‘ द्वादश ’ ह्यापासून मध्यदेशांत ‘ द(उ)वाडश ’ असें प्राकृत रूप झालें आणि तेंहि पालीमध्ये सापडतें. परंतु बारस व दुवाडस ह्या दोहोंपैकी अगोदरचें कोणतें आणि नंतरचें कोणतें हें सांगणें कठीण आहे. ‘ बारस ’ हें रूप पुष्कळ भाषांत रूढ आहे. मराठींत ‘ बारा ’ हें रूप रूढ आहे. चाळीस--ताळीस, सत्तर--हत्तर वगैरे फरक आहेतच. ‘ स् ’ आणि ‘ ह् ’ ह्या दोहोंची परस्पर अलटापालट होते. संख्यावाचक शब्दांचीं कांही रूपें खाली व्युत्पादिलीं आहेत.

एकः— संस्कृत — एक. प्राकृत — एक्क, एग, एअ. मराठी— एक. प्राकृतमधील ‘ एग ’ रूप ज्ञानेश्वरींत आढळतें. उदा—अनेग, अनेगा. मराठी ‘ एक ’ हा शब्द प्राकृत ‘ एक्क ’ किंवा संस्कृत ‘ एक ’ ह्यापासून आला आहे. सामासिक शब्दांत ‘ एक ’ असाच शब्द कांही ठिकाणीं

राहतो. उदा. एकवीस, एकतीस, अकरा < एकारह < एकारह < एकादश. 'दश' ह्याचें 'रह' रूप प्राकृतमध्ये झालें. [दश > दह > डह् > रह]. संस्कृतमध्ये हा जसा 'आ' स्वर मध्येच येतो तसा मराठींतहि येतो. ह्याची उपपत्ति आमच्या मतें अशीः— (१) आद्य स्वरावर आघात पडला म्हणजे साहजिकच पुढील स्वर दीर्घ होतो. (२) किंवा 'अधिक' 'आणि' ह्या अर्थी हा 'आ' असावा. वैदिक भाषेंत असे प्रयोग आढळतात. उदाः-- मित्र व वरुण = मित्रावरुणौ, इन्द्रामरुतौ इत्यादि. एकोणीस < एकोनविंशति. एकुणतीस, एकुणचाळीस, एकुणपन्नास वगैरे एकोणीसप्रमाणे बनलीं आहेत.

दोनः— द्वे( सं. ) > दुवे ( प्रा. ) दो अथवा बे अथवा बा. द्वौ > दोण्णी (माहा) > दोनि > दोन ( मराठी ). बे हें रूप कांहीं सामासिक शब्दांत मराठींत आलें आहे. उदा०— बारा, बावीस, बत्तीस, बेचाळीस, बावन्न, बासष्ट, इत्यादि. संस्कृतमध्ये ज्याप्रमाणे द्वि किंवा द्वा हें विशेषण लागतें त्याप्रमाणे मराठीमध्ये बे किंवा बा हें विशेषण लागतें. उदा०— बावीस > द्वाविंशति, बेचाळीस > द्वेचत्वारिंशत्. 'दु', 'दो' हें रूपहि कांहीं सामासिक शब्दांत असलेलें आढळून येतें. उदा०—दुहाती, दुपारीं (दोपार), दुधार ( शस्त्र ), दुभाषा, दुसरा, दुपाती; वीस (विंशति > विस्सा > वीस).

तीनः— त्रि ( सं. ) > त्रीणि (नपुंस.) > तिण्णी (प्राकृत माहा.) > तीन. सामासिक शब्दांत 'ति' किंवा 'ते' असें जें त्याचें रूप होतें तें 'त्रय', किंवा 'त्रि' ह्या रूपापासून आलें आहे. तेरा-- त्रयोदश, त्रिदश. तेवीस ( त्रयोविंशति ), तेतीस—( तेहेतीस ) त्रयस्त्रिंशत् इत्यादि. (त्रिंशत् > तिस्सा > तीस ).

चारः— चत्वारि > चत्तारि ( प्रा. ) > चारि (अपभ्रंश) > चार, चारी ( मराठी ). सामासिक शब्दांत 'चौ' किंवा 'चवे' हीं जीं रूपें येतात तीं चतुः ( सं. ) पासून आलीं आहेत. चौदा > चतुर्दश, चोवीस > चतुर्विंशति, चौतीस ( चतुस्त्रिंशत् ), चौऱ्याण्णव ( चतुर्नवति )--इ. चौकट ( चतुष्कटि ), चौघडी, चाळीस—ताळीस (चत्वारिंशत् ).

पांचः— पंच ( संस्कृत ) पासून. सामासिक शब्दांत ह्याचीं तीन रूपें होतात. उदा. १ पन-पन्धरा, ( पञ्च > पञ्च > पण्ण > पन्न + दश, दश = रा ) [ पुढील ' दश ' पहा ]. २ पंच-पंचवीस, पंचावन्न. ३ पस्, पास्-पसतीस, पासष्ट; पञ्च > पाँच > पाँस > पस--पास. पन्नास > पञ्चाशत् > पन्नास > पन्नाह; वन्नाह (पन्ना, वन्न) एकावन्न, बावन्न, त्रेपन्न ( एकवन्नाह < एकपन्नाह < एकपन्नास < एकपंचाशत् )

सहाः— षट् [ सं. ] > छा [ माहा. ] > छह [अपभ्रंश ] > सह किंवा छह. सामासिक शब्दांत 'सह' व 'छह' अशीं दोन्हीं रूपें सापडतात. उदा०--सोळा, सहवीस, सेहचाळीस इत्यादि. छत्तीस, छपन्न, इत्यादि साठ, एकसष्ट, बासष्ट ह्यांमध्ये शेवटच्या 'ई'चा लोप झाला आहे. [एकषष्टि, द्वाषष्टि].

सातः— सप्तन्>सत्त>सात. सत+रह=सतरा; सत्तावीस. सततीस, --सद्--ड--तीस. सतचाळीस-सत्तेचाळीस, सतषष्टि-सदषष्ट-सदुसष्ट. ' सदतीस व सदुसष्ट ' ह्यांतील ड् किंवा द् हे अडतीस व अडुसष्ट ह्यांतील ड वरून साम्याभासाने आले असावेत. सत्तर, हत्तर [सामासिक शब्दांत] सप्तति— सप्तटि—सत्तटि—सत्तडि—सत्तरि—सत्तर, हत्तर.

आठः—अष्ट > अठ्ठ > आठ. सामासिक शब्दांत अष्ट आणि आठ अशीं दोन्ही रूपें आढळतात. उदा.—अठरा, अठ्ठावीस, अडदीस ( ठ > ड ); अष्टयाहत्तर, अठ्यायेंशी, ऐशी, ऐँशीः —अशीति, अशीइ. कांही प्राकृतमध्ये हा शब्द सानुनासिक असला पाहिजे. त्याशिवाय मराठींतील ' अनुनासिक ' सिद्ध होणार नाही.

नऊः—'नव' (सं.) सामासिक शब्द 'नव' हा पूर्वशब्द लागून सिद्ध होत नाहीत. पुढच्या दशकास एक + ऊन = एकोन हा पूर्वशब्द लागून सिद्ध होतात.उदा.--एकोणीस,एकोणवीस,एकोणतीस,एकोणचाळीस इत्यादि. अपवाद—नवण्णव, ( नव्व्याण्णव ). नव्वद, नवति ( सं. ) > नव्वदि हें (प्राकृत रूप क्वचित् सापडतें). एक्याण्णव ( एकनवति – एकनवइ ). ' आ ' स्वर कांही ठिकाणीं मध्येच येतो. त्याची उपपत्ति एकादश मधील ' आ ' प्रमाणे आहे. तो समुच्चयवाचक समजावा.

दहाः—दश > दह; दश ह्या शब्दाची प्रक्रिया विशेष चमत्कारिक आहे. ह्यामध्ये दोन फरक होतात. १ ' श ' चा ' ह ' होतो. २ ' द '

चा 'र्' होतो. पैकी 'श्' चा 'ह्' होणें साहजिक आहे. (श > स् > ह्.) परंतु 'द्' चा 'र्' फार क्वचित् होतो. तो पुढील मार्गाने झाला असावा[1]:-द् > ड् > ळ् > ल् > र्; उदाः- षोडश > सोळह > सोळा; पंचदश > पञ्चदश > पन्नदह > पन्नरह > पन्नरा > पन्धरा.

शंभरः—स + भर. शतम् > शअम् > शें. एकशें, दोनशें इत्यादि.

हजारः—हा फारशी भाषेतील शब्द आहे. जुना संस्कृत शब्द 'सहस्र' असा आहे. परंतु फारशी भाषेचा संपर्क जसजसा जास्त वाढूं लागला, तसतसा 'सहस्र' शब्द रोजच्या व्यवहाराच्या बोलींतून नाहीसा होऊं लागला. ह्याच्या पुढील लाख, लाखों; कोटी, करोड, क्रोडों वगैरे संख्यावाचक शब्द मूळ संस्कृत लक्ष, कोटि वगैरे शब्दांवरून आले आहेत.

**क्रमवाचक संख्याविशेषणें:**— प्रथम (सं.) > पढमिल (माहा) > पहिल (अपभ्र) > पहिल (मराठी) प्रथ + इल. द्वितीय > विइज्ज > बीज दूजा (माहा) दोसर > दुसर (मराठी). तृतीय > तिइज्ज > तिइज्ज > तीज तेसर (माहा) > तिसरा (मराठी). चतुर्थ > चउत्थ > चउत्थ > चौथ. पंचम > पंचवँ > पांचव इत्यादि.

**अंशवाचक संख्याविशेषणें:** -उदाहरणें संस्कृत, माहाराष्ट्री व मराठी ह्या क्रमाने दिलीं आहेत. $\frac{1}{4}$ पाद – पाअ – पाव – पावक (कृत्वा). $\frac{1}{2}$ – अर्ध – अड्ढ – आड. सार्ध – साड्ढ – साढ-डे. $\frac{3}{4}$ पादोन – पाअउण – पाऊण. १$\frac{1}{4}$ – सपाद – सवाअ – सव्वा. १$\frac{1}{2}$ – द्व्यर्ध – दिवड्ढ– दीड, दीडक (कृत्वा). २$\frac{1}{2}$ – अर्धतृतीय – अड्ढाइज्ज – अडीच. ३$\frac{1}{2}$ – अर्धचतुर्थ – अट्ठउट्ठ, अद्धट्ठ – आउट. ४$\frac{1}{2}$ – सार्धपंच – साड्ढपंच – साड (डे) पांच. एक्कवार (माहा) – एकवार. एकदा – ० – एकदा. एकार्ध– एक्काद्ध – एकाधा, एखादा. एकः द्विःकृत्वाः द्वौ – एके दुकें दोन. एकः त्रिःकृत्वाः त्रीणि – एके तिकें तीन. एकः द्विगुणः द्वौ – एके दूणे दोन. – एके तीणे तीन. दश नवभिः नवतिः — दहा नवे नव्वद. दश दशभिः शतम् – दहा दाही शंभर. ( रा. ज्ञा. व्या. )

१५० क्रियाविशेषणः-—जै, जैं < यदि (सं.). जों, तों < (यावत्, तावत्). जेव्हा, तेव्हा, केव्हा < यदा, तदा, कदा (सं.) < जिमूव, तिमूव,

---

[1] J. Bloch L. F. M. § 221

किमूव ( प्रा. ). जेणे, तेणे ( तृतीयेचीं रूपें ). येथे < एत्थ ( प्राकृत ) < इत्तद्दा ( वैदिक सं. )

१ " अपभ्रंशांत ' इदम् 'चें सप्तमीचें एकवचनाचें रूप ' इथि ' असें होतें. त्यावरून मराठी ' इथें ' हा शब्द निघाला आहे. ' एतत् 'चें स. ए. रूप ' एत्थ ' होतें. त्यावरून येथे. कोठे ( कोथ्र ), कुठे ( कुथ्र ) हीं रूपें वरीलप्रमाणेच व्युत्पादिलीं जातात[१]. "

२ येथे < अत्र, जेथे < यत्र, तेथे < तत्र, कोठे < कुत्र ह्या मार्गानेहि ते शब्द येणें शक्य आहे. प्राकृतमध्ये अत्थ, तत्थ ह्यांबरोबर अत्थम्मि, तत्थम्मि अशींहि रूपें कोठे कोठे सापडतात. ह्यांवरूनहि एथे, जेथे हीं रूपें येणें शक्य आहे. 'कीं' हें अव्यय संस्कृत ' किम् ' अथवा फार्शी ' के ' पासून आला आहे.

## क्रियापदविचार

१८० भाषेमध्ये आद्य स्वरूपाचीं अशीं दोन प्रकारचीं बीजें असतात; एक सार्वनामिक आणि दुसरीं क्रियावाचक. पैकी सार्वनामिक बीजांचा विचार मागे येऊन गेलाच आहे. येथे दुसऱ्या क्रियावाचक बीजांचा विचार करूं. प्रकृति आणि प्रत्यय ह्या दोहोंच्या मुळाशीं अनुक्रमें क्रियावाचक व सार्वनामिक बीजेंच असतात. भाषेंतील नामें, विशेषणें, क्रियाविशेषणें वगैरे शब्द ह्या क्रियावाचक बीजांपासून—धातूंपासून तयार होतात. " आख्यातजानि नामानि "—"नामांची उत्पत्ति क्रियावाचक धातूंपासून" असा सिद्धांत यास्काचार्य ह्यांनी आपल्या निरुक्तांत मांडला आहे. कोणत्याहि भाषेंतील शब्दव्यवहार किंवा वाग्व्यापार बऱ्याच अंशीं क्रियावाचक धातूंवर अवलंबून असल्यामुळे त्या भाषेंतील धातुपाठ ठरविणें हें महत्त्वाचें असें शास्त्रीय कार्य ठरतें. भाषेमध्ये नेहमीच्या वापरांत असलेल्या धातूंच्या संख्येवर भाषेची समृद्धि व ऐश्वर्य अवलंबून असतात. व्याकरणामध्ये धातूंना महत्त्व असतें म्हणूनच यास्काचार्यांना वैदिक भाषेंतील धातूंचें परिगणन आपल्या निरुक्तांत करावें लागलें व त्यामुळेच पाणिनीस संस्कृत भाषेंतील धातुपाठ द्यावा लागला. प्राकृत व्याकरणकारांनीहि धातुपाठाच्या महत्त्वाकडे दुर्लक्ष केलें नाही. त्यांनी आपल्या व्याकरणांत प्राकृत भाषेंतील

---

१ राजवाडे ज्ञाने. व्या. पृ. ५५.

धातूंचा विचार केला आहे. मराठीचें ऐश्वर्य किती आहे हें दाखविण्याकरिता व तिच्या शास्त्रीय व संशोधनपर विचिकित्सेस उत्तेजन देण्याकरिता मराठी भाषेतील धातुपाठ तयार करणें अत्यंत जरूरीचें आहे.

मराठी धातूंची संख्या पांच हजारांजवळ आहे. हे धातु संस्कृत, प्राकृत, व द्राविडी व कांही परकीय भाषा इतक्या भाषांमधून आले आहेत. संस्कृत व प्राकृत धातु, हे मूळ वैदिक भाषेतील धातूंपासून उत्पन्न झाले. व मूळ वेदिक धातु हे आर्यांची जी आद्य भाषा इण्डो-युरोपियन होती तिच्यापासून आले आहेत.

संस्कृत वैयाकरणांनी धातूंची संख्या १७०६ पर्यंत नेली आहे. कांही दुसरे व्याकरणकार हीच संख्या २००० वर नेतात. शब्दांची व्युत्पत्ति जशी धातूंपर्यंत नेऊन भिडवितात तशी धातूंची व्युत्पत्तिहि पुन्हा धातूंपर्यंत कांही व्युत्पत्तिशास्त्रज्ञ नेऊन भिडवितात. डॉ. मरे याने सर्व भाषेची प्रचंड इमारत नऊ धातुरूपी स्तंभांवर चढविली आहे.[१] सर्व ग्रीक भाषा एकट्या 'इ' धातूपासून निघाली आहे असेंहि एक मत आहे. त्याचप्रमाणे लॅटिन भाषाहि 'हि' धातूपासून निघाली असें दुसरें एक मत आहे. असलीं ऐकान्तिक मतें सोडून दिलीं तरी धातूंची साधारणपणें संख्या निश्चित करणें जरूर असतें.

संस्कृतमधील धातूंची संख्या २००० ही जरी असली तरी सर्वच उपयोगांत येत नाहीत. नेहमी वाङ्मयांत साधारणपणें ८०० धातूच फक्त वापरांत येतात. ह्यांपैकी पुन्हा २०० फक्त वेद व ब्राह्मण ह्या वाङ्मयांत आढळतात. ५०० वेद आणि पाणिनीय संस्कृत ह्यांमध्ये येतात. आणि त्यांपैकी १५० च फक्त उत्तरकालीन वाङ्मयांत वापरलेले आढळतात.

प्राकृत वैयाकरणांनी प्राकृत भाषांतील धातूंची संख्या १५९० दिली आहे. हेमचंद्राने दिलेले ९३० व मार्कंडेयाने दिलेले ६१८ मिळून १५४८ धातु होतात. संस्कृत, प्राकृत, देश्य, द्राविडी, फारशी व इतर नामधातु मिळून मराठींतील धातूंची संख्या पांच हजाराजवळ असावी असा आमचा तर्क आहे.

---

१ डॉ. मरे याने शोधलेले नऊ धातू. ऑग्, बॅग्, क्यॅग्, डयॅग्, ल्यॅग्, म्यॅग्, श्यॅग्, न्यॅग्, रुयॅग्.

१८१ धातूंचें वर्गीकरण दोन दृष्टीने करतां येण्यासारखें आहे. एक अर्थावरून आणि दुसरें व्युत्पत्तीवरून. वाक्यांत अर्थ पूर्ण होण्याच्या दृष्टीने वाक्यांतील धातूस कर्ता असावा लागतो. कांहीं वेळेस वाक्यांतील धातूस प्रत्यक्ष असा कर्ता नसतो. क्रियेचा जो भाव तोच त्या धातूचा कर्ता होतो. "सूर्य उगवतो" ह्यांत सूर्य हा कर्ता आहे, त्याअर्थी 'उगव' हा धातु 'सकर्तृक आहे. "मला वाटेवर सांजावलें" ह्यांत प्रत्यक्ष कर्ता नाहीं. तेव्हां वाक्यांतील जो अर्थ किंवा भाव म्हणजे सांजावण्यासंबंधीचा तोच कर्ता आहे. म्हणून ह्या वाक्यांतील धातु 'सांजावणें' हा भावकर्तृक धातु आहे. प्रत्यक्ष कर्ता नसल्यामुळे ह्याला अकर्तृक धातुहि म्हटलें असतां चालेल. असले सर्व अकर्तृक अथवा भावकर्तृक धातु हे अकर्मक असणार हें उघड आहे. ह्यांना 'कर्ता' जर प्रत्यक्ष नाही तर 'कर्म' तरी कोठून येणार? पहिल्या सकर्तृक धातूमध्ये सकर्मक आणि अकर्मक असे दोन प्रकार आहेत. करणें, सांगणें, ऐकणें वगैरे धातु सकर्मक; असणें, होणें, पडणें, पळणें वगैरे धातु अकर्मक होत.

१८२ **प्राकृतमधील धात्वादेशः**—संस्कृत किंवा प्राकृतमधून धातु ज्या वेळेस मराठी भाषेंत येतो त्यावेळेस त्याला आदेश होतो. खुद्द संस्कृतमध्ये धातूला आदेश होतो असें कांहीं विद्वानांचें मत आहे[1]. उदा—दृश् (पश्), पा (पिब्), प्रच्छ् (पृच्छ्), दंश् (दश्), ब्रू (आत्थ), पत् (पत्-लुङ्), हन् (वध्-लुङ्) ह्यांत कंसांत दिलेलीं रूपें हे धातूचे आदेश होत. परंतु आम्हांस हें म्हणणें पटत नाही. दृश् ह्याचें पश् असें रूपांतर वर्णप्रक्रियेच्या कोणत्या नियमानुसार झालें हें सांगणें कठीण आहे. दृश् आणि पश् हे दोन्ही निराळे धातु आहेत. त्यांचा अर्थ मात्र एक आहे. प्राकृत वैयाकरणांची सुद्धा हीच चूक झालेली आहे. प्राकृत व्याकरणकार म्हणतात की, कथ् = बोल्ल, संघइ; मज्ज् = बुड्ड, त्रस् – बुज्ज, क्रुध् – जूर, क्षिप् – पेल्ल, विलप् – वडवड, गर्ज् – बुक्क, त्रस् – डर, पिब् = घोट्ट, भ्रंश् = चुक्क – भुल्ल – फिट्ट, गवेष् = ढंढोल्ल, आरोह् = चड, हे असे संस्कृत धातूंना प्राकृत आदेश होतात. वर्णप्रक्रियेच्या कोणत्याहि नियमाने हे आदेश सिद्ध होणार नाहीत. ह्या आदेशांचें शास्त्रशुद्ध स्पष्टीकरण म्हणजे हे संस्कृत धातु निराळे स्वतंत्र व पुढे आदेश म्हणून दिलेले प्राकृत धातु

---

१ प्र. प्रों. कानिटकर, म. सा. पत्रिका, व. ४–१.

हे निराळे स्वतंत्र आहेत. त्यांचा परस्परांचा कांही एक संबंध नाही. कांही देशी धातु प्राकृत काळीं वापरांत होते. ते कांही संस्कृत धातूंशीं समानार्थक असल्यामुळे त्यांचा संबंध प्राकृत वैयाकरणांनी त्यांच्याशीं लावला इतकाच ह्या प्राकृत धात्वादेशाचा अर्थ आहे. हे प्राकृत व्याकरणकारांनी दिलेले धात्वादेश पाहिले म्हणजे व्युत्पत्तिशास्त्राची जी ऐतिहासिक दृष्टि म्हणून असते तिच्याकडे त्यांनी दुर्लक्ष केलें असें निरुपायाने म्हणावें लागतें.

मराठींतील धातु साक्षात् संस्कृतमधून किंवा माहाराष्ट्री वगैरे प्राकृतमधून आले असल्यामुळे प्राकृतमधील धात्वादेश हें प्रकरण मराठीच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचें आहे. सर्व प्राकृत व्याकरणकारांनी दिलेले आदेश एकत्रित केले तर १५९० भरतात. ह्यांपैकी ४५३ धातु देशी आहेत.कारण त्यांचा संबंध कोणत्याहि संस्कृत धातूंशीं आदेशप्रक्रियेच्या नियमाने पोहोचत नाही[१]. प्राकृत व्याकरणांत दिलेले धात्वादेश पाहिले तर जे पांच प्रकार दृष्टोत्पत्तीस येतात ते खाली नमूद करतों. त्याबरोबर मराठी धातु ताडून पहावे.

१ मूळ संस्कृत धातु व प्राकृत आदेश एकाच स्वरूपाचे असलेले:— उदा.—चलति > चलइ > चळ, चुंबति > चुंबइ > चुंब, खादति > खाअइ > खा, ताडयति > ताडेइ > ताड.

२ मूळ संस्कृत धातूंचीं रुपें वर्णप्रक्रियेच्या नियमानुसार प्राकृतमध्य उतरलेलीं:- उदा.—पीडयति > पिलेइ > पिळ, अर्पयति > अप्पइ > ओप; खिद्यते > खिज्जइ > खिज; घटते > घडइ > घड; युध्यति > जुज्झइ > झुंज..

३ मूळ संस्कृत धातु व त्यांचे प्राकृत आदेश ह्या दोहोंमध्ये कसलाहि संबंध नसलेले—( यांचीं उदाहरणें वर दिलीं आहेत. )

४ मूळ संस्कृत धातु आपल्या गणचिन्हांसह प्राकृतमध्ये आलेले:— उदा:—नृत्यति – णच्चइ – नाच; चिनु – चिण – चिण; जानाति – जाणइ – जाण.

५ मूळ संस्कृत धातु व त्यांचे प्राकृत आदेश ह्यांमध्ये अर्थभेद झालेले:— उदा:—प्रेक्षते – पेक्खदि – पच्छइ – पाह.

**१८३ मराठी धातूंचीं उदाहरणें**—खालीं कांही नमुन्यादाखल मराठी धातूंचीं उदाहरणें देतों.

---

१ Dr. Grierson, Pr. D. R. A. S. Bengal Vol. 8, P. 830.

१ उपसर्ग न लागलेले सिद्ध धातुः– आच, इच, कर, कंद, खन, गण, जिल, चर, चेव, चु ( च्यव ), चुण ( सविकरण ), तूट, दह, डस ( दंश ), दे ( दा ), घस ( ध्वंस ), नाह ( स्ना ), ने ( नी ), पी ( पिब् ), पुस ( पृच्छ् ), बोल ( वल्ह किंवा ब्रू ), पिंज, वांच ( वंच् ), विंध(व्यध्), बुझ ( बुध्य ), माख, याच, झुज ( युध्य ).

२ उपसर्गासहित मराठींत आलेले कांही धातुः– ये ( आ + या ), आचव ( आचम् ), उसल, उचल, उतर, उठ, उपट, उपेक्ष, निरख, निवर्त, पाखड ( प्रक्षाल् ), पारख, पुस ( प्र + उञ्च ), विक, भिज ( अभि + अञ्ज् ) इत्यादि.

३ खाली दिलेले धातु द्राविडी भाषांतून आले असावेत, कारण त्यांच्या व्युत्पत्तीबद्दल शंका आहेः–आट ( कापड आटलें ), कस ( कंबर कसली ), घेर ( भोंवती वेढणें ), चाट ( चिकटून जाणें ), चाट ( तूप चाटणें ),चाप ( दाबणें ), जोख ( मापणें ), झेल ( चेंडू झेलणें ), झुक ( बाहेर झुकणें ), टिक ( कापड टिकणें ), टिप ( नेम मारणें ), पट ( कबूल होणें ), राह, लढ इत्यादि.

४ अन्य भाषांतून आलेले धातुः–फारशीः—चिमट, खिमट, गुजर, जम, खत, तपास, डाग, नरम, गरम, फसक, बदल इ. इंग्लिशः--एडिट, मॅनेज, कोट, नीट, ॲग्री इ. ह्या धातूंपुढे मराठी " करणें " हें क्रियापद घालतात.

पुढे दिलेलीं साधित धातूंचीं उदाहरणें आहेत.

१ कांही धातूंना खाली दिलेले प्रत्यय लावून साधित धातु तयार करतात. प्रत्ययाचा अर्थ त्वरा किंवा सातत्य हा आहे.

१क=अटक, कचक, चलक, चुमुक, टपक, ठमक, तरक, थबक, थक, दबक, धमक, भरक, भुरक, मचक, पुचक, लटक, सटक, हरक, हिसक [ आंकुष् ].

२ ट – कचट, खचट, खसट, घसट, चिमट, झपट, दापट.

३ र, ल, ड — उचल, कोसळ, चोवळ, झाकळ, डुरक, ठेचल, दादल, लंगड.

अभ्यस्त धातूंत साधे, द्विरक्त व द्विधातुसंयोग असे तीन प्रकार आहेत त्यांचीं उदाहरणें अनुक्रमें खाली दिलीं आहेत.

१ साधे—ढेंढाल, धुंडाल, जाग, चकव, भांबाव, कॆंकाट, बोंबल, गाग, तातड, चाचप, पोंफार, गांगर, लोलव, रोरव.

२ द्विरुक्त—खोखो, खटखट, काटकाट, दगदग, चटचट, झळझळ, तणतण, थबथब, भडभड, घरघर, चरचर, छाटाछाट, हरहर, भिरभिर.

३ द्विधातुसंयोगः—गटपट, घालमिल, घडपड, चुळबुळ, चिळबिळ, धरपकड, चुकभूल, देखमार इत्यादि.

साधितधातूंमध्ये प्रयोजक, शक्य, नकारार्थी धातु, त्याचप्रमाणे नाम, विशेषणें, धातु व निपात ह्यांपासून साधलेले धातु, तसेंच अर्थभेदाचे वगैरे धातु येतात. मुख्य क्रिया दाखविणाऱ्या धातूला जें मदत करतें तें सहायक क्रियापद होय. हें सहायक क्रियापद आपला मुळचा विशिष्ट जो अर्थ असतो तो सोडून दुसरा सामान्य असा अर्थ दाखवितें.

## संयुक्त क्रियापदें

१८४ धातूंच्या कांही नियमित रूपांशीं कांही नियमित क्रियापदांचा किंवा शब्दांचा योग होऊन जीं क्रियापदें बनतात त्यांस संयुक्त क्रियापदें म्हणतात. ह्यांत मुख्य क्रिया दाखविणारें धातुसाधित असतें व त्या क्रियेचा काळ व अर्थ रूप व प्रयोग दाखविण्याकरिता एक 'सहायकारी' क्रियापद त्या धातुसाधिताला जोडावें लागतें. अशा धातुसाधित व सहायकारी क्रियापद ह्या दोहोंचें मिळून संयुक्त क्रियापद तयार होतें. ह्यामध्ये मुख्य धातूचें कृदन्त रूप व सहायधातूचें आख्यात रूप असतें.

सहाय धातु चार प्रकारचे आहेत. १ कालदर्शक--उदा०—अस—मी जात आहें. २ प्रयोगदर्शक--उदा०—जा, हो— त्याच्याकडून काम केलें गेलें. ३ रूपदर्शक--उदा०—नस, नको, नये, हो, पाहिजे—तूं जाऊं नको. जातां कामा नये गेलें. पाहिजे. ४ विशेष अर्थदर्शक उदा०—आण, इच्छ, काढ, घे, चुक, जा, टाक, ठेव, दे, पड, पाह, पाहिजे, बस, ये, राह इत्यादि.

सूक्ष्म दृष्टीने पाहिलें तर पहिले तीन प्रकारचे हेच खरे सहाय धातु होत. चौथ्या प्रकारांत दिलेल्या धातूंनी क्रियापदाच्या अर्थात भर पडते. तेव्हा त्याच धातूला प्रधान धातू मानण्यास हरकत नाही. अर्थाच्या दृष्टीने संयुक्त क्रियापदांचा आणखी एक प्रकार आढळतो. उदा०—युद्ध करणें, पारख

करणें, गोंधळ करणें, मार खाणें, अंगांत येणें, डोकीस घालणें, रागें भरणें, सिद्धीस नेणें, संपादन करणें, श्रवण करणें इत्यादि.

वर दिलेल्या प्रयोगांत योजलेलीं क्रियापदें खरीं संयुक्त नव्हत. त्यांच्या अर्थात विशेष भर पडली आहे. वाक्याचा अर्थ लाक्षणिक असल्या-मुळे नाम आणि क्रियापद हे संयुक्त आहेतसे दिसतात. व्याकरणांत लाक्ष-णिक अर्थाकडे लक्ष देण्याचें कारण नाही; क्रियापदाच्या रूपाकडेच लक्ष दिलें पाहिजे.

संयुक्त क्रियापदें मराठींत मानावा किंवा नाही ह्यासंबंधी मराठी व्याकरणकारांमध्ये मतभेद आहे. वाक्यांत दर्शविलेली क्रिया कितीहि शब्दांनी बोधिली असो, त्यांतील एकच धातु—शेवटचा क्रियापद--मानावा व संयुक्त क्रियापदास खो द्यावा हा एक पक्ष. ह्या पक्षाचें असेंहि म्हणणें आहे की, क्रिया दाखविणारे वाक्यांतील सर्वच शब्द जर क्रियापदांशीं जोडून संयुक्त क्रियापदें मानूं लागलों तर संयुक्त क्रियापदांची संख्या बेसुमार वाढेल, व त्या दृष्टीने संयुक्त क्रियापदें कमींत कमी सत्तरपर्यंत निघतील. तेव्हा ही आपत्ति टाळण्याकरिता संयुक्त क्रियापदें न मानतां शेवटलें जें क्रियापद तेंच मुख्य मानावें.

दुसरा पक्ष संयुक्त क्रियापद मानणाऱ्यांचा. सुटया एकट्या धातूच्या अर्थापेक्षा दुसऱ्या शब्दांशीं संयोग होऊन जो अर्थ होतो तो अगदी निराळा आहे. तो पुस्तक घेतो व तो झोंप घेतो; तो जातो व तो जात आहे; तो होता व तो जेवून बसणार होता; ह्या वाक्यांच्या जोड्यांमध्ये ज्याअर्थी सारखा अर्थ नाही त्याअर्थी संयुक्त क्रियापदें मानणें प्राप्त आहे. हाच पक्ष आम्हांस मान्य आहे. शिवाय संयुक्त क्रियापदें मानण्यास आणखी एक कारण आहे, आणि तें काळासंबंधी आहे. भूत, वर्तमान व भविष्य हे तीन काळ जरी मुख्य असले तरी मराठीमध्ये त्यांच्या इतर छाया पुष्कळ आहेत व त्या मुख्य धातूशिवाय इतर क्रियापदांच्या साहाय्याने दाखविल्या जातात. संयुक्त काळ मानावे लागतातच म्हणून संयुक्त क्रियापदें मानिलीं पाहिजेत. मात्र वर जो त्यांचा चौथा प्रकार सांगितला आहे त्यांतील धातूंच्या साहाय्याने बनलेलीं संयुक्त क्रियापदें मानूं नयेत.

## रीतिभूतकाळ

१८५ मराठींतील रीतिभूतकाळ हा जुने जे काळ संस्कृतप्राकृतमार्फत प्रत्यक्ष आले आहेत त्यांपैकी एक आहे. पूर्वीचे प्रत्यय वर्णप्रक्रियेचे जरूर ते फरक होऊन आले आहेत. अर्थ पूर्वीचा बदलून त्याठिकाणीं दुसरा आला आहे. संस्कृतप्राकृतमध्ये जो लट् म्हणून काळ प्रसिद्ध होता व ज्याला आपण सध्याच्या भाषेंत 'वर्तमानकाळ' म्हणूं तोच हा काळ होय. परंतु पूर्वीचा वर्तमानकाळचा त्याचा अर्थ वदलून त्या ठिकाणीं मराठींत रीतिभूतकाळाचा अर्थ आला आहे. 'यामि' ह्याचा अर्थ 'मी जातों' असा होतो. परंतु 'यामि' पासून निघालेल्या 'जाईं' या रूपाचा अर्थ 'माझी जाण्याची रीत असे' असा होतो. ह्या काळाचे मराठींतील प्रत्यय खाली दिले आहेत. ह्याची उपपत्ति संस्कृत लट् [ वर्तमान ] पासून असल्यामुळे व कोणत्याहि कृदन्ता-पासून नसल्यामुळे कर्त्याच्या लिंगभेदाप्रमाणे त्याचीं रूपें बदलत नाहीत.

| ई-आख्यात प्रत्यय | एकवचन | अ. वचन |
|---|---|---|
| प्र. पु. | ईं [सकर्मक] एं [अकर्मक] | ऊं, ओं. |
| द्वि. पु. | स | आं, आ. |
| तृ. पु. | ई [सकर्मक], ए [अकर्मक] | त. |

| उदा०... | ए. व. सकर्मक | अ. व. | ए. व. | अ. व. |
|---|---|---|---|---|
| १ | करीं | करूं–रों | हसे | हसूं–सों |
| २ | करीस | करां–रा | हसस | हसां–सा |
| ३ | करी | करीत | हसे | हसत. |

प्रत्ययांची उपपत्ति पुढीलप्रमाणे संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश व मराठी ह्या क्रमाने दिली आहे. उदा.—आमि – अमि – अऊं – ईं; अमः – आमो – अईं; अहुं – ईं, ऊं, ओं. असि – असि-अहि – असि-अहि स; अथ – अह – अहु – अ. अति – अइ – अइ – इ. अन्ति–अंई – अंई, अहिं–त.

ह्या वरील तुलनेवरून हें दिसून येईल की, मराठीने अपभ्रंशापासून ह्या काळाचे प्रत्यय न घेतां माहाराष्ट्रीपासून हे प्रत्यय घेतले आहेत. सध्याच्या मराठींत ही रूपें वर्तमानकाळीं येत नाहीत. कवितेंत मात्र वर्तमानकाळीं ह्या रूपांचा उपयोग केला जातो.

ज्ञानेश्वरीमधील ह्या काळाचीं रूपें:--१ जाणें, भिये, पाहे, जूझे, बोले. २ जाणों, नेणों, पूसों, पाहों. ३ जाणसि, सांघसि, पवसि, नोलखसि ४ जाणा, सांघा, बोला. ५ देखे, जाणे, देई, घेई. ६ फूटति, भेटति. मिरवति, नव्हाति, साहाति.

## भूतकाळ

१८६ वेदकालीन भाषेंत भूतकाळदर्शक तीन काळ लिट् [ परोक्षभूत-Perfect ] लङ् [ अनद्यतन भूत-Imperfect ] लुङ् [भूतकाळ-Aorist] हे होते. त्यांचाच परामर्श पाणिनीने आपल्या व्याकरणांत घेतला आहे. पाणिनीय संस्कृतमध्येंहि तेच तीन प्रकार व त्यांच्यांत उत्पन्न झालेले गौण उपप्रकार सुरू होते. परंतु पुढे मध्ययुगीन भाषेंत—पालींत--शेवटच्या दोहोंचा मिलाफ होऊन एकच भूतकाळ सुरू झाला. तरी कधी कधी तीन्ही प्रकारांसंबंधींच्या जुन्या कल्पना वर डोकें काढीत. हियत्तनी आणि अज्जतनी ( म्हणजे—ह्यस्तनी = कालचा भूतकाळ आणि अज्जतनी=अद्यतनी = आजचा भूतकाळ ) असा भेद केला जात असे. हीच स्थिति पुढे प्राकृत भाषांच्या काळांत चालू राहिली. 'लिट्' चा तर हळूहळू लोपच होत गेला. कांही विशिष्ट धातूंच्या बाबतींतच फक्त आढळत असे. पण भूतकाळांतील निरनिराळ्या छाया दाखविणारे प्रकार लोपूं लागले तर त्यांचे काम भागविण्यासाठी प्राकृतभाषांनी सोय काय शोधून काढली हा प्रश्न येतो. त्यांनी भूतकाळाचे बारीकसारीक भेद नाहींसेच करून एक भूतकाळ कायम केला. आणि तो धातू भूतकालाच्या कृदन्तापासून निष्पन्न केला. "प्रायो भूते निष्ठान्तप्रयोग एव प्राकृते दृश्यते" हा प्राकृत, अपभ्रंश भाषांत नियम होता. व आधुनिक बोलींत भूतकाळ जो रूढ झाला तो असा विशेषणात्मक झाला. भूतकाळाच्या कृदन्ताला किंवा निष्ठेच्या रूपाला ( उदा०—कृत, गत ) मुख्य क्रियापदाचा अधिकार प्राप्त झाला. हा प्रकारहि द्राविडी भाषांच्या संसर्गाने आला असण्याचा संभव आहे. "द्राविडी भाषांतहि असाच भूतकालाच्या कृदन्ताला मुख्य क्रियापदाचा अधिकार देऊन भूतकाळ सिद्ध करतात[१]" "स जगाम, सोऽजायत किंवा अजनि,

---

Dr. Grierson, L. S. I. IV. P. 295.

ऽोऽरुहत्" वगैरे रूपें जाऊन " स यातः, स जातः, स आरूढः " अशीं रूपें रूढ होऊन बसलीं. तीं कृदन्तविशेषणें असल्यामुळे अकर्मक असतील त्या वेळेस कर्त्याप्रमाणे आणि सकर्मक असतील त्या वेळेस कर्माप्रमाणे चालू लागलीं. अशा रीतीने संस्कृत 'त', 'इत', 'न' अन्त असलेल्या संस्कृत भूतकाळाच्या कृदन्तांपासून ( द्राविडी भाषांतील भूतकाळाच्या वळणावर ) वर्तमानकालीन बोलींतील भूतकाळ सिद्ध झाला आहे.

प्राकृत भाषांच्या अमदानींतच कृदन्ताचे मूळचे अन्त्यवर्ण 'त, इत न' वगैरे वर्णप्रक्रियेच्या नियमाने अ, इअ, ( गअ, कअ सारखे ) असे तरी झाले किंवा दिण्ण, सुत्त ह्यांसारखे पूर्वीच्या व्यंजनांत सामावून तरी गेले. कधी कधी ह्यांच्यापुढे स्वार्थे प्रत्यय 'क' ( > अ ) हा लावित असत. त्याच वळणावर पूर्वी रूढ असलेला 'ल' प्रत्यय स्वार्थे ( म्हणजे विशेष अर्थ न दाखविणारा ) असा लावूं लागले. ह्याच 'ल' प्रत्ययाची इतर 'इल', 'अल', 'इल्ल', 'अल्ल' अशीं रूपें प्राकृत भाषांत व त्यांतल्या त्यांत अपभ्रंशांत जास्त प्राचुर्याने वापरलेलीं आढळतात. मागधी व मागधी अपभ्रंश, अर्धमागधी व त्याचप्रमाणे दक्षिणेकडील व पश्चिमेकडील अपभ्रंशांत भूतकाळी क्रियापदांना हे प्रत्यय लावीत असत हें सध्याच्या त्या भाषांच्या वंशज ज्या भाषा आहेत त्यांतील पुराव्यावरून सहजच सिद्ध होण्यासारखें आहे. जैन प्राकृतमधील पुढे दिलेल्या उदाहरणांवरून 'ल' प्रत्यय भूतकाळांत सररहा त्या काळीं वापरूं लागले होते हें स्पष्ट होतें. " चाइल्ल, लोहिल्ल, सोहिल्ल, णेरिल्ल, थलइल्ल, गण्ठिल्ल, गामिल्ल, धाहिणिल्ल, आगएल्लिया, वरेएल्लिय, लधिल्लियम्" इ.

तेव्हा मराठी भूतकाळांतील 'इल, अल' हे प्रत्यय जुन्या संस्कृत भूतकाळी कृदतांना ल, इल्ल, अल्ल हे जे प्राकृत काळांत 'स्वार्थे किंवा अल्पार्थे' विशेषणात्मक प्रत्यय लागत त्यांपासून झाले आहेत. भूतकाळ दर्शक 'ल' सारखाच प्रत्यय इतर प्राकृतिक आधुनिक बंगाली, बहारी ह्या बोलींत आहेत.

भूतकाळच्या 'ल' प्रत्ययाची उपपत्ति वर दिलेल्या उपपत्तीपेक्षा कांही निराळ्या तऱ्हेने दिली जाते. संस्कृत 'त' प्रत्ययापासून त किंवा इत – द किंवा इद – ड किंवा इड – ल किंवा इल[1] अशा मार्गाने व्युत्पादितात. त्याचप्रमाणे शौरसेनींतील 'द' ह्या भूतकाळच्या कृदन्तापासूनहि

व्युत्पादितात. त्याचप्रमाणे कोणी असेंहि म्हणतात की, हा ' ल ' प्रत्यय जुन्या वैदिक किंवा पूर्ववैदिक भाषेंतून आला असावा, कारण स्लाव्ह भाषेंत असाच ' ल ' प्रत्यय वापरतात. परंतु ही मतें ग्राह्य ठरणार नाहीत. त – द – ड – ळ -- ल ह्या मार्गानें ल येणें शक्य आहे. परंतु अशी विकृति सापेक्ष असते. म्हणजे एकाच शब्दांत ्र, ऋ, ष् पैकी वर्ण असेल तरच ' त ' ला मूर्धन्यत्व येणें शक्य आहे; एरवी नाही. तेव्हा ही व तशीच पुढील ' द ' चीहि उपपत्ति शास्त्रीय नव्हे. त्यांच्यामागे इतिहासहि नाही. स्लाव्ह भाषेंतील ' ल ' प्रत्यय अगदी निराळ्या स्वरूपाचा आहे.

मराठीमध्ये धातूंचीं भूतकाळचीं रूपें कशीं उतरलीं आहेत हें समजण्याकरितां मधील माहाराष्ट्री प्राकृतमधील दुवे देतों.

१ संस्कृतमधील निष्ठांचा 'त' कायम राहतो. उदाहरणें संस्कृत, माहाराष्ट्री व मराठी या क्रमानें दिलीं आहेत—गृहीत – गेण्हिअ – घेत-ल; आत्त – उआत्त – आतल; उपात्त-पात्त – पातल; जित – जिअ – जितल ' त ' विकल्पानें ठेवणारीं उदाहरणें—भणित>भणिअ>म्हणितल, म्हणियल; हारित>हारिअ>हारितल>हारियल; संख्यापित>संघविअ>सांघितले, सांघियल.

२ माहाराष्ट्रींतील अन्त्य अक्षर कायम ठेवणारीं उदाहरणें—तप्त -- तत्त -- तातल; खात -- खत्त -- खातल; गुफित -- गुत्थ -- गुथल; त्रुटित -- तुट्ट -- तुटल; पतित -- पड्ड -- पडल; खात -- खण्ण -- खाणल, खणल; सिक्त -- सित्त -- सीतल.

३ महाराष्ट्रींतील ' अ 'चा लोप दाखविणारीं रूपें—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| जात | > | जाअ | > | (जाअल>जाइल>जाल) |
| आगत | > | आअअ | > | आल |
| कृत | > | किअ | > | कल |
| नीत | > | णिअ | > | नेल |
| स्नात | > | न्हाअ | > | न्हाल |
| स्थित | > | ठ्ठिअ | > | ठेल |
| बंधित | > | बांधिअ | > | बांधिल |
| रक्षित | > | रक्खिअ | > | राखिल. |

1 Hoernle G, Gr. p. 306.

४ माहाराष्ट्रींतील अन्त्य ‘ अ ’ विकल्पानें ठेवणारीं रूपें. उदा.—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| कारापित | > | कराविअ | > | करवियल, करविल |
| विज्ञापित | > | विण्णविअ | > | विनवियल, विनविल |
| मानित | > | माणिअ | > | मानियल, मानिल |
| लिखित | > | लिहिअ | > | लिहियल, लिहिल. |

५ खालील रूपांत ‘ त ’ किंवा ‘ अ ’ ह्यांचा संबंध दिसत नाही. संस्कृत किंवा माहाराष्ट्री ह्यांमधील निष्ठारूपांना ‘ ल ’ प्रत्यय चिकटवून मराठी रूपें बनलीं आहेत. मात्र हीं रूपें प्राचीन मराठींत किंवा काव्यांत आढळतात.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| दत्त | > | दिन्न | > | दिन्नल, दिन्हल, दिधल, दिल |
| धावित | > | धाविण्ण | > | धाविन्नल |
| भणित | > | भणिण्ण | > | म्हणिन्नल |
| उड्डीन | > | — | > | उड्डिनल, उडल |
| पक्व<br>प्र | > | पक्क<br>पिक्क | > | पिकल, पिकेल |
| भिन्न | > | — | > | भिनल |
| उत्पन्न | > | उप्पण्ण | > | उपनल |
| युद्ध | > | — | > | जुझिन्नल. |

६ उच्चारसौकर्यासाठी ‘ आ ’ कांही ठिकाणीं मध्ये येतो. बिहाल, भियाल, निगाल, बुडाल, जिराल, विआल इ.

भूतकाळाचें वर्तमान मराठींतील प्रत्यय खालीलप्रमाणे होतात.

| | पुल्लिंग | | स्त्रीलिंग | | नपुंसकलिंग | |
|---|---|---|---|---|---|---|
| | ए. व. | अ. व. | ए. व. | अ. व. | ए. व. | अ. व. |
| प्र० | --लों | लों | ल्यें ले | लों | लें | लीं |
| द्वि० | --लास | लां, लांत, लेत | लीस | लां, लांत, ल्यांत | लेंस | लां, लांत लींत |
| तृ० | --ला | ले | ली | ल्या | लें | लीं |
| उदा० | --धरिलों | धरिलों | धरिल्यें-लें | धरिलो | धरिलें | धरिलीं |
| | ०लास | धरिलां-लांत लेत | धरिलीस | धरिलां-लांत ल्यांत | धरिलेंस | धरिलां-लांत-लींत |

घरिलां घरिले घरिली घरिल्या धरिलें धरिलीं
दुसरीं रूपें अशींच थोड्या थोड्या स्थानिक फरकाप्रमाणे तयार होतात.

## वर्तमानकाळ

१८७ संस्कृतांतील जे काळ मराठींत कृदन्तद्वारा आले आहेत त्यांपैकी मराठींतील वर्तमानकाळ हा एक आहे. मूळ धातूचें संस्कृत कृदन्त--वर्तमान-कालवाचक धातुसाधित–विशेषणापासून झाल्यामुळे कर्त्याच्या लिंगवचना-प्रमाणे ह्याचीं रूपें बदलतात. कृदन्ताचे संस्कृतमध्ये प्रत्यय अत्, आन, मान ( आत्मनेपदी ) असे आहेत. प्राकृतमध्ये हेच प्रत्यय अन्त किंवा एन्त हीं रूपें धारण करितात. ह्यांमधील अनुनासिक नाहीसा होऊन तोच प्रत्यय आधुनिक बोलींमध्ये उतरला आहे. त्याला सार्वनामिक प्रत्यय लावून मराठी-मधील साधा स्वार्थे वर्तमानकाळ तयार होतो. अन्त, अयन्त (संस्कृत)> अन्त, एन्त ( प्राकृत ) > अत्, इत ( मराठी ) अशा मार्गाने वर्तमान-काळांतील धातूचें अंग व्युत्पादितां येतें.

वर्तमानकाळाचीं रूपें ज्ञानेश्वरीच्या काळांत खालीलप्रमाणे होत असत.

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| १ | ( मी ) करितु | ( आम्ही ) करित |
| २ | ( तूं ) करितु | ( तुम्ही ) करित |
| ३ | ( तो ) करितु | ( ते ) करित |

पुढे शिवकालांत व पेशवाईमध्ये हा 'उं' जाऊन पुढे त्याच्या ऐवजी 'ओं' प्रथमपुरुषांत दोन्ही वचनी पुंल्लिंगी प्रत्यय आला. तृतीय-पुरुषी अनेकवचनांत मात्र 'ति' प्रत्यय आला. जाताती, करिताती, नेताती वगैरे रूपें तृ. अनेकवचनी येतात. ( पहा—प्रकरण ४ थें )

प्रथमपुरुषामध्ये आलेला अनुस्वार अपभ्रंश भाषेंतून आला असें राजवाडे म्हणतात.[1] उदा—वट्टउँ, वट्टहुँ; वट्टसि, वट्टइ. वर्तमान मराठींतील वर्तमानकाळाचीं कांही रूपें ते पुढे दिल्याप्रमाणे व्युत्पादितात.

करित > करितु+उँ > करितों ( मी ) पुंल्लिंगी
करित > करितु+हुँ > करितों ( आम्ही )
करित > करिती+ए > करितीएँ> करित्ये, करिते ( स्त्री )

---

१ राजवाडे, ज्ञानेश्वरीचें व्याकरण. पान ११४.

करित > करितिया+हुं > करितियों > करित्यो, करितों ( स्त्री )
अनेकवचन

करित > करितु+सि > करितोसी > करितोसी–स

करित > करित+आथि > करिताथि > करिताति > करितात
तृ. पु. अनेकवचन

अपभ्रंश भाषेंत वट्ट ( वृत् ) हा धातु वर्तमानकाळांत ( लट्मध्ये ) असा चालतोः—

| | |
|---|---|
| १ वट्टउं | वट्टहुँ |
| २ वट्टसि | वट्टह |
| ३ वट्टइ | वट्टति |

अशीं जरी रूपें वर्तमानकाळाचीं ( लट्चीं ) होत असत तरी त्याबरोबर दुसरीहि एक प्रवृत्ति अपभ्रंश भाषेंत—विशेषतः पश्चिमेकडील अपभ्रंश भाषेंत—प्रचलित होती. ही प्रवृत्ति मार्कंण्डेय ह्याने आपल्या 'प्राकृतसर्वस्व' ह्या व्याकरणांत नमूद करून ठेविली आहे. त्याने दिलेलें सूत्र "सर्वदा शतृः होन्तो = भवन्, बभूव, भविष्यति वा[1]" व त्याचा भावार्थ वर्तमानकाळाचें धातुसाधित सर्व काळांसाठी चालू शकतें. असा आहे. धातुसाधित विशेषणापासून काळ सिद्ध करण्याची प्रवृत्ति अशा रीतीने मागे अपभ्रंश भाषेपर्यंत जाते. ह्याच प्रवृत्तीची नक्कल पुढील तिच्यापासून उत्पन्न झालेल्या आधुनिक बोलींनी उचलिली. अपभ्रंश भाषेंतील 'होन्तो' या रूपापासून गुजराती 'हतो', राजस्थानी 'थो', पश्चिम हिन्दी 'हतौ, हुतौ, हतो, थो, था'--इत्यादि रूपें निघालीं आहेत. हीच प्रवृत्ति मराठीने उचलली. मात्र अपभ्रंश भाषेंतून प्रथम पुरुषाचे एकवचन 'उँ' अनेकवचन 'हुँ' हे प्रत्यय घेतले आणि नवा वर्तमानकाळ बनविला. अपभ्रंष भाषेपासून पुढे मराठीच्या पांच अवस्थांमधून सयस्क वर्तमानकाळाचीं रूपें कशीं निघालीं हें पुढें सोदाहरण सांगितलें आहे.

---

१ मार्कण्डेय-प्राकृतसर्वस्व १७-६३

## सकर्मक कर धातु

| | | एक वचन. | | तिन्ही लिंगी |
|---|---|---|---|---|
| | पु. | स्त्री. | न. | बहुवचन |
| प्र. | करितों | करित्यें--तें | करितें | करितों |
| द्वि | करितोस | करित्येस--तेस | करितेंस | करितां-ता |
| तृ | करितो | करित्ये--ते--ती | करितें | करितात |

## अकर्मक निघ धातु

| | | | | |
|---|---|---|---|---|
| प्र- | निघतो | निघत्ये--तें | निघतें | निघतों |
| द्वि- | निघतोस | निघत्येस--तेस | निघतेंस | निघतां--ता |
| तृ- | निघतो | निघत्ये--ते--ती | निघतें | निघतात. |

इतर धातु वरीलप्रमाणे चालतात. कांही धातूंच्या पुढे प्रत्ययांपूर्वी 'इ' आगम होतो. उदा० आचरितो इ.

स्त्रीलिंगीं रूपें 'करित्ये' असें 'त्य' कारान्त कोंकणांत वापरतात. शिष्ट भाषेंतहि पूर्वीच्या अवल इंग्रजीच्या काळाच्या गद्यांत येत असे. अलीकडे तीं रूपें फार कोणी वापरीत नाहीत. साधीं 'त' कारान्तच रूपें वापरतात.

## भविष्यकाळ

१८८ मागे मराठींतील रीतिवर्तमानकाळ म्हणून जो सांगितला व जो संस्कृतमधील प्रत्यक्ष वर्तमानकाळापासून प्राकृतच्या मार्फत आला त्या पासूनच मराठींतील भविष्यकाळाची उत्पत्ति झाली आहे. वर्तमानकाळ म्हटला म्हणजे त्याला अर्थाच्या दृष्टीने आसन्न भूतकाळ किंवा आसन्न भविष्यकाळ ह्यांचा अर्थ असणारच व त्याच दृष्टीने ह्या जुन्या वर्तमान-काळाला भविष्यकाळाचा अर्थ प्राप्त झाला आहे. एकाच स्वरुपाचीं रूपें दोन काळांचा अर्थ दाखविणारीं झाल्यामुळे पुढे त्यांच्यांत कांही भेद करणें प्राप्त झालें. व हा भेद मराठींत त्याच रूपांना 'ल' हा स्वार्थे प्रत्यय लावून करण्यांत आला. अशा रीतीने संस्कृतमधील मूळ वर्तमान-काळापासून मराठींतील रीतिवर्तमान व भविष्यकाळ साधला गेला आणि मराठींतील वर्तमानकाळ धातुसाधित विशेषणापासून साधला गेला.

मराठींतील भविष्यकाळीं धातूचीं रूपें तयार करतांना कांही धातु व्यंजनादि प्रत्ययांपूर्वी 'इ' आगम घेतात उदा० करील, करीन इ. कांही धातु 'ए' किंवा 'अ' हा आगम घेतात. उदा० धांवेल, शिकेल; धावल, शिकल इत्यादि. ह्याच 'इ' ला व 'ए' आणि 'अ' ना अनुक्रमें सेट् , अनिट् ह्यांच्या त्या खुणा आहेत असें कांही विद्वान् लोक समजतात[1]. परंतु हे सकर्मकत्व व अकर्मकत्व ह्याचे दर्शक आगम आहेत. धातूंचा जुना वर्तमान किंवा सध्याच्या दृष्टीने रीतिभूत तयार करावा आणि त्याला ईल किंवा एल हे प्रत्यय लावावे म्हणजे मराठींतील भविष्य तयार होतो. 'ल' चा कधी कधी (प्रथमपुरुष, एकवचनी) न होतो.

| भविष्य काळाचे प्रत्ययः—ए. व. | | | अनेकवचन |
|---|---|---|---|
| प्र. | ईन ( सकर्मक ) | एन ( अकर्मक ) | ऊं |
| द्वि. | शील | | आल |
| तृ. | ईल ( सक. ) | एल ( अकर्मक ) | तील. |

## भविष्यकाळ

| | एक | अनेक | एक | अनेक |
|---|---|---|---|---|
| प्र. | करीं + ल करीन | करूं | धावेन | धावूं |
| द्वि. | करशील | कराल | धावशील | धावाल |
| तृ. | करील | करतील | धावेल | धावतील |
| प्र. | नेईन | नेऊं | सांगेन | सांगूं |
| द्वि. | नेशील | न्याल | सांगशील | सांगाल |
| तृ. | नेईल | नेतील | सांगेल सांगील | सांगतील |

मराठीने ह्या भविष्यकाळाच्या बाबतींतहि वर्तमानकाळाप्रमाणें प्राकृतोद्भव इतर आधुनिक बोलींपासून भिन्न असा मार्ग काढला आहे. गुजराती, हिंदी, बंगाली, उरिया वगैरे प्राकृतिक भाषांमध्ये भविष्यकाळ साधण्याचे निराळे प्रकार आहेत. त्या भाषांनी भविष्यकाळ मूळ संस्कृतमधील भविष्य ( लृट् ) पासूनच साधला आहे. संस्कृतमधील भविष्यकाळाचें 'स्य' हें जें चिन्ह तेंच इतर भाषांत स्य–स्स–श किंवा स, 'ह' ह्या मार्गाने परिणत होऊन उतरलें आहे.

---

१ राजवाडे, ज्ञानेश्वरीचें व्याकरण. पान ८४,

ह्याच " स्य > स्स > स, श " च्या परंपरेंत कांही इतर भाषांत 'ह' हा प्रत्यय येतो. मारवाडी—मारहूं, मारहां; व्रजभाषा—मारि—हऊं, मारिहैं इत्यादि.

संस्कृतमधील भविष्यकाळाचा ' स्य ' मराठीच्या भविष्यकाळाच्या रूपांतहि उतरला आहे असें राजवाड्यांनी कांही धातूंच्या भविष्यकाळाचीं रूपें व्युत्पादिलीं आहेत त्यांवरून वाटतें. त्यांनी व्युत्पादिलेलीं रूपें खाली देतों[1].

## भविष्यति लट् अनिट्

| | | | |
|---|---|---|---|
| १ | हसिष्यामि | > हसेहिमि | > हसे + ल = हसेन |
| | हसिष्यामः | > हसेहिमो | > हसूँ + ल = हसूं. |
| २ | हसिष्यसि | > हसेहिसि | > हससि + ल = हससील- |
| | हसिष्यथ | > हसेहित्था, हसेहिह | > हसा + ल = हसाल |
| ३ | हसिष्यति | > हसेहिइ | > हसेइ + ल = हसेल |
| | हसिष्यन्ति | > हसेहिन्ति | > हसति + ल = हसतील. |

ह्याचप्रमाणे

करिष्यामि > करिहिमि > करिइइँ > करीं > करीन
करिष्यामः > करिहिमु > करिइउँ > कर्‍युँ > करूँ
करिष्यसि > करिहिसि > करिइसि > करिसि > करिशी [ल]
करिष्यथ > करिहित्था > करिइहा > कर्‍यां > करा [ल]

अशींच इतर रूपें व्युत्पादितां येण्यासारखीं आहेत. ज्ञानेश्वरकालीन मराठींत ' ल ' हा प्रत्यय भविष्यकाळीं क्रियापदांना विकल्पाने लागे. ' ल ' प्रत्ययाखेरीज रूपें यादवकाळांत सापडतात. पाटण येथील १२०६ इसवी सनांतील शिलालेखांत ' उघटे ' व 'वाहन्ति' अशीं लटचीं रूपें ' ल ' शिवाय आहेत.

## आज्ञार्थ

१८९ संस्कृतमधील आज्ञार्था [ लोट् ] पासून मराठींतील आज्ञार्थ आला आहे. प्रचलित मराठींतील आज्ञार्थाचे प्रत्यय हेः—

---

१ राजवाडे ज्ञा. व्या. पा. ८४.

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र. | ऊं [ ओं ] | ऊं [ ओं ] |
| द्वि. | —[ ई, ए ] | आ |
| तृ. | ऊ, ओ | ऊत, ओत |

कंसांत दिलेले प्रत्यय कवितेंत येतात. एकाक्षरी धातु असेल तर 'ओं', 'ओ', 'आ' ह्या प्रत्ययांच्या पूर्वी उच्चारसौकर्यार्थ व् हा आगम होतो. उदा०—जावो, जावोत, जावा, धुवो, धुवोत, धुवा इ. इ.

ह्या प्रत्ययांची उपपत्ति खालीलप्रमाणे आहे.

| | संस्कृत | | प्राकृत | | अपभ्रंश | | मराठी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| एकवचन | | | | | | | |
| | आमि | > | मु | > | अउं | > | ऊं |
| | हि | > | इ | > | अहि | > | —[ अ ] |
| | तु | > | ऊ | > | ऊ | > | ऊ, ओ |
| अनेकवचन | आम | > | अमु | > | अहु | > | ऊं, ओं |
| | त | > | ह | > | हु | > | आ |
| | अन्तु | > | अन्तु | > | अन्तु, हि | > | ऊत, ओत. |

मराठींतील आज्ञार्थाचे सर्व प्रत्यय संस्कृत--प्राकृत--अपभ्रंश ह्या मार्गाने आले आहेत. भूतकाळांत अथवा वर्तमानकाळांत ज्याप्रमाणे संस्कृत धातुसाधितापासून प्रत्यय तयार झाल्यामुळे कर्त्याप्रमाणे किंवा कर्माप्रमाणे क्रियापदाचें रूप बदलतें त्याप्रमाणे आज्ञार्थांत बदलत नाही.

द्वितीय पुरुषी एकवचनासाठी मराठींत प्रत्यय नाही. धातूचें मूळ रूपच तो अर्थ दाखवूं शकतें.

अपभ्रंशांत दोन प्रकारचीं आज्ञार्थाचीं रूपें सापडतात. एक 'उ' प्रत्यय घेणारीं. उदा०—देखु, संचु, करहु. दुसरीं 'इ' प्रत्यय घेणारीं. उदाः—करि, कहि, सुमरी.

हीं 'इ' प्रत्ययान्वित रूपें वर्तमान मराठींतहि कवितेंत आढळतात. उदा—घेई घेई माझे वाचे। गोड नाम विठोबाचें.

## कृदन्तें

१९० धातूपासून पूर्ण व अपूर्ण क्रियाद्योतक अशीं कांही रूपें बनत असतात त्यांस कृदन्त असें म्हणतात. कृदन्तें दोन प्रकारचीं असतात. एक व्ययी कृदन्तें म्हणजे ज्यांना विभक्तीचे प्रत्यय लागतात किंवा ज्यांचें सामान्य-रूप होतें तीं व दुसरीं अव्ययी कृदन्तें.

१ व्ययी कृदन्तें:—(अ) 'ता'–कृदन्त. उदा.—करता, देता, घेता, बोलता, मारता. हीं सर्व कर्तृवाचक म्हणजे क्रियेचा कर्ता दाखविणारीं कृदन्तें आहेत. हीं आकारान्त विशेषणें असून विशेषणाचे सर्व नियम त्यांना लागतात. संस्कृतमधील 'तृ' म्हणून जो कर्तृवाचक प्रत्यय आहे त्या पासून हीं कृदन्तें बनलीं आहेत. 'तां' हें सानुनासिक कृदन्त ह्या कृदन्ता-पासून भिन्न आहे.

(आ) 'णार' कृदन्त. उदा०—करणार, देणार, घेणार, बोलणार, मारणार. हीं सर्व कर्तृवाचक म्हणजे क्रियेचा कर्ता दाखविणारीं कृदन्तें आहेत. हीं 'णार' अंतीं असलेलीं विशेषणें असून त्यांना विशेषणाचे सर्व नियम लागतात. वर दिलेला जो 'तृ' प्रत्यय आहे त्याच्या ऐवजी 'णृ' हा प्रत्यय लागून हीं कृदन्तें बनलीं आहेत. हीं जेव्हा विशेषणें असतात तेव्हा पुं–स्त्री–नपुंसकलिंगी आ, इ, एँ (उदा०—करणारा,--री,--रें) हे प्रत्यय अनुक्रमें त्यांना लागतात. जेव्हा हीं कृदन्तें विशेषणें नसतात तेव्हा त्यांचा उपयोग अव्ययाप्रमाणे होतो व त्यांच्यापुढ सहायकारी क्रियापद ठेविलें म्हणजे भविष्यकाळ दाखविला जातो. उदा.—तो जाणार, मी घेणार आहे. मी बोलणार आहे इत्यादि.

(इ) 'ला'—कृदन्त. ह्या कृदन्ताविषयी सविस्तर विवेचन मागे मराठींतील भूतकाळ या प्रकरणात केलें आहे. हें कृदन्त पूर्णक्रियाद्योतक आहे. हें विशेषण असून विशेष्याप्रमाणे त्याचें लिंगवचन बदलतें. संस्कृत 'क्त क्तवतु' निष्ठेपासून हें मराठींतील कृदन्त सिद्ध झालें आहे. शेवटचा 'ल' प्रत्यय प्राकृतमधील इल्ल, अल्ल ह्या प्रत्ययापासून आला आहे. याचेंहि विवेचन मागे केलें आहे.

( ई ) 'वा'-कृदन्त. उदा०-करावें, द्यावें, ध्यावें. हें कृदन्त विधि, कर्तव्य, आवश्यकता इत्यादि अर्थ दाखविणारें आहे. हें विध्यर्थी आहे. हेंहि विशेषण असून विशेष्याच्या लिंगवचनाप्रमाणे त्याचें रूप बदलतें.

संस्कृतांत 'तव्य, अनीय व य' हे प्रत्यय लावून जीं विध्यर्थांचीं रूपें होतात तींच रूपें मराठीच्या 'वा' कृदन्ताच्या मुळाशीं आहेत. संस्कृत 'तव्य' प्रत्यय माहाराष्ट्री प्राकृतांत अव्व होतो व तोच प्रत्यय मराठींत 'आव' असा होतो. उदा०—कर्तव्यम् > करिअव्वँ > करावँ; हसितव्यम् > हसिअव्वँ > हसावँ; भवितव्यम् > होइअव्व > होआवँ. दुसरा जो अनीय म्हणून संस्कृतमधील विध्यर्थाचा प्रत्यय आहे त्यापासून मराठी विध्यर्थी कृदन्त 'णें' कारान्त सिद्ध होतें. संस्कृत 'अनीय' प्रत्यय प्राकृतमध्ये अणिय होतो आणि मराठींत 'णें' होतो. उदा०—लिहिणें, करणें, देखणा. उदा०—हें काम मला करणें आहे. बहुत काय लिहिणें. देखणा मनुष्य. ह्या कृदन्ताचा नामाप्रमाणेहि उपयोग करतात. वर्तमान मराठींत ह्याचा उपयोग फार आहे. ह्या कृदन्तांना चतुर्थी व षष्ठी ह्या विभक्तींचे प्रत्यय लागतात. उदा०—करावयास, करण्यास, करावयाचें, करण्याचें.

२ अव्ययी कृदन्तें:--(अ) 'त' कृदन्त उदा.--करित, देत, घेत इत्यादि अपूर्ण क्रिया दाखविणारीं कृदन्तें. ह्यांचा विचार मागे मराठींतील 'वर्तमानकाळ' ह्या प्रकरणांत केलाच आहे. संस्कृतमधील 'अन्त' 'त' ह्या वर्तमानकाळच्या कृदन्त प्रत्ययांवरूनच मराठी प्रत्यय 'त' आला आहे.

मराठींतील वर्तमानकाळ ह्याच कृदन्तापासून सिद्ध झाला आहे. त्या वेळीं मात्र हें कृदन्त अव्ययी नसून व्ययी असतें आणि विशेषण समजून विशेष्याप्रमाणे त्याचें लिंगवचन बदलतें. उदाहरणें संस्कृत, माहाराष्ट्री, मराठी, या क्रमाने दिलीं आहेत. भवत् > होन्त > होँत; भणत् > भणन्त > म्हणत; ददत् > देन्त > देँत. त्याचप्रमाणे करीत, मानीत, धरीत, घालीत, लिहीत अशीं रूपें होतात. ह्या सर्वांमध्ये 'ई' आगम झाला आहे. हा ईकार माहाराष्ट्री भाषेपासून आला आहे.

( आ ) तां—कृदन्त. उदा०—करितां, देतां, घेतां, बोलतां. वरचें व्ययी कृदन्तांत 'ता' कृदन्त दिलें आहे त्यालाच अधिकरणवाचक

'आं' हा प्रत्यय लावून हें 'तां' कृदन्त साधलें आहे[1]. हें अव्यय आहे. हें कृदन्त क्रियावाचक आहे. 'तां' कृदन्ताची वर जी उपपत्ति दिली आहे त्याहून भिन्न अशी उपपत्ति राजवाडे यांनी दिली आहे[2] व ती जास्त सयुक्तिक वाटते. हा 'तां' प्रत्यय संस्कृत 'त्वा' ह्या प्रत्ययापासून त्यांनी व्युत्पादिला आहे. हा त्वा प्रत्यय अर्धमागधी भाषेंत 'त्ता' होतो व त्यापासून मराठी तां होणें अगदी शक्य आहे. त्वा > त्ता > तां उदा०— वंदित्वा > वदित्ता > वदितां; गंत्वा > गत्ता > गता, यात्वा > जातां; नीत्वा > नेत्ता > नेतां. हेंच कृदन्त 'तांना' प्रत्ययान्तहि कधी कधी असतें. ह्याची उपपत्ति क्त्वा > ताणं > तांना अशी आहे. 'अर्धमागधींत' 'क्त्वा'चा ताणं हें रूप होतें.

(इ) ऊं–कृदन्त. उदा० करूं, देऊं, घेऊं, बोलूं, मारूं. हीं कृदन्तें क्रियेचा आरंभ दाखवितात. हीं भविष्यार्थी आहेत. राजवाडे हा ऊं प्रत्यय संस्कृत तुम् पासून तुम्--उम्--उं--ऊं-ह्या मार्गानें व्युत्पादितात. परंतु दोन्ही प्रत्ययाच्या अर्थाकडे जर पाहिले तर त्वानम्-तूणम्--तून--ऊन--ऊं ह्या मार्गानें तो व्युत्पादणें ज्यास्त सयुक्तिक दिसतें. ह्याचाच आणखी एक प्रकार खालीलप्रमाणें आहे.

ऊन–कृदन्त. हीं कृदन्तें क्रिया पूर्ण झाल्याचीं द्योतक आहेत. उदा०—करून, देऊन, घेऊन, बोलून, मारून. संस्कृतमधील 'त्वा' प्रत्ययापासून किंवा त्याच्याहि मागच्या त्वान, त्वीन वगैरे वैदिक संस्कृत प्रत्ययापासून हा प्रत्यय सिद्ध झाला आहे.

त्वान, त्वीन--त्वा--तूणम्--तून--ऊन, अशा मार्गानें हा 'ऊन' प्रत्यय येणें शक्य आहे. व 'ऊन'च्या पुढची पायरी म्हणजे 'ऊं', हा वर दिलाच आहे. जुन्या लेखामध्ये घेऊन, देऊन, पाठवून, करून हीं रूपें घेऊं, देऊं, पाठवूं, करूं ह्या अर्थी वापरलेलींच आहेत, तीं पहावीं. त्यांवरून वरील विधानास जास्त बळकटी येईल.

ज्ञानेश्वरी वगैरे जुन्या वाङ्मयांत ह्या ऊन कृदन्तांचीं निरनिराळीं

---

१ दामले शास्त्रीय व्याकरण, पान ७०३. २ राजवाडे ज्ञा. व्या. पृ. १०८

रूपें वापरलेलीं आढळतात. उदा० जिणूनि, हसूनि, पिऊनि, दावूनि. त्याचप्रमाणे कधी कधी जिणौनि, हसौनि पिवौनि अशींहि रूपें येतात. कधी कधी त्यांना ‘ उकार ’ लागतो. उदा० करूनु घेऊनु, हसुनु. ( अपभ्रंश भाषेंत अशींच उकारान्त अव्ययें वापरतात )

कधी कधी ‘ ऊन ’ प्रत्यय लावून पुढे आणखी ‘ इयाँ ’ हा प्रत्ययहि जुन्या वाङ्मयांत लावलेला आढळतो. उदा० घेऊनियाँ, जाऊनियां, करूनियां, देऊनियां.

हा ‘ इयाँ ’ प्रत्यय संस्कृतमधील ‘ य ’ प्रत्ययापासून काढला आहे. ‘ त्वा ’ च्या ऐवजी धातुच्या मागे उपसर्ग असेल तर ‘य ’ प्रत्यय संस्कृत मध्ये वापरतात. य--इय- इय + आ--इयां अशा परंपरेने तो प्रत्यय येतो.

त्वा--तून--दूण--ऊण ( माहाराष्ट्री ) ह्या मार्गानेहि मराठी ऊन प्रत्यय निघेल. परंतु ऊन प्रत्ययाबरोबरच ओनि, औनि हे जुने प्रत्यय त्याच अर्थी आढळतात. हे[1] प्रत्यय कोणत्या तरी शब्दापासून निघाले असावेत. ‘ नि ’ हें शब्दयोगी अव्यय असावें[1].

सर्व प्रत्ययांची ही विचारसरणी ध्यानांत ठेवून जर एखाद्या धातूचीं ‘ ऊन ’ कृदन्ताचीं किती रूपें होणें शक्य आहे असें पाहिलें तर पुढील रूपें दिसतील. धातु--करः—करून, करुन, करूनि, करुनि, करूनु, करुनु, करूनियां, करुनियाँ, करूनी, करूनि इतकीं रूपें होतात.

पुनः प्रयोजकाचीं रूपें करौनि, करवून हीं होतात तीं निराळींच ( जास्त स्पष्टीकरणासाठी ‘ मराठीचे कालिक--भेद या प्रकरणांतील यादव-कालीन, शिवकालीन व पेशवेकालीन भाषा हीं प्रकरणें पहावीं. )

कृदन्तांचा संबंध वाक्यघटनेंत पुष्कळ ठिकाणीं येतो. कृदन्तें मराठीमध्ये संयुक्त क्रियापदें ज्यांना म्हणतात तीं सर्व कृदन्तांच्या साह्याने तयार होतात. संयुक्त क्रियापदांत मुख्य क्रियेचें कृदन्त असतें आणि गौण क्रियेचें क्रियापद किंवा आख्यात असतें. कृदन्त आणि सहाय क्रिया-

---

J. Bloch, L. F. M. p. 261-263.

पद या दोहोंचें मिळून संयुक्त क्रियापद मराठींत तयार होतें. हींच संयुक्त क्रियापदें संयुक्त काळाच्या मुळाशीं आहेत. वर सांगितलेलीं कृदन्तें व्ययी आणि अव्ययी या दोन प्रकारांत मांडलीं आहेत. काळाच्या दृष्टीनेहि तीं मांडणें शक्य आहेत. त्यामध्ये कर्तरि, कर्मणि व भावे असे प्रकार पडतात.

वर्तमानः—त--कृदन्त कर्तरि, करीत, देत, घेत.
कर्मणी म्हणेजत, करिजत.
प्रयोजक इसवित, म्हणवित.

भूतः—ला कृदन्त, ऊन कृदन्त

भविष्यः—ता कृदन्त, णार कृदन्त.

कर्मणी, भावेः—वा कृदन्त, ऊं कृदन्त.

## प्रयोग

१९१ वाक्यांमध्ये निरनिराळे शब्द परस्पराशीं कोणत्या तरी विशिष्ट संबंधाने जोडले जातात. ह्या निरनिराळ्या शब्दांत कर्ता, क्रियापद व क्रियापद सकर्मक असेल तर त्याचें कर्म हे शब्द मुख्य होत. मराठींतील प्रयोगांची घटना ही संस्कृत, प्राकृत भाषांच्या मार्फतच आली आहे. वर्तमान, भूत वगैरे काळांतील क्रियापदांचीं रूपें हीं धातुसाधित विशेषणापासून उत्पन्न झालीं असल्यामुळे तीं कर्त्याप्रमाणे किंवा कर्माप्रमाणे बदलतात. वाक्यांत कर्त्याच्या लिंगवचनाप्रमाणे क्रियापद बदललें म्हणजे त्याला कर्तरि प्रयोग म्हणतात व कर्माच्या लिंगवचनाप्रमाणे क्रियापद बदललें म्हणजे त्याला कर्मणि प्रयोग म्हणतात. ज्या वाक्यांत कर्ता व कर्म ह्या दोन्ही प्रमाणे क्रियापद न बदलतां तें तृतीय पुरुषी नपुंसकलिंगी एकवचनी असतें त्या वेळेस भावे प्रयोग म्हणतात. जेव्हा वाक्यांतील क्रियेचा जो भाव तोच कर्ता असतो तेव्हा त्याला भावकर्तृक प्रयोग म्हणतात.

## कर्मणि प्रयोग

१९२ ह्या चारी प्रयोगांत कर्मणि प्रयोग फार महत्त्वाचा आहे. प्राकृत भाषांत जे अंतरंग व बहिरंग[1] असे जे दोन प्रकार आधुनिक भाषांतील

१ परिशिष्ट पहा.

पुराव्याच्या बळावर पाडतात ते मुख्यतः कर्मणी प्रयोगावरच होय. ह्या कर्मणि प्रयोगाचें स्पष्टीकरण खाली केलें आहे.

मराठींतील प्रयोगांमध्ये कर्मणि प्रयोग विशेष महत्त्वाचा आहे. ह्याची ऐतिहासिक उत्क्रांति पाहणें तर मनोरंजक आहे. फार प्राचीन काळच्या पूर्ववैदिक भाषेंत हा कर्मणि प्रयोग वापरांत नसावासें वाटतें. जुन्या आर्य व इराणी भाषेंत हा प्रयोग वापरलेला आढळतो. परंतु तो फक्त वर्तमानकाळीं आणि भूतकाळीं तृतीयपुरुषी एकवचनांतच फक्त आढळतो. कर्मणि प्रत्यय 'य' हा तेथील मूळचा प्रत्यय पुढील वैदिक व पाणिनीय संस्कृतमध्येहि आहे. पुढे प्राकृत भाषांच्या काळांत आर्य भाषेच्या आंतररचनेंत जे कांही फरक झाले त्यांपैकी बरेचसे काळ व प्रयोग ह्यांच्या बाबतींत झाले असले तरी हा कर्मणि प्रयोग प्राकृतमध्ये सुद्धा राहिला. वेद व संस्कृत ह्यांमधील कर्मणीचा दर्शक जो 'य' प्रत्यय तो प्राकृतमध्ये य, इय, इय्य, ईय व कांही काळानंतर इज्ज अथवा ईअ अशीं रूपें धारण करतो. प्राकृतानंतर आधुनिक बोलींमध्ये कर्मणि प्रयोग प्राकृत अथवा अपभ्रंश ह्या भाषांच्याच द्वारा आला आहे. व त्याचा प्रत्यय ईज, ईअ, इअ ह्या रूपांत दिसतो. आधुनिक बोलींपैकी कांही बोलींतच, विशेषतः पश्चिमेकडील बोलींत, हा प्रयोग त्याच्या प्रत्ययासह राहिला आहे. पूर्व व दक्षिणेकडील बोलींत हा वापरला जात नाही.

मराठीमध्ये कर्मणि प्रयोग तयार करण्याचे दोन प्रकार आहेत. एक कर्मणि प्रकार संस्कृत व प्राकृत ह्या भाषांच्या द्वारा त्याच्या मूळ 'य' प्रत्ययापासून निघालेल्या 'ज' ह्या प्रत्ययासह आला आहे. ह्याला पुराण कर्मणि म्हणतात. कारण हा जुन्या मराठी वाङ्मयांतच फक्त वापरलेला आढळतो. पुढील वाङ्मयांत हा 'ज' प्रत्ययाचा कर्मणि प्रयोग आढळत नाही. जुन्या वाङ्मयांत वापरलेलीं कांही रूपें पुढीलप्रमाणे आहेत. गमिजे, होईजे, अनुभविजे. कीजे, धरिजे, दीजे, म्हणिजे, ठेविजे, घेइजे, करिजे इत्यादि. ह्या सर्वांचीं पूर्वीचीं प्राकृत व संस्कृतचीं रूपें पुढीलप्रमाणे असणार--उ० गम्यते, गमिज्जे; भूयेत, होइज्जे; अनुभूयते, अनुभूइज्जे इत्यादि. हा 'ज' प्रत्यय लागून ज्याप्रमाणे कर्मणि प्रयोगाचा एक प्रकार वर सांगितला तसाच 'व' प्रत्यय लागून दुसरा एक कर्मणि प्रयोगाचा प्रकार

मराठींत रूढ आहे. ह्या प्रकाराचीहि उपपत्ति संस्कृतमाहाराष्ट्रीच्या द्वारा लागते. संस्कृतमधील 'य' ह्या कर्मणि प्रत्ययाबद्दल माहाराष्ट्रींत 'व्व' हा प्रत्यय येतो. उदा० भूयते--हुव्वइ--होववे, परिश्रूयते--परिसुव्वइ--परिसवे, जीर्यते--जीरइ--जिरवे, गम्यते--गम्मइ -गमे, गृह्यते--घेप्पइ--घेपे, दृश्यते--दीसए--दीसे, लभ्यते--लब्भइ--लाभे, क्रियते--कीरइ--करवे, ज्ञायते--णव्वइ--जाणवे—नेणवे, भण्यते--भण्णइ--म्हणवे—म्हणिपे. हीं रूपें 'भावे' हि चालतात. परंतु तीं प्रथमपुरुषी एकवचनांतच फक्त तेवढीं चालतात.

कर्मणि प्रयोगाचा दुसरा एक जो प्रकार मराठींत रूढ आहे त्यास नवीन कर्मणि (किंवा कोठे कोठे कर्मकर्तरि) असें म्हणतात. हा प्रयोग वापरण्याची प्रवृत्ति आधुनिक आहे म्हणूनच ह्याला नवीन कर्मणि म्हणतात. ह्या प्रयोगांत कर्मपद कर्त्याच्या जागीं येतें म्हणून ह्याला कर्मकर्तरि म्हणतात. ह्या प्रकारांत 'जा' धातूचा सहायकारी म्हणून उपयोग करतात. उदा० १ शिपायाकडून चोर धरिला जातो. २ मजकडून हें काम केलें जाईल. ३ त्याजकडून हें पुस्तक वाचलें जावें. इत्यादि.

ह्या नवीन कर्मणि प्रयोगाची उपपत्ति दोन प्रकारांनी लाविली जाते.

१ 'जा' हा धातु संस्कृत मधील 'या'=जाणें ह्या धातूपासून आला आहे. तेव्हा त्यापासून ही पद्धत मराठींत आली असावी.

२ किंवा प्राकृत मधील इज्ज प्रत्यय जो वर सांगितला आहे त्याच्यापासून जरी प्रत्यक्ष हा वरील 'जा' धातू आला नसला तरी त्याचा ह्याच्यावर परिणाम पुष्कळ झाला असावा.[1]

पुराणकर्मणि प्रत्येक आख्यानांत किंवा काळांत चालतो. त्याचीं उदाहरणें पुढीलप्रमाणे आहेत.[2] वर्तमानकाळ (ताख्यात)—उदा०—सागराने तो काय सांगिजेतो. भूतकाळ (ला आख्यात) उदा०—नळें इंद्रासी असें बोलिजेलें. रीतिभूत उदा०—मग मातें (ईश्वराने) जेणें पाविजे. भविष्यकाळ (ईल आख्यात) उदा.—ते अनुभवाचे चमत्कार पुढे बोलिजेतील.

मराठींतील मुख्य कर्मणि प्रयोगाचा प्रकार आणखी एक आहे. वर जे कर्माणि प्रयोगाचे प्रकार सांगितले त्यांपेक्षा हा निराळा आहे. संस्कृतमधील भूतकालवाचक निष्ठेपासून व विध्यर्थी धातुसाधितापासून हा प्रयोग

---

१ Chatterji O. D.B. p.912. २ दामले, शा. म. व्याकरण ३८८.

मराठींत आला आहे. ह्या प्रयोगांत क्रियापद हें संस्कृतमधील भूतकाळीं व विध्यर्थी धातुसाधित विशेषणापासून आल्यामुळे हें क्रियापद (व तत्परत्वें कर्मणि प्रयोगहि) विशेषणात्मक असतें व तें कर्माच्या लिङ्गवचनाप्रमाणे चालतें म्हणून ह्याला कर्मणि प्रयोग म्हणतात. ह्या प्रयोगांत कर्ता तृतीय विभक्तींत असतो. उदा० त्याने घोडा पाहिला--[पहावा--विध्यर्थी] त्याने पोथी वाचिली--[वाचावी--विध्यर्थी]. त्यानें काम केलें--[करावें विध्यर्थी].

(ह्याचें विवेचन मागे 'भूतकाळ' ह्या सदराखाली दिलें आहे.)

## ग्रामिक मराठीचें स्वरूप

१२३ मध्यवर्ती नागर भाषेचा वर्णप्रक्रिया व तिचें व्याकरण ह्या दोन बाबींचा विचार प्रामुख्याने वर केला. ह्या नागर भाषेच्या विचाराबरोबर मध्यवर्ती ग्रामिक भाषांचा विचार येतो. मध्यवर्ती मराठीचीं नागर व ग्रामिक हीं दोन स्वरूपें आहेत. ह्या दोहोंचा स्वभाव एकच आहे. उच्चारांत व व्याकरणांत कांहीं थोड्या सूक्ष्म स्वरूपाच्या लकबा आहेत. पुणें, सातारा, सोलापूर, नगर, नाशिक व ठाण्याचा कांहीं भाग इतक्या प्रदेशांतील बहुजनसमाजाची हीं ग्रामिक स्वरूपाची मराठी बोली आहे. मराठा व तत्सम इतर जाती ह्यांची ही बोली आहे. खेडेगांवांतील व शहरांतील अशिक्षित समाज ह्या बोलींतच व्यवहार करतो. साधारणपणें शेंकडा ९० लोक ही बोली वापरतात असें म्हणावयास हरकत नाही. ह्या भाषेच्या स्वरूपाचा उल्लेख मागे केलाच आहे. तिच्यांतील आणखी कांहीं लकबा पुढे देत आहें. वैदिक व प्राकृत भाषांतील कित्येक जुन्या लकबा ह्या ग्रामिक भाषेंत उतरलेल्या दिसतात.

१ आरंभींच्या स्वरोच्चारांत 'ह' कार मिसळतो. उदा०--हापटणें, हाय. २ त्याचप्रमाणे उपान्त्य स्वराचा थोडासा पसरट उच्चार केला जातो. उदा०--गाढाव, कीरतान, भजान, आंग [अंग] उलाट, सुलाट, तबाक, गाजार. ३ 'इ' चा 'अ' होतो. उदा०—जकड तकड, हकड, जत, तत, हथ. ४ 'ए' चा 'ये किंवा अ किंवा आ' होतो. उदा०—ह्येलपाटा, ल्येका, ग्येला, क्येळ, किंवा क्याळ, पुढं, आल, मुलं, पोर, कुठ, तंत. ५ 'ओ' चा 'आ' किंवा वो, 'उ' किंवा 'यो' होतो.

उदा०—त्वांड, [तोंड] बॉबलणें, ल्वॉक, ल्योक, मॉडका, जुंदळा, बायकु, दोपार, ववाळणी. ६ जाडाक्षरें तोडलीं जातात--अस्तुरी, बिरामण, गिरस्त, किणव, फकस्त, वखत.

व्यंजनाच्या बाबतींत असेच त्यांच्यांत फरक होतात. १ महाप्राण व अल्पप्राण व्यंजनांची आलटापालट होते. उदा०--माज, तुज, कता [कथा] लकलकीत [ ख ], वांड [ ढ ], पेडा [ पेढा], भहीण. २ 'न, ण' ह्याची आलटापालट होते. उदा०–कोन, क्वान, पानी, लोनी, म्हनून, कारन. ३ कधी त्याचा 'ल' होतो उदा०–लुकसान, लिंब. ४ 'वि' बद्दल 'इ' येते. उदा०–इटकर, इजार, इत, इचारणें, इचरणें, इपत, येळ किंवा कधी लोप होतो. हीर [विहीर] ५ 'श्, ष्, स्' बद्दल 'स' हा एकच ऊष्मा येतो. संबु, [शंभु] सुकसुकाट, येसपांड्या, सहाणा, माणुस, सिकसान [ शिक्षण ], साळा.

व्याकरणांतीलहि रूपें चमत्कारिक जरी दिसलीं तरी भाषेच्या जुनेपणाच्या दृष्टीने चिन्तनीय आहेत हें खास. म्हंगाला, लागत्यो, आल्याती, जात्यात, करत्यात, आलाय, जातोय, करतो, हैत, है [आहेस], लागतुया, करतुया, त्यो [ वैदिक त्यत् ], ह्यो, व्होव [ हवे ], तोडत्याल, जायला, करायला. त्याचप्रमाणे पुढील शब्द महत्त्वाचे आहेत. वाइच, अक्षी, लई, मायंदळ, मंग, बेगी, उर्गा, डांई, भुई, तुंप, इंटाळ, जी, धाडणें, घरामंदी, येरवाळी. जणु, वंगाळ [अमंगळ] कसनुस, र, व [ संबोधनार्थक ], वरन, खालन, बि [ अपि ], रास्सार, दिसभर इत्यादि.

## परकी भाषांतील मराठींत आलेले व्याकरणविशेष

१९५ मराठी व द्राविडी व फारशी ह्या भाषांचा संबंध फार जुन्या काळापासून असल्यामुळे त्यांचा परस्परांच्या व्याकरणावरहि परिणाम झाला आहे. द्राविडी भाषांतून पुढील व्याकरणविशेष मराठींत आलेले आहेत. १ विभक्तीच्या प्रत्ययांऐवजी शब्दयोगी अव्ययें वापरणें. २ एकवचन व अनेकवचन ह्यांचे दर्शक एकच प्रत्यय असणें. ३ 'आपण' ह्या सर्वनामाचा आपणासाठी ( आत्मने ) व दुसऱ्यासाठी ( परस्मै ) असा दुहेरी चमत्कारिक उपयोग करणें, ४ कृदन्तांच्या साहाय्याने काळांचीं रूपें सिद्ध करणें, ५ प्रधान वाक्याच्या अगोदर गौण वाक्य वापरणें, ६ संबंधी व अनुबंधी

( जो, तो ) ह्यांपैकी संबंधी शब्द पुढे व अनुबंधी मागे असा क्रम ठेवणें, ह्या सर्व बाबी द्राविडी शिक्क्याच्या आहेत[१]. ह्या बाबींतील विशेषतः पहिली दुसरी व चौथी ह्या बाबी आर्यभाषेचे सुद्धा स्वभावविशेष आहेत असे मागील विवेचनावरून लक्षांत येईल.

फारशी भाषेपासून पुढील गोष्टी मराठींत आल्या. १ विशेषण विशेष्यापुढे घालणें (इसम मजकूर, साहेब बहादूर). २ त्यांचें तारतम्य तर व तरीन् ह्या प्रत्ययांनी दाखविणें ( कमतर, बेहत्तर, ). ३ 'हा' 'जात' 'आन' ह्या प्रत्ययांनीं अनेकवचनें सिद्ध करणें. ४ द्वितीया व चतुर्थीचा 'रा' व षष्ठीचा 'इ' हे प्रत्यय वापरणें. हे सर्व फारशी भाषेचे विशेष मराठींत उतरले आहेत[२]. करणें, मारणें, देणें इत्यादि क्रियापदांच्या पूर्वी क्रियावाचक अगर इतर नाम घालून संयुक्त क्रियापद साधण्याचा प्रकार मराठीने फारशीवरूनच उचलला. फारशींतून शब्दयोगीअव्ययें व क्रियाविशेषणअव्ययें पुरोगामी व पूर्वगामी अशीं वापरणें इत्यादि पुष्कळ प्रकार मराठींत आले आहेत. ह्या सर्वांचा सविस्तर व मार्मिक विचार मा. त्रि. पटवर्धन ह्यांनी आपल्या फार्शी-मराठी कोशाच्या प्रस्तावनेंत केला आहे तो जिज्ञासूंनी तेथे पहावा.

## शब्दसिद्धि-तद्धित प्रत्यय

१९५ (१) अ—[पु. स्त्री, नं. नाम] संस्कृतमधील 'अः, अम्, आ' ह्या प्रत्ययाबद्दल मराठींत येतो. उदा० मन [ मनस् ] चार, वात [वार्ता], बोल, चाल.

२ अ--[विशेषण आणि नामें] सं. क--अक--अअ--आ. उदा.—भला, काळा, ढवळ [ धवल ].

३ त--( संस्कृत वर्तमानकालवाचक धातुसाधितापासून निघालेला). अथवा अत, इत ईत. वर्तमानकालवाचक धातुसाधितें. उदा०—जीवंत, चालत, भरत, वाढत, फिरती, जाणता [ माणूस ].

---

१ Caldwell, C. Gr. D. Intro.

२ मा. त्रि. पटवर्धन, फार्शीमराठी कोश प्रस्तावना.

४ अती, ती [ आसिका ] भाववाचक उदा०—बढती, चुकती, घटती, गळती, उठती.

५ अन, न, ण. [ स्त्री ] नी, णी [--अनम् ] उदा०—गायन, वाचन, ज्वलन [ जळण ], ढाकण, ढापण, जारण, मारण, चाळण, चाळणी, खिसणी, पिसणी, कापणी, लावणी.

६ आई—भाववाचक [ आपिका ] आपिका--आविआ--आवी--आई. उदा०—लढाई, डोलाई, भलाई, मिठाइ, [ तका, तिका ] बढाई, पुष्टाई, चढाई. आई, [अल्पार्थे]. कान्हाइ, सोमाई, रामाई.

७ व, अव.—घातुसाधित णिच् [ आप--आव--व. ] उदा०—चढाव, घबराव, फैलाव, बनाव.

८ आऊ, [विशेषण आणि भाववाचक] उदा०—घराऊ, जडाऊ, बचाव, मिळताऊ, पोहणाऊ.

९ आणि > वण > ण. उदा०—पानीयम्--पाणी--वाणी--वण, अण, गुळवणी, तेलवणी.

१० आर, आरी, रा, र. [ कार, कारिन, कारिक ] कर्तृवाचक नामें, उदा०—कुंभार, सुतार, लोहार.

११ आल्, आल, लु उ०—आल, आलु, दुधाळ, मांसल, तेजाळ, वाचाळ, छिनाल, दांताळ, तोंडाळ,

१२ इ, ई [ नामें व विशेषणें. ] उपपत्ति—ई--इन्, माळी, २ ई—ईय; देशी, ३ ई--इक. उ०—गुणी, बडी, हिशोबी, गुजराती, मराठी, पुणेरी, नगरी, खानदेशी स्त्री. ई--इका—घोडी, मामी, काकी, सुरी, बोली.

१३ य्या, [ हिंदुस्थानी ] तव्य--अन्न--आव--आवय्या; उदा०—गवय्या, खवय्या, बजवय्या.

१४ इल--इल्ल--इल—भूतकालवाचक [ पाणिनी५।२।७९] उ०—अण्डिल, कुटिल, पिकल.

१५ १उ, ऊ. उदा०--गड्डु, लाड्डु, २ अ--०--उ--डुबुडुबु, उड्डुउड्डु.

१६ क, अक, इक, उक अक्क [ प्राकृत ] २ द्राविडी क्य [ संस्कृत ] उ०--टणक, चरक, मारक, तारक मोडक, तोडक, परक--पारक्य.

१७ ट, टी [ स्त्री विशेषणार्थे, अल्पार्थे ] धुवट, लांबट, रुंदट, घसट, तिखट, खारट, कासोट. ह्या पासूनच 'ड' प्रत्यय आला आहे. उघडा, नागडा.

१८ डा--आखाडा. उकिरडा. संस्कृत. (वाट, वाटिका).

र, रा, री; डा, ड, डी; रा, र, री. प्राकृत आणि अपभ्रंश ह्यांमध्ये हा प्रत्यय आहे. हा प्रत्यय सुद्धा संस्कृतमधील 'ट' ह्यापासून नरमाऊन आला आहे. हा प्रत्यय संस्कृत दृश् ह्यापासून होर्न्ले काढतो. (गौडी व्याकरण पृ. २१८) उदा ०—मर्कट > माकडा, कर्पट > कापडा; लकुट > लगुड; हिजडा, कठडा, तुकडा, गठडी. रा.--मोहरा, छोकरा.

१९ त, ती. ( भावार्थे ). वत > पत्र, करवत-करपत्र.

२० स्त्रीलिंगी प्रत्यय. नि, नी, न, इनि, आनि, अनि, उनि, राणी. बाकीच्या शब्दांत स्त्रीलिंगी प्रत्यय ईन-ण असा झाला आहे. कांही नामांना स्त्रीलिंगी प्रत्यय 'ई' हा लागतो.

२१ भावार्थे त्व > प्प, त्वन > पण.

२२ रूं < रूव < रूप, उदा०— गुरूं, वासरूं, कोकरूं, लेकरूं.

२३ ल, ला, ली, लें, इल > इल्ल, उल्ल > ल, मागे उल्लेख आला आहे.

२४ श, स ( > सदृश ).--कर्कश, लोमश, कापिश.

२५ सर, सरा--एकसर, दुसरा, तिसरा.

## फारशी प्रत्यय

१ आन, वान,—मतुब् प्रत्ययासारखा अर्थ—"जवळ असणें" [वत् ह्या संस्कृत मतुप् प्रत्ययापासून निघाला आहे काय ?] उदा०—बागवान, गाडीवान, दारवान.

२ खाना—घर, निवास. उदा.–दवाखाना, दिवाणखाना, दप्तरखाना.

३ खोर—खाणारा. उदा०—दिवाळखोर, भांडखोर, चुगलखोर, हलालखोर, हरामखोर.

४ गर—करणार, कर. उदा०—कारागर, शिकलगर, सवदागर, कारीगर.

५ गिरी—धंदा, कार्य. ( गर + इ = गीरी ). उदा०—बाबुगिरी, दादागिरी, वस्तादगिरी.

६ ची—( अल्पार्थें ) उदा.–सतरंची, बगीचा, चमचा.

७ दान, दानी.–साठा उदा.– पिकदाणी, कलमदान, अत्तरदाणी, गुलाबदाणी.

८ दार–अधिकारी.उदा.–चौकीदार, भालदार, मामलेदार, फौजदार.

९ नवीस–लेखक. उदा.–नकलनवीस, फडनवीस, सबनीस, जमेनीस, वाकनीस.

१० बन्द. उदा.–लंगोटबन्द, लखोटबन्द.

११ बाज–संबंधीचा. उदा.–बाजा ( नाम ). गळाबाज, जहांबाज, अफीणबाज.

१२ इस्तान–संस्कृत 'स्थान' ह्या प्रत्ययासारखाच आहे. उदा.–हिंदुस्तान, अफगाणीस्तान, तुर्कीस्तान.

१३ मन्द--( संस्कृत मतुप् प्रत्ययासारखाच हा प्रत्यय आहे ). उदा.--दौलतमन्द ( श्रीमन्त ).

## १ परिशिष्ट

आर्योद्भव आधुनिक बोलींच्या तपासणीवरून त्यांचे दोन गट पडतात. १ ल्हांडा, पश्चिम पंजाबी, सिंधी, मराठी, उरिया, बिहारी, बंगाली, आसामी. २ पश्चिम हिंदी, पंजाबी, गुजराथी, भिल्ली, खानदेशी, राजस्तानी. ह्या दोन्ही गटांतील भाषांच्या साम्यावरून त्या दोन निराळ्या प्राकृत भाषांपासून निघाल्या असाव्यात असें वाटतें. त्यांना बाह्य प्राकृत व आंतर प्राकृत अशीं नांवें डॉ. होर्नले ह्याने दिलीं व त्याचाच अनुवाद डॉ. गिय-

र्सनने केला. ह्या भाषांच्या पुराव्यावरून आर्यांच्या वसाहतीहि निरनिराळ्या काळीं झाल्या असें त्याचें मत आहे. होर्न्ले म्हणतो की, मागाहून आलेला आर्यांचा पुंज एकदम आंत मध्यदेशांत शिरला. ह्यांची अंतरंग प्राकृत भाषा होय व तेथे पूर्वी स्थायी झालेल्या लोकांना त्याने चारी दिशांस पांगावयास लाविलें. ह्यांची बहिरंग प्राकृत होय. ह्याच्या उलट डॉ. ग्रियर्सनचें म्हणणें असें की, मागाहून आलेले आर्यलोकच चोहो दिशेस पांगले व त्यांनी मूळच्या मध्यदेशांतील आर्यांस घेरलें. ह्यांची भाषा बाह्य प्राकृत. आंतर व बाह्य प्राकृतोद्भव भाषांतील भेद ऊष्मवर्ण व कर्मणि प्रयोग ह्या दोहोंच्या बाबतींत दिसून येतो. आंतर भाषांत 'श्, ष्, स्' ह्या तिहींचा 'स' होतो. बाह्य भाषांत हे उच्चार उच्चारण्यास कठीण जातात. भूतकाळाच्या रूपांत पदाचें लिंग, वचन बदलून पुन्हा कर्त्याचा दर्शक असा सार्वनामिक प्रत्यय लावतात. कर्मणि प्रयोगाची रचना विशेष स्पष्ट होण्यासाठी सर्व भाषांतील त्याचीं उदाहरणें खाली देतों.

## पश्चिमेकडील भाषा

१ पश्चिम हिंदीः—मैंने पोथी पढी, २ गुजरातीः—में पोथी वाँची ३ मराठीः—मीं पोथी वाचिली, ४ सिंधीः–मूँ पोथी पढी-मे, ५ प. पंजाबीः–मैं पोथी पढी-म.

## पूर्वेकडील भाषा

१ पू. हिंदीः–मैं पोथी पढेऊं, २ भोजपुरीः- हम पोथी पढ़ली, ३ मैथिलीः--हम पोथी पढलहुँ, ४ बंगालीः--आमि पुथी पाडिलाम् ( मुई पुथी पोडिली-छुम् ). ५ उडियाः--आम्भे पोथि पोढिलु, मुँ पोथि पोढिली.

# मराठी बोलणाऱ्यांची लोकसंख्या

| प्रांतांचें नांव | १९११ ची शिरगणति | १९२१ ची शि. ग |
|---|---|---|
| अजमेर मारवाड | ६८८ | ७४८ |
| अंदमान | ६७१ | ५०२ |
| आसाम | १३९६ | १४०० |
| बलुचिस्तान | ७८६ | ११२१ |
| बंगाल | २४०३ | २६२० |
| बिहार ओरिसा | १०४९ | १२४३ |
| मुंबई | ९०,१६,२२८ | ८४.३५,७४० |
| कोंकण | | १,७९,४०८ |
| ब्रह्मदेश | २,२१२ | १,५७३ |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | ४८,६५,९८० | ४७,७३,५६१ |
| कूर्ग | ४,४३७ | ३,५४५ |
| मद्रास | २,९८,९९८ | ३,०१,३१२ |
| वायव्य स. प्रांत | २१९ | ४६३ |
| पजाब | ७५६ | १,३२७ |
| संयुक्तप्रांत | ६,०२९ | २,८१२ |
| बडोदा संस्थान | ३६,१४५ | ३३,१ ६ |
| बिहार ओरिसा संस्थानें | २८४ | २४७ |
| मुंबई इलाखा संस्थानें | १७,२५,८१२ | १५,४१,८ [illegible] |
| मध्यहिंदुस्थान संस्थानें | ६५,९१३ | ५३,०३९ |
| ग्वाल्हेर | | २३,०३२ |
| मध्यप्रांत सस्थानें | १,४६,११९ | |
| हैद्राबाद संस्थान | ३४,९८,७५१ | ३ ,९८,७३३ |
| मद्रास इलाखा संस्थानें | ४१,८६९ | ३४,११५ |
| कोचीन | २२,२२५ | २०,६२५ |
| त्रावणकोर | १७,८२० | ११,९२९ |
| म्हैसूर | ८७,४७६ | ९०३२८ |
| राजपुताना संस्थानें | २,०२८ | १,७७५ |
| सिकीम संस्थान | २२२ | |
| इतर प्रांत | १६५ | १३६ दिल्ली |
| एकंदर लोकसंख्या | १,९८,०६,६३६ | १,८७,९७,८३१ |

गोव्यानीज २४,२७४, कोंकणी ४,९५,९०२, मध्य मराठी ६१,९३,०८३, उत्तर कोंकणी २३,५०,८१७, वऱ्हाडी, नागपुरी व इतर पोटभाषा ७६,७७,४३२ कोंकणी १५.६५,३९१, संकीर्ण २,२५,२२५.



मराठी
व
इतर भारतीय भाषा
मराठी भाषेचा प्रांत.
बलोच
बलोच
ब्राहुइ
मकराणी
पंजाबी
पश्चिम पहाडी
मध्यपहाडी
पूर्व पहाडी
हिंदुस्तानी
ब्रज
राजस्थानी
माळवी
गुजराती
बघेली
मैथिली
बिहारी
मागधी
आसामी
बंगाली
उरिया
मुंबई
रत्नागिरी
सोलापूर
हैद्राबाद
हुबळी


मराठी भाषा
प्रांतिक भेद
दर १०००पैकी बोलणारे लोकांची संख्या.
८५०० - ९५००
७५०० - ८५००
७५०० चे खाली.
अन्य भाषांचा प्रदेश.
गुजराती
नेमाडी
राजस्तानी
पश्चिम हिंदी
पूर्व हिंदी
खानदेशी
अहिराणी
नागपुरी
नागपूर
वर्धा
चांदा
वैरागड
गोंड
लांजी
हळबी
बैतूल
सिवनी
तेलगु
कानडी
दमण
वसई
मुंबई
ठाणे
अंजिरा
रत्नागिरी
गोवा
करवार
नासीक
औरंगाबाद
पैठण
अहमदनगर
पुणें
सातारा
पंढरपूर
सोलापूर
अक्कलकोट
विजापूर
सांगली
बीड
बार्शी
देगलूर
बेदर
बुलढाणा
अकोला
अमरावती
वाशीम
यवतमाळ
माहूर
चिन्पावनी
कुडाळी

खाली दिलेल्या तक्त्यांतील आंकडे १९३१ च्या खानेसुमारीच्या याद्यांवरून घेतले आहेत.

| भाषेचें नांव | प्रांत | बोलणाऱ्यांची संख्या |
|---|---|---|
| मॉनख्मेर आणि मलाय. | ब्रह्मदेश, आसाम, निकोबार | ७,३३,००६ |
| मुण्डा | आसाम, बंगाल, बिहार, म. प्रांत | ४६,०५,०७१ |
| तिबेट, ब्रह्मी | आसाम, ब्रह्मदेश, बंगाल | १,२९,८९,६०६ |
| ब्रह्मी | ब्रह्मदेश | ९८,७४,४६७ |
| ताइचिनी, करेन, मत | ब्रह्मदेश, आसाम | २३,६९,९४७ |
| तामीळ | मद्रास, म्हैसूर | २,०४,११,६५२ |
| मल्याळी | मद्रास | ११,३७,६१५ |
| कानडी | मुंबई, म्हैसूर, मद्रास, हैद्राबाद | १,१२,०६,३८० |
| तेलगु | मद्रास, हैद्राबाद, म्हैसूर | २,८३,०३,५१४ |
| इतर | | ४५,१३,४९२ |
| दार्दीक | वा. प्रा. बलुचिस्तान, काश्मीर | ३७,८८,९६७ |
| सिंधी | सिंध | ३७,२९,३९९ |
| पंजाबी, ल्हांडी | पंजाब, काश्मीर, वा. प्रा. सिंध | २,४६,६०,६८० |
| मराठी, कोंकणी | मुंबई, म. प्रांत, वऱ्हाड, हैद्राबाद | २,१३,६१३९९ |
| हिंदुस्तानी | संयुक्त प्रांत, मध्यप्रांत. मध्यहिंदुस्थानी, पंजाब, राजपुताना | १२,१२,५४,८९८ |
| पहाडी | आसाम, बंगाल, संयुक्तप्रांत, काश्शीर, पंजाब | २७,५२,४३२ |
| उरिया | ओरिसा, मद्रास | १,११,९४२६५ |
| बंगाली | बंगाल, आसाम | ५,३४,६८,४६९ |
| आसामी | आसाम | १९'९९,०५८ |
| इतर | | १,३२,७८,७२० |

# सूचि

[ आंकडे पानांचे आहेत. ]